भट्टोजी दीक्षितकृत

# प्रौढ मनोरमा

व

त्या ग्रंथावरील शब्दरत्ननामक टीका

यांचें स्त्रीप्रत्ययान्त

विस्तृत विवरणासह व प्रक्रियेसह

मराठी

# सुबोध भाषांतर

## भाग २ रा

(परिभाषाप्रकरणम् व अच्संधितील 'वान्तो यि प्रत्यये' पर्यंत)

★

विवरणकर्ता

कै० रावबहादुर ना. दा. वाडेगांवकर, एम्. ए.

सेवानिवृत्त डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज, नागपूर.

★

किंमत रु. ८·५०

# अर्पणपत्रिका-

कर्तव्यनिष्ठा व न्यायप्रियता यांमुळें पारतंत्र्याच्या काळांतील सरकारी नौकरींतहि सरकार व समाज-मान्यता पावलेले, ईश्वरावरील अनन्य विश्वास हें ज्यांच्या जीवननौकेचें एकमेव सुकाणु होतें, ज्यांच्या पराकाष्ठेच्या विद्याभिरुचीनें व्यसनाची मर्यादा गाठली होती अशा माझ्या परमपूज्य कै. ती. ना. दा. वाडेगांवकर यांच्या स्मृतीस त्यांचीच ही कृति अंशात्मक प्रकाशित स्वरूपांत अत्यंत श्रद्धायुक्त अंतःकरणानें व नम्रभावानें समर्पण करीत आहे.

# मनोरमा व शब्दरत्न

यांचें

# मराठी भाषांतर

## भाग २ रा

## अनुक्रमणिका



परिभाषा प्रकरणम्

---



कै. रावबहादुर ना. दा. पाढेगांवकर, एम्. ए.
सेवानिवृत्त डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज, नागपूर.

# ग्रंथकर्त्यांचा अल्प परिचय

**या** भागांतील जुन्या सुविद्य पिढींत रा. ब. नारायण दाजीबा वाडेगांवकर यांचा परिचय ज्यास नाहीं असा माणूस विरळाच. त्यांनी लिहिलेल्या प्रस्तुत ग्रंथाच्या प्रकाशनाच्या संदर्भानें नवीन पिढीस त्यांची ओळख व्हावी म्हणून त्यांचेविषयीं जी कांही थोडी माहिती उपलब्ध आहे ती येणेंप्रमाणें–

कस्तुरीचा परिमल जसा आसमंतांत सारखा दरवळत असतो तसाच कै. नारायणरावांचा कीर्तिसौरभ त्यांच्या वैकुंठवासानंतर देखील लोकांच्या आठवणींत आहे. वयाच्या ७९ व्या वर्षी त्यांचें देहावसान झाल्यानंतर स्थानिक पत्रकारांनी त्यांचेविषयीं जे उदार उद्‌गार काढले ते केवळ त्यांचेविषयींच्या कृतज्ञताबुद्धीनेंच नव्हे तर त्यांचे अंगीं मोठेपणास शोभा आणणारे त्यांचे जे अनेक पैलू होते त्यांच्या समर्थनार्थहि होय. त्यांच्या निधनानें त्यांच्या समकालीनांना एक निष्णात कायदेपंडित, विद्वान् नागरिक व निस्पृह, निरभिमानी व कर्तव्यदक्ष व्यक्ति नाहीसे झाल्याची तीव्र जाणीव झाली व सारी जनता त्यामुळें हळहळली, यांतच त्यांच्या मोठेपणाचें सारसर्वस्व सामावलेलें आहे.

स्वतःचें मोठेपण स्वतःच्या गुणानुषंगानें घडविणारी व्यक्ति या दृष्टीनें त्यांच्या जीवनाकडे दृष्टिक्षेप करितांच त्यांचें व्यक्तित्व विलोभनीय वाटते व त्यांच्याविषयींच्या आदरानें मन विनम्र होतें.

नारायणरावांचा जन्म वाडेगांवकरांच्या कुटुंबांत दिनांक १० मार्च १८७१ ला झाला. त्यावेळीं त्यांचे वडील दाजी हरी हे "ऑनररी मॅजिस्ट्रेट" च्या कचेरींत मोहरीर होते. नागपूरला असे-तों त्यांचें कर्तृत्व उनाडपणा करण्यांत व्यतीत होत असल्याकारणानें साहजिकपणेंच अभ्यासावर तें स्थिरचित्त होऊं शकलें नाहीं; पण

त्याच्या आयुष्यास कलाटणी मिळावयाची होती म्हणूनच की काय त्याच्या वडिलाची बदली रामटेकला झाली. तेथे असताना ते गडावर श्रीरामाच्या दर्शनास नित्य जाऊ लागले आधीच भक्ति-परायण मन, त्यात त्या पावनक्षेत्राचा सयोग होताच अकुररूपाने त्याचे ठायी वसत असलेल्या सुसस्कृत भावनाचा विकास होऊ लागला व त्याची कुशाग्र बुद्धि व्यवहारात देखील बाळसे धरू लागली तेव्हापासून शाळेतील अभ्यासात ते सदैव अग्रेसर असत. त्याना वयाच्या पाचव्या वर्षीच शब्दरूपावलि मुखाग्र होती.

ते १० वर्षाचे असतानाच त्याचे लग्न राधाकृष्णशास्त्री घोगे याची कन्या रगूताई हिचेशी झाले वे शा म. श्रीकृष्णशास्त्री घोगे हे त्याचे आजेसासरे होते ते धर्मनिष्ठ व ज्योतिर्विद असल्यामुळे नारायणाच्या उज्ज्वल भवितव्याचा कयास त्यानी आधीच बाधला होता लग्न ठरले त्यावेळी त्याचे मित्र श्रीकृष्णशास्त्र्याना म्हणत, "शास्त्रीबोवा, तुमची नात इतकी गोरी, पण तुमचा नात–जावई फारच काळा आहे." त्यावर ते म्हणत, "असेल ! पण त्याची कुडली कीर्तीच्या शुभतेने उजळ झालेली आहे, तो आयुष्यात मोठा हुद्दा मिळविल्याशिवाय राहणार नाही." आणि त्याचे ते भाकित खर ठरले.

नारायणरावाचे पाय पाळण्यातच दिसू लागले. १८८५ साली ते इग्रजी चवथ्या वर्गात प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले. शुक्लपक्षातील चद्र जसा कलेकलेने वर्धमान होतो, अगदी तसेच नारायणरावाचे देखील झाले इतःपर दिलेल्या सर्व परीक्षात त्यानी आपली प्रथम श्रेणी अतर दिली नाही. कलकत्ता विश्वविद्यालयाच्या एम्. ए. च्या सस्कृत (आनर्स) विषयातील यशाने तर त्याच्या यशोमदिरावर सुवर्णकळस चढविला.

सन १८८७ मध्ये नागपूर येथील सीटी विद्यालयातून ते मॅट्रिकची परीक्षा १ ल्या वर्गात पास झाले नतर त्यानी हिस्लॉप

कॉलेजमध्यें प्रवेश घेतला. त्यांचा आंतरिक कल न्यायशास्त्र व संस्कृत या विषयांकडे असल्याकारणानें इंटर–सायन्सची परीक्षा पहिल्या वर्गात पास होऊन देखील त्यांनी बी. ए. करितां संस्कृत विषय घेऊन "आर्टस्" मध्यें प्रवेश घेतला. नागपूरचे प्रथितयश वैय्याकरणी कै. म. म. भटजीशास्त्री घाटे हे त्यांचे संस्कृत विषयाचे गुरु होत. व्याकरणाची संथा नारायणरावांनी त्यांचेपाशींच घेतली. १८८९ मध्यें एफ्. ए. च्या परीक्षेंत त्यांना शिष्यवृत्ति मिळाली होती व १८९१ मध्यें कलकत्ता विश्वविद्यालयाची बी. ए. ची परीक्षा तत्वज्ञान व संस्कृत हे दोन विषय घेऊन ते पहिल्या क्रमांकांत उत्तीर्ण झाले.

सन १८९३ मध्यें ते कलकत्ता विश्वविद्यालयाच्या एम्. ए. च्या परीक्षेस संस्कृत (ऑनर्स) घेऊन बसले. या परीक्षेंत त्यांचा क्रमांक दुसरा लागला हें कळतांच त्यांना त्यांत कांही तरी विपरीत असावें असा संशय आला व तो त्यांनी हिस्लॉप कॉलेजचे त्यावेळचे गणिताचे आचार्य कै. श्री. भगिरथप्रसाद व प्राचार्य ख्रिस्तवासी रे. व्हिटन यांचेपाशीं बोलून दाखविला. रे. व्हिटन यांनी कलकत्ता–विश्वविद्यालयाच्या रजिस्ट्रारकडे चौकशी केली व नारायणरावांचे पेपर पुन्हा तपासावे अशी विनंती केली. ती रजिस्ट्रारनें मान्य करून नारायणरावांचा पेपर पुन्हा तपासून पाहतांच नारायणरावांचाच क्रमांक पहिला आहे असें आढळून आलें. आपल्या कर्तृत्वाबद्दल नारायणरावांना किती आत्मविश्वास होता हें यावरून दिसून येतें. रजिस्ट्रारनें तात्काळ नारायणरावांचा पहिला क्रमांक जाहीर केला व झालेल्या चुकीबद्दल खेद प्रदर्शित केला. नारायणरावांना सुवर्ण पारितोषक व इतर बक्षिसें देण्यांत आलीं. या त्यांच्या अपूर्व यशाचा गौरव म्हणून त्यांना I. C. S. च्या शिक्षणाकरितां "प्रेमचंद रायचंद" यांची शिष्यवृत्ति विश्वविद्यालयानें देऊं केली; पण त्यांच्या कुटुंबियांना व वडिलधाऱ्या मंडळींना त्यांचें परदेशगमन उचित न वाटल्याकारणानें त्यांनी ही शिष्यवृत्ति नाकारली.

याप्रमाणें आपलें भाग्य आपल्या स्वत:च्या परिश्रमानें व निष्ठेनें घडवीत घडवीत त्यांनी शैक्षणिक क्षेत्रांत उच्चांक गांठला. शिक्षणांतील निष्कलंक प्रगति नारायणरावांप्रमाणें फारच थोड्यांच्या वाट्यास आली असेल. त्यांत आश्चर्य व अभिमानाची गोष्ट ही कीं, त्यांनी हें सर्व शिक्षण स्वत:ची योग्यता निकषावर सिद्ध करून मिळविलेल्या शिष्यवृत्यांतूनच केलें. परभृतता जणूं त्यांच्या गांवींहि नव्हती.

ते एम्. ए. च्या परीक्षेनंतर नोकरीकडे वळले. सन १८९३ मध्यें इ. ए. सी. म्हणून त्यांची नेमणूक झाली. गरीबांना हे उच्चपदाधिकार दिल्यास ते लांचलुचपत खातील अशी शंका त्यावेळीं व्यक्त करण्यांत आली होती. परंतु कै. रा. ब. ढोवळे व नारायणरावांनी आपल्या निर्मळ व निर्लेप आदर्शानें ती कल्पना विफल केली. चीफ कमिश्नर मॅक्डोनल्ड साहेबांनी पुढाकार घेऊन ज्या त्यांच्या नेमणुका केल्या होत्या, त्या त्यांनी यथार्थ ठरविल्या.

नारायणरावांनी कायद्याची कोणतीहि परीक्षा दिली नव्हती; त्यामुळें नोकरींतील पुढील उन्नतीस अडथळा येईल अशी शंका कोणी त्यांचेपाशीं व्यक्त करितांच "लॉ टर्म्स" भरण्याचें त्यांनी मनावर घेतलें व त्याकरितां रजा मिळावी या आशयाचा अधिकाऱ्यांकडे अर्जहि केला. पण त्यावेळी ज्युडीशिअल कमिश्नर असलेले सर स्टॅन्ले इस्मे यांनी त्यांची ही शंका निरसन करून कायद्याच्या प्रमाणपत्राची नोकरीच्या प्रगतीच्या दृष्टीनें त्यांना कांहीहि आवश्यकता पडणार नाही असें आश्वासनपर अभिवचन देऊन त्यांना त्यांच्या निश्चयापासून परावृत्त केलें; एवढेंच नव्हे तर बऱ्याच वरच्या लोकांना मागें सारून सर स्टॅन्ले यांनी नारायणरावांची सिव्हिल जज्ज म्हणून जबलपूरला नेमणूक केली. १९१६ मध्यें सर हेन्री ड्रेक ब्रॉकमन साहेबांनी त्यांना भंडाऱ्यास ॲडिशनल डिव्हिजनल ॲन्ड सेशन्स जज्जच्या अधिकारावर एक हजार रुपये मासिक

पगारावर पाठविलें व १९२० मध्यें डिस्ट्रिक्ट अँड सेशन्स जज्ज म्हणून नागपूरला त्यांची बदली झाली. ऑकमन साहेब हे कायद्याचे नियम करितांना नारायणरावांची मदत घेत असत. यावरून नारायणरावांच्या कायद्याच्या ज्ञानाची यथार्थ कल्पना येईल. १९२५ मध्यें अॅडिशनल ज्युडीशिअल कमिश्नर हे सुटीवर जातांच त्यांचे जागीं नारायणरावांची कांही दिवसांसाठी नेमणूक झाली व १९२६ मध्यें ते सेवानिवृत्त झाले.

या थकत्या काळांत वास्तविक देहाला पूर्ण विश्रांति देण्याची कल्पनाच कोणाच्याहि मनांत आली असती; पण ते स्वस्थ बसले नाहीं. त्यांचा पिंडच मुळीं कर्तृत्ववान धुरंधराचा होता. तो जसा स्थळास्थळावर आपली विजय पताका रोवून अग्रेसर होत जातो, तसे नारायणरावांनीहि केलें. "कृतांतकटकामलध्वज" असलेली जरा दार ठोठावत असतांना तिला न जुमानतां उत्साहानें, नितांत श्रद्धेनें व दुर्दम्य उत्साहानें त्यांनी आपल्या आयुष्याची उर्वरित पाऊलवाट ठरविली. तत्वज्ञान व संस्कृत या दोन विषयांची त्यांना भारी आवड. काशीला जाऊन विद्वान पंडितांच्या सहवासांत त्यांनी आपल्या संस्कृत–व्याकरण विषयक ज्ञानावर जी थोडी राख "अनभ्यासेन नश्यति" या नियमानुसार बसली होती ती पार झाडून टाकली व स्वत:ला वाङ्मयसेवेला वाहून घेतलें. संस्कृत–व्याकरण विषयक ग्रंथाचें आपातत: मंथन करून पुस्तकरूपाने ज्ञान–दानाचें पुण्य पदरीं पाडावें या एकमेव महत्वाकांक्षेने प्रेरित होऊन नारायणराव आपले मित्र कै. श्री. गोपाळराव गर्दे या प्रकांड पंडितावरोबर अध्ययन करूं लागले. नागपूरच्या भर उन्हाळ्यांत-सुद्धां हे दोघे जराजीर्ण पण ज्ञानपिपासु मित्र परीक्षेच्या आदल्या दिवशीं आधुनिक विद्यार्थी जसा जीव ओतून ओतून अभ्यास करितात, तसे अभ्यास करीत असलेले लोकांनी प्रत्यक्ष पाहिलें आहे.

त्यांच्या या निष्ठायुक्त वाङ्मयसेवेंतून दोन अपत्यें जन्माला आलींत. एक परिभाषेन्दुशेखर या व्याकरणावर सर्वश्रेष्ठ असलेल्या

ग्रंथाचें सटीक भाषांतर आणि दुसरें प्रौढमनोरमा व शब्दरत्न या ग्रंथांचें विवरणात्मक भाषांतर. पैकी पहिलें पुस्तक प्रसिद्ध झालें असून उरलेलें हस्तलिखिताच्या अवस्थेंत प्रकाशनाची प्रतीक्षा करीत आहे. या ग्रंथाचा पहिला भाग १९५१ सालीं त्यांचे पहिले श्राद्धदिनीं प्रसिद्ध झाला.

जसें नोकरीत असतांना, तसेंच इतर व्यवहारांतहि ते अतिशय वक्तशीर, दक्ष व न्यायनिष्ठुर असत. आपल्या हाताखालील त्याच-प्रमाणें परिवारांतील लोकांकडूनहि त्यांची तत्सम वागणुकीची अपेक्षा असे. पण असें असतांना देखील त्यांचा मूळ दयाळू स्वभाव मात्र लोप पावत नसे. त्यांच्या विद्वत्तेचा व अधिकाराचा फायदा त्यांनी निरभिमानी वृत्तीनें अनेकांना करून दिला.

उपरोक्त कार्यव्यग्रतेमुळें राजकीय क्षेत्रांत त्यांना फारसें लक्ष घालता आलें नाही. न्यायमूर्ति माधवराव रानड्यांच्या पंक्तीत त्यांना स्थान दिल्यास वस्तुस्थितीचा विपर्यास करणारें होणार नाही असें वाटतें. तरीपण यथावकाश आणि यावच्छक्य त्यांनी नागपूर येथे पहिली कांग्रेस भरली असतांना सीटी स्कूलचे मुख्याध्यापक श्री. जोशी व हिस्लॉप कॉलेजचे गणिताचे प्राध्यापक श्री. भगीरथप्रसाद यांचेसह वर्गणी गोळा करण्याकरितां प्रांतभर दौरा केला.

संधि प्राप्त झाल्यास ते समाजसेवा करण्यासहि तत्पर असत. १८९१ मध्यें प्राध्यापक कै. रा. ब. सदाशिव जयराम यांचे जागीं हिस्लॉप कॉलेजमध्यें त्यांनी कांहीं काळ प्राध्यापकाचें काम केलें. नंतर सेवानिवृत्तिनंतर भोंसला संस्कृत महाविद्यालयात (सीताबर्डी) ते संस्कृत शिकवीत असत. तेथेंच त्यांनी हिंदु कायद्यांतील मिताक्षरेवर कांहीं व्याख्यानें दिलीं. या व्याख्यानास नागपूरचे नामांकित वकील श्री. भैय्यासाहेब बोबडे, कै. आर. एन्. पाध्ये, कै. गोपाळराव देव, कै. विश्वनाथराव केळकर, श्री. बळवंतराव मंडलेकर, कै. रा. ब. बापूराव दिनगेट वगैरे मंडळी नियमितपणें व आग्रहें उपस्थित

असत. सेवासदन हायस्कुलांत संस्कृत शिक्षक नसल्यामुळें यांनी तेथें मॅट्रिकचे वर्गास कांही काळ शिकविलें डॉ. करंबेलकर, श्री. बाळशास्त्री हरदास वगैरे मंडळी त्यांचेकडे शिकण्यासाठी व आपल्या त्या विषयांतील अडचणींची फोड करून घेण्यासाठीं येत असत. त्यांना शिकविण्याची फार हौस असे. कायद्याचें कोणत्याहि प्रकारचें प्रमाणपत्र नसतांना त्यांनीं जे न्याय–निर्णय दिले ते प्रशंसापात्र ठरलेत. नागपूरच्या "लॉ रिपोर्टर" मध्यें त्यांचे अनेक निर्णय प्रकाशित झाले आहेत.

कै. पंढरिनाथशास्त्री घाटे, कै. बाळाशास्त्री घाटे, कै. म म. केशवराव ताह्मण, कै. गोपाळराव गर्दे या समकालिनांत आपल्या गुण-प्रकर्षानें ते खरोखरच शोभून दिसत असत. त्यांनी हातीं घेतलेलें कोणतेंहि काम पूर्ण केल्याशिवाय त्यांना उसंत पडत नसे, इतके ते कृतनिश्चयी होते. निस्पृहता, आपल्या सनातन संस्कृतीवरील प्रेम, परिवारांतील मंडळींना व होतकरु विद्यार्थ्यांना दयाळू अंतःकरणानें मदत करण्याची आस्था व तत्परता, सत्याची आवड व कर्तव्य-परायणता या शेलक्या गुणसमुच्चयानें मंडित असलेल्या त्यांच्या तपस्वी जीवनांत एक प्रकारचें तेज ओसंडत होतें. निरलसपणें निष्ठेचें पाथेय जवळ बाळगून त्यांनी जी शिक्षण, व्यवसाय व वाङ्मयसेवा या त्रिविध प्रांगणांत त्रिस्थळी यात्रा केली ती त्यांच्या जीवनास प्रशोभित करणारीच ठरली. सरकारी नोकरींत असतांना सेवेचा व्याप सांभाळून घरीं आल्यानंतर पित्याची एकनिष्ठेनें सेवा केल्या-शिवाय ते कधींहि राहिले नाहीत; कदाचित् असेंहि असेल कीं याच पुण्यसंचितामुळे त्यांच्या आयुःपथांतील प्रगतीला उन्मुख होऊन येणारे अडथळे निखळून पडले असतील व त्यांची निष्कंटक वाटचाल यशोमय व दीप्तिमान् झाली असेल.

---

in Nagpur L. R. It was during his time that the Judicial service in C. P. was reorganised on modern lines (C. P. was a Non-Regulation province) and the many helpful suggestions he made concerning the service in the early stages of its growth were embodied in the procedural Rules and Regulations that were then framed for the guidance of Courts. Throughout practically the whole gamut of his official life, he had been doing the responsible work of a District Judge, though under different designations. As a judge he had few equals and none superior. His judgments were always marked by lucidity, thoroughness and a sense of absolute fairness and impartiality. In his administrative capacity he was a hard task master. He had set himself a high standard of judicial rectitude and efficiency and expected those placed under him to maintain it unflinchingly and he did not spare those who did not. It was however this quality of his that was appreciated by the litigant public whose complaint even today is the lack of efficiency and looseness all along the line. He was a District and Sessions Judge of Nagpur for a long period, and his name had come to be so closely associated with that Court that without Wadegaonkar it seemed to be an unthinkable proposition!

It was, however, after his retirement that the public had a taste of the depth of his learning. As already stated, his forte was Sanskrit and Philosophy in which he had obtained laurels at the University. His aptitude in that

direction which had lain dormant during the preoccupations of office was re-kindled by the ample leisure then at his disposal. He did not lapse into intellectual stagnation as many pensioners are seen to do. He assiduously applied himself to the study of that seemingly dry and uninteresting subject of Paniniyan Grammar and succeeded in getting a mastery of it. For the benefit of Marathi readers interested he wrote two books on Paribhashendu Shekhar and Praudh Manorama and Shabdaratna ( books in Sanskrit on Grammar ). One of these has already been published in a bulky volume and has been well-received by those competent to judge. The other book which runs into serveral thousand pages awaits publication. Apart from this he had a passion for passing on the knowledge he possessed to others willing to secure it. Many including the present writer took advantage of his goodness and profited by his teaching.

In private life he was a model gentleman, simple, unassuming and kind. In religion he was a Sanatanist, if you like, but a Sanatanist in the best sense of that much-abused word. A devout and pious Hindu, he used to spend a part of each day in Pujas and prayers in the efficacy of which he had abundant faith. Nagpur is distinctly the poorer by his loss. May his soul rest in peace.

G. H. Gokhale
*Retd. Dist. & Sessions Judge*

( *Reproduced from the* "Hitavada" *Nagpur. 21-2-1950* )

# प्रकाशकाचें निवेदन

माझे परमपूज्य वडील, कै. रावबहादुर नारायण दाजीबा वाडेगांवकर, एम्. ए., सेवानिवृत्त डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज, नागपूर, यांनीं लिहिलेल्या "प्रौढ मनोरमा व शब्दरत्न यांचें विवरणात्मक मराठी भाषांतर" या ग्रंथाचा दुसरा भाग आज प्रकाशित करण्यांत मला फार आनंद वाटतो. या ग्रंथाचा पहिला भाग इ. स. १९५१ चे मार्चमध्यें प्रसिद्ध झाला. त्या भागांत वडिलांनीं स्वतः लिहिलेली प्रस्तावना व पहिलें संपूर्ण संज्ञाप्रकरण आलें आहे. या दुसऱ्या भागांत सबंध परिभाषाप्रकरण व अच्‌सन्धिप्रकरणांतील 'हलो यमां यमि लोपः' या सूत्राचें भाषांतर आलें आहे. या प्रकरणांतील उरलेला भाग तिसऱ्या भागांत येईल.

प्रस्तुत भागाचे प्रकाशनाचा एकूण खर्च माझे कनिष्ट बंधु रा. सा. वामनराव वाडेगांवकर, माजी सुपरिंटेंडेंट, अंध विद्यालय, नागपूर, यांनी देण्याचें पत्करल्यावरूनच हा दुसरा भाग प्रसिद्ध होत आहे. प्रकाशक या नात्यानें मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. त्यांनी हें कार्य करण्याचें मनावर घेतलें नसतें तर आजहि हा भाग प्रसिद्ध होणें दुरापास्त झालें असतें. म्हणून सहा वर्षांनंतर कां होईना पण त्यांनी सर्व खर्च सोसण्याचें ठरविल्यामुळेंच आज हा दुसरा भाग प्रसिद्ध होऊं शकला. म्हणून त्यांचे मानावे तितके आभार थोडेच होतील. या ग्रंथाचे प्रकाशनासाठीं आर्थिक सहाय्य मिळविण्याबाबद मी नागपूर, पुणें, मुंबई व बडोदें विश्वविद्यालयांकडे खटपट करून पाहिली. अझून तरी मला कोठेंच यश मिळालें नाहीं. पण यथावकाश सदरहू संस्थांकडून या प्रकाशनास यथायोग्य सहाय्य मिळेल असा मला भरवसा आहे.

येथें नमूद करण्यास मला अत्यंत आनंद वाटतो कीं, विदर्भ साहित्य संघाकडून १९५२ सालचें 'कै. श्रीमती सरस्वतीबाई देशमुख पारितोषक' या ग्रंथाचे पहिले भागास मिळालें. महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था (डे. व्ह. ट्रा. सोसायटी) पुणें, या संस्थेकडूनहि या ग्रंथाचे

पहिले भागास १०० रु. चे वक्षीस १९५४ साली मिळाले. तसेच नागपूर विश्वविद्यालयाने या ग्रथाचे पुरस्कारार्थ २०० रु. दिले आहेत. नागपूरचे दानशूर श्रीमत वावूरावजी देशमुख यानीहि २५० रु. ची देणगी देऊन या ग्रथाचा गौरव केला आहे. या आणि इतर वैयक्तिक देणग्यावद्दल मी सर्वांचे पुन. एकदा आभार मानणे माझे कर्तव्य समजतो. प्रस्तुत भागासबधी एक विशेष गोष्ट वाचकाच्या लक्षात आणून देणे आहे. ती ही की, 'अच्सन्धि' हे प्रकरण निव्वळ नाइलाज म्हणून खडित करावे लागले. सपूर्ण प्रकरण याच भागात देण्याचे ठरविले असते तर पृष्ठसख्या आवाक्यावाहेर गेली असती व प्रत्येक भागाला जी सरासरी पृष्ठसख्या शोभून दिसेल तिचाहि फार मोठा अतिक्रम झाला असता. अच्सन्धिप्रकरण खडित करावे लागल्यावद्दल मी वाचकाची मन पूर्वक क्षमा मागतो. मात्र यामुळे पुढील तिसरा भाग शक्य तितक्या लौकर प्रसिद्ध होणे सर्वतोपरी इष्ट आहे हे वाचकाना सहज पटेल, कारण त्याशिवाय या भागातील खडित प्रकरण पूर्ण होऊ शकणार नाही. यापुढील भागाचे त्वरित् प्रसिद्ध होणे कोणातरी सहृदय व्यक्तीच्या अथवा सस्थेच्या उदारपणावरच सर्वस्वी अवलवून राहील हे न सागताहि वाचकाच्या लक्षात येईलच

या भागाच्या प्रकाशनाच्या कामी सस्कृताची प्रुफे तपासण्यात श्री. रा. ल. रा उर्फ वावाजी कुळकर्णी यानी मला जी आपुलकीनें मदत केली त्यावद्दल मी त्याचा अत्यत आभारी आहे. तसेच माझ्या अनेक मित्रानी जी निरपेक्ष मदत केली तिचा नुसता निर्देश करून त्याशिवाय ही महान कामगिरी माझे हातून पार पडली नसती हे म्हणणे वावगें होणार नाही.

अशेष शब्दब्रह्माची अनन्यभावे उपासना करण्याच्या बुद्धीनेच वडिलानी ही वाङमयसेवा केली व त्याच्याच प्रेरणेने हा प्रकाशनाचा योग आला तेव्हा ती त्याच्याच चरणी रुजू होवो.

धतोली, नागपूर. खं. ना. वाडेगांवकर

॥ श्रीगुरुः शरणम् ॥

रा. रा. रावबहादुर ना. दा. वाडेगांवकर यांनी प्रौढ मनोरमा व शब्दरत्न या ग्रन्थांचें जें स्त्रीप्रत्ययान्त विवरण केलें आहे त्याचा बराचसा भाग मी वाचला. या ग्रन्थांत प्रथम प्रत्येक पंक्तीचा अक्षरार्थ देऊन पुढें कंसांत त्या पंक्तीचें विस्तृत व मार्मिक विवरण केलें आहे व आवश्यक ठिकाणीं पूर्ण प्रक्रिया दिली आहे. त्यामुळें ग्रन्थाचा बोध होण्यास साधारण बुद्धीच्या विद्यार्थ्याला देखील माझ्या मतें कांही अडचण येऊं नये. या ग्रन्थांत ठिकठिकाणीं भाष्य, प्रदीप, उद्योत, काशिका, पदमञ्जरी इत्यादि ग्रन्थांतून समर्पक उतारे दिले असल्यामुळें हा ग्रन्थ आदर्शभूत झाला आहे व युनिव्हर्सिटीसारख्या संस्थांनी हा माननीय ग्रन्थ संग्रहीं ठेवण्यास अत्यंत लायक आहे. विद्यार्थीवर्गाच्या हिताकरितां हा ग्रन्थ जितक्या लवकर छापला जाईल तितकें बरें व या ग्रन्थाचें हिन्दींत भाषान्तर करून तें छापल्यास यू. पी., पंजाब, बंगाल वगैरे प्रांतांतील विद्यार्थ्यांना फार फायदा होईल. मी हा ग्रन्थ वाचून फार प्रसन्न झालों आहे व एवढे कठिण व्याकरणशास्त्राचे ग्रन्थ महाराष्ट्र भाषेंत उतरविणें दुष्कर असून देखील रा. ब. वाडेगांवकर यांनीं हें जें काम सरळ व सुन्दर भाषा लिहून प्रशंसनीय रीतीनें केलें आहे त्याबद्दल मी त्यांचें मनःपूर्वक अभिनन्दन करितों.

बनारस<br>
ता. ६–१२–४४

गोपाल शास्त्री नेने<br>
व्याकरणाध्यापक, ग. सं. कॉलेज, बनारस

---

॥ श्रीगुरुः शरणम् ॥

संस्कृत भाषेतील शास्त्रीय ग्रन्थाचे मराठी भाषेत यथार्थ भाषान्तर करणे हे कार्य सगळ्यानाच उत्तम रीतीनें साधते असे नाही प आचार्य भक्त विष्णुशास्त्री बापट, दीक्षित भाऊशास्त्री लेले, म म प. वासुदेव शास्त्री अभ्यकर प्रभृति दिवगत व विद्यमान प धुण्डिराज शास्त्री ऊर्फ बापू दीक्षित बापट पाचगावकर प्रभृति ग्रन्थकारानी केलेली भाषातरे वजा करिता बहुतेक भावार्थानुवादात्मकच भाषातरे आहेत म्हणावयास हरकत नाही भाषातरित ग्रन्थात सुद्धा वेदातादि शास्त्रीय ग्रन्थाची भाषातरे लोकात प्रचलित असलेल्या दृष्टातादिकानी सुरुचिर तरी करिता येतात. परतु सर्वथा नीरस व क्लिष्ट अशा व्याकरण शास्त्रातील विशिष्ट टीकाग्रन्थाचे भाषातर सुव्यवस्थित व यथार्थ रीतीने करणे हे कार्य अति अवघड व फारच कष्टसाध्य असे आहे. म्हणूनच जेथे वेदान्त, धर्मशास्त्र वगैरे शास्त्रातील दहा दहा ग्रन्थाची भाषातरे झालेली मिळतात, तेथे व्याकरणशास्त्रातील दोन तीनच ग्रन्थाची भाषातरे झाली आहेत याचे कारण उघडच आहे प्रस्तुत ग्रन्थकारानी काही वर्षापूर्वी श्री. नागोजीभट्ट काळे यानी केलेल्या परिभाषेन्दुशेखर नावाच्या ग्रन्थाचे मराठीत सुन्दर भाषातर केलेले प्रसिद्ध आहेच आता प्रकृत ग्रन्थकारानी शब्दरत्न मनोरमेचे अव्ययान्त भागाचे मराठीत भाषातर केले आहे. ते मी बरेच स्थळी आपातत व एकाध प्रकरण अक्षरश. सपूर्ण वाचून पाहिले आहे त्यामुळे मला निश्चयाने असे सागता येते की सदरहू भाषातर प्राचीन परपरेला व मूळातील गभीर अर्थाला कोठेहि न सोडता उत्तम रीतीनें केलेले आहे व्याकरणासारख्या नीरस, क्लिष्ट शास्त्रातील अति कठिण टीकाग्रन्थाचे उत्कृष्ट भाषातर करिता येते याकरिता हा ग्रन्थ सर्वदा उत्कृष्ट उदाहरण म्हणून दाखविता येण्यासारखा आहे. अस्तु. ज्याना व्याकरणशास्त्राचे अध्ययन करण्याची आवड आहे परतु गुरूकडे जाऊन अध्ययन करिता येणे शक्य नाही, तसेच गुरूजवळ अध्ययन

करूनहि ग्रन्थ स्पष्ट होण्याकरितां पुनः चिंतनाची आवश्यकता आहे अशा उभयविध जिज्ञासूंना या ग्रंथानें फार उपयोग होणार आहे.

७५ चें आंतबाहेर वय, इन्द्रियें एका काळीं आपलीं असूनहि आपलीं नाहींत अशी साक्ष पटवीत आहेत. या कालांतील सांसारिक सुख, अशा परिस्थितींत १५–१५ तास दिवसा तसेंच रात्रींहि व्याकरण-शास्त्रासारख्या नीरस क्लिष्ट विषयांत एकाग्रचित्तानें विचार करीत समाधि स्थितींत असलेल्या श्रीमान् पंडित बाबासाहेब वाडेगांवकरांना पाहिलें म्हणजे प्राचीन विद्वानांचीं वर्णनें प्रत्यक्ष डोळ्यांसमोर उभीं राहतात. असो. हा ग्रन्थ लवकरच प्रसिद्ध होण्याचा योग यावा व मराठी भाषेंत एका उत्कृष्ट भाषांतराची भर पडावी अशी सदिच्छा प्रकट करितों.

पौप वद्य ६/२००१, बुधवार
ता. ६–१२–४४, काशी

पं. अनन्त शास्त्री फडके
व्याकरणाचार्य, मीमांसातीर्थ
प्रा. ग. सं. कॉ., काशी

---

॥ श्री विश्वनाथो विजयते तमाम् ॥

रा. ब. श्री. ना. दा. वाडेगांवकर यानी 'प्रौढ–मनोरमा आणि शब्दरत्न' ह्या व्याकरण शास्त्रावरील जटिल दोन ग्रन्थाचे जे महाराष्ट्र भाषेत विस्तृत विवरण केले आहे त्याचा काही भाग मी वाचला. हा ग्रन्थ सर्वांगसुन्दर जाहला आहे. जसा एखादा वैयाकरणमूर्द्धन्य आपल्या प्रियतम विद्यार्थ्यास प्रत्येक पक्तीचे विशद विवरण करून ग्रन्थाचे गूढ ग्रन्थिरहस्य एकान्तात सागतो तसे हे 'भाषान्तर' वाचकास चटकन ग्रन्थ प्रमेय सागते. यात प्रत्येक पक्तीचा अक्षरार्थ प्रथम देऊन नतर कंसांत त्याचे विस्तृत विवरण केले आहे व जेथे प्रक्रिया देणे आवश्यक आहे तेथे सूत्रे देऊन सविस्तर प्रक्रिया दिली आहे आणि ठिकठिकाणी भाष्य, काशिका, प्रदीप, उद्योत, शब्देन्दुशेखर, पदमजरी इत्यादि ग्रन्थातील समर्पक उतारे दिले आहेत, त्यायोगे ग्रन्थ समजण्यात अडचण जात नाही. माझी पूर्ण खात्री आहे की ज्याने कौमुदीचे अध्ययन केले आहे त्याला शिक्षकाच्या सहाय्याशिवाय हा ग्रन्थ वाचल्याने मनोरमा व शब्दरत्न यातील पक्ति उत्तम रीतीने समजू शकते. असा सर्वोत्कृष्ट ग्रन्थ लिहिल्याबद्दल मी रावबहादुर याचे सप्रेम हार्दिक अभिनदन करितो. महाराष्ट्र प्रान्तात व्याकरणशास्त्राचा प्रचार विरल आहे. उत्तर (हिन्दुस्थानात) भारतात व्याकरणशास्त्राचा विशेष प्रचार असल्यामुळे या ग्रंथाचे हिन्दीत भाषान्तर होणे आवश्यक आहे. तसे भाषान्तर केल्यास व्याकरणशास्त्राध्ययन करणाऱ्या छात्रवर्गावर फार उपकार होतील.

बनारस
कार्तिक कृ. १३ सोमवार
ता. १३–११–४४

सदाशिव शास्त्री मुसलगांवकर
माजी प्रिन्सिपल, सस्कृत कॉलेज, ग्वाल्हेर

---

॥ श्री ॥

श्री. रा. ब. ना. दा. वाडेगांवकर यांनीं प्रौढ मनोरमा व शब्दरत्न या गहन ग्रन्थांचें महाराष्ट्र भाषेंत जें स्त्रीप्रत्ययान्त विवरण केलें आहे त्याचीं तीन प्रकरणें मी वाचलीं. या विवरणांत प्रत्येक पंक्तीचा प्रथम अक्षरार्थ देऊन पुढें कंसांत विस्तृत विवेचन केलें आहे व अवश्य ठिकाणीं सूत्रें व सूत्राङ्क देऊन पूर्ण प्रक्रिया दिली आहे, आणि तसेंच भाष्य, प्रदीप, उद्योत, शब्देन्दुशेखर, काशिका, पदमञ्जरी इत्यादि ग्रंथांतून आवश्यक स्थलीं समर्पक उतारे दिले असून त्यांचा भावार्थहि दिला आहे. त्यामुळें प्रत्येक पंक्तीचा उत्तम रीतीनें अर्थबोध होतो. हा ग्रंथ सरल व सुंदर भाषेंत लिहिला असल्यामुळें सामान्य बुद्धीच्या विद्यार्थ्याला देखील ग्रंथबोध होण्यांत कांहीं अडचण येऊं नये. शब्दरत्नाची भाषा फार अवघड आहे व त्या ग्रंथाचा गूढार्थ मराठी भाषेंत पूर्णपणें उतरविणें हें दुष्कर असून देखील या विवरणांत तें उत्तम रीतीनें केलें. सारांश हें विवरण अत्यन्त सुंदर, बोधप्रद व आदर्शभूत झालें आहे व या उतारवयांत शरीर रोगग्रस्त झालें असून देखील वाडेगांवकर साहेबांनी जो एवढा प्रचण्ड व सुंदर ग्रन्थ निर्माण केला आहे त्याबद्दल त्यांचें जितकें कौतुक व अभिनंदन केलें तितकें कमीच आहे.

ता. ६-१२-४४

दिवाकर शास्त्री जोशी,<br>
व्याकरणाचार्य,<br>
व्याकरण शास्त्राध्यापक, गवर्नमेण्ट संस्कृत<br>
कॉलेज व स्या. जैन विद्यालय, बनारस.

---

सर्वत्र मान्यता पावलेलें

# मनोरमा व शब्दरत्न

यांचें विवरणात्मक

## मराठी भाषांतर

(भाग १ ला)

(संज्ञा प्रकरणम्)

(प्रस्तुत पुस्तक 'विदर्भ साहित्य मंघ', 'महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था, पुणे', 'नागपूर विश्वविद्यालय' इत्यादि संस्थाकडून पुरस्कृत झाले आहे.)

विवरणकर्ता

कै. रावबहादुर ना. दा. वाडेगांवकर, एम्. ए.
सेवानिवृत्त डिस्ट्रीक्ट व सेशन्स जज्ज, नागपूर

॥ श्रीगणेशायनमः ॥

# ॥ अथ परिभाषाप्रकरणम् ॥

मनोरमा--"इको गुणवृद्धी" गुणवृद्धिशब्दाभ्यामिति। एतच्च पूर्वसूत्राभ्यां गुण-वृद्धिपदे अनुवर्त्य गुणोवृद्धिरिति। ये गुण-वृद्धी इति योजनया लभ्यते, तेनेह न, "दिव औत्" द्यौः। "त्यदादीनामः" सः, इमम्। षष्ठ्यन्तमिति। सूत्रे षष्ठ्यन्तस्यानुकरणाच्छब्दस्वरूपपरतया नपुंसकत्वात्सोर्लुगिति भावः। पदमिति। तच्च सम्भवति सामानाधिकरण्ये इगन्तस्याङ्गस्येत्यादिक्रमेण संबध्यते। "मिदेर्गुणः" "मृजेर्वृद्धिः" इत्यादौ तु सामानाधिकरण्यासंभवान्मिदिमृज्योरवयवस्येक इति संबध्यते। यत्तु-'इक एव स्थाने स्तः' इति प्राचा *व्याख्यातम्, यच्च-तट्टीकाकृतोक्तमनियमप्रसङ्गे नियमार्थमि*दमित्यादि, तत्सर्वं भाष्यविरोधादुपेक्ष्यम्, तच्छेषपक्षं दूषयित्वा पदोपस्थितिपक्षस्यैव भाष्ये समर्थितत्वादित्याहुः। तच्छेषपक्षेऽपि दूषणोद्धारस्तु शब्दकौस्तुभे स्पष्टीकृतोऽस्माभिः।

'इको गुणवृद्धी' सू. ३४ या सूत्राचा 'गुणवृद्धिशब्दाभ्यां यत्र गुणवृद्धी विधीयेते तत्रेक इति षष्ठ्यन्तं पदमुपतिष्ठते' असा जो कौमुदींत अर्थ केला आहे तो, या सूत्रांत पूर्व सूत्रांतून, म्हणजे 'अदेङ् गुणः' व 'वृद्धिरादैच्' या पूर्व सूत्रांतून, 'गुणः' व 'वृद्धिः' हीं पदें अनुक्रमें अनुवृत्त केल्यानें (व 'इति, उच्चार्य, विधीयेते' या तीन पदांचा अध्याहार केल्यानें आणि) 'गुणः, वृद्धिः, इति (उच्चार्य) ये गुणवृद्धी (विधीयेते') अशी पदांची योजना केल्यानें, निष्पन्न होतो. (इकाचा गुण व्हावा किंवा वृद्धि व्हावी एवढाच जर प्रकृत सूत्राचा अर्थ विवक्षित असता तर, 'वृद्धिरादैच्' व 'अदेङ् गुणः' या पूर्व सूत्रांतून 'वृद्धिः' व 'गुणः' या पदांची अनुवृत्ति केल्यानें तसा अर्थ

होऊ शकला असता व प्रकृत सूत्रांत पुन्हा 'गुणवृद्धी' या पदाचें ग्रहण करण्याची काहीच गरज नव्हती. तरी पण प्रकृत सूत्रांत त्या पदाचें ग्रहण केले असल्यामुळें, त्या पदाच्या पुनर्ग्रहणसामर्थ्याने प्रकृत सूत्राचा जसा कौमुदीत अर्थ केला आहे तसा अर्थ सिद्ध होतो असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे. प्रकृत सूत्रावरील भाष्यात –१–१–३– 'संज्ञया विधाने नियमः' हे वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात–'संज्ञया–गुणवृद्धिशब्दाभ्याम्–ये विधीयन्ते तेषु नियमः' व या भाष्यावर टीका करिताना कैयटाने 'गुणवृद्धयनुवृत्त्यैव गुणवृद्धयोरिकः सिद्धत्वाद्द्वितीय गुणवृद्धिग्रहणमाश्रितगुणवृद्धिशब्दव्यापाराश्रयणार्थं विज्ञायते। तेन गुण इत्येव यो गुणः, वृद्धिरित्येव या वृद्धिरिति विज्ञायते।' असे म्हटले आहे. आणि या वरील भाष्याला व कैयटवृत्तीला अनुसरूनच दीक्षितानी प्रकृत सूत्राचा कौमुदीत अर्थ केला आहे. येथें हे लक्षात ठेवावे की, प्रकृत सूत्रात अनुवृत्त केलेली 'गुणः' व 'वृद्धिः' ही पदे 'अनुवृत्तसंज्ञापदानां स्वरूपपरकत्वम्' या नियमान्वयें शब्दपरक असून, या सूत्रात निर्दिष्ट असलेले 'गुणवृद्धी' हे पद अर्थपरक आहे.) प्रकृत सूत्राचा असा अर्थ होत असल्यामुळे, 'दिव औत्' सू. ३३६ व 'त्यदादीनाम.' सू. २६५ या सूत्रात प्रकृत सूत्राची उपस्थिति होत नाही, व त्यामुळे 'द्यौः, सः, इमम्' ही रूपें सिद्ध होतात. (जरी 'दिव औत्' या सूत्रात 'वृद्धिरादैच्' सू. १६ या सूत्रान्वयें वृद्धिसंज्ञक असलेल्या 'औ'चे ग्रहण केले आहे तरी त्या सूत्रात 'वृद्धि.' या पदाचे ग्रहण करून वृद्धि होण्याचे विधान केले नसल्यामुळें, 'इको गुणवृद्धी' सू. ३४ ही परिभाषा त्या सूत्राचे ठिकाणी उपस्थित होत नाही व त्यामुळें 'दिव्' यातील इकाराची वृद्धि होत नाही. त्या सूत्रातील 'दिवः' ही स्थानषष्ठी असल्यामुळे, त्या सूत्रात 'अलोऽन्त्यस्य' सू. ४२ ही परिभाषा उपस्थित होऊन 'दिव्' यातील अन्त्य वकाराचे जागी 'औ' असा आदेश होतो व

त्यामुळें 'दिव्+सु = दि+औ+सु' अशी स्थिति झाली असतां, 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें 'दि' यांतील इकाराचे जागीं यणादेश होऊन 'द्यौः' असें इष्ट रूप सिद्ध होतें. त्याचप्रमाणें 'त्यदादीनामः' या सूत्रांत जरी 'अदेङ गुणः' सू. १७ या सूत्रान्वयें गुणसंज्ञक असणाऱ्या अकाराचें ग्रहण केलें आहे तरी त्या सूत्रांत 'गुणः' हें पद उच्चारून गुण होण्याचें विधान केलें नसल्यामुळें, त्या सूत्राचे ठिकाणीं देखील 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा उपस्थित होत नाहीं व त्या सूत्रांतील 'त्यदादीनाम्' ही स्थानषष्ठी असल्यामुळें, 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा उपस्थित होऊन त्यदादि सर्वनामांच्या अन्त्य वर्णाचे जागीं अकारादेश होतो. त्यदादिगणांत पठित असलेल्या सर्वनामांत 'द्वि' व 'इदम्' असे दोनच शब्द पठित आहेत कीं ज्यांत इक् आहे. त्यामुळें 'त्यदादीनामः' या सूत्राचे ठिकाणीं 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा उपस्थित झाल्यास, ती त्या दोन सर्वनामांनाच लागू पडेल व इतर त्यदादि सर्वनामांत इक् नसल्यामुळें तशा सर्वनामांना ती मुळींच लागू पडणार नाहीं. पण वर सांगितल्याप्रमाणें वरील सूत्रांत ती परिभाषा उपस्थित न होतां, 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा उपस्थित होत असल्यामुळें, 'तद्' व 'इदम्' यांतील अन्त्य वर्णाचे जागीं अकारादेश होऊन व 'अतो गुणे' सू. १९१ या सूत्रानें पररूप एकादेश होऊन 'तद्+सु= त+अ+सु = त+सु' व 'इदम्+अम् = इद+अ+अम् = इद+अम्' अशी स्थिति झाली असतां, 'त+सु' या स्थलीं 'तदोः सः सावनन्त्ययोः' सू. ३८१ या सूत्रानें तकाराचे जागीं सकार होऊन 'स+सु = सस्' अशी स्थिति झाल्यावर 'ससजुषो रुः' सू. १६२ या सूत्रानें 'सस्' यांतील अन्त्य सकारचें रुत्व होऊन व 'खरवसानयोर्विसर्जनीयः' सू. ७६ या सूत्रानें रेफाचा विसर्ग होऊन 'सः' असें इष्ट रूप सिद्ध होतें, आणि 'इद+अम्' या स्थलीं 'दश्च' सू. ३४५ या सूत्रानें दकाराचे जागीं मकार होऊन व 'अमि पूर्वः' सू. १९४

या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन ‘इमम्’ असें इष्ट रूप सिद्ध होतें. वरील दोन्ही उदाहरणांत अलोन्त्य परिभाषा उपस्थित न होतां ‘इको गुणवृद्धी’ ही परिभाषा उपस्थित झाली असती तर, ‘तद्’ या शब्दांत इक् नसल्यामुळें, ‘सः’ असें रूप मुळींच सिद्ध होऊं शकलें नसतें व ‘इदम्’ या शब्दांतील इक्‌ला गुण होऊन ‘इमम्’ असें इष्ट रूप सिद्ध न होतां, विकृत रूप सिद्ध झालें असतें.) प्रकृत सूत्रांतील ‘इकः’ हें पद ‘इकः’ या षष्ठ्यन्त पदाचें अनुकरण असून तें शब्दस्वरूपपरक असल्यामुळें, म्हणजे त्याचा अर्थ ‘इकः’ हें शब्दस्वरूप असा होत असल्यामुळें, (आणि तें पद ‘पदम्’ याचें विशेषण होत असल्यामुळें) ‘इकस्’ हें नपुंसकलिङ्गी असन्त प्रातिपदिक होऊन त्याहून ‘सु’ हा विभक्तिप्रत्यय झाला असतां, ‘स्वमोर्नपुंसकात्’ सू. ३१९ या सूत्रानें त्या ‘सु’ प्रत्ययाचा लुक् होतो. (‘इकःइति षष्ठ्यन्तं पदमुपतिष्ठते’ या कौमुदीच्या पंक्तींतील ‘इकः’ हें षष्ठ्यन्त पद नसून ‘इकः’ या षष्ठ्यन्त पदाचें तें शब्दस्वरूपपरक प्रथमान्त अनुकरण आहे व येथें भेदानुकरणपक्ष मानला असतां, ‘इकः’ या अनुकार्याचा जो अर्थ आहे तोच ‘इकः’ या अनुकरणाचा देखील होत असल्यामुळें व अशा रीतीनें त्या पक्षांत ‘इकः’ हें अनुकरण अर्थवान् ठरत असल्यामुळें, त्याला ‘अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम्’ सू. १७८ या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होते व तें ‘पदम्’ याचें विशेषण असल्यामुळें नपुंसकलिङ्गी होऊन त्याहून ‘सु’ हा विभक्तिप्रत्यय केला असतां, ‘इकस् + सु’ अशा स्थितींत ‘स्वमोर्नपुंसकात्’ या सूत्रानें ‘सु’ प्रत्ययाचा लुक् होतो आणि ‘न लुमताङ्गस्य’ सू. २६३ हा निषेध अङ्गाला कार्य करणें झाल्यास लागू पडत असल्यामुळें व पदसंज्ञा करणें हें तशा प्रकारचें कार्य नसल्यामुळें, ‘प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्’ सू. २६२ या सूत्रान्वयें ‘सु’ प्रत्यय विद्यमान आहे असें मानल्यानें, ‘इकस्’ याला पदसंज्ञा होते व त्यामुळें त्यांतील अन्त्य सकाराचें ‘ससजुषो रुः’

या सूत्रानें रुत्व होऊन व 'खरवसानयोर्विसर्जनीयः' या सूत्रानें रेफाचा विसर्ग होऊन 'इकः' असें नपुंसकलिङ्गाचें प्रथमेच्या एकवचनाचें रूप सिद्ध होतें.) जेथें सामानाधिकरण्य संभवत असेल तेथें 'इकः' हें षष्ठ्यन्त पद 'इगन्तस्य अङ्गस्य' इत्यादि क्रमानें अन्वित होतें. (उदाहरणार्थ 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू. २१६८ या सूत्रांत 'मिदेर्गुणः' या पूर्व सूत्रांतून 'गुणः' हें पद अनुवृत्त होत असल्यामुळें व अशा रीतीनें त्या सूत्रांत 'गुणः' हें पद उच्चारून गुण होण्याचें विधान केलें असल्यामुळें, त्या सूत्राचे ठिकाणीं 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा प्रवृत्त होऊन 'इकः' हें षष्ठ्यन्त पद उपस्थित होतें व तें सूत्र अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें त्या सूत्रांत 'अङ्गस्य' हें पद अनुवृत्त होतें. 'इकः' व 'अङ्गस्य' हीं दोन्ही पदें षष्ठ्यन्त असून त्यांचा सामानाधिकरण्यानें अन्वय होणें संभवत असल्यामुळें, 'इकः' हें पद 'अङ्गस्य' या पदाशीं विशेषणरूपानें अन्वित होतें व 'विशेषणं तदन्तस्य संज्ञा स्यात्' या अर्थाच्या वाचक 'येन विधिस्तदन्तस्य' सू. २६ या सूत्रान्वयें 'इकः' या विशेषणाचा 'इगन्तस्य' असा अर्थ होऊन 'इगन्तस्य अङ्गस्य गुणो भवति सार्वधातुकार्धधातुकयोः प्रत्यययोः परयोः' असा त्या सूत्राचा अर्थ होतो.) परंतु 'मिदेर्गुणः' सू. २३४६ 'मृजेर्वृद्धिः' सू. २४७३ इत्यादि स्थलीं सामानाधिकरण्यानें अन्वय होणें संभवत नसल्यामुळें, 'मिदिमृज्योरवयवस्येकः' अशा रीतीनें 'इकः' हें पद अन्वित होतें. ('मिदेर्गुणः, मृजेर्वृद्धिः' या सूत्रांत 'गुणः' व 'वृद्धिः' हीं पदें अनुक्रमें उच्चारून गुण व वृद्धि होण्याचें विधान केलें असल्यामुळें, या सूत्रांचे ठिकाणीं 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा प्रवृत्त होऊन 'इकः' हें षष्ठ्यन्त पद उपस्थित होतें व हीं दोन्ही सूत्रें अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें या दोन्ही सूत्रांत 'अङ्गस्य' हें पद अनुवृत्त होतें. 'इकः' व 'अङ्गस्य' हीं दोन्ही पदें जरी षष्ठ्यन्त आहेत तरी वरील दोन सूत्रांत त्यांचा 'इगन्तस्य अङ्गस्य' असा सामानाधिकरण्यानें अन्वय करतां येऊं शकत नाहीं; कारण 'मिद्,

मृज्' हीं अङ्गें इगन्त नसून हलन्त आहेत व त्यांच्या उपधेंत इक् आहे. म्हणून 'मिदेः, मृजेः' या अवयवषष्ठी ठरत असल्यामुळें 'मिदेरवयवस्य इकः, मृजेरवयवस्य इकः' असा वैयधिकरण्यानें अन्वय करून वरील दोन सूत्रांचा अर्थ करणें भाग आहे. सारांश जेथें दोन पदांचें सामानाधिकरण्य होणें संभवत असेल तेथेंच त्या दोन पदांपैकीं एक पद दुसऱ्याचें विशेषण मानून त्या दोन पदांचा विशेषण-विशेष्यरूपानें सामानाधिकरण्यानें अभेदान्वय करतां येतो. पण जेथें तसा सामानाधिकरण्यानें अन्वय होणें संभवत नाहीं तेथें वैयधि-करण्यानें अन्वय करणें भाग आहे व हाच अर्थ सांगणारा 'सम्भवति सामानाधिकरण्ये वैयधिकरण्यमन्याय्यम्' हा न्याय आहे.) प्रक्रिया-कौमुदीकारांनीं 'इकः एव स्थाने स्तः' असें जें प्रकृत सूत्राचें व्याख्यान केलें आहे व प्रसादकारांनीं त्या ग्रन्थावरील टीकेंत 'अनियमप्रसङ्गे नियमार्थम्' इत्यादि जें म्हटलें आहे तें सर्व भाष्यविरुद्ध असल्यामुळें स्वीकारार्ह नाहीं, कारण भाष्यांत तच्छेषपक्ष दूषित ठरवून पदोप-स्थितिपक्षाचेंच भाष्यकारांनीं समर्थन केलें आहे असें प्रकाशकारांनीं म्हटलें आहे. तच्छेषपक्षावर जीं दूषणें दिलीं आहेत त्यांचें देखील निराकरण कसें करतां येतें हें आम्ही शब्दकौस्तुभांत स्पष्ट केलें आहे. (तच्छेषपक्षावर कोणतीं दूषणें दिलीं आहेत व दीक्षितांनीं शब्द-कौस्तुभांत त्या दूषणांचें कसें निराकरण केलें आहे हें शब्दरत्नांत सांगण्यांत येईल. प्रक्रियाकौमुदीकारांनीं प्रकृत सूत्राचें व्याख्यान करितांना 'गुणवृद्धी स्वसंज्ञया विधीयमाने इक एव स्थाने स्तः' असें म्हटलें आहे व प्रसादकारांनीं आपल्या टीकेंत 'इयं परिभाषा, नाधिकारः, अस्वरितत्वात् ।...सा चानियमप्रसङ्गे नियमो विधीयते इति । यत्र साक्षात्स्थानी न निर्दिष्टः सार्वधातुकार्धधातुकयोः, सिचि वृद्धिः इत्यादौ, तत्रैव स्थानिनियमार्था प्रवर्तते । न अचोञ्णिति इत्यादौ, स्थानिनिर्देशात्' असें म्हटलें आहे. प्रकाशकारांचें असें म्हणणें आहे कीं, भाष्यकारांनीं पदोपस्थितिपक्ष, म्हणजे 'इकः इति षष्ठ्यन्तं

पदमुपतिष्ठते' असा पक्ष, हाच सिद्धान्तपक्ष मानला असल्यामुळें व वर जें व्याख्यान केलें आहे तें तच्छेपपक्षानुसार केलें असून पदोपस्थितिपक्षाला धरून नसल्यामुळें, स्वीकारार्ह नाहीं. प्रकृत सूत्रावरील भाष्यांत तच्छेषपक्ष, तदपवादपक्ष व पदोपस्थितिपक्ष हे तीन पक्ष सांगितले आहेत व पहिल्या दोन पक्षांचें प्रत्याख्यान करून तृतीय पक्ष सिद्धान्तपक्ष मानला आहे. या तीन्ही पक्षांचें विवरण शब्दरत्नांत करण्यांत येईल.)

शब्दरत्न—योजनयेति। यद्यपि तदनुवृत्त्यैव सिद्धे सामर्थ्याच्छब्दव्यापाराश्रयणेन लभ्यते मूलोक्तार्थः, तथाऽपि मन्दबुद्धिसाधारण्येन स्फुटत्वायैवमेवोक्तम्। स इति। अत्र नैव स्यादिति भावः। इममिति। अत्रेकारस्यैव स्यान्नत्वन्त्यस्येति भावः। सो लुंगिति। अत एव दीर्घो नेति भावः। तच्चेति। इक इति पदं चेत्यर्थः। अनेनात्र सूत्रे पदोपस्थितिपक्ष इति सूचयति। "अचो ञ्णिति" "ओर्गुणः" इत्यादौ तु नास्याः प्रवृत्तिः, लिङ्गस्य श्रुत्यपेक्षया दुर्बलत्वेन प्रथमतः श्रौताच्पदार्थादिघटितवाक्यार्थबोधे वृत्ते निर्दिष्टस्थानिकत्वेनोपस्थितस्यापीक्पदस्य वाक्यार्थेऽनन्वयात्। "सार्वधातुक" इत्यादौ तु तदुपस्थितिं विना स्थान्याकाङ्क्षाशान्त्यभावेन बोध एव नेति विशेषः। एवञ्च पदश्रुतिनिमित्तैषा पदैकवाक्यतयाऽन्वयवत्यन्तरङ्गा। स्थानषष्ठीत्वनिर्णये उपस्थिताऽलोऽन्त्यपरिभाषाया अनन्त्यस्य गुणव्यावृत्तये वाक्यैकवाक्यतयाऽन्वय इति बहिरङ्गा सा, तदाह—इगन्ताङ्गस्येत्यादि। मृज्योरवयवस्येति। एवं च स्थानषष्ठीत्वाभावनिर्णयेन "अलोऽन्त्यस्य" इत्यस्य प्रवृत्तिरेव नेति भावः।

'इको गुणवृद्धी' या सूत्रांत पूर्व सूत्रांतून 'गुणः' व 'वृद्धिः' हीं पदें अनुवृत्त केल्यानेंच (प्रकृत सूत्राचा कौमुदींत जसा अर्थ केला आहे तसा) इष्ट अर्थ सिद्ध होऊं शकला असता तरी (तसें केल्यानें प्रकृत सूत्रांत जें 'गुणवृद्धी' या पदाचें ग्रहण केलें आहे तें व्यर्थ ठरण्याची आपत्ति आली असती आणि ती आपत्ति टाळण्याकरितां) प्रकृत सूत्रांत

निर्दिष्ट असलेल्या 'गुणवृद्धी' या पदाचा लक्षणेनें अर्थ केल्यानें देखील जसा कौमुदींत या सूत्राचा अर्थ केला आहे तसा अर्थ करतां आला असता. तरी पण मन्दबुद्धि विद्यार्थ्यांना या सूत्राचा अर्थ स्पष्टपणें ध्यानांत यावा याकरितां दीक्षितांनीं मनोरमेंत जसें सांगितलें आहे तसें म्हटलें आहे. ('इको गुणवृद्धी' या सूत्रांत पूर्व सूत्रांतून 'गुणः' व 'वृद्धिः' हीं पदें अनुवृत्त केलीं व या प्रकृत सूत्रांतून 'गुणवृद्धी' हें पद गाळलें तरी, अनुवृत्त पदें शब्दपरक व अर्थपरक मानून त्यापैकीं शब्दपरक पदाचा 'गुणवृद्धिशब्दकरणकविधानाधिकरणे = गुणवृद्धिशब्दोच्चारणेन यत्र गुणवृद्धिविधानं क्रियते तत्र' असा लक्षणेनें अर्थ केल्यानें व या अर्थपरक पदाचा 'गुणवृद्धी स्तः' असा विधेयरूप अर्थ केल्यानें प्रकृत सूत्राचा इष्ट अर्थ निष्पन्न होऊं शकतो. पण तसें केल्यास, प्रकृत सूत्रांतील 'गुणवृद्धी' हें पद व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. म्हणून ती आपत्ति टाळण्याकरितां प्रकृत सूत्रांत 'गुणः' व 'वृद्धिः' हीं पदें अनुवृत्त न करितां, तीं पदें अनुवृत्त केलीं असतां जसा त्यांचा, वर सांगितल्याप्रमाणें अर्थ करितां येतो तसाच प्रकृत सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या 'गुणवृद्धी' या पदाचा शब्दपरक व अर्थपरक अर्थ केल्यानें देखील या सूत्राचा इष्ट अर्थ सिद्ध होऊं शकतो. मग असें असून दीक्षितांनीं प्रकृत सूत्रांतून 'गुणवृद्धी' हें पद न गाळतां पूर्व सूत्रांतून 'गुणः' व 'वृद्धिः' या पदांची अनुवृत्ति कां केली ? या प्रश्नाचें शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं जर प्रकृत सूत्रांत दीक्षितांनीं 'गुणः' व 'वृद्धिः' या पदांची अनुवृत्ति केली नसती किंवा त्या पदांची अनुवृत्ति करून प्रकृत सूत्रांतील 'गुणवृद्धी' या पदाचें प्रत्याख्यान केलें असतें तर, या सूत्रांत गुण व वृद्धि या शब्दांचें एकदांच ग्रहण झालें असतें व त्या शब्दांचा वर जसा लक्षणेनें अर्थ केला आहे तसा अर्थ करावा लागला असता. पण एक तर लक्षणा करण्यांत व 'गुण' व 'वृद्धि' या पदांची प्रकृत सूत्रांत पूर्वसूत्रांतून अनुवृत्ति होत असतां प्रकृत सूत्रांतील

'गुणवृद्धी' या पदाचें द्विरुच्चारण करण्यांत गौरवरूप दोष येतो व दुसरें असें कीं, तसा द्विरुच्चारण करून लक्षणेनें अर्थ केल्यानें मन्दबुद्धि विद्यार्थ्यांच्या लक्षांत प्रकृत सूत्राचा अर्थ येणें फार कठीण झालें असतें. म्हणून सर्वसाधारण विद्यार्थ्यांच्या ध्यानांत सूत्रार्थ सहज रीतीनें यावा व लक्षणा करण्याची गरज टळावी याकरितां दीक्षितांनीं प्रकृत सूत्रांत 'गुणः' व 'वृद्धिः' हीं पदें अनुवृत्त करून तीं पदें संज्ञिपरक–अर्थपरक–न मानतां संज्ञापरक–शब्दपरक–मानलीं आहेत व प्रकृत सूत्रांत निर्दिष्ट असलेलें 'गुणवृद्धी' हें पद कायम ठेवून तें पद संज्ञिपरक–अर्थपरक–मानलें आहे. त्यामुळें 'गुणः वृद्धिः इति उच्चार्य यत्र गुणवृद्धी विधीयेते तत्र इकः इति षष्ठ्यन्तं पदमुपतिष्ठते' असा सरळ सूत्रार्थ होऊन तो कोणाच्याहि ध्यानांत येण्यांत व येथें पदोपस्थितिपक्ष विवक्षित आहे हें बोधित होण्यांत कांहीं अडचण पडत नाहीं. द्विरावृत्ति व लक्षणा केली असती तर जरी कदाचित् काम भागूं शकलें असतें तरी इष्ट सूत्रार्थ सहज रीतीनें ध्यानांत येणें फार कठीण झालें असतें. सारांश दीक्षितांनीं जें केलें तें योग्यच केलें असें म्हटलें पाहिजे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.)

'तद् + सु = सः' या उदाहरणांत ('इको गुणवृद्धी' ही परिभाषा उपस्थित झाल्यास, 'तद्' या शब्दांत इक् नसल्यामुळें, या परिभाषान्वयें 'त्यदादीनामः' हें सूत्र लागू पडणार नाहीं व त्यामुळें) 'सः' हें रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. (पण 'त्यदादीनामः' या सूत्रांत 'गुणः' या पदाचें उच्चारण करून गुण होण्याचें विधान केलें नसल्यामुळें, प्रकृत परिभाषा या स्थलीं उपस्थित होऊं शकत नाहीं व 'त्यदादीनामः' या सूत्राची प्रवृत्ति होऊन पूर्वी मनोरमेंत सांगितल्याप्रमाणें 'सः' असें इष्ट रूप सिद्ध होतें.) 'इदम् + अम्' या स्थलीं प्रकृत परिभाषा उपस्थित झाल्यास, इकाराचे जागीं गुणादेश होईल व अन्त्य वर्णाचे जागीं अकारादेश होणार नाहीं (व त्यामुळें 'इमम्' हें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा

आशय हा आहे कीं, 'इदम्' या स्थलीं जो अन्त्य वर्ण आहे तो इक् नाहीं व जो इक् आहे तो अन्त्य वर्ण नाहीं. त्यामुळें 'अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य'–परि. १०४–या परिभाषान्वयें अन्त्य वर्णाचे जागीं अकारादेश न होतां तो इकाराचे जागीं होण्याची आपत्ति येईल व त्यामुळें इष्ट रूप सिद्ध न होतां विकृत रूप होण्याची आपत्ति येईल.) 'सोर्लुक्' असें मनोरमेंत म्हटलें असल्यामुळेंच, 'इकस् + सु' या स्थलीं दीर्घ–उपधादीर्घकार्य–होत नाहीं. ('इकस् + सु' या स्थलीं पूर्वी मनोरमेंत सांगितल्याप्रमाणें 'इकस्' हें नपुंसकलिङ्गी प्रातिपदिक असल्यामुळें 'स्वमोर्नपुंसकात्' सू. ३१९ या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लुक् होतो. म्हणून 'अत्वसन्तस्य चाधातोः' सू. ४२५ या सूत्रानें होणारें उपधादीर्घकार्य अङ्गाला होणारें कार्य असल्यामुळें आणि अङ्गाला कार्य करते वेळीं 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ हें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं या अर्थाचें 'न लुमताङ्गस्य' सू. २६३ हें निषेधक सूत्र असल्यामुळें, ज्या 'सु' प्रत्ययाचा लुक् झाला आहे तो विद्यमान आहे असें प्रत्ययलक्षणानें मानतां येत नाहीं आणि असंबुद्धीचा 'सु' प्रत्यय पुढें असतांनाच उपधादीर्घकार्य होणें सांगितलें असल्यामुळें व तो प्रत्यय, वरील उदाहरणांत लुक् झाल्यानें, विद्यमान आहे असें मानतां येत नसल्यामुळें, येथें उपधा दीर्घ होत नाहीं.) 'तच्च सम्भवति सामानाधिकरण्ये' या मनोरमेच्या पंक्तींतील 'तच्च' याचा 'इकः इति पदं च' असा अर्थ आहे. अशा रीतीनें 'इकः इति षष्ठयन्तं पदमुपतिष्ठते' या कौमुदींतील पंक्तींत 'पदम्' या पदाचें दीक्षितांनी ग्रहण केलें असल्यामुळें, दीक्षित असें सुचवितात कीं, प्रकृत सूत्रांत पदोपस्थितिपक्षच मानला पाहिजे. (पदोपस्थितिपक्ष हा भाष्यान्वयें सिद्धान्तपक्ष कसा ठरतो हें पुढें तच्छेषपक्षाचें व्याख्यान करितांना सांगण्यांत येईल.) 'अचो ञ्णिति' सू. २५४, 'ओर्गुणः' सू. ८४७ इत्यादि सूत्रांचे ठिकाणीं 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा प्रवृत्त होऊं शकत नाहीं; कारण लिङ्गप्रमाण हें श्रुतिरूप

प्रमाणापेक्षां दुर्बल असल्यामुळें व त्या सूत्रांत साक्षात् पठित असलेल्या ‘अच्, उ’ इत्यादि पदांनीं युक्त अशा वाक्यांच्या अर्थाचा प्रथम बोध झाल्यावर त्या सूत्रांत स्थानी निर्दिष्ट आहे असें ज्ञान होत असल्यामुळें, (व अशा रीतीनें इतर स्थानीची आकांक्षा राहत नसल्यामुळें, त्या सूत्रांत) ‘इकः’ हें पद उपस्थित झालें तरी, त्याचा वाक्यांच्या अर्थामध्यें अन्वय होऊं शकत नाहीं. (‘श्रुतिलिङ्गवाक्य-प्रकरणस्थानसमाख्यानां पारदौर्बल्यमर्थविप्रकर्षात्’ या मीमांसेंत सांगितलेल्या न्यायान्वयें श्रुतिप्रमाण लिङ्गप्रमाणाच्या मानानें प्रबल आहे. ‘इको गुणवृद्धी’ ही परिभाषा जेथें गुण किंवा वृद्धि हें लिङ्ग आहे, म्हणजे जेथें सूत्रांत गुण किंवा वृद्धि हा शब्द उच्चारून गुण किंवा वृद्धि होण्याचें विधान केलें आहे, तशा ठिकाणीं लिङ्ग-प्रमाणाच्या बलावर उपस्थित होणारी परिभाषा आहे व ती जेथें उपस्थित होते तेथें ‘इक्’ हा गुणकार्याचा किंवा वृद्धिकार्याचा स्थानी होतो. पण जेथें सूत्रांत गुणकार्य किंवा वृद्धिकार्य ज्याला करणें आहे तो स्थानी साक्षात् श्रुत–पठित–आहे तेथें, श्रुतिप्रमाण लिङ्ग-प्रमाणाच्या मानानें प्रबल असल्यामुळें, प्रकृत परिभाषा प्रवृत्त होऊं शकत नाहीं. उदाहरणार्थ ‘अचो ञ्णिति’ या सूत्रांत ‘मृजेर्वृद्धिः’ या पूर्व सूत्रांतून ‘वृद्धिः’ हें पद अनुवृत्त असल्यामुळें व अशा रीतीनें त्या सूत्रांत ‘इको गुणवृद्धी’ ही परिभाषा उपस्थित होण्याचें लिङ्ग–निमित्त–असल्यामुळें जरी ती परिभाषा उपस्थित होते तरी, त्या सूत्रांत ‘अचः’ हा स्थानी साक्षात् श्रुत–पठित–असल्यामुळें व अशा रीतीनें त्या सूत्रांत स्थान्यन्तराची अपेक्षा राहत नसल्यामुळें, ती परिभाषा अनपेक्षित होऊन तिची प्रवृत्ति होत नाहीं. तसेंच ‘ओर्गुणः’ या सूत्रांत ‘गुणः’ या पदाचा उच्चार करून गुण होणें सांगितलें असल्यामुळें जरी ‘इको गुणवृद्धी’ ही परिभाषा उपस्थित होते तरी, त्या सूत्रांत ‘उ’ हा स्थानी साक्षात् श्रुत–पठित–असल्यामुळें, ती परिभाषा अनपेक्षित होऊन प्रवृत्त होत नाहीं. सारांश जेथें सूत्रांत

गुण किंवा वृद्धि हें पद उच्चारून गुणकार्य किंवा वृद्धिकार्य होण्याचें विधान केलें आहे व स्थानीचा निर्देश केलेला नाहीं तेथें स्थानीची आकांक्षा राहत असल्यामुळें, 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा प्रवृत्त होते व 'इक्' हा गुणवृद्धिरूप कार्याचा स्थानी ठरतो. पण जेथें सूत्रांत स्थानीचा साक्षात् निर्देश केलेला आहे तेथें 'गुणः' किंवा 'वृद्धिः' हें पद उच्चारून जरी गुणकार्य किंवा वृद्धिकार्य होण्याचें विधान केलें असलें तरी, तशा ठिकाणीं इतर स्थानीची आकांक्षा राहत नसल्यामुळें प्रकृत परिभाषा प्रवृत्त होऊं शकत नाहीं.) 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू. २१६८ इत्यादि सूत्रांत 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा उपस्थित झाल्याशिवाय कोणत्या स्थानीचे जागीं गुण व्हावा ही आकांक्षा–अपेक्षा–शांत होऊं शकत नसल्यामुळें, तशा सूत्राच्या अर्थाचा बोधच होऊं शकत नाहीं, व ह्याच या दोन प्रकारच्या सूत्रांत फरक आहे. ('सार्वधातुकार्धधातुकयोः' या सूत्रांत 'मिदेर्गुणः' या पूर्वसूत्रांतून 'गुणः' हें पद अनुवृत्त होतें व या सूत्रांत ज्याला गुण होणें सांगितलें आहे त्या स्थानीचा निर्देश केला नाहीं व कोणत्या स्थानीला गुण करावा ही आकांक्षा राहत असल्यामुळें ती आकांक्षा निवृत्त–पूर्ण–करण्याकरितां 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा उपस्थित होते. अशा ठिकाणीं ती परिभाषा उपस्थित न झाल्यास, कोण्या स्थानीला गुण करावा याचें ज्ञान होऊं शकत नसल्यामुळें, सूत्राच्या अर्थापासून कांहींच बोध होणार नाहीं. म्हणून जेथें सूत्रांत गुण किंवा वृद्धि हा शब्द उच्चारून गुणकार्य किंवा वृद्धिकार्य होण्याचें विधान केलें असेल व स्थानीचा निर्देश केला नसेल तेथें त्या सूत्राच्या अर्थाचा बोध होण्याकरितां, म्हणजे गुणकार्याचा किंवा वृद्धिकार्याचा कोणता स्थानी आहे हें कळण्याकरितां, प्रकृत परिभाषेची उपस्थिति होणें आवश्यक आहे, व ती परिभाषा प्रवृत्त झाल्यानें 'इक्' हा गुणाचा स्थानी आहे हें ज्ञान होऊन सूत्रार्थाचा बोध होतो व स्थान्याकांक्षेची निवृत्ति होते. आतां येथें अशी शंका करण्यांत येते कीं,

'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा उपस्थित केल्यानें देखील स्थानिविषयक आकांक्षा शांत होऊं शकते, म्हणजे कोणत्या स्थानीचे जागीं गुणादेश करावा हें कळूं शकते, व 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा पूर्वसूत्र असून 'अलोऽन्तस्य' ही परिभाषा परसूत्र असल्यामुळें, 'पूर्वासिरं वलवत्' या न्यायान्वयें ही पर परिभाषा 'सार्वधातुकार्धधातुकयोः' या सूत्रांत प्रवृत्त होऊं शकते व 'इको गुणवृद्धी' ही वाधित पूर्व परिभाषा प्रवृत्त होऊं शकत नाहीं. या शंकेवर शव्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, 'सार्वधातुकार्धधातुकयोः' या सूत्रांत दोन्ही परिभाषा उपस्थित होण्याचें निमित्त–म्हणजे 'अङ्गस्य' ही स्थानषष्ठी व 'गुणः' या पदाची अनुवृत्ति–असल्यामुळें जरी दोन्ही परिभाषा उपस्थित होतात तरी, 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषेच्या मानानें 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा अन्तरङ्ग असल्यामुळें 'असिद्धं वहिरङ्गमन्तरङ्गें'–परि. ५०–व 'पूर्वपर' प. ३८ या न्यायांन्वयें, ती अन्तरङ्ग परिभाषा 'अलोऽन्त्यस्य' या वहिरङ्गपरिभाषेचा वाध करून स्वतःच प्रथम प्रवृत्त होते व ती प्रवृत्त झाल्यावर स्थानिविषयक आकांक्षा शांत–परिपूर्ण–होत असल्यामुळें, 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा प्रवृत्त होण्याची कांहींच गरज राहत नाहीं. आतां 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषेच्या मानानें अन्तरङ्ग कां ठरते याचें कारण शव्दरत्नकार पुढील पंक्तींत सांगतात.) 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा उपस्थित होण्यास सूत्रांत 'गुणः' किंवा 'वृद्धिः' या पदाचें उच्चारण (किंवा अनुवृत्ति) असणें या निमित्ताची आवश्यकता आहे व जेथें तें निमित्त उपलव्ध आहे तेथें 'इकः' हे षष्ठ्यन्त पद उपस्थित होऊन व सूत्रांतील इतर पदांशीं अन्वित व एकवाक्यतापन्न होऊन पदैकवाक्यतेनें सूत्रार्थवोध होत असल्यामुळें, ही परिभाषा अन्तरङ्ग ठरते. पण सूत्रांत (अवयवषष्ठी किंवा इतर प्रकारची षष्ठी नसून) स्थानषष्ठी आहे असा निश्चय झाल्यावर त्या स्थानषष्ठीलिङ्गरूप निमित्तामुळें उपस्थित होणारी 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा जेव्हां विधिसूत्रांत

उपस्थित होते तेव्हां अन्तीं नसलेल्या वर्णाला गुण न व्हावा याकरितां सूत्राच्या वाक्याशीं एकवाक्यतापन्न होणारी ही परिभाषा बहिरङ्ग ठरते. (सूत्रांत एकच वाक्य असल्यास जसा त्या सूत्राच्या अर्थाचा बोध लवकर होतो तसा त्या सूत्रांत अनेक वाक्यें असल्यास होत नाहीं. सर्व वाक्यांच्या अर्थाचें ज्ञान झाल्यावरच त्या सूत्राच्या अर्थाचा बोध होऊं शकतो व तो होण्यास साहजिकच अधिक वेळ लागतो. म्हणून सूत्राच्या ज्या अर्थाचा लवकर बोध होतो तो अन्तरङ्ग ठरून ज्या अर्थाचा उशिरानें बोध होतो तो बहिरङ्ग ठरतो. अशा रीतीनें वाक्यभेद झाल्यानें अर्थाचे ठिकाणीं बहिरङ्गत्व येत असल्यामुळें, एक वाक्य तयार होऊन निष्पन्न झालेला सूत्रार्थ दोन वाक्यें तयार होऊन निष्पन्न झालेल्या सूत्रार्थाच्या मानानें अन्तरङ्ग ठरतो आणि म्हणूनच पर्युदास मानल्यानें एक वाक्यानें सूत्रार्थ निष्पन्न होत असून प्रसज्य-प्रतिषेध मानल्यानें दोन वाक्यें तयार होऊन सूत्रार्थ निष्पन्न होत असल्यामुळें, प्रसज्यप्रतिषेधाच्या मानानें पर्युदास अन्तरङ्ग ठरतो. उदाहरणार्थ 'अनचि च' सू. ४८ या सूत्रांतील 'अनचि' हा पर्युदास मानल्यास 'अचः परस्य यरो द्वे वा स्तः अज्भिन्ने वर्णे परे सति' असें एक वाक्य तयार होऊन सूत्रार्थ निष्पन्न होतो. पण 'अनचि' हा प्रसज्यप्रतिषेध मानल्यास 'अचः परस्य यरो द्वे वा स्तः, किन्तु अचि परे सति द्वे न स्तः' अशीं दोन वाक्यें तयार होऊन सूत्रार्थ निष्पन्न होतो. म्हणून वास्तविक अन्तरङ्गत्वामुळें 'अनचि' हा पर्युदास मानला पाहिजे. परंतु 'वाक्' इत्यादि भाष्योदाहृत उदाहरणें सिद्ध होण्याकरितां 'अनचि' हा प्रसज्यप्रतिषेध अगतिकगतिन्यायानें मानणें भाग पडत असल्यामुळे, 'अनचि' हा प्रसज्यप्रतिषेध मानावा लागतो ही गोष्ट वेगळी. आतां 'अलोऽन्त्यस्य' सू. ४२ ही परिभाषा उपस्थित होण्याकरितां सूत्रांत स्थानषष्ठीचा निर्देश असणें आवश्यक आहे. स्थानषष्ठी व 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा या दोहोंमध्ये उपजीव्योपजीवकभावसंबंध आहे, म्हणजे स्थानषष्ठी उपजीवक असून

'अलोऽन्त्स्य' ही परिभाषा उपजीव्य आहे, आणि ज्या ठिकाणीं असा संबंध असतो तेथें दोन वाक्यें तयार होऊन त्यांचा वाक्यैकवाक्यतेनें अन्वय होतो. 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा उपस्थित होण्याकरितां सूत्रांत 'गुण' अथवा 'वृद्धि' हा शब्द विधेयरूपानें उच्चारित किंवा अनुवृत्त असणें आवश्यक आहे. हा विधेयांश व 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा या दोहोंमध्यें निरूप्यनिरूपकभावसंबंध आहे, म्हणजे विधेयांश निरूपक असून 'इकः' हें षष्ठयन्त पद निरूप्य आहे, आणि जेथें असा संबंध असतो तेथें पदैकवाक्यतेनें अन्वय होऊन सूत्राचें एकच वाक्य तयार होत असल्यामुळें, 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषेच्या मानानें अन्तरङ्ग ठरते हें उघड आहे. दुसरें असें कीं, वाक्यार्थबोधानंतर सूत्रांतील षष्ठी स्थानषष्ठी आहे असा निर्णय होत असल्यामुळें व 'मिदेर्गुणः, मृजेर्वृद्धिः' इत्यादि स्थलीं प्रथमान्त विधेयांशाच्या उच्चारणबळावर 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा उपस्थित होत असल्यामुळें आणि अशा रीतीनें 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा विलम्बोपस्थितिक असून तिच्या मानानें 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा शीघ्रोपस्थितिक असल्यामुळें, 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा 'शीघ्रोपस्थितिकमन्तरङ्गं विलम्बोपस्थितिकं बहिरङ्गम्' या न्यायान्वयें देखील अन्तरङ्ग ठरते. म्हणून 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू. २१६८ या अङ्गाधिकारांत पठित असलेल्या सूत्रांत 'मिदेर्गुणः' या पूर्व सूत्रांतून 'गुणः' या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळें, या स्थलीं 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा बहिरङ्गत्वामुळें उपस्थित न होतां, 'इको गुणवृद्धी' ही अन्तरङ्ग-परिभाषा उपस्थित होते व त्यामुळें 'सार्वधातुके आर्धधातुके च प्रत्यये परे सति इगन्ताङ्गस्य गुणो भवति' असा, पदैकवाक्यतेनें अन्वय होऊन, सूत्रार्थ निष्पन्न होतो.) वरील सर्व गोष्टी लक्षांत धरूनच 'इगन्ताङ्गस्येत्यादिक्रमेण सम्बध्यते' असें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे. 'मिदिमृज्योरवयवस्येक इति सम्बध्यते' असें जें दीक्षितांनी

मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'मिदेर्गुणः, मृजेर्वृद्धिः' या दोन सूत्रांतील 'मिदेः, मृजेः' ही स्थानषष्ठी नाहीं (व अवयवषष्ठी आहे) असा निश्चय होत असल्यामुळें, 'अलोऽन्त्यस्य' ही (जेथें स्थानषष्ठी आहे तेथेंच प्रवृत्त होणारी) परिभाषा त्या दोन्ही सूत्रांत मुळींच प्रवृत्त होऊं शकत नाहीं.

शब्दरत्न—'नियमार्थमिदमिति । तत्तद्विधायकैर्विहितयोर्गुणवृध्द्योः "अलोऽन्त्यस्य" इतिवदिदमपि स्थानिनियमार्थमिति तदाशयः । तत्सर्वं भाष्येति । द्वयोर्नियमयोः "सार्वधातुक" इत्याद्यविरोधेनेग्रूपस्यान्त्यस्येत्यर्थो वाच्यः, अन्त्यस्येक इति वा । उभयथाऽपि द्वयोर्विशेष्यविशेषणभावसत्त्वात्तच्छेषपक्षे पर्यवसानम् । सः "अलोऽन्त्यस्य" इति नियमः शेषः विशेषणमस्येति तदर्थः । तस्य = "अलोऽन्त्यस्य" इत्यस्य विशेषणमिति वा । एवञ्च "मिदे र्गुणः" इत्यादौ परस्परविरोधादनयोस्त्यागे सर्वादेशगुणापत्त्या तद्विरोध इति भावस्तदाह—तच्छेषपक्षमिति । दूषणोद्धारस्त्वित्ति "मिदेः" इत्यत्र मिद इर्मिदिस्तस्येति व्याख्यानान्न दोषः । 'पुगन्त'— इत्यत्र पुगन्तो लघ्वी उपधेति व्याख्येयमित्यादि भाष्योक्तदूषणोद्धारस्त्वित्यर्थः । न च 'यापयति' क्ष्मापयति' इत्यादौ दोषः, गुणे कृतं वृध्द्या रूपसिद्धेः । अत एव "समयाच्च यापनायाम्" इति निर्देशः सङ्गच्छते, तदाह—कौस्तुभे स्पष्टीकृत इति । नन्वेवं तर्हि किमर्थं प्राचां पक्ष उपेक्षित इति चेच्छृणु—लघूपधांशे इक्परिभाषाऽनुपस्थितावनिग्लक्षणत्वाद्भिन्नमित्यादौ गुणनिषेधानापत्तिभिया स उपेक्षित इति । क्नोः कित्वस्यानिग्लक्षणत्वेऽपि गुणनिषेधप्रवृत्तिज्ञापकत्वाश्रयणे तु तस्य पदोपस्थितिपक्षज्ञापकत्वमेवोचितमिति दिक् ।

'अनियमप्रसङ्गे नियमार्थम्' असें जें प्रसादकारांनीं म्हटलें आहे त्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, ज्याप्रमाणें 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा सूत्रांत स्थानी कोणास मानावें याचा, म्हणजे अनन्त्य वर्ण स्थानी न मानतां अन्त्य वर्णच स्थानी मानावा असा, नियम घालून

देणारी परिभाषा आहे त्याचप्रमाणें गुणवृद्धिविधायकसूत्रांत विधान केलेल्या गुणाचा किंवा वृद्धीचा स्थानी कोण आहे याचा नियम घालून देणारी, म्हणजे इक्‌लाच गुणवृद्धिकार्य करावें मग तो अन्त्य असो किंवा अनन्त्य असो व जो इक् नाहीं त्याला तें कार्य करूं नये असा नियम घालून देणारी, 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा देखील आहे. (उदाहरणार्थ 'त्यदादीनामः' सू. २६५ या सूत्राचा 'त्यद्' इत्यादि सर्वनामांच्या जागीं अकारादेश व्हावा असा अक्षरार्थ होतो, पण त्या सूत्रांतील 'त्यदादीनाम्' ही स्थानपठी असल्यामुळें, 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा प्रवृत्त होऊन असा नियम घालून देते कीं, त्यदादि संपूर्ण सर्वनामांच्या किंवा त्यांतील अनन्त्य वर्णाच्या जागीं अकारादेश न करितां त्या सर्वनामांतील अन्त्य वर्णाचे जागींच अकारादेश करावा. तसेंच 'सार्वधातुकार्धधातुकयोः, मिदेर्गुणः, मृजेर्वृद्धिः' इत्यादि सूत्रांनीं गुण अथवा वृद्धि होण्याचें विधान केलें असून त्या सूत्रांत गुणाचा किंवा वृद्धीचा स्थानी कोण आहे याचा निर्देश केला नसल्यामुळें, कोण्या स्थानीला गुण करावा किंवा वृद्धि करावी हा प्रश्न उपस्थित होतो. या वरील सर्व सूत्रांत 'गुण' किंवा 'वृद्धि' या शब्दांचें उच्चारण करून गुण किंवा वृद्धि होणें सांगितलें असल्यामुळें, येथें 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा प्रवृत्त होते व असा नियम घालून देते कीं, इग्भिन्न वर्णास गुण व वृद्धि न होतां इक्‌लाच तीं कार्यें व्हावींत. सारांश जशी 'अलोऽन्त्यस्य' ही नियामक परिभाषा आहे तशीच 'इको गुणवृद्धी' ही देखील नियामक परिभाषा आहे असा प्रसादकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'तत्सर्व भाष्यविरोधादुपेक्ष्यम्' असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू. २१६८ इत्यादि सूत्रांत 'अलोऽन्त्यस्य' व 'इको गुणवृद्धी' या दोन परिभाषा युगपत् प्रवृत्त झाल्यास त्या दोन परिभाषांमध्यें परस्पर विरोध येत नसल्यामुळें 'इग्रूपस्यान्त्यस्य गुणो भवति' किंवा

'अन्त्यस्य इको गुणो भवति' असा सूत्रार्थ होईल व या दोन अर्थांपैकीं कोणताहि अर्थ केला तरी वरील दोन परिभाषांमध्यें विशेषण-विशेष्यभाव होत असल्यामुळें, (प्रक्रियाकौमुदीकारानी व प्रसादकारांनी मानलेल्या नियमपक्षाचें) तच्छेषपक्षातच पर्यवसान होते, म्हणजे नियमपक्ष व तच्छेषपक्ष या दोन पक्षात काहीच भेद राहत नसून केवळ नावातच फरक आहे व नियमपक्ष तच्छेषपक्षच ठरतो. 'तच्छेष' या शब्दाचा 'स.=अलोऽन्त्यस्य इति नियम., शेपः= विशेषणम्, अस्य=इको गुणवृद्धी इति नियमस्य' असा, किवा 'तस्य=अलोऽन्त्यस्य इति नियमस्य, शेप.=विशेषणम्' असा विग्रह होऊ शकतो, म्हणजे 'तच्छेप' हा शब्द बहुव्रीहि किंवा षष्ठीतत्पुरुष आहे असे मानता येते. परतु अशा रीतीने 'मिदेर्गुणः' इत्यादि सूत्रात वरील दोन्ही परिभाषा युगपत् उपस्थित झाल्यास त्याच्यामध्ये परस्पर विरोध येत असल्यामुळे त्या दोन्ही परिभाषाचा त्याग केल्यास गुणादेश सपूर्ण अङ्गाचे ठिकाणी होण्याची आपत्ति येते व अशा रीतीने प्रक्रियाकौमुदीकार व प्रसादकार यानी जे प्रकृत सूत्राचे व्याख्यान केले आहे त्याचा भाष्याशी विरोध येतो (आणि म्हणून ते व्याख्यान भाष्यविरुद्ध असल्यामुळे स्वीकारार्ह नाही असे दीक्षिताचे म्हणणें आहे. 'सार्वधातुकार्धधातुकयो' हे सूत्र अङ्गाधिकारात पठित असल्यामुळे त्या सूत्रात 'अङ्गस्य' या पदाची अनुवृत्ति होते व 'अङ्गस्य' ही स्थानषष्ठी असल्यामुळें त्या स्थानषष्ठीरूप निमित्ता-मुळे 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा त्या सूत्रात उपस्थित होते. तसेच त्या सूत्रात 'मिदेर्गुण·' या पूर्व सूत्रातून 'गुणः' हे पद अनुवृत्त होत असल्यामुळें व अशा रीतीनें त्या सूत्रात 'गुण:' हे पद उच्चारून गुण होण्याचे विधान केले असल्यामुळें, त्या सूत्रात 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा देखील उपस्थित होते. 'विशेषण-विशेष्यभावे कामचारः' या न्यायान्वये वरील दोन परिभाषापैकी कोणतीहि एक परिभाषा दुसरीचे विशेषण मानल्यास, 'इग्रूपस्या-

न्त्यस्य वर्णस्य गुणो भवति' किंवा 'अन्त्यस्य इकः गुणो भवति' असा त्या सूत्रांत अनुवृत्त असलेल्या 'अङ्गस्य गुणः' या दोन पदांचा अर्थ होतो--म्हणजे 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषेचें विशेषण मानल्यास, 'इग्रूपस्यान्त्यस्य अलःगुणो भवति' असा प्रथम दिलेला अर्थ होत असून, 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा 'इको गुणवृद्धी' या परिभाषेचें विशेषण मानल्यास, 'अन्त्यस्य इकःगुणो भवति' असा द्वितीय अर्थ होतो, व या दोन अर्थांपैकीं कोणताहि अर्थ मानला तरी दोन्ही अर्थांचें फल एकच असल्यामुळें, या सूत्रान्वयें 'हरति, नयति, भवति' इत्यादि इष्ट रूपांची सिद्धि होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं हें खरें. परंतु 'मिदेर्गुणः, मृजेर्वृद्धिः' या दोन सूत्रांत वरील दोन्ही परिभाषा उपस्थित होण्याचें निमित्त विद्यमान असल्यामुळें त्या दोन्ही परिभाषा त्या दोन सूत्रांत उपस्थित केल्यास, त्या दोन परिभाषांमध्यें परस्परविरोध येत असल्यामुळें इष्टार्थ निष्पन्न होऊं शकत नाहीं; कारण 'मिद्, मृज्' या स्थलीं जो अन्त्य वर्ण आहे तो इक् नाहीं व जो अन्त्य वर्ण नाहीं तो इक् आहे. मग अन्त्य वर्णाला कार्य करावें कीं अनन्त्य वर्णाला कार्य करावें असा परस्परविरोध उपस्थित होतो आणि म्हणून तच्छेषपक्ष सर्वत्र उपयोगांत आणतां येत नसल्यामुळें तो पक्ष मानतां येत नाहीं. दुसरें असें कीं, परिभाषा स्वतःकरितां केल्या नसून कार्यविधायक सूत्रांचा अर्थ निश्चित करण्याकरितां केल्या असल्यामुळें व अशा रीतीनें त्या परार्थ व अप्रधान ठरत असल्यामुळें, 'गुणानां च परार्थत्वादसम्बन्धः समत्वात् स्यात्' या न्यायान्वयें परिभाषांमध्यें परस्परांस विशेषणविशेष्यभाव होऊं शकत नाहीं आणि त्यामुळें देखील तच्छेषपक्ष दूषित ठरतोच. या पक्षामध्यें 'सार्वधातुकार्धधातुकयोः' इत्यादि गुणवृद्धिविधायक सूत्रांत 'इको गुणवृद्धी' व 'अलोऽन्त्यस्य' या दोन्ही परिभाषा उपस्थित होण्याचें निमित्त विद्यमान असल्यामुळें त्या दोन्ही परिभाषा युगपत् उपस्थित झाल्या असतां त्यांच्यामध्यें

विशेषणविशेष्यभाव मानून सूत्रार्थ करावा लागत असल्यामुळें याला तच्छेषपक्ष म्हणतात, व या पक्षाला तसें नांव देण्याचें कारण हें कीं, विधायक सूत्रांत उपस्थित होणाऱ्या वरील दोन परिभाषांपैकीं एक दुसरीचा शेष--विशेषण--मानलें जातें. या पक्षाच्या उलट तदपवादक पक्ष हा दुसरा पक्ष आहे. या द्वितीय पक्षांत उपस्थित होणाऱ्या वरील दोन परिभाषांमध्यें विशेषणविशेष्यभाव मानला जात नसून, 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषेची अपवादक परिभाषा मानली जाते व त्यामुळें 'अङ्गस्य इको गुणवृद्धी भवतः, अन्त्यस्य चानन्त्यस्य' असा अर्थ होतो आणि या पक्षांत एक परिभाषा दुसरीची अपवादक मानली जात असल्यामुळें या पक्षाला तदपवादक पक्ष असें नांव दिलें आहे. तृतीय पक्ष असा आहे कीं, वरील दोन परिभाषांमध्यें विशेषणविशेष्यभाव नसून किंवा 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषेची अपवादक परिभाषा नसून, 'इको गुणवृद्धी' ही स्वतंत्र परिभाषा आहे व तिचा 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषेशीं कोणत्याहि प्रकारचा संबन्ध नाहीं आणि जेथें सूत्रांत गुण किंवा वृद्धि हा शब्द उच्चारून गुण किंवा वृद्धि होण्याचें विधान केलें आहे तेथें 'इकः' या षष्ठ्यन्त पदाची उपस्थिति होते या अर्थाची वाचक 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा आहे. हाच पदोपस्थितिपक्ष होय, व या पक्षांत 'इकः' या पदाची उपस्थिति होणें सांगितलें असल्यामुळें, या तृतीय पक्षाला पदोपस्थितिपक्ष असें नांव दिलें आहे. प्रकृत सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं वर दिलेले तीन्ही पक्ष सांगितले आहेत व पहिले दोन पक्ष मानल्यास कोणकोणते दोष येतात हें विस्तारपूर्वक सांगून व ते दोन्ही पक्ष दूषित व त्याज्य ठरवून, तृतीय पक्ष--पदोपस्थितिपक्ष--हाच निर्दोष पक्ष सिद्धान्तपक्ष मानला आहे. त्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात:--'किं पुनरयमलोऽन्त्यशेष आहोस्विदलोऽन्त्यापवादः ? । कथं चायं तच्छेषः स्यात्कथं वा तदपवादः ? । यद्येकं वाक्यं, तच्चेदं च, अलोऽन्त्यस्य विधयो भवन्ति

इको गुणवृद्धी अलोऽन्त्यस्येति, ततोऽयं तच्छेपः। अथ नाना वाक्यम्, अलोऽन्त्यस्य विधयो भवन्ति इको गुणवृद्धी अन्त्यस्य चानन्त्यस्य चेति, ततोऽयं तदपवादः।' या भाष्याचा अर्थ वरील विवरणांत आलाच आहे. अशा रीतीनें तच्छेपपक्ष व तदपवादपक्ष सांगून भाष्यकार पुढें असें म्हणतात की, तच्छेपपक्ष मानल्यास 'वृद्धिगुणावलोऽन्त्यस्येति चेन्मिदिपुगन्तलघूपधर्च्छिदशिक्षिप्रक्षुद्रेष्विग्ग्रहणम्' व 'सर्वादेशप्रसङ्गश्चानिगन्तस्य' या दोन वार्तिकांत दाखविलेले दोष उद्भवतात. प्रथम वार्तिकाचा अर्थ असा आहे कीं, वृद्धि व गुण हे शेवटच्या इग्वर्णालाच होतात असें मानलें तर, मिद्, मृज्, पुगन्त धातु, ज्यांच्या उपधेंत ऱ्हस्व स्वर आहे असे धातु, ऋच्छ्, दृश्, क्षिप्र व क्षुद्र यांना गुण किंवा वृद्धि सांगणाऱ्या सूत्रांत इक् या शब्दाचें ग्रहण करावें लागेल; कारण 'मिदेर्गुणः, मृजेर्वृद्धिः, पुगन्तलघूपधस्य च' या सूत्रांत व तसेंच 'ऋच्छत्यॄताम्' सू. २३८३ 'ऋदृशोऽङि गुणः' सू. २४०६ 'स्थूलदूरयुव' सू. २०१५ या सूत्रांत 'इकः' हा शब्द न उच्चारल्यास इक् शेवटीं येत नसल्यामुळें, त्याला गुण किंवा वृद्धि होऊं शकणार नाहीं. द्वितीय वार्तिकाचा अर्थ असा आहे कीं, गुण व वृद्धि हे अन्त्य इकालाच होतात असें मानल्यास, ज्या धातूंच्या शेवटीं इक् नसतो तशा संपूर्ण धातूंचे ठिकाणीं गुणरूप किंवा वृद्धिरूप आदेश होण्याची आपत्ति येईल. तच्छेपपक्षावर प्रथम वार्तिकांत वार्तिककारानें जे दोष दिले आहेत त्यांचें भाष्यकारांनीं कसें निवारण केलें आहे हें पुढें सांगण्यांत येणार आहे व त्यावेळीं त्या वार्तिकाचें उदाहरणपूर्वक विस्तृत विवेचन करण्यांत येईल. सारांश तच्छेपपक्ष दूषित ठरत असल्यामुळें तो न मानतां तदपवादकपक्ष मानल्यास त्या पक्षांत देखील 'इग्मात्रस्येति चेज्जुसिसार्वधातुकार्धधातुकऱ्हस्वाद्योर्गुणेष्वनन्त्यप्रतिषेधः' या वार्तिकांत सांगितलेले दोष उद्भवतात. या वार्तिकाचा अर्थ असा आहे कीं, जर गुण हा इकालाच होतो, मग तो शेवटीं असो किंवा नसो, असें मानलें तर, 'जुसि च' सू. २४८१ व

'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू. २१६८ या सूत्रांनीं सांगितलेला गुण व तसेंच 'ऱ्हस्वस्य गुणः' सू. २४२ या सूत्रानें व त्या सूत्रापुढील 'जसि च' सू. २४१, 'ऋतो ङिसर्वनामस्थानयोः' सू. २७५ 'घेर्ङिति' सू. २४५ या सूत्रांनीं सांगितलेला गुण या सर्व गुणांचा शेवटीं नसलेल्या इकाच्या विषयांत प्रतिषेध सांगावा लागेल. अशा रीतीनें तच्छेषपक्ष व तदपवादकपक्ष हे दोन्ही पक्ष दूषित ठरत असल्यामुळें, भाष्यकार म्हणतातः–'एवं तर्हि नायं तच्छेषो नापि तदपवादः। अन्यदेवेदं परिभाषान्तरमसम्बद्धमनया परिभाषया।' व अखेरीस भाष्यकार म्हणतातः–'एवं तर्हि वृद्धिर्भवति गुणो भवतीति यत्र ब्रूयादिक इत्येतत्तत्रोपस्थितं द्रष्टव्यम्।' हाच पदोपस्थितिपक्ष होय, आणि भाष्यकारांनी हा निर्दोष पक्ष सिद्धान्तपक्ष मानला असल्यामुळें आणि प्रक्रियाकौमुदीकारांनी प्रकृत सूत्राचें जें व्याख्यान केलें आहे व प्रसादकारांनी त्यावर जी टीका केली आहे हें सर्व वास्तविक तच्छेष-पक्षान्वयें केलें असून या सिद्धान्तपक्षाला धरून नसल्यामुळें स्वीकारार्ह नाही असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे असें शब्दरत्नकार म्हणतात. आता प्रक्रियाकौमुदीकारांनी व प्रसादकारांनी वरील दोन्ही परिभाषा नियमार्थक मानून जो नियमपक्ष सांगितला आहे त्याचें तच्छेषपक्षातच पर्यवसान होतें, म्हणजे वास्तविक तो तच्छेषपक्षच आहे, असें जें शब्दरत्नकारांनी म्हटलें आहे त्याचें कारण हे की, पदोपस्थितिपक्ष न मानल्यास, 'सार्वधातुकार्धधातुकयोः' या सूत्रांत, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, वरील दोन्ही परिभाषा उपस्थित होण्याचीं निमित्तें, म्हणजे 'अङ्गस्य' ही स्थानषष्ठी व 'गुणः' या पदानें उच्चारण करून गुण होण्याचें विधान करणें हीं निमित्तें, उपलब्ध असल्यामुळें, त्या दोन्ही परिभाषा परस्परांत विरोध न होतां उपस्थित होतील व एक दुसरीचें विशेषण होऊन 'इग्रूपस्य अन्त्यस्य गुणः' किंवा 'अन्त्यस्य इकः गुणः' असा अर्थ होईल व या दोन अर्थांपैकी कोणताहि अर्थ मानला तरी, अन्त्य इकाला च गुण होईल, आणि अनन्त्य इकाला

गुण होणार नाहीं. पण येथें वरील दोन परिभाषांमध्यें विशेषण-विशेष्यभाव होत असल्यामुळें, प्रसादकारादिकांनीं मानलेला पक्ष व तच्छेपपक्ष या दोन पक्षांत कोणताहि फरक न होतां, त्यानीं मानलेला पक्ष तच्छेपपक्षच ठरेल आणि त्यामुळें 'मिदेर्गुणः, मृजेर्वृद्धिः' या अङ्गाधिकारांत पठित असलेल्या सूत्रांतील 'मिदेः, मृजेः' ही स्थान-षष्ठी नसून अवयवषष्ठी असल्यामुळें, त्या सूत्रांत 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा उपस्थित होणार नाहीं व तसेंच 'मिद्, मृज्' हीं अङ्गें हलन्त असून इगन्त नसल्यामुळें आणि या पक्षांत अन्त्य इकालाच गुण किंवा वृद्धि होऊं शकत असल्यामुळें,. 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा देखील उपस्थित होऊं शकणार नाहीं आणि अशा रीतीनें वरील दोन्ही नियामक परिभाषा उपस्थित होऊं शकत नसल्यामुळें, 'सर्वादेशप्रसङ्गश्चानिगन्तस्य' या वार्तिकांत सांगितल्याप्रमाणें संपूर्ण अङ्गाचे ठिकाणीं गुणरूप अथवा वृद्धिरूप आदेश होण्याची आपत्ति येईल. सारांश प्रसादकारादिकांनीं मानलेला पक्ष वर सांगितल्या-प्रमाणें तच्छेपपक्ष ठरत असल्यामुळें व भाष्यकारांनीं तच्छेपपक्षाचें प्रत्याख्यान केलें असल्यामुळें त्यांचा पक्ष स्वीकारार्ह नाहीं असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) वार्तिककारानें तच्छेप-पक्षावर जीं दूषणें दिलीं आहेत त्यांचें भाष्यकारांनीं जसें निराकरण केलें आहे त्याचेंच स्पष्टीकरण दीक्षितांनीं शब्दकौस्तुभांत केलें आहे. (सारांश दीक्षितांनी जो दूषणोद्धार सुचविला आहे तो स्वकपोल-कल्पित नसून भाष्यकारांच्या म्हणण्याचा अनुवाद आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. आतां तो दूषणोद्धार कसा केला आहे हें शब्दरत्नकार थोडक्यांत सांगतात:) 'मिदेर्गुणः' या स्थलीं 'मिदः इः' असें व्याख्यान केल्यानें व 'पुगन्तलघूपधस्य च' या स्थलीं 'पुकि अन्तः पुगन्तः लघ्वी उपधा लघूपधा' असें व्याख्यान केल्यानें आणि तसेंच इतर स्थलीं (जें तच्छेपपक्षावर दोष दाखविले आहेत त्या स्थलीं देखील भिन्न भिन्न तऱ्हेनें व्याख्यान केल्यानें त्या)

सर्व दोषांचें निवारण करतां येतें. (प्रकृत सूत्रावरील भाष्यांत तच्छेषपक्षावर वार्तिककारानें जे दोष दिले आहेत त्यांचें व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात—'मिदेर्गुणः इक इति वक्तव्यम् । अनन्त्यत्वाद्धि न प्राप्नोति । पुगन्तलघूपधस्य गुण इक इति वक्तव्यम् । अनन्त्येत्वाद्धि न प्राप्नोति । ऋच्छेर्लिटि गुण इक इति वक्तव्यम् । अनन्त्यत्वाद्धि न प्राप्नोति । ऋदृशोऽङि गुणः इक इति वक्तव्यम् । अनन्त्यत्वाद्धि न प्राप्नोति । क्षिप्रक्षुद्रयोर्गुण इक इति वक्तव्यम् । अनन्त्यत्वाद्धि न प्राप्नोति ।' आणि पुढें यावर दिलेल्या दोषांचें निवारण करितांना भाष्यकार म्हणतात—'अथवा सर्वत्रैवात्र स्थानी निर्दिश्यते । इह तावन्मिदेरित्यविभक्तिको निर्देशः । मिद एः मिदेरिति । अथवा षष्ठीसमासो भविष्यति । मिद इः मिदिः मिदेरिति । पुगन्तलघूपधस्येति नैवं विज्ञायते पुगन्तस्याङ्गस्य लघूपधस्य चेति । कथं तर्हि ?०। पुक्यन्तः पुगन्तः । लघ्व्युपधा लघूपधा । पुगन्तश्च लघूपधा च पुगन्तलघूपधं पुगन्तलघूपधस्येति । अवश्यं चैतदेवं विज्ञेयम् । अङ्गविशेषणे हि सतीह प्रसज्येत भिनत्ति छिनत्तीति । ऋच्छेरपि प्रश्लिष्टनिर्देशोऽयम् । ऋच्छति ऋ ऋ ऋताम् ऋच्छत्यृतामिति । दृशेरपि योगविभागः करिष्यते । उरङि गुणः । उरङि गुणो भवति । ततो दृशेः । दृशेश्चाङि गुणो भवति । उरित्येव । क्षिप्रक्षुद्रयोरपि यणादिपर गुण इतीयता सिद्धम् । सोऽयमेवं सिद्धे सति यत्पूर्वग्रहणं करोति तस्यैतत्प्रयोजनमिको यथा स्यादनिको मा भूदिति ।' या वरील भाष्याचा अर्थ असा आहे की, तच्छेषपक्षावर दूषणें देतांना ज्या सूत्रांचा निर्देश केला आहे त्या सर्व सूत्रांत स्थानी साक्षात् निर्दिष्ट आहे असें मानतां येऊं शकत असल्यामुळें 'इकः' या पदाचें त्या सूत्रांत ग्रहण करण्याची मुळींच गरज पडत नाही. उदाहरणार्थ 'मिदेर्गुणः' सू. २३४६ या सूत्रांतील 'मिदेः' या पदांत 'मिद्' व 'एः' अशीं दोन भिन्न पदें आहेत असें मानलें व 'मिद्' हें लुप्तविभक्तिक षष्ठ्यन्त पद आहे असें मानलें अथवा 'मिदेः' हा षष्ठीतत्पुरुष मानून त्याचा

मिदःइःमिदिः तस्य मिदेः' असा विग्रह केला तर या सूत्रांत 'इ' ृा गुणाचा स्थानी निर्दिष्ट आहे असें मानतां येतें व त्यामुळें इक्-परिभाषा उपस्थित होण्याचें व वरील सूत्रांत 'इकः' हें पद घालण्याचें कांहींच कारण राहत नाहीं. तसेंच 'पुगन्तलघूपधस्य च' सू. २१८९ या सूत्रांतील 'पुगन्त' व 'लघूपध' हे दोन शब्द 'अङ्गस्य' या अनुवृत्त पदाचें विशेषण न मानतां व त्यांचा बहुव्रीहिसमास न करितां, 'पुकि अन्तः पुगन्तः' असा सप्तमीतत्पुरुष व 'लघ्वी उपधा लघूपधा' असा कर्मधारय व नंतर या दोन पदांचा समाहारद्वन्द्व केल्यानें, पुगागम पुढें असतांना त्याच्या लगेंच मागें असलेला वर्ण आणि उपधेंतील ऱ्हस्व स्वर हे साक्षात् निर्दिष्ट स्थानी ठरतात व त्यामुळें त्या सूत्रांत सांगितलेला गुण त्यांना होऊं शकतो. म्हणून त्या सूत्रांत देखील इक्चें ग्रहण करण्याची कांहीं गरज राहत नाहीं. त्याचप्रमाणें 'ऋच्छत्यॄताम्' सू. २३८३ या सूत्रांत ऋकाराचा प्रश्लेष केला व 'ऋच्छति, ऋ ॠ ॠताम्' अशी त्या सूत्राचीं पदें पाडलीं तर 'ऋच्छ्' धातूंतील ऋकार गुणाचा स्थानी ठरतो व अशा रीतीनें त्या सूत्रांत 'ऋच्छ्' धातूंतील ऋकार हा गुणाचा साक्षात् निर्दिष्ट स्थानी ठरत असल्यामुळें, त्या सूत्रांत देखील 'ऋच्छतेरिकः' असें म्हणण्याची कांहीं आवश्यकता राहत नाहीं. तसेंच 'ऋदृशोऽङि गुणः' सू. २४०६ या सूत्राचा योगविभाग केल्यास व 'उरङि गुणः' व 'दृशेः' अशीं त्या सूत्राचीं दोन सूत्रें केल्यास व 'दृशेः' या उत्तर-सूत्रांत पूर्व सूत्रांतून 'उः' हें पद अनुवृत्त केल्यास, 'दृशेः उः गुणः= दृशेः ऋकारस्य गुणो भवति' असा 'दृशेः' या त्या पृथक् सूत्राचा अर्थ होतो आणि अशा रीतीनें त्या सूत्रांत 'दृश्' धातूंतील ऋकार हा गुणाचा साक्षात् निर्दिष्ट स्थानी ठरत असल्यामुळें, 'दृशेरिकः गुणः' असें म्हणण्याची कांहीं गरज राहत नाहीं. त्याचप्रमाणें 'स्थूलदूरयुव' सू. २०१५ या सूत्राचीं 'स्थूलदूरयुवऱ्हस्वानां यणादि-परम्' व 'क्षिप्रक्षुद्रयोः पूर्वस्य च गुणः' अशीं दोन सूत्रें केलीं व

द्वितीय सूत्रात 'यणादिपरं लुप्यते' हीं पदें अनुवृत्त करून त्या सूत्राचा 'क्षिप्र, क्षुद्र' या शब्दांतील यणाच्या, म्हणजे रकाराच्या, मागील वर्ण जे पकार व दकार आहेत त्यांच्या पुढील भागाचा, म्हणजे 'र'चा, लोप होतो आणि पकार व दकार यांच्या पूर्वी असलेल्या वर्णाला गुण होतो असा अर्थ केला असतां, या सूत्रांत देखील 'क्षिप्र' व 'क्षुद्र' यांतील 'पूर्वस्य' हा स्थानी साक्षात् निर्दिष्ट होत असल्या-मुळें, येथें देखील इक् या पदाचें ग्रहण करण्याची कांहीं गरज राहत नाहीं. अशाच तऱ्हेचें शब्दकौस्तुभांत देखील व्याख्यान केलें असल्या-मुळे तें व्याख्यान येथें ग्रन्थविस्तारभयास्तव दिलें नाहीं. तें व्याख्यान शब्दकौस्तुभांत पाहावें. वरील भाष्यांत 'मृजेर्वृद्धिः' सू. २४७३ या सूत्राबद्दल उल्लेख केला नाही. पण प्रकृत सूत्रावरील पुढील भाष्यांत त्या सूत्राबद्दल उल्लेख केला आहे. त्या पुढील भाष्यांत भाष्यकार म्हणतातः–'योगविभागः करिष्यते । मृजेर्वृद्धिरचः । ततो ञ्णिति । ञिति णिति च वृद्धिर्भवति । अच इत्येव । यद्यचो वृद्धिरुच्यते न्यमार्ट् अटोऽपि वृद्धिः प्राप्नोति । अटि चोक्तम् । किमुक्तम् । अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य कार्यं भवतीति ।' भाष्यकारांच्या म्हण-ण्याचा भावार्थ हा आहे की, 'अचो ञ्णिति' हें सूत्र व त्याच्या लगेंच मागें असलेलें 'मृजेर्वृद्धिः' हें सूत्र मिळून एक सूत्र पठित करावें व त्या सूत्राचा 'मृजेर्वृद्धिरचः' व 'ञ्णिति' असा योगविभाग करावा. तसा योगविभाग केल्यानें 'मृज्' धातूंतील 'अच्', म्हणजे ऋकार, हा वृद्धीचा साक्षात् निर्दिष्ट स्थानी ठरतो व त्यामुळें या सूत्रांत देखील 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा उपस्थित होण्याची व 'इकः' हें पद जोड-ण्याची कांहीं गरज राहत नाहीं. यावर पुन्हा भाष्यकार अशी शंका करतात कीं, 'मृजेर्वृद्धिरचः' असें सूत्र पठित केलें तर 'न्यमार्ट्' या स्थळीं 'लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः' सू. २२०६ या सूत्रान्वयें जो 'अट् = अ' आगम झाला आहे तो अच् असल्यामुळें व 'यदागमाः' या परिभाषे-न्वयें तो धातूचा अवयव होत असल्यामुळें त्याला देखील वृद्धि

होण्याची आपत्ति येईल व या शंकेवर ते असें उत्तर देतात कीं, 'अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य' परि. १०४—म्हणजे जेथें एखाद्या सूत्रानें सांगितलेलें आदेशरूप कार्य अन्त्य वर्णाहून भिन्न दोन वर्णाना एखाद्या शब्दस्वरूपांत युगपत् प्राप्त होतें तेथें तें कार्य अन्त्य वर्णाच्या लगेंच मागें असणाऱ्या वर्णासच होतें व उपान्त्य वर्णाच्या मागें असलेल्या वर्णास तें कार्य होत नाहीं—या परिभाषेचा आश्रय केल्यानें 'मृज्' धातूंतील अन्त्य वर्णाच्या लगेंच पूर्वी असलेल्या ऋकारास वृद्धिकार्य होतें व त्याच्या पूर्वी असलेल्या अट्‌ला म्हणजे अकारास, तें कार्य होत नाहीं. सारांश वार्तिककारानें तच्छेपपक्षावर जे दोप दिले होते त्या सर्व दोपांचें भाष्यकारांनीं वर सांगितल्याप्रमाणें निराकरण केलें आहे. आतां येथें शंकाकार अशी शंका करतो कीं,'पुगन्तलघूपवस्य च' या सूत्रांतील 'पुगन्त' या शब्दाचा भाष्यांत सांगितल्याप्रमाणें 'पुकि अन्तः पुगन्तः' असा विग्रह केल्यास 'यापयति, क्ष्मापयति' इत्यादि इष्ट रूपांची सिद्धि होऊं शकणार नाहीं; कारण 'अर्तिह्रीव्ली' सू. २५७० या सूत्रानें 'या' या आकारान्त धातूहून व तसेंच 'क्ष्मायी' या धातूहून पुगागम केला असतां 'याप्, क्ष्माप्' अशी स्थिति आल्यावर पुगागमाच्या लगेंच पूर्वी असलेल्या आकारास 'पुगन्तल-घूपवस्य च' सू. २१८९ या सूत्रानें गुण होण्याची आपत्ति येईल, म्हणजे आकाराचे जागीं अकरादेश होईल, व 'यपयति, क्ष्मपयति' अशीं अनिष्ट रूपें होतील. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, 'पुगन्त' या शब्दाचा 'पुकि अन्तः' असा विग्रह केल्यानें) 'यापयति, क्ष्मापयति' इत्यादि स्थलीं कांहीं दोप येत नाहीं; कारण गुण प्रथम करून नंतर वृद्धि केल्यास इष्ट रूपें सिद्ध होऊं शकतात. ('याप्+णिच्+अ+ति' या स्थलीं 'पुगन्तलघूपधस्य च' या सूत्रानें आकारास प्रथम गुण करून त्याचा अकार केला तरी, 'अत उपधायाः' सू. २२८२ या सूत्रानें पुन्हा त्या अकाराची 'आ' अशी वृद्धि होऊन 'यापयति' इत्यादि रूपें सिद्ध होण्यांत कांहीं अडचण

येत नाही असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) गुण केल्यानंतर वृद्धि होऊं शकत असल्यामुळेच, 'समयाच्च यापनायाम्' सू. २१३१ या सूत्रात केलेला 'यापनायाम्' हा निर्देश योग्य ठरतो. (गुण होऊन वृद्धि होऊं शकली नसती तर वरील सूत्रात 'यपनायाम्' असा निर्देश केला असता. पण 'यापनायाम्' असा त्या सूत्रात निर्देश केल्यामुळें हे सिद्ध होते की, 'पुगन्तलघूपधस्य च' या सूत्राने आकाराला प्रथम गुण करून त्याचा अकार केल्यावर त्या अकाराची 'अत उपधायाः' या सूत्रानें वृद्धि होऊं शकते. अशा रीतीनें वार्तिककारानें तच्छेपपक्षावर दिलेल्या सर्व दोषाचे शब्दकौस्तुभांत परिमार्जन केले असल्यामुळें दीक्षितांनी मनोरमेंत) 'तच्छेपपक्षेऽपि दूषणोद्धारस्तु शब्दकौस्तुभे स्पष्टीकृतोऽस्माभिः' असे म्हटले आहे. मग जर दीक्षितानी स्वतःच तच्छेपपक्षावर दिलेल्या सर्व दोषाचें निराकरण केले आहे तर प्रक्रियाकौमुदीकार व प्रसादकार यांनी जो नियमपक्ष मानला आहे (त्याचे त्यांच्यामतें तच्छेपपक्षांत पर्यवसान होत असल्यामुळें, म्हणजे तो तच्छेपपक्षच ठरत असल्यामुळें,) तो त्यांनी त्याज्य का ठरविला आहे असा कोणी प्रश्न केल्यास, त्याचे उत्तर श्रवण करा. 'पुगन्तलघूपधस्य च' या सूत्रांत वर सांगितल्या-प्रमाणे स्थानी साक्षात् निर्दिष्ट आहे असे मानल्यास, 'लघूपध' या सूत्रासामध्यें 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा उपस्थित होणार नाही आणि त्यामुळें त्या सूत्राने होणारा लघूपध गुण इग्लक्षण गुण, म्हणजे 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा उपस्थित होऊन होणारा गुण, ठरणार नाही व त्याचा परिणाम असा होईल की, 'भिन्नम्' इत्यादि स्थली गुणाचा निषेध न होण्याची आपत्ति येईल व ही आपत्ति टाळण्या-करिताच दीक्षितांनी प्रसादकारादिकांचा नियमपक्ष त्याज्य मानला आहे. ('भिद् + त' या स्थली 'पुगन्तलघूपधस्य च' या सूत्राने प्राप्त झालेल्या गुणकार्याचा 'क्ङिति च' सू. २२१७ या सूत्रानें निषेध होतो; कारण 'त' हा प्रत्यय कित् आहे. पण तच्छेपपक्षावर दिलेल्या

दोषांचें निवारण करतेवेळीं असें म्हटलें आहे कीं, 'पुगन्तलघूपधस्य च' या सूत्रांत गुणाचा स्थानी साक्षात् निर्दिष्ट असल्यामुळें त्या सूत्रांत 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा उपस्थित होण्याची कांहींच आवश्यकता नाहीं, व हें म्हणणें बरोबर मानल्यास, त्या सूत्रान्वयें होणारा गुण इग्लक्षण गुण ठरत नसल्यामुळें, इग्लक्षण गुणाचा निषेध करणारें 'क्ङिति च' हें निषेधक सूत्र त्या अनिग्लक्षण गुणाचा निषेध करूं शकणार नाहीं. त्यामुळें 'भिद्+क्त' या स्थलीं 'क्त' हा प्रत्यय कित् असून देखील गुण होण्याची आपत्ति येईल. तच्छेपपक्ष व त्याचाच अनुसारी नियमपक्ष मानल्यास, ती आपत्ति कोणत्याहि रीतीनें टाळतां येणार नाहीं व म्हणूनच दीक्षितांनीं तो पक्ष त्याज्य मानला आहे असें शब्दरत्नकारांचें म्हणणें आहे.) 'क्नु' प्रत्यय कित् केला असल्यामुळें त्या कित्वरूप ज्ञापकाच्या आधारें हें सिद्ध होतें कीं, 'क्ङिति च' या सूत्रांत सांगितलेला निषेध जसा इग्लक्षण लघूपध गुणाला लागू पडतो तसाच तो अनिग्लक्षण लघूपध गुणाला देखील लागू पडतो असें कोणी म्हटल्यास, त्याला उत्तर हें आहे कीं, तो निषेध अनिग्लक्षण-गुणाला देखील वरील ज्ञापकाच्या आधारें लागू पडतो असें मानण्या-पेक्षां पदोपस्थितिपक्ष मानणें हेंच अधिक योग्य आहे. (वास्तविक प्रकृत सूत्रावरील भाष्यांत 'इक्प्रकरणात् इग्लक्षणयोर्गुणवृद्ध्योः प्रतिषेधः,' म्हणजे 'क्ङिति च' इत्यादि निषेधक सूत्रें इक्प्रकरणांत पठित असल्यामुळें तीं इग्लक्षणगुणवृद्धीचाच प्रतिषेध करणारीं सूत्रें आहेत, असें भाष्यकारांनी स्पष्ट म्हटलें आहे. परंतु तच्छेप-पक्षांत 'पुगन्तलघूपधस्य च' या इक्प्रकरणांत पठित नसलेल्या सूत्रान्वयें होणारा गुण अनिग्लक्षण मानला आहे व त्यामुळें 'क्ङिति च' हा निषेध त्याला लागू पडत नाहीं असें नुकतेंच वर म्हटलें आहे. मग तो निषेध जर केवळ इग्लक्षणगुणवृद्धीचाच निषेध करणारा आहे तर, 'त्रसिगृधिधृषिक्षिपेः क्नुः' सू. ३१२० या इक्-प्रकरणांत पठित नसलेल्या सूत्रांत 'क्नु' प्रत्ययाला कित् केल्यानें

गुणनिषेध होऊं शकत नाहीं व त्या प्रत्ययाचें कित्करण अनर्थक ठरण्याची आपत्ति येते; कारण तो प्रत्यय कित् असला किंवा नसला तरी, 'पुगन्तलघूपधस्य च' या सूत्रान्वयें होणारा अनिग्लक्षण गुण टाळतां येणें अशक्य आहे. परंतु तो प्रत्यय मुद्दाम कित् केला असल्यामुळें, त्या कित्करणरूप ज्ञापकाच्या आधारें हें सिद्ध होतें कीं, 'क्ङिति च' हा निषेध इग्लक्षण व अनिग्लक्षण अशा दोन्ही प्रकारच्या लघूपध गुणाला लागू पडणारा निषेध आहे, व तसें मानलें म्हणजे, 'क्नु' प्रत्ययाचें कित्करण व्यर्थ न ठरतां सार्थक ठरतें, आणि तसें मानल्यानें, 'भिन्नम्' हें रूप सिद्ध होण्यांस कांहीं अडचण येत नाहीं; कारण 'भिद् + क्त' या स्थलीं जरी 'पुगन्तलघूपधस्य च' या सूत्रान्वयें होणारा अनिग्लक्षण लघूपध गुण पावला आहे तरी, वरील ज्ञापकाच्या आधारें 'क्ङिति च' हा निषेध तशा अनिग्लक्षण गुणाला देखील लागू पडत असल्यामुळें, गुण न होता 'भिन्नम्' असें इष्ट रूप तच्छेशपक्षांत देखील सिद्ध होऊं शकतें. 'क्ङिति च' १·१·५ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात—'अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्युपधालक्षणस्य गुणस्य प्रतिषेध इति यदयं त्रसिगृधिधृषिक्षिपेः क्नुः, इको झल्हन्ताच्च इति क्नुसनौ कितौ करोति। कथं कृत्वा ज्ञापकम् ? । कित्करणे एतत्प्रयोजनं गुणः कथं (कथमपि) न स्यादिति। यदि चात्र गुणप्रतिषेधो न स्यात् कित्करणमनर्थकं स्यात्। पश्यति त्वाचार्यो भवत्युपधालक्षणस्य प्रतिषेध इति, ततः क्नुसनौ कितौ करोति।' या भाष्याचा अर्थ हा आहे कीं, ज्याअर्थी आचार्य पाणिनीनें 'त्रसिगृधि' या सूत्रानें सांगितलेल्या 'क्नु' प्रत्ययाला इत्संज्ञक ककार जोडला आहे आणि तसेंच 'इको झल्' सू. २६१३ या सूत्रानें होणाऱ्या हलादि 'सन्' प्रत्ययाचे ठिकाणीं कित्त्वाचा अतिदेश केला आहे, त्याअर्थी हें ज्ञापित होतें कीं, 'क्ङिति च' हा निषेध जसा इग्लक्षण गुणाला लागू पडतो तसाच तो अनिग्लक्षण गुणालाहि लागू पडतो.

त्या प्रत्ययांना कित् करण्याचें प्रयोजन हेंच आहे कीं, ते प्रत्यय पुढें आले असतां गुण मुळींच होऊं नये. जर वरील 'क्नु' व 'सन्' प्रत्ययांचे ठिकाणीं 'क्ङिति च' या सूत्रानें होणारा निषेध प्रवृत्त होणार नाहीं तर, त्या प्रत्ययांना केलेलें कित्व अनर्थक ठरेल. यावरून आचार्य पाणिनी हें ज्ञापित करतात कीं, 'क्ङिति च' या सूत्रानें अनिग्लक्षण लघूपधगुणाचा देखील निषेध होतो. तच्छेपपक्ष मानल्यास 'भिन्नम्' हें रूप मुळींच सिद्ध होऊं शकणार नाहीं असा जो त्या पक्षावर दोष दिला होता त्या दोषाचें निवारण करण्याकरितां शंकाकारानें वरील भाष्याच्या आधारावरच पूर्वोक्त शंका उपस्थित केली आहे असें दिसतें. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, वरील ज्ञापकाच्या आधारें अनिग्लक्षण लघूपधगुणाचा निषेध करण्यापेक्षां पदोपस्थितिपक्ष मानणें यांतच लाघव आहे; कारण तो पक्ष मानल्यानें 'पुगन्तलघूपधस्य च' या सूत्रानें होणारा गुण इग्लक्षण ठरून इग्लक्षण गुणाचा प्रतिषेध करणारा 'क्ङिति च' हा निषेध त्याला लागू पडत असल्यामुळें, अनिग्लक्षण लघूपधगुणाला देखील तो निषेध लागू पडण्याकरितां ज्ञापकें शोधण्याची गरज पडत नाहीं, व पदोपस्थितिपक्षांत जें पाणिनीय सूत्रानेंच सिद्ध होतें तें तच्छेपपक्ष मानल्यानें पाणिनीय सूत्रानें सिद्ध होऊं शकत नसून तें सिद्ध करण्याकरितां ज्ञापकें शोधण्यापेक्षां पदोपस्थितिपक्ष मानण्यांतच लाघव आहे. दुसरें असें कीं, तच्छेपपक्षावर दिलेल्या दोषांचें निवारण करतेवेळीं भाष्यकारांना किती तरी क्लिष्ट कल्पना कराव्या लागल्या हें त्या भाष्यावरूनच स्पष्ट होतें. त्यांनीं कोठें कोठें सूत्रांचा दण्डपाठ मानला आहे, कोठें कोठें सूत्रांचे योगविभाग केले आहेत, कोठें कोठें वर्ण प्रश्लेप मानला आहे व कोठें कोठें पदांचा विलक्षण रीतीनें क्लिष्ट पदच्छेद केला आहे, आणि एवढें सर्व करूनहि जेथें काम भागलें नाहीं तेथें परिभाषान्तराची मदत घेतली आहे व कोठें कोठें ज्ञापकांची मदत घेतली आहे. तिसरें असें कीं, 'गुणानां च परार्थत्वात्'

या न्यायान्वयें जरी दोन परिभाषांमध्यें अङ्गाङ्गिभाव–विशेषण-विशेष्यभाव–होऊं शकत नाहीं तरी, तशा प्रकारचा विशेषणविशेष्यभाव 'अलोऽन्त्यस्य' व 'इको गुणवृद्धी' या दोन परिभाषा कार्यविधायक सूत्रांचे ठिकाणीं उपस्थित झाल्या असतां, त्या परिभाषांमध्यें मानला आहे. म्हणून असा गौरवग्रस्त व दोषयुक्त तच्छेषपक्ष मानण्यापेक्षां पदोपस्थितिपक्ष मानणेंच श्रेयस्कर आहे; कारण तो पक्ष मानल्यानें तच्छेषपक्ष स्थापित करण्याकरितां जो विलक्षण प्रयास केला आहे तो करण्याची कांहीं गरज पडत नाहीं. म्हणून तच्छेषपक्षदूषणोद्धारक भाष्य एकदेशि भाष्य असून पदोपस्थितिपक्ष स्थापित करणारें भाष्य सिद्धान्तभूत भाष्य आहे हेंच मानणें उचित आहे. पदोपस्थितिपक्ष हा सिद्धान्तपक्ष असल्यामुळेंच भाष्यकारांनीं प्रकृत सूत्रावरील भाष्यांत 'तस्मान्मृजेरिग्लक्षणा वृद्धिरेषितव्या', 'तस्मादिग्लक्षणा वृद्धिरास्थेया' असे म्हटलें असून त्या भाष्याच्या अखेरीस भाष्यकार म्हणतात:– 'अथवेदं तावदयं प्रष्टव्यः। सार्वधातुकार्धधातुकयोर्गुणो भवतीतीह कस्मान्न भवति। याता वाता। इदं तत्रापेक्षिष्यत इको गुणवृद्धी इति। यथैव तर्हीदं तत्रापेक्षिष्यत एवमिहापि तदपेक्षिष्यामहे। सार्वधातुकार्धधातुकयोरिको गुणवृद्धी इति।' म्हणून दीक्षितांनीं तच्छेषपक्ष व नियमपक्ष हे दोन्ही पक्ष स्वीकारार्ह मानले नाहींत आणि पदोपस्थितिपक्षच सिद्धान्तपक्ष मानला आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे)

मनोरमा—अचां मध्य इति। यत्तु–प्राचोक्तम् अन्त्यादचः परः इति, तन्न, "मो मुचादीनाम्" इत्यादावन्त्यस्याचोऽसंभवात्। तस्यैवान्तावयव इति। तेन त्रपूणीत्यादौ अङ्गस्य नान्तत्वेन दीर्घः सिद्धः। परादित्वे स न सिध्येत्। अभक्तत्वे तु 'यहंलिट्' इत्यत्र "यहाभ्रे लिहः" इति णत्वे "अर्धद्विपद्" इति मुमोऽनुस्वारो न स्यात्, अपदान्तत्वात्। यत्तु–अभक्तत्वे 'त्रपूणि' इति दीर्घो न स्यादिति, तन्न "तदादिग्रहणं स्यादिनुभर्थम्" इत्यङ्गसंज्ञासूत्रस्थभाष्यविरोधेन दूषितप्रायम्।

('मिदचोऽन्त्यात् परः' सू. ३७ या सूत्रांतील 'अचः' हें पद निर्धारणे षष्ठी मानून व 'अचः' हें एकवचन अविवक्षित मानून दीक्षितांनीं प्रकृत सूत्राचा 'अचां मध्ये योऽन्त्यस्तस्मात्परस्तस्यैवान्तावयवो मित्स्यात्' असा अर्थ केला आहे. पण प्रक्रियाकौमुदीकारांनीं त्या सूत्रांतील 'अचः' हें पद दिग्योगे पञ्चमी मानून 'अन्त्यादचः परो मित्स्यात्' असा त्या सूत्राचा अर्थ केला आहे. तो अर्थ बरोबर मानल्यास कोणते दोष येतात हें आतां दीक्षित सांगतात.) 'अन्त्यादचः परोमित्स्यात्' असा जो प्रक्रियाकौमुदीकारांनीं (व प्रकाशकारांनी) प्रकृत सूत्राचा अर्थ केला आहे तो बरोबर नाहीं. तो अर्थ बरोबर मानल्यास, 'शे मुचादीनाम्' सू. २५४२ इत्यादि सूत्रांनीं होणारा मित् आगम, 'मुच्' इत्यादि धातूंच्या अन्तीं अच् नसल्यामुळें, त्यांना होणें असंभवनीय आहे. (अन्त्य अचाला मित् आगम होतो, म्हणजे शब्दाच्या अन्तीं अच् असला तरच त्याला मित् आगम होतो, असा जो प्रक्रियाकौमुदीकारांनीं व प्रकाशकारांनीं प्रकृत सूत्राचा अर्थ केला आहे तो बरोबर मानला तर, 'मुच्, लुप्, लिप्, सिच्' इत्यादि धातूंच्या अन्तीं अच् नसून हल् असल्यामुळें, 'शे मुचादीनाम्' या सूत्रानें होणारा नुमागम त्यांना होणार नाहीं आणि त्यामुळें तें सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल. परंतु 'अचां मध्ये योऽन्त्यः' असा सूत्रार्थ केल्यानें 'मुच्, लुप्' यांतील 'उ' या अच्ला नुमागम होऊन 'मुञ्चति, लुम्पति' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे.) प्रकृत सूत्रावरील कौमुदींत 'तस्यैवान्तावयवो मित्स्यात्,' म्हणजे ज्याला मित् आगम होतो त्याचाच तो अन्तावयव होतो, असें म्हटलें असल्यामुळें, 'त्रपूणि' इत्यादि स्थलीं अङ्ग नकारान्त होत असल्यानें दीर्घकार्याची सिद्धि होते. जर मित् आगम पराचा—प्रत्ययाचा—आद्यवयव होतो असें मानलें तर, दीर्घकार्य सिद्ध होऊं शकणार नाहीं. जर तो मित् आगम (पूर्वाचा अन्तावयव किंवा पराचा आद्यवयव न होतां पूर्व व पर

यांच्या मध्यें) अलगच राहतो असें मानलें तर, 'वहं लिहः' या स्थलीं 'वहाभ्रे लिहः' सू. २९४७ या सूत्रानें 'लिह्' धातूहून 'खश्=अ' प्रत्यय केला असतां, 'अरुर्द्विषदजन्तस्य मुम्' सू. २९४२ या सूत्रानें अजन्त 'वह' या शब्दाला जो 'मुम्=म्' हा मित् आगम होतो तो पदाच्या अन्तीं आहे असें मानतां येणार नाहीं व त्यामुळें त्या मकाराचा 'मोऽनुस्वारः' सू. १२२ या सूत्रानें होणारा अनुस्वार होऊं शकणार नाहीं. (प्रकृत सूत्रावरील भाष्यांत १.१.४७ भाष्यकारांनीं असा प्रश्न केला आहे कीं, मित् आगम पूर्वाचा अन्तावयव होतो किंवा पराचा आद्यवयव होतो अथवा त्या दोहोंचाहि अवयव न होतां त्या दोहोंच्या मध्यें अलगच राहतो. त्या भाष्यांत भाष्यकार म्हणतात:—'किं पुनरयं पूर्वान्त आहोस्वित्परादिराहोस्विदभक्तः। कथं चायं पूर्वान्तः स्यात्कथं वा परादिः कथं वाऽभक्तः। यद्यन्त इति वर्तते ततः पूर्वान्तः। अथादिरिति वर्तते ततः परादिः। अथोभयं निवृत्तं ततोऽभक्तः।' अशा रीतीनें त्या भाष्यांत पूर्वान्तत्व, परादित्व व अभक्तत्व असे तीन पक्ष उपस्थित करून व अभक्तत्वपक्ष मानल्यास 'अभक्ते दीर्घनलोपस्वरणत्वानुस्वारशीभावाः' हे दोष येतात व परादित्वपक्ष मानल्यास 'परादौ गुणवृद्ध्यौत्त्वदीर्घनलोपानुस्वारशीभावेनकारप्रतिषेधः' हे दोष येतात आणि पूर्वान्तत्वपक्ष मानल्यास 'पूर्वान्ते नपुंसकोपसर्जनह्रस्वत्वं द्विगुस्वरश्च' हे दोष येतात असें सांगून व पूर्वान्तत्वपक्षावर दिलेल्या सर्व दोषांचे निरसन करून भाष्यकारांनीं तोच पक्ष सिद्धान्तपक्ष मानला आहे. अभक्तत्व व परादित्व या दोन पक्षांवर भाष्यांत जे दोष दिले आहेत त्या सर्व दोषांना दीक्षितांनीं मनोरमेंत उल्लेख न करितां, त्या दोन पक्षांवर दिलेल्या दोषांपैकीं प्रत्येकावरील एकच दोष उदाहरणरूपानें सांगितला आहे व दीक्षित म्हणतात कीं, पूर्वान्तत्वपक्ष मानल्यास 'त्रपूणि' इत्यादि स्थळीं उपधेला दीर्घ कार्य होऊं शकतें. 'त्रपु+जस्' या स्थळीं 'जश्शसोः शिः' सू. ३१२

या सूत्रानें 'जस्' चें जागीं 'शि=इ' असा आदेश होतो व 'शि सर्वनामस्थानम्' सू. ३१३ या सूत्रान्वयें 'शि' हें सर्वनामस्थान असल्यामुळें, 'नपुंसकस्य झलचः' सू. ३१४ या सूत्रानें 'त्रपु' या अजन्त नपुंसक अङ्गांतील अन्त्य उकाराला नुमागम होतो व 'त्रपुन्+शि' अशी स्थिति होते. नुम् हा मित् आगम 'त्रपु' या पूर्व अङ्गाचा अन्तावयव होत असल्यामुळेंच 'त्रपुन्' हें नकारान्त अङ्ग होतें व त्यापुढें असलेला 'शि=इ' हा प्रत्यय सर्वनामस्थान प्रत्यय असल्यामुळे, 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' सू. २५० या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन व 'अट्कुप्वाङ्नुम्व्यवायेऽपि' सू. १९७ या सूत्रानें णत्व होऊन 'त्रपूणि' असें इष्ट रूप सिद्ध होतें. जर 'नुम्=न्' हा मित् आगम पूर्व अङ्गाचा अन्तावयव न मानतां 'शि=इ' या परप्रत्ययाचा आद्यवयव मानला तर, म्हणजे परादित्व पक्ष मानला तर, 'त्रपु+नि' अशी स्थिति होईल व या स्थलीं 'त्रपु' हें अङ्ग नकारान्त होत नसल्यामुळें, सर्वनामस्थान प्रत्यय पुढें आला असतां नकारान्त अङ्गाची उपधा दीर्घ होते हें सांगणाऱ्या 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' या सूत्राची प्रवृत्ति होऊं शकणार नाहीं व त्यामुळें उपधा दीर्घ कार्य होऊं शकणार नाहीं आणि 'त्रपूणि' असें इष्ट रूप सिद्ध होणार नाहीं. म्हणून पूर्वान्तत्वपक्ष मानणेंच योग्य आहे असें दीक्षितांचें म्हणणें आहे. आतां अभक्तत्वपक्ष मानल्यास दीक्षित म्हणतात कीं, 'वहंलिहः' हें रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं; कारण 'वहं=स्कन्धं-लेढीति वहंलिहः गौः' या स्थलीं 'वहम्' हें कर्मणि उपपद असल्यामुळें 'लिह्' धातूहून 'वहाभ्रे लिहः' या सूत्रानें 'खश्=अ' प्रत्यय झाला असतां, 'वह' या अजन्त शब्दापुढें 'लिह+सु=लिहः' हें खिदन्त उत्तरपद येत असल्यामुळें 'वह' या अजन्त शब्दाहून 'अरुर्द्विषदजन्तस्य मुम्' या सूत्रानें जो 'मुम्=म्' हा मित् आगम होतो तो 'वह' या पूर्वपदाचा अन्तावयव न मानतां, अभक्त, म्हणजे 'वह' व 'लिह' या दोन पदांमध्यें अलग राहणारा आहे असें, मानल्यास, तो

मकार पदाच्या अन्ती आहे असें मानतां येणार नाही व त्यामुळे हल् पुढें असतां पदान्ती असलेल्या मकाराचा अनुस्वार होतो हे सांगणाऱ्या 'मोऽनुस्वारः' सू. १२२ या सूत्राची प्रवृत्ति होणार नाही व 'वहलिहः' हे इष्ट रूप सिद्ध होणार नाही. म्हणून अभक्तत्वपक्ष देखील स्वीकारार्ह नाही आणि पदान्तत्वपक्षच मानणे योग्य आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे.) अभक्तत्वपक्ष मानल्यास 'त्रपूणि' या स्थली उपधा दीर्घ होणार नाही असें जें कित्येक वैयाकरण म्हणतात ते अङ्गसंज्ञासूत्रावरील भाष्यात पठित असलेल्या 'तदादिग्रहणं स्यादिनुमर्थम्' या वार्तिकान्वये अदूषित ठरते. ('यस्मात्प्रत्ययविधिः' सू. १·४·१३ या अङ्गसंज्ञाविधायक सूत्रावरील भाष्यात 'अङ्गसंज्ञायातदादिवचनं स्यादिनुमर्थम्' हे वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात:—'अङ्गसंज्ञाया तदादिग्रहणं क्रियते । किं प्रयोजनम् ? । स्यादिनुमर्थम् । स्याद्यर्थं नुमर्थं च । स्याद्यर्थं तावत्—करिष्यावः करिष्यामः । नुमर्थं कुण्डानि वनानि । 'कृ+इ+स्य+मस् = करिष्य+मस्' या स्थली 'कृ' धातूहून उत्तम पुरुषाच्या वहुवचनाचा 'मस्' प्रत्यय झाला आहे. 'यस्मात्प्रत्ययविधिः' या अङ्गसंज्ञाविषयक सूत्रात 'तदादि' हे पद नसते तर, 'कृ' एवढ्यालाच अङ्गसंज्ञा झाली असती व 'मस्' प्रत्ययापूर्वी असणाऱ्या 'करिष्य' या समुदायाला अङ्गसंज्ञा झाली नसती आणि त्यामुळे अदन्त अङ्गापुढे यञादि सार्वधातुकप्रत्यय आला असता त्या अङ्गातील अन्त्य अकार दीर्घ होतो हे सांगणाऱ्या 'अतो दीर्घो यञि' सू. २१७० या सूत्रान्वयें 'ष्य' यातील अन्त्य अकार दीर्घ झाला नसता व 'करिष्यामः' असे इष्ट रूप सिद्ध होऊं शकले नसते. पण त्या अङ्गसंज्ञाविधायक सूत्रात 'तदादि' हे पद घातले असल्यामुळे, 'मस्' प्रत्ययापूर्वी असणाऱ्या व 'कृ' ज्याचा आदि आहे अशा 'कृ + इ + स्य = करिष्य' या समुदायाला अङ्गसंज्ञा होऊन 'करिष्य' हे 'मस्' प्रत्ययाचे अङ्ग

ठरत असल्यामुळें, त्यांतील अन्त्य अकार दीर्घ होतो व 'करिष्यामः' हें इष्ट रूप सिद्ध होतें. त्याचप्रमाणें 'त्रपु + जस् = त्रपु + शि' या स्थलीं 'नपुंसकस्य झलचः' सू. ३१४ या सूत्रानें 'नुम् = न्' आगम होऊन 'त्रपु + न् + शि' अशी स्थिति झाली असतां 'शि = इ' या प्रत्ययापूर्वी 'त्रपुन' हा समुदाय असल्यामुळें त्या समुदायाला, 'यस्मात्प्रत्ययविधिः' या सूत्रांत 'तदादि' या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें, अङ्गसंज्ञा होते आणि अशा रीतीनें 'त्रपुन्' हें नकारान्त अङ्ग ठरत असल्यामुळें, 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' सू. २५० या सूत्रानें त्या अङ्गांतील उपधा दीर्घ होते. म्हणून दीक्षित म्हणतात कीं, 'अभक्तत्वे त्रपूणि इति दीर्घो न स्यात्' असें जें कित्येक वैयाकरणांचें म्हणणें आहे तें वरील भाष्यांत पठित असलेल्या पूर्वोक्त वार्तिकान्वयें चूक ठरतें.)

शब्दरत्न-(इत्यादाविति आदिना झलन्तलक्षणो नुम्, इदितो नुमित्यादि च । अचोऽसम्भवादिति । नुमो मित्त्वं तु ज्ञानानीत्यादौ चरितार्थमिति मुचादावन्त्यस्यैव स्यादिति भावः । दीर्घः सिद्ध इति । तच्छब्देन यस्य विहितः स समुदायः परामृश्यते इति भावः । यद्यपि 'तस्यान्त्याचः' इति व्याख्यानेऽपि, भवितेत्यादौ तासवयवेटो लघूपधाङ्गावयत्वेन प्राप्तस्य गुणस्य "दीधीवेवीटाम्" इति निषेधारम्भेण, लोकव्यवहारेण चावयवावयवस्य समुदायावयवत्वाङ्गोकादत्र न दोषः, तथाऽपि तथा न व्याख्यातम्, पञ्चारत्नीनीत्यादौ पदस्य विभज्यान्वाख्याने उत्तरपदस्यापि नान्तत्वापत्तौ "इगन्त" इति स्वरानापत्तेरिति स्पष्टं भाष्यादौ । त्रपूणीत्युपलक्षणम्, 'ता ता पिण्टानाम्' इति नलोपसिद्धेः । तानि तानीत्यर्थे "शेश्छन्दसि" इति शेर्लोपे तदुदाहरणम् ॥

'मे मुचादीनाम् इत्यादावन्त्यस्याचोऽसम्भवात्' या मनोरमेच्या पंक्तींतील 'इत्यादौ' या पदांत जो 'आदि' शब्द घातला आहे त्या शब्दानें 'नपुंसकस्य झलचः' सू. ३१४ या सूत्रानें झलन्त अङ्गास

होणाऱ्या नुम्‌चें व तसेंच 'इदितो नुम् धातोः' सू. २२६२ इत्यादि सूत्रांनीं होणाऱ्या नुम्‌चें देखील ग्रहण होतें. ('नपुंसकस्य झलचः' या सूत्रानें सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतां नपुंसकलिङ्गी अजन्त व तसेंच झलन्त प्रातिपदिकाला नुमागम होणें सांगितलें आहे. झलन्तरूप लक्षणामुळें—निमित्तामुळें—या सूत्रानें होणाऱ्या नुमागमास झलन्त-लक्षण नुम् असें म्हणतात, व अजन्तरूप निमित्तामुळें या सूत्रानें होणाऱ्या नुमागमास अजन्तलक्षण नुम् असें म्हणतात. 'अन्त्यादचः परो मित् स्यात्.' म्हणजे शब्दाच्या अन्तीं असणाऱ्या अचाला मित् आगम होतो, असा जो प्रक्रियाकौमुदीकारांनीं प्रकृत सूत्राचा अर्थ केला आहे तो बरोबर मानल्यास, 'नपुंसकस्य झलचः' या सूत्रानें होणारा नुम् हा मित् आगम अजन्त प्रातिपदिकाहून होऊं शकेल, पण झलन्त प्रातिपदिकाहून तो आगम अजन्तत्वाच्या अभावामुळें होऊं शकणार नाहीं. तसेंच धातुपाठांत 'स्कुदि, दिवदि, वदि, भदि, मदि' इत्यादि जे अनेक इदित् धातु पठित केले आहेत त्यांतील इत्संज्ञक इकार नाहींसा झाल्यावर ते सर्व धातु हलन्त होत असल्यामुळें, त्यांना देखील 'इदितो नुम् धातोः' या सूत्रानें होणारा नुम् हा मित् आगम अजन्तत्वाच्या अभावामुळें न होण्याची आपत्ति येईल. म्हणून प्रक्रियाकौमुदीकारांनीं केलेला प्रकृत सूत्राचा अर्थ स्वीकारार्ह नाहीं असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'अन्त्यस्याचोऽनम्भयात्' असें जे मनोरमेच्या वरील पंक्तींत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'ज्ञानानि' इत्यादि स्थलीं 'नुम्' मित् करण्याचें प्रयोजन चरितार्थ—सफल—झालें असल्यामुळें, 'मुच्' इत्यादि धातूंतील अन्त्य वर्णालाच नुमागम होण्याची आपत्ति येईल. ('अन्त्यादचः परो मित्स्यात्' असा प्रकृत सूत्राचा अर्थ केल्यास, तें सूत्र 'ज्ञान' इत्यादि अजन्त शब्दांहून होणाऱ्या नुमागमाच्या विषयांत चरितार्थ झालें असल्यामुळें 'मुच्' इत्यादि हलन्त धातूंच्या ठिकाणीं त्या सूत्राची प्रवृत्ति होणार नाहीं व 'मुच्' इत्यादि धातूंच्या अन्तीं अच् नसल्या-

मुळें, 'शे मुचादीनाम्' सू. २५४२ हें सूत्र व्यर्थ न ठरावें म्हणून, या सूत्राच्या सामर्थ्यानें तो नुमागम अन्त्य हलाला होण्याची व इष्ट रूपें सिद्ध न होण्याची आपत्ति येईल. पण 'अचांमध्ये योऽन्त्यः' अशा रीतीनें दीक्षितांनीं जो प्रकृत सूत्राचा अर्थ केला आहे तसा अर्थ केल्यास वरील आपत्ति सहज टाळतां येते.) 'तस्यैवान्तावयवः' असें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे त्यांतील 'तस्य' या सर्वनामानें ज्या समुदायांतील अन्त्य अचाला मित् आगम होणें सांगितलें आहे त्या समुदायाचें ग्रहण होतें व त्यामुळें 'त्रपूणि' या स्थलीं 'दीर्घः सिद्धः' असें मनोरमेंत म्हटलें आहे. ('त्रपु' या अङ्गांतील अन्त्य उकारास नुमागम झाला असतां, तो नुमागम 'त्रपु' या संपूर्ण अङ्गाचा अवयव होत असल्यामुळें, 'त्रपुन्' हें अङ्ग नकारान्त ठरतें व त्यामुळें 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' सू. २५० या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन इष्ट रूप–'त्रपूणि' हें इष्ट रूप सिद्ध होतें असा 'अङ्गस्य नान्तत्वेन दीर्घः सिद्धः' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ आहे असें शब्दरत्नकार म्हणतात. जर 'नुम्' हा मित् आगम 'त्रपु' यांतील अन्त्य उकाराचा अवयव मानला असता व अङ्गाचा अवयव मानला नसता तर, अङ्ग नकारान्त ठरलें नसतें व त्यामुळें 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' या सूत्रानें होणारें उपधादीर्घ कार्य होऊं शकलें नसतें.) मित् आगम समुदायांतील–अङ्गांतील–अन्त्य अचाचा अवयव होतो असें जरी दीक्षितांनीं व्याख्यान केलें असतें तरी, 'भविता' इत्यादि उदाहरणांत 'तास्' प्रत्ययाला होणारा इडागम जसा अङ्गाचा लघूपधात्प अवयव मानला जाऊं शकतो व त्यामुळें त्या इडागमाला प्राप्त होणाऱ्या गुणाचा निषेध करण्याकरितां 'दीधीवेवीटाम्' सू. २१९० हें निषेधक सूत्र मुद्दाम केलें असल्यामुळें आणि तसेंच लौकिकव्यवहारांत देखील जो अवयवाचा अवयव होतो त्याला समुदायाचा अवयव मानण्याचा प्रघात असल्यामुळें त्या इडागमाला गुण होण्याची आपत्ति टळते.

त्याचप्रमाणे, 'त्रपूणि' या स्थली कांही दोष उद्भवला नसता तरी, दीक्षितांनी तसे व्याख्यान न करण्याचें कारण हे आहे की, 'पञ्चारत्नीनि' इत्यादि उदाहरणांत पदाची प्रकृतिप्रत्ययरूप शकले पाडून त्या पदाचें रूप व्याकरणरीत्या सिद्ध करतेवेळी उत्तरपद देखील नकारान्त होण्याची आपत्ति आली असती आणि त्यामुळे 'इगन्तकाल' सू. ३७६३ या सूत्राने होणारा पूर्वपदप्रकृतिस्वर न होण्याची आपत्ति आली असती. हा विषय भाष्यात स्पष्ट केला आहे. ('भू' धातूचे लुट्लकाराचे प्रथम पुरुषाचें एकवचनाचे रूप करतेवेळी 'स्यतासी लृलुटोः' सू. २१८६ या सूत्राने 'भू' धातूला 'तास्' हें विकरण लागून 'लुटः प्रथमस्य डारौरसः' सू. २१८८ या सूत्राने 'डा' हा प्रत्यय झाल्यावर 'भू तास् डा' अशी स्थिति झाली असता, 'भू' पुढे 'तास्' प्रत्यय आला असल्यामुळे 'भू' धातूतील अन्त्य ऊकाराचा 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू. २१६८ या सूत्रानें 'ओ' असा गुण होऊन व 'आर्धधातुकस्येड्वलादेः' सू. २१८४ या सूत्राने 'तास्' या वलादि आर्धधातुक प्रत्ययाला इडागम होऊन व 'एचोऽयवायावः' सू. ६१ या सूत्राने 'भो' यातील ओकाराचे जागी अवादेश होऊन आणि 'अभस्यापि टेर्लोपोऽिति' या वचनान्वये 'तास्' यातील आस या 'टि' चा लोप होऊन 'भवित्+डा = भवित्+आ' अशी स्थिति झाली असता, जरी इडागम 'तास्' प्रत्ययाला झाला आहे व तो त्याचा अवयव आहे तरी तो समुदायाचा—अङ्गाचा—अवयव मानता येतो. लौकिक व्यवहारात देखील हीच प्रथा आहे. एखाद्या मनुष्याच्या हातास सहा बोटें असली तर, जरी तीं बोटें त्याच्या हाताने अवयव आहेत तरी, त्याचा हात त्याचा अवयव असल्यामुळे, तीं बोटें देखील त्याचे अवयव मानले जातात व त्याला 'सहाबोटया' असे म्हणण्याचा प्रघात आहे. या लौकिक दृष्टान्तान्वयें 'तास्' प्रत्ययाला झालेला इडागम अङ्गाचा अवयव मानता येतो आणि त्यामुळें 'भवित् + आ' या स्थितीत इडागम हा अङ्गाचा उपधा होत असल्यामुळें, त्या

इडागमाला 'पुगन्तलघूपधस्य च' सू. २१८९ या सूत्रानें जी गुण होण्याची प्राप्ति होते ती टाळण्याकरितांच 'दीधीवेवीटाम्' हें सूत्र मुद्दाम केलें आहे. सारांश 'तास्' प्रत्ययाला होणारा इडागम जसा अङ्गाचा अवयव मानला जातो त्याचप्रमाणें 'नुम्' हा मित् आगम 'त्रपु' यांतील 'उ' या अन्त्य अचाचा अवयव मानला तरी तो 'त्रपु' या समुदायाचा—अङ्गाचा—अवयव मानतां येतो व त्यामुळें 'त्रपुन्' हें अङ्ग नकारान्त ठरून, 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' या सूत्रानें त्या अङ्गांतील 'उ' ही उपधा दीर्घ होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. मग असें जर आहे तर मित् आगम समुदायांतील अन्त्य अचाचा अवयव होतो असें न म्हणतां तो समुदायाचा अवयव होतो असें दीक्षितांनीं कां म्हटलें आहे? या प्रश्नाचें शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, दीक्षितांनीं असें म्हणण्याचें कारण हें आहे कीं, 'पञ्च अरत्नयः प्रमाणं येषां तानि पञ्चारत्नीनि' या स्थलीं 'नपुंसकस्य झलचः' सू. ३१४ या सूत्रानें होणारा नुमागम 'अरत्नि' यांतील अन्त्य इकारास झाला आहे असें मानल्यास, 'अरत्नि' हें उत्तर पद नकारान्त ठरेल व त्याचें इगन्तत्व नष्ट होईल आणि त्यामुळें 'इगन्तकाल' सू. ३७६३ या सूत्रानें होणारा पूर्वपदप्रकृतिस्वर न होण्याची आपत्ति येईल. परंतु तो नुमागम 'पञ्चारत्नि' या संपूर्ण समुदायाचा अवयव मानल्यानें, त्या समुदायांतील 'अरत्नि' या उत्तर पदाचें इगन्तत्व नष्ट न होतां तें उत्तरपद इगन्त ठरत असल्यामुळें, पूर्वपदप्रकृतिस्वर होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. प्रकृत सूत्रावरील भाष्यांत हा विषय स्पष्ट केला आहे. त्या भाष्यांत, पूर्वान्तत्वपक्ष मानल्यास 'ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' सू. ३१८ व 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' सू. ६५६ या सूत्रांनीं अनुक्रमें होणारें नपुंसकप्रातिपदिकह्रस्वत्व व उपसर्जनह्रस्वत्व आणि तसेंच 'इगन्तकाल' सू. ३७६३ या सूत्रानें द्विगु समासांत होणारा पूर्वपद-प्रकृतिस्वर होऊं शकणार नाहीं अशी आपत्ति दिली आहे, व द्विगु

समासांत पूर्वपदप्रकृतिस्वर होणार नाहीं याची 'पञ्चारत्नीनि, दशारत्नीनि' हीं उदाहरणें दिलीं आहेत. हे दोन्ही सामासिक शब्द, 'तद्धितार्थोत्तरपदसमाहारे च' सू. ७२८ व 'संख्यापूर्वो द्विगुः' सू. ७३० या सूत्रांनी द्विगु समास होऊन, सिद्ध झाले आहेत. या दोन्ही उदाहरणांत 'पञ्च' व 'दश' या शब्दांपुढें 'अरत्नि' हें इगन्त उत्तरपद असल्यामुळें त्या दोन शब्दांना 'इगन्त' सू. ३७६३ या सूत्रानें प्रकृतिस्वर, म्हणजे पञ्चन् व दशन् हे नकारान्त संख्यावाचक शब्द असल्यामुळें 'ञ्नः संख्यायाः' फिट् सू. २८ या सूत्रानें होणारा आद्युदात्तस्वर, प्राप्त झाला आहे. पण पूर्वपदप्रकृतिस्वर प्रथम केला किंवा मागून केला तरी 'इकोऽचि विभक्तौ' सू. ३२० या सूत्रानें होणारा नुमागम अवश्य प्राप्त होत असल्यामुळें, 'कृताकृतप्रसङ्गि नित्यम्' या वचनान्वयें नुमागम नित्य ठरतो च त्यामुळें तो प्रथम केल्यास व नो पूर्वाचा अन्तावयव मानल्यास, 'अरत्निन्' असें नकारान्त उत्तरपद होईल व अशा रीतीनें उत्तरपद इगन्त राहत नसल्यामुळें इष्ट पूर्वपदप्रकृतिस्वर न होता, 'समासस्य' सू. ३७३४ या सूत्रानें संपूर्ण सामासिक शब्दाला अन्तोदात्त स्वर होईल. या वरील दोषाचें निरसन करितांना 'न वा बहिरङ्गलक्षणत्वात्' हें वार्तिक पठित करून भाष्यकार असें म्हणतात कीं, 'न वैष दोषः। किं कारणम्?। बहिरङ्गलक्षणत्वात्। बहिरङ्गो नुम्, अन्तरङ्गा एते विधयः। असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे।' या भाष्याचा आशय हा आहे कीं, 'इकोऽचि विभक्तौ' या सूत्रानें होणाऱ्या नुमागमाच्या पुढें विभक्ति प्रत्यय असणें याची जरूर असल्यामुळें तो बहिरङ्ग ठरतो व स्वरकार्यं आणि द्विगुस्वर या कार्यांना तशी जरूर नसल्यामुळें तीं अन्तरङ्ग ठरतात. त्यामुळें 'नित्यादप्यन्तरङ्गं बलीयः' या न्यायान्वयें व तसेंच 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे'— परि. ५०—या परिभाषान्वयें त्या अन्तरङ्गकार्यांच्या दृष्टीनें बहिरङ्ग नुमागम असिद्ध ठरत असल्यामुळें, तीं अन्तरङ्गकार्यें नुमागम होण्यापूर्वी

होतील व त्यामुळें वरील उदाहरणांत कांहीं दोष येत नाहीं. हें सांगून पुढें भाष्यकार असें म्हणतात कीं, 'द्विगुस्वरे भूयान् परिहारः। सङ्घातभक्तोऽसौ नोत्सहतेऽवयवस्येगन्ततां विहन्तुमिति कृत्वा द्विगुस्वरो भविष्यति।' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, द्विगुस्वरासंबंधानें वार्तिककारानें जो दोष दिला आहे त्याचें अधिक चांगल्या तऱ्हेनें निराकरण करतां येतें व ती तऱ्हा अशी कीं, नुमागम हा 'पञ्चारत्नि' या संपूर्ण सामासिक शब्दाचा अवयव होत असल्यामुळें, जरी तो त्या सामासिक 'अरत्नि' या अवयवापुढें येतो तरी, तो तेवढ्यानें त्या अवयवाच्या स्वरूपांत बदल करूं शकत नाहीं व त्याचें इगन्तत्व नष्ट करूं शकत नाहीं. अशा रीतीनें नुमागमानें 'अरत्नि' या उत्तरपदाच्या इगन्तत्वाचा विघात होत नसल्यामुळें, त्या उदाहरणांत 'इगन्त' सू. ३७६३ या सूत्रानें द्विगुस्वर होण्यांत कांहींच अडचण येत नाहीं. या वरील भाष्यांत नुमागम हा समुदायाचा अवयव होतो असें स्पष्टपणें सांगितलें असल्यामुळें आणि तसेंच कैयटानें 'पूर्वान्त' या शब्दाचें व्याख्यान करितांना 'संघातस्य पूर्वस्य भक्तो न तदेकदेशस्य' असें म्हटलें असल्यामुळें, दीक्षितांनीं समुदायांतील अन्त्य अचाला जो मित आगम होतो तो त्या समुदायाचा अवयव होतो असें म्हटलें आहे व तसें मानलें असतांच, वर सांगितल्याप्रमाणें 'पञ्चारत्नीनि' इत्यादि उदाहरणांत पूर्वपदप्रकृतिस्वर न होण्याची आपत्ति टाळतां येऊं शकते व तसेंच 'त्रपु' यांतील अन्त्य उकार या अचाला जो नुमागम होतो तो 'त्रपु' या समुदायाचा अवयव होत असल्यामुळें, 'त्रपुन्' असें नकारान्त अङ्ग ठरून उपधादीर्घकार्य सिद्ध होतें असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) मित् आगम ज्या समुदायाच्या अन्त्य अचास होतो त्या समुदायाचा तो अवयव होतो याचें मनोरमेंत 'त्रपूणि' हें जें उदाहरण दिलें आहे तें केवळ उपलक्षणात्मक आहे, म्हणजे अनेक उदाहरणांपैकीं तें एक उदाहरण आहे. मित् आगम पूर्व समुदायांतील केवळ अन्त्य अचाचा अवयव

होत नसून त्या समुदायाचा अवयव होत असल्यामुळेंच 'ता ता पिण्डानाम्' या स्थलीं नकाराचा लोप सिद्ध होतो. 'ता ता' या पदांचा 'तानि तानि' असा अर्थ असून, 'शेः छन्दसि बहुलम्' सू. ३५१६ या सूत्रानें 'शि' प्रत्ययाचा लोप झाला असतां, नकार-लोप होण्याचें हें उदाहरण आहे. ('तद्' या सर्वनामाचें नपुंसकाचें प्रथमेचें बहुवचन करितांना 'तद् + जस्' या स्थलीं 'जश्शसोः शिः' सू. ३१२ या सूत्रानें 'जस्' प्रत्ययाचे जागीं 'शि = इ' असा आदेश होऊन व 'त्यदादीनामः' सू. २६५ व 'अतो गुणे' सू. १९१ हीं सूत्रें प्रवृत्त होऊन 'तद् + जस् = तद् + शि = त + अ + शि = त + शि' अशी स्थिति झाली असतां, 'शि सर्वनामस्थानम्' सू. ३१३ या सूत्रान्वयें 'शि' हा सर्वनामस्थान प्रत्यय असल्यामुळें 'नपुंसकस्य झलचः' सू. ३१४ या सूत्रानें 'त' यांतील अन्त्य अकारास नुमागम होऊन व 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' सू. २५० या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन 'तान् + शि' अशी स्थिति होते. अशा स्थितींत 'शेः छन्दसि बहुलम्' या सूत्रानें 'शि' प्रत्ययाचा लोप केला असतां, 'प्रत्ययलोपे प्रत्यय-लक्षणम्' सू. २६२ या सूत्रानें 'तान्' याला प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञा होते व 'तद्' हें जरी मूळचें प्रातिपदिक होतें तरी त्यांत पाणिनीय सूत्रांनीं फेरबदल होऊन त्याचें 'तान्' असें रूप झाल्यावर देखील स्थानिवद्भावानें तें प्रातिपदिक मानलें जाऊं शकतें व त्या प्रातिपदिक-संज्ञेचा पदसंज्ञेनें बाध होत नाहीं. अशा रीतीनें 'तान्' हें नकारान्त पदसंज्ञक प्रातिपदिक ठरत असल्यामुळें, 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू. २३६ या सूत्रानें 'तान्' यांतील अन्त्य नकाराचा लोप होऊन 'ता' हें रूप सिद्ध होतें. 'नुम्' हा मित् आगम पूर्वाचा, म्हणजे 'त' या अङ्गाचा, अन्त्यावयव न मानतां अगमत मानला असता किंवा पराचा, म्हणजे 'शि = इ' या प्रत्ययाचा, आदि मानला असता तर, नकाराचा लोप होऊं शकला नसता, कारण 'न लोपः प्रातिपदि-कान्तस्य' या सूत्रानें नकारान्त पदसंज्ञक प्रातिपदिकाच्या अन्त्य

नकाराचा लोप होणें सांगितलें आहे. सारांश पूर्वान्तत्वपक्ष मानल्यानेंच 'ता' हें रूप सिद्ध होऊं शकत असल्यामुळें, तोच पक्ष मानणें म्हणजे नुम् पूर्व समुदायाचा अवयव होतो हा पक्ष मानणें उचित आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.)

**मनोरमा--स्थानेयोगेति । स्थानेन योगोऽस्या इति विग्रहः । निपातनादेत्वम् ।।**

'षष्ठीस्थानेयोगा' सू. ३८ या सूत्रांतील 'स्थानेयोगा' या पदाचा 'स्थानेन योगःअस्याः' असा विग्रह होत असून या स्थलीं निपातनानें एत्व झालें आहे. (प्रकृत सूत्रावरील भाष्यांत –१·१·४९– भाष्यकारांनीं 'स्थानेयोगा' या पदाचा 'स्थाने योगोऽस्याः' व 'स्थानेन योगोऽस्याः' असा दोन रीतीनें विग्रह केला आहे. भाष्यकार त्या भाष्यांत पुढें असें देखील म्हणतात कीं, 'स्थानेयोगा' हें एक पद न मानतां, 'स्थाने' व 'अयोगा' किंवा 'स्थाने' व 'योगा' अशीं दोन भिन्न पदें मानावीं व 'अयोगा' या पदाचा 'अव्यक्तयोगा', आणि 'योगा' या पदाचा 'योगवती' असा अर्थ समजावा. भाष्यकारांच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, ज्या षष्ठीपासून कोणत्याहि विशेष प्रकारच्या संबंधाचा बोध होत नाहीं अशी 'अव्यक्तयोगा' षष्ठी स्थानषष्ठी होय. 'योगा = योगवती' याचा अर्थ असा समजावा कीं, ज्या षष्ठीचे संबंध अनेक संभवत असल्यामुळें, ती कोण्या विशेष प्रकारच्या संबंधाचा बोध करून देणारी षष्ठी आहे हें निश्चितपणें ज्ञात होऊं शकत नाहीं तशी षष्ठी स्थानयोगाषष्ठी समजावी. 'योगा' या स्थलीं मतुप् या अर्थाचा वाचक 'अच्' प्रत्यय 'अर्शआदिभ्योऽच्' सू. १९३३ या सूत्रान्वयें झाला आहे व त्यानंतर 'टाप् = आ' प्रत्यय झाला आहे असें समजावें. सारांश 'अयोगा' व 'योगा' या दोन्ही पदांचा 'अनिर्धारितसंबंधविशेषा' असा अर्थ होतो आणि कौमुदींत देखील प्रकृत सूत्राचें व्याख्यान करितांना दीक्षितांनीं

याच शब्दाचा उपयोग केला आहे. भाष्यकार म्हणतात—'किमिदं स्थानेयोगेति । स्थाने योगोऽस्याः सेयं स्थानेयोगा । सप्तम्यलोपो निपातनात् । तृतीयाया वैत्वम् । स्थानेन योगोऽस्यः सेयं स्थानेयोगा । ……अथवा स्थानेऽयोगा स्थानेयोगा । किमिदमयोगेति । अव्यक्तयोगाऽयोगा । अथवा योगवती योगा । का पुनर्योगवती । यस्या बह्वो योगाः । कुत एतत् । भूम्नि हि मतुब्भवति ।' दीक्षितांनी 'स्थानेयोगा' या पदाचा जो विग्रह केला आहे व 'निपातनादेत्वम्' असें जे म्हटले आहे त्याला वरील भाष्य प्रमाण आहे.)

शब्दरत्न—स्थानेनेति । स्थानशब्दार्थेनेत्यर्थः । तन्निरूपितसम्बन्धः षष्ठ्यर्थो न तु तद्रूपः सम्बन्धस्तदर्थ इति अनेन ध्वनयति । एत्वमिति । व्यधिकरणबहुव्रीहिरप्यत एवेति बोध्यम् ॥

'स्थानेन योगोऽस्याः' असा जो 'स्थानेयोगा' या पदाचा मनोरमेंत विग्रह केला आहे त्यातील 'स्थानेन' या पदाचा 'स्थानशब्दार्थेन,' म्हणजे 'स्थान' या शब्दाच्या अर्थाशी, असा अर्थ आहे. 'स्थान' या शब्दाच्या अर्थाने बोधित होणारा जो स्थान्यादेशसंबंध तो षष्ठीचा अर्थ होय असे सांगून व तसेच 'स्थानेन योगोऽस्याः' असा व्यधिकरणबहुव्रीहि करून दीक्षित असे सुचवितात की, षष्ठीचा वाच्य अर्थ स्थानरूपसंबंध नव्हे. ('स्थानरूपसम्बन्धः षष्ठ्यर्थः' असें जें कित्येक वैयाकरणाचे मत आहे त्याचें खण्डन करण्याच्या हेतूनें शब्दरत्नकारांनी 'स्थानशब्दार्थनिरूपितसम्बन्धः षष्ठ्यर्थः न तु तद्रूपः सम्बन्धः षष्ठ्यर्थः' असे म्हटले आहे, व दीक्षितांनी 'स्थानेयोगा' या पदाचा समानाधिकरणबहुव्रीहि न करिता जो व्यधिकरणबहुव्रीहि केला आहे त्यावरून वरील अर्थ ज्ञापित होतो असें शब्दरत्नकाराचे म्हणणे आहे. 'स्थानं योगः अस्याः' असा जर 'स्थानेयोगा' या पदाचा समानाधिकरणबहुव्रीहि केला असता तर, षष्ठीचा वाच्यार्थ स्थानरूपसंबंध आहे असा विपरीत बोध झाला असता. पण षष्ठीचा अर्थ 'स्थान' नसल्यामुळें, 'स्थानेन योगोऽस्याः' असा मुद्दाम व्यधि-

करणबहुव्रीहि केला आहे. प्रकृत सूत्रावरील शब्देन्दुशेखराच्या टीकेंत ज्योत्स्नाकार म्हणतात–'स्थानं योगस्तद्रूपःसम्बन्धो यस्या वाच्य इति समानाधिकरणबहुव्रीहिणा सिद्धे स्थानेन योगो यस्या इति व्यधिकरण-बहुव्रीहिप्रदर्शनं षष्ठ्याः वाच्यः स्थानादिरर्थो नास्तीति सूचयति.' प्रकृत सूत्रावरील सरलाटीकेंत देखील 'समानाधिकरणबहुव्रीहौ तु स्थानं योगो यस्या इति विग्रहेण स्थानस्यैव संबन्धत्वं स्यात्तच्च नेष्यते । एवञ्चानिर्धारितसंबन्धविशेषषष्ठ्यन्तपद्घटिते सूत्रे स्थानेपदमुपलिष्ठत इति षष्ठी स्थाने इत्यस्यार्थः फलति' असें म्हटलें आहे. सारांश 'स्थान' या शब्दाचा अर्थ प्रसङ्ग किंवा प्रसक्ति हा आहे व या अर्थावरून स्थान्यादेशभावरूपसंबंधच म्हणजे निवर्त्यनिवर्तकरूप संबंधच, ज्ञात होत असल्यामुळें, अनिर्धारितसंबंधविशेषार्थक षष्ठीचा स्थान्या-देशभावात्मकसंबंधरूप षष्ठी असा अर्थ समजावा हें वरील विवेचना-वरून स्पष्ट होतें.) ज्याप्रमाणें निपातनानें एत्व झालें आहे त्याचप्रमाणें निपातनानें व्यधिकरणबहुव्रीहि देखील झाला आहे हें समजावें. ('अनेकमन्यपदार्थे' सू. ८३० या सूत्रानें समानाधिकरणबहुव्रीहि होणें सांगितलें आहे. व्यधिकरणबहुव्रीहि होण्यासंबंधानें अष्टाध्यायींत कोणतेंहि सूत्र साक्षात् पठित केलें नसल्यामुळें, शब्दरत्नकार म्हणतात कीं, 'स्थानेयोगा' या स्थलीं निपातनानें व्यधिकरणबहुव्रीहि झाला आहे असें समजावें.)

**मनोरमा—अनेकविधमिति । स्थानार्थगुणप्रमाणकृतमित्यर्थः । बलीय इति । तेन 'चेता' 'स्तोता' इत्यत्र प्रमाणत आन्तर्यवानकारो नेति भावः ।**

('स्थानेऽन्तरतमः' सू. ३९ या सूत्रावरील कौमुदींत दीक्षितांनी 'यत्रानेकविधमान्तर्यं तत्र स्थानत आन्तर्यंबलीयः'–परि. १३–ही परिभाषा पठित केली आहे व त्या परिभाषेंतील 'अनेकविधम्' या पदाचा अर्थ ते येथें सांगतात.) 'अनेकविधम्' या पदाचा 'स्थानार्थ-गुणप्रमाणकृतम्,' म्हणजे स्थान, अर्थ, गुण व प्रमाण यांच्यामुळें होणारें

अनेकविध साम्य किंवा सादृश्य असा अर्थ आहे. स्थानामुळें होणारें साम्य 'बलीयः'--म्हणजे बलवत्तर-असल्यामुळेंच 'चेता, स्तोता' या स्थलीं प्रमाणानें सदृश असणारा अकार होत नाहीं असा त्या परिभाषेचा भावार्थ आहे. ('चि+तृच्' किंवा 'स्तु+तृच्' या स्थलीं 'ण्वुल्तृचौ' सू. २८९५ या सूत्रानें 'तृच्' प्रत्यय केला असतां, 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू. २१६८ या सूत्रानें 'चि' यांतील अन्त्य ऱ्हस्व इकारास व 'स्तु' यांतील अन्त्य ऱ्हस्व उकारास गुण पावला आहे. 'अदेङ गुणः' सू. १७ या सूत्रान्वयें 'अ, ए, ओ' हे वर्ण गुणसंज्ञक आहेत. 'अ, इ, उ' हे तीन्ही एकमात्रिक ऱ्हस्व अच् असल्यामुळें त्यांच्यांत ऱ्हस्वप्रमाणरूप सादृश्य आहे. तरी पण त्यांच्यांत स्थानसादृश्य नाहीं; कारण अकाराचें कण्ठस्थान असून इकाराचें तालुस्थान व उकाराचें ओष्ठस्थान आहे. म्हणून जरी अकार, इकार व उकार या वर्णामध्यें प्रमाणरूप सादृश्य आहे तरी त्यांत स्थानसाम्य नसल्यामुळें, इकाराचे किंवा उकाराचे जागीं 'अ' हा गुणरूप आदेश होत नाहीं. इ व ए यांच्यांत तालुस्थानसाम्य असल्यामुळें आणि तसेंच उ व ओ यांच्यांत ओष्ठस्थानसाम्य असल्यामुळें, जरी त्यांच्यांत प्रमाणरूप साम्य नाही-कारण ए व ओ हे दीर्घ अच् द्विमात्रिक असून इ व उ हे ऱ्हस्व अच् एकमात्रिक आहेत-तरी इचे जागीं ए व उचे जागीं ओ असा गुणरूप आदेश होतो. याचें कारण हेंच कीं, स्थानामुळें होणारें साम्य इतर प्रकारानें होणाऱ्या साम्यापेक्षां बलवत्तर असतें.)

शब्दरत्न--गुणप्रमाणेति। प्रमाणस्य ह्रस्वत्वादेर्गुणत्वेऽपि ब्राह्मणवसिष्ठन्यायेन पृथगुक्तिः। गुणशब्देनोक्तत्रितयातिरिक्तधर्ममात्रम्। तेन "अनान्तर्यमेवैंतयोरान्तर्यम्" इत्यादिस्थानेऽन्तरतमसूत्रस्थभाष्येण न विरोधः, अन्तरतमाभाव एव गुणविधौ ऋकाराकारयोः साद्दश्यमिति तदर्थः। बाह्यानां साक्षाद्वर्णावृत्तित्वेऽप्यौपचारिकं गुणत्वं बोध्यम्॥

ऱ्हस्वत्व इत्यादि प्रमाणें जरी 'गुण' आहेत तरी 'स्थानार्थ-

गुणप्रमाणकृतम्' या मनोरमेंतील पंक्तींत प्रमाणाचा ब्राह्मण-वशिष्ठन्यायानें वेगळा उल्लेख केला आहे. (वैशेपिकांनीं जे चोवीस गुण सांगितले आहेत त्यांत परिमिति किंवा प्रमाण हा गुण अन्तर्भूत आहे. म्हणून प्रमाण हें देखील गुणच ठरत असल्यामुळें त्याचा मनोरमेच्या वरील पंक्तींत पृथक् निर्देश करण्याची वास्तविक कांहीं गरज नव्हती. तरी पण गुण हा शब्द सामान्य गुणाचा वाचक असून, प्रमाण हा शब्द विशेप गुणाचा वाचक असल्यामुळें, ब्राह्मणवशिष्ठ-न्यायान्वयें वरील मनोरमेच्या पंक्तींत प्रमाणाचा पृथक् उल्लेख केला आहे. 'सर्वे ब्राह्मणाः आगताः, वशिष्ठोप्यागतः' असा भापेंत प्रयोग होत असतो. वास्तविक वशिष्ठ देखील ब्राह्मण असल्यामुळें त्याचा 'सर्वे ब्राह्मणाः' यांत अन्तर्भाव होतोच. तरी पण सामान्यविशेप-न्यायान्वयें जसा त्याच्या वैशिष्टयामुळें—महत्त्वामुळें—त्याचा पृथक् निर्देश लौकिकप्रयोगांत केला जातो त्याचप्रमाणें मनोरमेंतील पंक्तींत गुणाचा निर्देश केला असून देखील प्रमाणाचा पुन्हा पृथक् उल्लेख केला आहे. 'ब्राह्मणवशिष्ठन्यायेन' या स्थलीं 'ब्राह्मणैः सहितो वशिष्ठः ब्राह्मणवशिष्ठः तस्य न्यायेन' असा विग्रह करावा, 'ब्राह्मणवशिष्ठ' या पदाचा द्वन्द्वसमास करूं नये; कारण 'त्यदादीनि सर्वैर्नित्यम्' १·२·७२ या सूत्रावरील भाष्यांत सामान्यवाची व विशेपवाची शब्दांचा द्वन्द्वसमास होऊं शकत नाहीं असें सांगितलें आहे.) स्थान, अर्थ व प्रमाण हे तीन खेरीज करून इतर कोणत्याहि प्रकारच्या धर्मांचें 'गुण' या शब्दानें ग्रहण होतें, आणि 'गुण' या शब्दाचा असा अर्थ मानला असल्यामुळेंच, 'स्थानेऽन्तरतमः' १.१.५० या सूत्रावरील भाष्यांत 'अनान्तर्यमेवैतयोरान्तर्यम्' असें जें म्हटलें आहे त्याशीं कांहीं विरोध येत नाहीं. भाष्यांतील त्या पंक्तीचा असा अर्थ आहे कीं, गुण करतेवेळीं ऋकार या स्थानीचें 'अ, ए, ओ' या तीन गुणसंज्ञक वर्णांपैकीं एकाशींहि साम्य नसणें व अकाररूप गुणादेशाचें इक्‌रूप स्थानींपैकीं कोणाशींहि साम्य नसणें हेंच ऋकार

व अकार यांच्यांत साम्य–सादृश्य–आहे. (जेथें विधिसूत्रांत 'गुण' हा शब्द उच्चारून गुणाचें विधान केलें असेल व त्या सूत्रांत स्थानी साक्षात् निर्दिष्ट नसेल तेथें 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा उपस्थित होऊन इक्‌लाच गुण पावतो हें पूर्वी सांगितलेंच आहे. 'अ, ए' व 'ओ' यांनाच 'अदेङ गुणः' सू. १७ या सूत्रान्वयें गुणसंज्ञा आहे. 'इ उ' यांचे अनुक्रमें 'ए ओ' यांशीं स्थानसाम्य असल्यामुळें, इचे जागीं ए व उचे जागीं ओ असा गुणादेश होतो. पण वरील तीन्ही गुणसंज्ञक वर्णांपैकीं कोणत्याहि वर्णांशीं ऋकाराचें स्थानसाम्य नाहीं. तसेंच 'अ' या गुणरूप आदेशाचें कोणत्याहि इक्‌रूप स्थानीशीं स्थानसाम्य नाहीं. अशा रीतीनें 'ऋ' या इक्‌चें 'अ, ए, ओ' या तीन गुणादेशांपैकी कोणाशीहि स्थानसाम्य नसणें आणि तसेंच 'अ' या गुणदेशाचें कोणत्याहि इक्‌रूप स्थानीशीं स्थानसाम्य नसणें हेंच 'अ' व 'ऋ' या दोन वर्णांत गुणसाम्य आहे आणि त्या गुणसाम्यामुळेंच ऋकाराचे जागीं 'अ' हा गुणादेश होतो असा भाष्यकारांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. सारांश भाष्यकारांनीं अन्तरतमाभाव–सादृश्याचा अभाव–हा देखील गुण मानला आहे व त्याचें कारण हेंच की, 'गुण' या शब्दानें कोणत्याहि प्रकारच्या धर्माचें ग्रहण होतें. 'स्थानेऽन्तरतमः' १.१.५० या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात–'अथवाऽनान्तर्यमेवैतयोरान्तर्यम् । एकस्याप्यन्तरतमा प्रकृतिर्नास्त्यपरस्याप्यन्तरतम आदेशो नास्ति । एतदेवैतयोरान्तर्यम् ।' या भाष्याच्या अर्थाचें विवरण वर केलेंच आहे. पुढील भाष्य फारच सुंदर आहे व त्या भाष्यांत 'सम्प्रयोगो वा नष्टाश्वदग्धरथवत्' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचें व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात–'अथवा नष्टाश्वदग्धरथवत् सम्प्रयोगो भवति । तद्यथा । तवाश्वो नष्टो ममापि रथो दग्ध उभौ सम्प्रयुज्यावहा इति । एवमिहापि तवाप्यन्तरतमा प्रकृतिर्नास्ति ममाप्यन्तरतम आदेशो नास्त्यस्तु नौ सम्प्रयोग इति ।' या भाष्याचा असा अर्थ आहे कीं, एखाद्याचा घोडा

4062-51

नष्ट झाल्यास व दुसऱ्याचा रथ जळून गेल्यास एक दुसऱ्यास असें म्हणतो कीं, ज्याअर्थी तुझा घोडा नष्ट झाला आहे व माझा रथ जळून गेला आहे त्याअर्थी तुझ्या रथाला माझा घोडा जोडून आपण आपलें काम भागवूं. त्याचप्रमाणें ऋकार अकारास असें म्हणतो कीं, तुला तुझ्यासारख्या स्थानी मिळत नाहीं व मला माझ्यासारखा आदेश मिळत नाहीं आणि म्हणून आपण एकमेकांशीं संबंध घडवून आणूं–म्हणजे तूं माझे स्थानीं गुणरूप आदेश हो. अशा रीतीनें 'ऋ' ला स्थानसाम्य असणारा गुणरूप आदेश मिळत नसल्यामुळें व अकाररूप गुणसंज्ञक वर्णाला स्थानसाम्य असणारा इक्‌रूपस्थानी मिळत नसल्यामुळें, त्या दोहोंमध्यें अशा सादृश्यामुळें संबंध घडून येतो व ऋकाराचे जागीं 'अ' हा गुणादेश होतो असा भाष्यकारांच्या म्हणण्याचा अभिप्राय आहे.) बाह्ययत्न जरी वर्णाचे ठिकाणीं (इतर गुणांसारखे तादात्म्यसंबंधाने किंवा समवायसंबंधानें) राहत नसतात तरी त्यांचे ठिकाणीं औपचारिक गुणत्व मानलें जातें. (ताल्वादिस्थाननिष्ठवायुसंयोगामुळेंच बाह्ययत्नांची अभिव्यक्ति होत असल्यामुळें, अशा परंपरासंबंधामुळें त्यांचे ठिकाणीं, ते साक्षात् तादात्म्यसंबंधानें राहणारें गुण नसून देखील, गुणाचा आरोप केला जातो व त्यांना देखील औपचारिकरीत्या गुण असें म्हणण्याची प्रथा आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.)

**मनोरमा––"तस्मिन्" इति सप्तम्यन्तानामनुकरणम् । निःशब्दो नैरन्तर्यपरः । दिशिरुच्चारणक्रियः । अचि यणित्युक्ते व्यवहिते, ऽव्यवहिते च सति प्राप्तमव्यवहित एवेति । पूर्वस्य, परस्य च प्राप्तं पूर्वस्यैवेति च नियम्यते । अव्यवहितस्येति तु फलितार्थकथनम् ।**

'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' सू. ४० या सूत्रांतील 'तस्मिन्' हें पद विधिसूत्रांत निर्दिष्ट असलेल्या (निमित्तबोधक) सप्तम्यन्त पदाचें अनुकरण आहे. या सूत्रांतील 'निर्दिष्टे' या पदांत असणारा 'निर्' हा उपसर्ग नैरन्तर्याचा–मध्यें व्यवधान नसणें या अर्थाचा–वाचक असून

यांतील 'दिश्' धातु उच्चारणरूप क्रियेचा वाचक आहे. (सारांश कार्यविधायक सूत्रांत 'तस्मिन्' या पदाचा निर्देश केला असतां त्याच्या पूर्वी असणाऱ्या वर्णास सूत्रविहित कार्य होतें असा प्रकृत सूत्राचा अर्थ न समजतां, कार्यविधायक सूत्रांत निमित्तबोधक सप्तम्यन्त पदाचा निर्देश केला असतां, त्या सप्तम्यन्त पदाच्या लगेंच पूर्वी असणाऱ्या वर्णास सूत्रविहित कार्य करावें असा प्रकृत सूत्राचा अर्थ समजावा.) 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रांतील 'अचि यण्' या शब्दांनीं ज्या इकांत व अचांत कांहीं व्यवधान नाहीं असा इक् व ज्या इकांत व अचांत व्यवधान आहे असा इक् या दोन्ही प्रकारच्या इक्‌चें ग्रहण प्राप्त झालें असतां व तसेंच अव्यवहितपूर्व इक् आणि अव्यहितपर इक् म्हणजे लगेंच पूर्वी असणारा व लगेंच पुढें असणारा इक्, या दोहोंचेंहि ग्रहण प्राप्त झालें असतां, प्रकृत परिभाषा असा नियम घालून देते कीं, अव्यवहित इकाचेंच ग्रहण करावें व तो अव्यवहित इक् पूर्वच असावा. (प्रकृत परिभाषा असा नियम घालून देणारी असल्यामुळेंच, 'अग्निचित् + अत्र, सोमसुत् + अत्र' या दोन उदाहरणांत जरी 'अ' या अचापूर्वी इ व उ हे अनुक्रमें इक् आहेत तरी त्या दोहोंत तकार या वर्णाचें व्यवधान असल्यामुळें त्या इकांचे जागीं यणादेश होत नाहीं. तसेंच 'दधि + उदकम्' या उदाहरणांत जरी इकार व उकार हे दोन्ही इक् असून अच् देखील आहेत व त्या दोहोंमध्यें कोणत्याहि वर्णाचें व्यवधान नाहीं तरी, पर उकाराचे जागीं यणादेश न होतां पूर्व इकाराचे जागींच यणादेश होतो. प्रकृत सूत्रावरील भाष्यांत १-१-६६ भाष्यकार म्हणतात–'निर्दिष्ट ग्रहणं क्रियत आनन्तर्यार्थम् । आनन्तर्यमात्रे कार्यं यथा स्यात् । इको यणचि । दध्यत्र मध्वत्र । इह मा भूत् । समिधौ समिधः । दृषदौ दृषदः ।... ग्रामे देवदत्तः । पूर्वःपर इति सन्देहः । एवमिहापीको यणचि । दध्युदकं पचत्योदनम् । उभाविकावुभावचौ । अचि पूर्वस्याचि परस्येति सन्देहः । तिङ्ङतिङः इत्यतिङः पूर्वस्यातिङः परस्येति सन्देहः । इष्यते चात्राचि

पूर्वस्य स्यादतिङः परस्येति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीति नियमार्थं वचनम् ।' या भाष्याला धरूनच मनोरमेंतील वरील पंक्ति लिहिली आहे.) प्रकृत सूत्राचा अर्थ करितांना 'अव्यवहितस्य पूर्वस्य बोध्यम्' असें जें कौमुदींत म्हटलें आहे तें फलितार्थाचें कथन होय, म्हणजे त्या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या सर्व पदांचा अर्थ करून अखेरीस जो अर्थ निष्पन्न होतो त्या अर्थाचें कथन केलें आहे.

शब्दरत्न—अनुकरणमिति । अचीत्यादिसप्तम्यन्तार्थकस्य स्वतन्त्रतच्छब्दस्य निर्देशो न स्वरूपपरम्, व्याख्यानाद्, बहुलक्ष्यसंस्कारानुरोधाच्च । सप्तमी तु सप्तम्यन्तानामेव तच्छब्दार्थत्वमिति बोधनाय, तद्बोध्यार्थस्य निर्दिष्टे इत्यनेन सामानाधिकरण्याय चेति भावः । शब्दार्थकत्वेन त्वनुकरणत्वव्यवहार इति बोध्यम् । दिशिरुच्चारणेति । अत एव "जनपदे लुप्" इत्यादौ न दोषः । नह्यर्थ उच्चारितो नापि शब्दस्य निरन्तर इति भावः । अचि यणित्युक्ते इति । अचि उपश्लिष्टस्य यणित्युक्ते इत्यर्थः । इदं "संहितायाम्" इति सूत्रे भाष्ये स्पष्टम् । फलितेति । सप्तम्यन्तार्थेऽव्यवहिते षष्ठ्यन्तार्थोऽप्यव्यवहित एवेति भावः ॥

प्रकृत सूत्रांत निर्दिष्ट असलेलें 'तस्मिन्' हें पद स्वरूपपर नसून, म्हणजे 'तस्मिन्' या शब्दाचें वाचक नसून, विधिसूत्रांत निर्दिष्ट असलेलीं 'अचि' इत्यादि सप्तम्यन्त पदें ज्याचा अर्थ आहेत अशा स्वतंत्र 'तद्' या सर्वनामाची सप्तमी आहे व तशा (परामर्शक) सप्तम्यन्त पदाचा प्रकृत सूत्रांत निर्देश केला आहे. भाष्यांत 'तस्मिन्' या पदाचें अशा तऱ्हेनेंच व्याख्यान केलें आहे व प्रकृत सूत्र अनेक लक्ष्यांचे—उदाहरणांचे—ठिकाणीं लागू पडावें याकरितां त्या पदाचा तसा अर्थ लक्ष्यानुरोधानें—सर्वइष्टरूपसिद्ध्यर्थ—केला आहे. (प्रकृत सूत्रांतील 'तस्मिन्' हा शब्द व 'तस्मादित्युत्तरस्य' सू. ४१ या सूत्रांतील 'तस्मात्' हा शब्द जर 'तस्मिन्' व 'तस्मात्' या अनुकार्य शब्दांचेच अनुकरण मानले व विधायक सूत्रांत निर्दिष्ट

असलेल्या सप्तम्यन्त व पञ्चम्यन्त पदांचे अनुकरण न मानले तर, ज्या विधिसूत्रांत 'तस्मिन्' व 'तस्मात्' या शब्दांचा साक्षात् निर्देश केला आहे तशाच ठिकाणी या दोन परिभाषा लागू पडतील व ज्या विधिसूत्रांत इतर सप्तम्यन्त किंवा पञ्चम्यन्त पदांचा निर्देश केला आहे तशा अनेक विधिसूत्रांना त्या परिभाषा लागू पडणार नाहीत आणि त्यामुळें तशा सूत्राचा अर्थ निश्चित करण्यास कांहीच साधन उपलब्ध राहणार नाही. म्हणून प्रकृत सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात—'सर्वनाम्नाऽयं निर्देशः क्रियते, सर्वनाम च सामान्यवाचि। तत्र सामान्ये निर्दिष्टे विशेषा अप्युदाहरणानि भवन्ति।' या भाष्यात भाष्यकारांनी प्रथम अशी शंका उपस्थित केली आहे की, 'इको यणचि' इत्यादि सूत्रें प्रकृत परिभाषेचीं उदाहरणें ठरूं शकत नाहीत; कारण त्या सूत्रांत 'तस्मिन्' या शब्दाचें उच्चारण केलें नसून भिन्न प्रकारच्या सप्तम्यन्त पदाचें उच्चारण केलें आहे. तसेंच 'द्व्यन्तरुपसर्गेभ्योऽप ईत्' सू. ९४१ इत्यादि सूत्रें 'तस्मादित्युत्तरस्य' या परिभाषेची उदाहरणें मानतां येऊं शकत नाहीत; कारण त्यांत 'तस्मात्' या पदाचें उच्चारण केलें नसून भिन्न प्रकारच्या पञ्चम्यन्त पदाचें उच्चारण केलें आहे. म्हणून 'तस्मिन्नणि च युष्माकास्माकौ' सू. १२७१ हें सूत्र प्रकृत परिभाषेचें उदाहरण मानतां येतें व 'तस्माच्छसो नः पुंसि' सू. १९६ हें सूत्र 'तस्मादित्युत्तरस्य' या परिभाषेचें उदाहरण ठरूं शकतें. अशी शंका उपस्थित करून त्या शंकेवर भाष्यकार असें उत्तर देतात की, 'इको यणचि, द्व्यन्तरुपसर्गेभ्यः' इत्यादि सूत्रें देखील वरील दोन परिभाषांची उदाहरणें मानतां येतात; कारण त्या दोन परिभाषांमध्यें 'तस्मिन्, तस्मात्' असा सर्वनामशब्दानें निर्देश केला आहे व सर्वनामशब्द सामान्य अर्थाचा वाचक आहे. म्हणून सामान्य वाचक 'तस्मिन्, तस्मात्' या सप्तम्यन्त व पञ्चम्यन्त पदांनीं विधिसूत्रांत निर्दिष्ट असलेल्या सर्व निमित्तबोधक सप्तम्यन्त व पञ्चम्यन्त पदांचें ग्रहण होऊं शकत असल्यामुळें, तशा विधि-

सूत्रें देखील या दोन परिभाषांचीं उदाहरणें ठरतात. आणि म्हणूनच शब्दरत्नकार पुढील पंक्तींत असें म्हणतात कीं,) प्रकृत सूत्रांत 'तस्मिन्' असा सप्तमीनिर्देश अशाकरितां केला आहे कीं, विधिसूत्रांत निर्दिष्ट असलेलीं (निमित्तबोधक) सप्तम्यन्त पदेंच त्या सर्वनामशब्दाचा अर्थ आहेत हें ज्ञापित व्हावें व त्या शब्दानें बोधित झालेल्या विधिसूत्रनिर्दिष्ट सप्तम्यन्त पदाचा 'निर्दिष्टे' या पदार्शीं सामानाधिकरण्यानें अन्वय व्हावा. विधिसूत्रनिर्दिष्ट सप्तम्यन्त पदें 'तस्मिन्' या सर्वनामशब्दाचा अर्थ असल्यामुळें प्रकृत सूत्रांत निर्दिष्ट असलेलें 'तस्मिन्' हें पद त्या सप्तम्यन्त पदांचें अनुकरण आहे हें जाणावें. (सरलेंत या पंक्तीचा 'अनुकार्यवृत्यानुपूर्वीसमानानुपूर्वीमत्वाभावेऽपि भागत्यागलक्षणयाऽनुकरणत्वव्यवहार इत्यर्थः' असा अर्थ दिला आहे. सारांश जरी प्रकृत स्थलीं अनुकार्य व अनुकरण यांची वर्णानुपूर्वी सारखी नसून भिन्न आहे तरी, येथें शब्दानुकरण विवक्षित नसून केवळ अर्थानुकरण विवक्षित असल्यामुळें, 'तस्मिन्' हें प्रकृतसूत्रनिर्दिष्ट सर्वनाम विधिसूत्रांत निर्दिष्ट असलेल्या निमित्तबोधक सप्तम्यन्त पदांच्या अर्थाचें गौणी लक्षणेनें—भागत्यागलक्षणेनें—अनुकरण मानतां येतें असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. आतां धातुपाठांत 'दिश अतिसर्जने' असा दानार्थक धातु पठित केला आहे. मग तो उच्चारणक्रियेचा वाचक आहे असें भाष्यकारांनीं व दीक्षितांनीं कसें म्हटलें आहे ? या प्रश्नाचें उत्तर हेंच आहे कीं, धातुपाठांत दिलेले धातूंचे अर्थ उपलक्षणात्मक असल्यामुळें, 'धातूनामनेकार्थत्वात्' या वचनान्वयें 'दिश्' धातूचा उच्चारणरूप क्रिया असा देखील अर्थ होऊं शकतो, व) 'दिश्' धातूचा प्रकृत स्थलीं 'उच्चारण' असा अर्थ केला असल्यामुळेंच, 'जनपदे लुप्' सू. १२९३ इत्यादि सूत्रांत कांहीं दोष येत नाहीं. अर्थाचा उच्चार होऊं शकत नाहीं म्हणजे शब्दच उच्चारला जाऊं शकत असून अर्थ मुळींच उच्चारला जाऊं शकत नाहीं, व अर्थाचा शब्दाशीं नैरन्तर्यरूप—म्हणजे एकाच्या लगेंच

मार्गे किंवा पुढें दुसरें असणें असा—संबंध संभवत नाहीं. ('जनपदे लुप्' या सूत्रांतील 'जनपदे' हा शब्द त्या शब्दाचा वाचक नसून त्याच्या अर्थाचा वाचक आहे व 'जनपदरूपे अर्थे वाच्ये सति' असा 'जनपदे' या पदाचा अर्थ असून 'जनपदशब्दे परे सति' असा त्या पदाचा अर्थ नसल्यामुळें, त्या सूत्रास प्रकृत परिभाषा लागू पडत नाहीं; कारण जेथें विधिसूत्रनिर्दिष्ट सप्तम्यन्त पदानें शब्द वाच्य असेल व अर्थ वाच्य नसेल व अशा रीतीनें दोन शब्दांचें नैरन्तर्य संभवत असेल तेथेंच प्रकृत परिभाषा उपस्थित होत असून तशा सप्तम्यन्त शब्दाच्या लगेंच पूर्वी असलेल्याला कार्य व्हावें असें ती परिभाषा सांगते. पण जेथें विधिसूत्रनिर्दिष्ट सप्तम्यन्त पदानें शब्द वाच्य नसून अर्थ वाच्य आहे तेथें पूर्व शब्द व पर अर्थ यांचें नैरन्तर्य संभवत नसल्यामुळें, तशा ठिकाणीं प्रकृत परिभाषा लागू पडत नाहीं. अशा ठिकाणीं नैरन्तर्य संभवत नाहीं यांचें कारण हें कीं, शब्दार्थ हा शब्दांत राहणारा असून त्या शब्दाहून बहिर्भूत प्रदेशांत राहणारा नसल्यामुळें, शब्द व अर्थ या दोहोंत नैरन्तर्य असणें संभवत नाही. प्रकृत सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात:—'अथ किमर्थमुपसर्गेण निर्देशः क्रियते । शब्दे सप्तम्या निर्दिष्टे पूर्वस्य कार्यं यथा स्यादर्थे मा भूत् । जनपदे अतिशायने इति । किं गतमेतदुपसर्गेणाहोस्विच्छब्दाधिक्या-दर्थाधिक्यम् । गतमित्याह । कथम् ? । निरयं बहिर्भावे वर्तते । तद्यथा । निष्क्रान्तो देशान्निर्देशः । बहिर्देश इति गम्यते । शब्दश्च शब्दाद्बहिर्भूतोऽर्थोऽबहिर्भूतः ।' या भाष्याचा असा अर्थ आहे कीं, प्रकृत सूत्रांत 'निर्' हा उपसर्ग जोडून 'दिष्ट' शब्दाचा जो निर्देश केला आहे तो अशाकरितां की, जेथें सप्तम्यन्त पदानें शब्द बोधित असेल तशा ठिकाणीं त्या शब्दाच्या लगेंच पूर्वी असणाऱ्याला कार्य व्हावें; पण जेथें सप्तम्यन्त पदानें अर्थ बोधित असेल, उदाहरणार्थ 'जनपदे लुप्' सू. १२९३, 'अतिशायने तमबिष्ठनौ' सू. २००१, तेथें त्या

अर्थाच्या पूर्वी असणाऱ्याला कार्य होऊं नये. 'निर्' या उपसर्गातूनच हा वरील अर्थ निघतो व 'निर्' हा शब्द येथें जास्त घातला आहे एवढ्यावरून कांहीं तरी जास्त अर्थ काढावयाचा असें कांहीं नाहीं; कारण त्या उपसर्गाचा अर्थ बहिर्भाव—बाहेर-जाणें किंवा असणें—असा आहे. उदाहरणार्थ देशांतून बाहेर निघालेल्याला निर्देश, म्हणजे तो त्या देशाच्या बाहेर गेला आहे, असें म्हणतात. शब्द हा शब्दाहून बहिर्भूत असतो; अर्थ शब्दांतच राहणारा असल्यामुळें तो त्या शब्दाहून बहिर्भूत राहत नाही. या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, शब्द व अर्थ या दोहोंत नैरन्तर्य संभवत नसून दोन शब्दांमध्येंच नैरन्तर्य संभवतें, आणि या भाष्याला धरूनच शब्दरत्नांतील वरील पंक्ति लिहिली आहे.) 'अचि यण्' असें म्हटलें असतां 'अचि उपश्लिष्टस्य इकः यण्' असा अर्थ होतो हें 'संहितायाम्' ६–१–७२ या सूत्रावरील भाष्यांत स्पष्टपणें सांगितलें आहे. (त्या भाष्यांत भाष्यकार म्हणतात 'अयं योगः शक्योऽवक्तुम् । कथम् ? । अधिकरणं नाम त्रिप्रकारं—व्यापकमौपश्लेषिकं वैषयिकमिति । शब्दस्य च शब्देन कोऽन्योऽभिसम्बन्धो भवितुमर्हत्यन्यदत उपश्लेषात् ? । इको यणचि । अच्युपश्लिष्टस्येति । तत्रान्तरेण संहिताग्रहणं संहितायामेव भविष्यति ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, 'संहितायाम्' या सूत्राचें प्रत्याख्यान करणें शक्य आहे; कारण 'आधारोऽधिकरणम्' सू. ६३२ या सूत्रान्वयें आधाराला अधिकरणसंज्ञा असून तो आधार व्यापक, औपश्लेषिक व वैषयिक असा तीन प्रकारचा असतो. उदाहरणार्थ 'दध्नि सर्पिः, तिले तैलम्' इत्यादि स्थलीं सकलावयवव्याप्तित्वामुळें 'दध्नि, तिले' हीं व्यापक अधिकरणें आहेत. 'कटे आस्ते, स्थाल्यां पचति' इत्यादि स्थलीं 'कटे, स्थाल्याम्' हीं संयोगसंबंधबोधक औपश्लेषिक अधिकरणें आहेत. 'मोक्षे इच्छाऽस्ति' इत्यादि स्थलीं 'मोक्षे' हें विषयतासंबंधबोधक वैषयिक अधिकरण आहे. औपश्लेषिक-संबंधाखेरीज दोन शब्दांचा इतर कोणत्याहि प्रकारें संबंध होणें

संभवत नाहीं. म्हणूनच 'इको यणचि' या सूत्राचा 'अच्युपश्लिष्टस्य इको यण्' असा अर्थ होतो व या स्थलीं 'अचि' हें औपश्लेषिक अधिकरण आहे. अशा प्रकारचा उपश्लेषात्मक संयोगसंबंध सन्धिकार्य करतांनाच होत असल्यामुळें 'संहितायाम्' हें सूत्र असण्याची कांहीं गरज नाहीं. 'अचि' इत्यादि) सप्तम्यन्त पदाचा, अच् लगेंच पुढें असतां, असा अर्थ होत असल्यामुळें, सूत्रनिर्दिष्ट 'इकः' हें षष्ठ्यन्त पद देखील आपोआपच लगेंच पूर्वी असणारें अशा प्रकारचें ठरतें, म्हणजे अचाच्या लगेंच पूर्वी इक् असला पाहिजे व त्या दोहोंत कोणत्याहि वर्णाचें व्यवधान नसलें पाहिजे असा 'इको यणचि' या सूत्राचा अर्थ प्रकृत परिभाषेच्या सहायानें निष्पन्न होतो, आणि म्हणूनच मनोरमेंत 'अव्यवहितस्येति तु फलितार्थकथनम्' असें म्हटलें आहे.

मनोरमा—परस्य यदिति । "तस्मादित्युत्तरस्यादेः" इति तु न सूत्रितम्, आदेरित्यंशस्य सर्वादेशबाधकत्वापत्तेः । सिद्धान्ते तु परत्वात्सर्वादेशत्वं बाधकमित्यनुपदमेव वक्ष्यति ॥

('परस्य यद्विहितं तत्तस्यादेर्बोध्यम्' या अर्थाचें वाचक 'आदेः परस्य' सू. ४४ हें पृथक् सूत्र केलें आहे. 'तस्मादित्युत्तरस्य' सू. ४१ व 'आदेः परस्य' हीं दोन सूत्रें मिळून) 'तस्मादित्युत्तरस्यादेः' असें एक सूत्र केलें नाहीं; कारण असें सूत्र केलें असतें तर, तशा केलेल्या सूत्रांतील 'आदेः' या अंशानें 'अनेकाल्शित्सर्वस्य' सू. ४५ या सर्वादेशविधायक सूत्राचा बाध होण्याची आपत्ति आली असती. (अष्टाध्यायींत 'आदेः परस्य' हें सूत्र पहिलें पठित असून त्यानंतर 'अनेकाल्शित्सर्वस्य' हें सूत्र पठित आहे व या सूत्राच्या बरेंच पुढें 'तस्मादित्युत्तरस्य' हें सूत्र पठित आहे. 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू. १७५ या सूत्रान्वयें म्हणजेच 'पूर्वात् परं बलवत्' या न्यायान्वयें 'अनेकाल्शित्सर्वस्य' हें परसूत्र 'आदेः परस्य' या पूर्व सूत्राचें बाधक ठरतें. 'आदेः परस्य' १.१.५४ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार

म्हणतातः–'अलोऽन्त्यस्येत्युत्सर्गः'। तस्यादेः परस्यानेकाल्शित्सर्वस्ये-त्यपवादौ। अपवादविप्रतिषेधात्तु सर्वादेशो भविष्यति।' या भाष्याचा अर्थ असा आहे कीं, 'अलोऽन्त्यस्य' हा सामान्य नियम असून 'आदेः परस्य' व 'अनेकाल्शित्सर्वस्य' हे त्याचे दोन अपवाद आहेत आणि या दोन अपवादांमध्यें जेथें परस्परविरोध उत्पन्न होतो तेथें परत्वामुळें–'विप्रतिषेधे परं कार्यम्' या न्यायान्वयें–सर्वादेशच होतो. पण 'तस्मादित्युत्तरस्य' या पुढील सूत्रांत 'आदेः परस्य' हें पूर्व सूत्र मिळवून 'तस्मादित्युत्तरस्यादेः' असें एक सूत्र पठित केलें असतें तर, तें सूत्र 'अनेकाल्शित्सर्वस्य' या सूत्राच्या मानानें परसूत्र ठरलें असतें व त्यांतील 'आदेः' हा अंश 'विप्रतिषेधे परं कार्यम्' या न्यायान्वयें 'अनेकाल्शित्सर्वस्य' या सूत्राचा बाधक ठरण्याची आपत्ति आली असती आणि त्यामुळें 'अष्टाभ्य औश्' सू. ३७२ या सूत्रांत 'अष्टाभ्यः' असा पञ्चमीनिर्देश असल्यामुळें त्या सूत्रानें 'जस्, शस् = अस्' या प्रत्ययांचे जागीं होणारा 'औश्' हा शित् आदेश सर्वादेश न होतां त्या प्रत्ययांतील आद्य अकाराचे जागीं होण्याची आपत्ति आली असती. ती आपत्ति टळावी म्हणूनच, 'तस्मादित्यु-त्तरस्यादेः' असें एक सूत्र पठित न करितां 'आदेः परस्य' व 'तस्मादित्युत्तरस्य' हीं पृथक् सूत्रें करुन 'आदेः परस्य' हें सूत्र 'अनेकाल्शित्सर्वस्य' या सूत्रापूर्वी अष्टाध्यायींत पठित केलें आहे आणि त्यामुळेंच 'अनेकाल्शित्सर्वस्य' हें परसूत्र विप्रतिषेधन्यायानें 'आदेः परस्य' या पूर्व सूत्राचें बाधक ठरतें.) सिद्धान्तपक्षामध्यें 'अनेका-ल्शित्सर्वस्य' हें सूत्र परत्वामुळें 'आदेः परस्य' या पूर्वसूत्राचें बाधक ठरतें हें पुढें लवकरच सांगण्यांत येईल.

शब्दरत्न—न सूत्रितमिति। "स्वंरूपम्" इत्यतः प्रागिति शेषः। तत्र "आदेः" इति पृथग्वाक्यम्, तत्र "उत्तरस्य" इत्यनुवर्तते स्थानषष्ठी चेयं, पञ्चमीनिर्देशेन यत्कार्यं तदुत्तरसम्बन्धि, उत्तरस्य स्थाने विधीयमानं चादे र्बोध्यमिति वाक्यार्थद्वयम्, वाक्य-

भेदसामर्थ्याच्च "आदेः" इत्यंशं विनाऽपि क्वचिदंशान्तरप्रवृत्तिः। "आदेः" इत्यंशस्त्वनुवृत्तोत्तरस्येत्यस्यावृत्त्या परत्वबोधकशब्देन यत्र विधानं तत्रैवेति "नित्यं ङितः" इत्यादौ न प्रवर्तत इति भावः। वक्ष्यतीति। न च "अनेकाल्" इत्यतः पूर्वमेव "तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य" "तस्मादित्युत्तरस्यादेः" इति सूत्रे कुतो न पठिते इति वाच्यम्, "आदेः" इत्यंशे "षष्ठी स्थाने" इत्यस्यासम्बन्धे "आज्जसेरसुक्" इत्यादावपि तस्य प्रवृत्त्यापत्तेः। सम्बन्धे मध्ये "तस्मिन्निति-" "तस्मादिति-" अनयोरपि तत्सम्बन्धे तयोरप्यागम-विषयेऽप्रवृत्त्यापत्तेरिति दिक्॥

'तस्मादित्युत्तरस्यादेः इति तु न सूत्रितम्' या मनोरमेंतील पंक्तीपूर्वी 'स्वं रूपं शब्दस्य इत्यतः प्राक्' हीं पदें अध्याहृत आहेत. (सारांश त्या पंक्तीचा अर्थ असा समजूं नये कीं, 'आदेः परस्य' या सूत्राचे जागीं तें सूत्र पठित केलें नाहीं. पण त्या पंक्तीचा अर्थ असा समजावा कीं, 'स्वं रूपं शब्दस्य' या सूत्राच्या लगेंच पूर्वी पठित असलेल्या, 'तस्मादित्युत्तरस्य' या सूत्राचे जागीं तसें सूत्र पठित केलें नाहीं.) 'तस्मादित्युत्तरस्य' या सूत्राचे जागीं 'तस्मादित्युत्तरस्यादेः' असें सूत्र पठित केलें असतें तरी, त्या सूत्राचीं 'तस्मादित्युत्तरस्य' व 'आदेः' अशीं योगविभागानें दोन वाक्यें तयार करतां आलीं असतीं व प्रथम वाक्यांतून 'आदेः' या द्वितीय वाक्यांत 'उत्तरस्य' या पदाची अनुवृत्ति करतां आली असती. तें अनुवृत्त पद (प्रकृत सूत्र 'षष्ठी स्थानेयोगा' या स्थानषष्ठीप्रकरणांत पठित असल्यामुळें) स्थानषष्ठी आहे. असें केल्यानें 'तस्मादित्युत्तरस्य' या प्रथम वाक्याचा असा अर्थ झाला असता कीं, सूत्रांत पञ्चमीनिर्देश करून कांहीं कार्य होणें सांगितलें असल्यास, तें कार्य पुढें असलेल्याला करावें, व 'उत्तरस्य आदेः' या द्वितीय वाक्याचा असा अर्थ झाला असता कीं, पुढें असलेल्याला जें कार्य होणें सांगितलें आहे तें त्याच्या आद्य वर्णास करावें आणि अशा रीतीनें त्या एक सूत्राची यर सांगित-

त्याप्रमाणें दोन भिन्न वाक्यें तयार केल्यानें वाक्यभेदसामर्थ्यामुळें, म्हणजे एकाच सूत्राचीं मुद्दाम दोन वाक्यें तयार केलीं असल्यामुळें त्या सामर्थ्यानें, कांहीं स्थलीं 'उत्तरस्यादेः' हा द्वितीय अंश-वाक्य-प्रवृत्त न होतां 'तस्मादित्युत्तरस्य' या प्रथम अंशाचीच-वाक्याचीच-प्रवृत्ति होऊं शकली असती. (याचा अर्थ असा कीं, अतिदेशविधायक व आगमविधायक सूत्रांत स्थानषष्ठीचा निर्देश राहत नसल्यामुळें, तशा सूत्रांत 'उत्तरस्यादेः' या द्वितीय वाक्याची प्रवृत्ति न करितां 'तस्मादित्युत्तरस्य' या प्रथम वाक्याचीच प्रवृत्ति करतां आली असती. उदाहरणार्थ 'गाङ्कुटादिभ्योऽञ्णिन्ङित्' सू. २४६१ या अतिदेश-विधायक सूत्रांत असें सांगितलें आहे कीं, 'गाङ' आदेश व कुटादिग-णांत पठित असलेले धातु यांच्यापुढें ञित् किंवा णित् प्रत्यय खेरीज करून इतर कोणतेहि प्रत्यय आल्यास, ते प्रत्यय ङित् प्रत्ययासारखे होतात, म्हणजे तसे प्रत्यय पुढें आल्यास 'क्ङिति च' सू. २२१७ या निषेधक सूत्रान्वयें गुण किंवा वृद्धि होत नाहीं. या सूत्रांत पञ्चमी-निर्देश असून त्याच्या पुढें येणाऱ्या ञित्णित्भिन्न प्रत्ययांना ङित्व होण्याचा अतिदेश केला आहे. अशा प्रत्ययांच्या आद्य वर्णाचे ठिकाणीं ङित्वाचा अतिदेश केल्यानें कांहींच फायदा नाहीं. संपूर्ण प्रत्यय ङित् मानल्यासच 'क्ङिति च' हा निषेध प्रवृत्त होऊं शकतो. सारांश अशा स्थलीं 'आदेः' या द्वितीय अंशाची प्रवृत्ति न करितां प्रथम अंशाची प्रवृत्ति केल्यानें इष्टसिद्धि होऊं शकते. आतां येथें अशी शंका करण्यांत येते कीं, वाक्यभेदसामर्थ्यामुळें क्वचित् स्थलीं द्वितीय वाक्य प्रवृत्त न होतां जसें प्रथम वाक्यच प्रवृत्त होतें त्याचप्रमाणें वाक्यभेदसामर्थ्या-मुळें क्वचित् स्थलीं प्रथम वाक्य प्रवृत्त न होतां द्वितीय वाक्यच प्रवृत्त होईल व तसें झाल्यास, ङित् लकारांत उत्तमपुरुषाच्या सकारान्त प्रत्ययाचा नित्य लोप होतो, म्हणजे 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषान्वयें तशा प्रत्ययांतील अन्त्य सकाराचा नित्य लोप होतो, हें सांगणाऱ्या 'नित्यं ङितः' सू. २२०० या सूत्राचे ठिकाणीं दोष येईल; कारण

त्या सूत्रानें उत्तराला—पुढील प्रत्ययाला—कार्य होणें सांगितलें असल्यामुळें, 'उत्तरस्य स्थाने विधीयमानं चादेर्बोध्यम्' हें द्वितीय वाक्य तेथें प्रवृत्त केलें असतां, उत्तमपुरुषाच्या सकारान्त 'वस्, मस्' प्रत्ययांच्या अन्त्य सकाराचा लोप न होतां त्या प्रत्ययांतील आद्य वर्णाचा या द्वितीय वाक्यान्वयें लोप होण्याची आपत्ति येईल. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं,) द्वितीय अंश 'उत्तरस्यादेः' यांतील 'उत्तरस्य' या अनुवृत्त पदाची द्विरावृत्ति केल्यानें (व शब्दाधिकाराचा आश्रय करुन व प्रथम उच्चारलेल्या 'उत्तरस्य' या पदाचा 'परत्वबोधकस्य' असा व पुन्हा उच्चारलेल्या त्या पदाचा 'परस्य' असा अर्थ केल्यानें) जेथें सूत्रांत परत्वबोधक पञ्चम्यन्त पदाचा उच्चार करुन पुढच्याला कार्य होणें सांगितलें आहे तशाच स्थली त्या द्वितीय अंशाची—वाक्याची—प्रवृत्ति होऊं शकली असती आणि त्यामुळें 'नित्यं ङितः' सू. २२०० इत्यादि स्थलीं त्या द्वितीय वाक्याची प्रवृत्ति झालीच नसती. (कारण 'नित्यं ङितः' हें सूत्र 'धातोः' या अधिकारांत पठित असल्यामुळें जरी त्या सूत्रांत 'धातोः' हें पञ्चम्यन्त पद अनुवृत्त होतें तरी, 'धातोः' ही दिग्योगलक्षणा—परत्वबोधक—पञ्चमी नसून विहितपञ्चमी आहे व त्या पदाचा 'धातोः परस्य' असा अर्थ नसून 'धातोः विहितस्य' असा अर्थ आहे. सारांश 'नित्यं ङितः' या सूत्रांत परत्वबोधक पञ्चमीचा निर्देश करुन पुढच्याला कार्य होणें सांगितलें नसल्यामुळें, त्या सूत्रांत द्वितीय वाक्य प्रवृत्त होऊं शकलें नसतें व उत्तमपुरुषाच्या 'वस्, मस्' प्रत्ययांतील आद्यवर्णाचा लोप होण्याची आपत्ति आली नसती व 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषान्वयें त्या प्रत्ययांतील अन्त्य सकाराचा लोप झालाच असता. पण 'आदेः परस्य' हें पृथक् सूत्र पठित न करितां 'तस्मादित्युत्तरस्य' या सूत्राऐवजी 'तस्मादित्युत्तरस्यादेः' असें सूत्र पठित केलें असतें तरी, जरी वर सांगितल्याप्रमाणें कार्यसिद्धि होऊं शकली असती तरी, तसें सूत्र पठित केल्यास

दीक्षितांनीं मनोरमेंत जो दोप दाखविला आहे तो टाळतां आला नसता. दुसरें असें कीं, दोन सूत्रांऐवजीं एक सूत्र पठित करणें यांत जरी लाघव आहे तरीं, एक सूत्र पठित करून त्याचे पुन्हा दोन भाग करणें आणि प्रथम भागांतील 'उत्तरस्य' या पदाची द्वितीय भागांत अनुवृत्ति करून त्या अनुवृत्त पदाचा दोनदां उच्चार करणें व शब्दाधिकाराचा आश्रय करून द्वितीय भागाचा 'परत्वबोधकशब्देन उत्तरस्य यद्विहितं तत्तस्यादेर्बोध्यम्' असा अर्थ करणें यांत काय लाघव आहे ? म्हणून पाणिनीनें जशीं दोन भिन्न सूत्रें करून भिन्न स्थलीं पठित केलीं आहेत तशींच सूत्रें मानणें इष्ट आहे व तशीं सूत्रें मानल्यास, 'आदेः' हा अंश 'अनेकाल्शित्सर्वस्य' या सूत्राचा बाधक होण्याची आपत्ति टळते असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' व 'तस्मादित्युत्तरस्यादेः' अशीं दोन सूत्रें 'अनेकाल्शित्सर्वस्य' या सूत्राच्या पूर्वींच पाणिनीनें कां पठित केलीं नाहींत (कारण तीं दोन सूत्रें तशीं पठित केलीं असतीं तर, 'आदेः' हा अंश 'अनेकाल्शित्सर्वस्य' या सर्वादेश-विधायक उत्तर सूत्राचा बाधक झाला नसता व दीक्षितांनीं मनोरमेंत जो दोप दाखविला आहे तो सहज टाळतां आला असता) असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'आदेः = उत्तरस्यादेः' या द्वितीय अंशांत ('पष्ठी स्थानेयोगा' हें सूत्र एक तर संबद्ध होऊं शकलें नसतें किंवा संबद्ध होऊं शकलें असतें, आणि) 'पष्ठी स्थानेयोगा' हें सूत्र संबद्ध होऊं शकलें नसतें तर, 'आज्जसेरसुक्' सू. ३५७२ इत्यादि सूत्रांत देखील तो द्वितीय अंश प्रवृत्त होण्याची आपत्ति आली असती. ('आज्जसेरसुक्' या आगमविधायकसूत्रांत 'आत्' हें परत्वबोधक पञ्चम्यन्त पद असून, त्यांत स्थानपष्ठीबोधक पदाचा निर्देश नाहीं; कारण 'जसः' ही स्थानपष्ठी नसून अवयवपष्ठी आहे. म्हणून त्या सूत्रांत स्थानपष्ठीचा निर्देश नसल्या-मुळें, 'उत्तरस्यादेः' या द्वितीय अंशाची त्या सूत्रांत प्रवृत्ति झाली

असती व त्यामुळें 'जस् = अस्' प्रत्ययातील आद्य वर्ण जो अकार त्याला 'असुक्' आगम होण्याची आपत्ति आली असती आणि 'देवासः, मनुष्यासः' इत्यादि इष्ट वैदिक रूपे सिद्ध होऊ शकली नसती; कारण 'देव + जस् = देव + अस्' या स्थली 'आज्जसेरसुक्' या सूत्राने 'अस्' प्रत्ययातील आद्य अकाराला 'असुक् = अस्' आगम केल्याने 'देव + अ + अस् + स्' अशी स्थिति होईल व अशा स्थितीत 'अतो गुणे' सू. १९१ व 'स्कोःसयोगाद्योः' सू. ३८० ही दोन सूत्रें प्रवृत्त करता येणे शक्य आहे असे मानले तर, 'अतो गुणे' या सूत्रानें पररूप एकादेश होऊन 'देव + अस् + स्' अशी स्थिति झाली असता 'प्रथमयोः पूर्वसवर्णः' सू. १६४ या सूत्राने परसवर्णदीर्घरूप एकादेश होऊन 'देवास्स्' अशी स्थिति झाल्यावर 'स्कोःसयोगाद्योः' या सूत्रानें पूर्व सकाराचा लोप केला असता व त्याच्या पुढील सकाराचें 'ससजुषो रुः' सू. १६२ या सूत्रानें रुत्व करून 'खरवसानयोर्विसर्जनीयः' सू. ७६ या सूत्रानें रेफाचा विसर्ग केला असता, 'देवासः' असे इष्ट वैदिक रूप न होता, 'देवाः' असेच भाषेतील लौकिक रूपासारखेंच रूप होईल. दुसरे असे की, 'आज्जसेरसुक्' या सूत्रानें 'असुक् = अस्' आगम होण्याचे विधान मुद्दाम केले असून देखील जर त्या आगमातील अकाराचा 'अतो गुणे' या सूत्रानें होणाऱ्या पररूप एकादेशानें अपहार केला व त्या आगमातील अवशिष्ट सकाराचा 'स्कोःसयोगाद्योः' या सूत्रानें अपहार केला तर तो संपूर्ण आगम नाहीसा होईल व वैदिक रूपात त्या आगमाचे मुळीच श्रवण होणार नाही आणि त्यामुळें 'आज्जसेरसुक्' हें आगमविधायक सूत्र मुद्दाम केलें असून देखील अनर्थक ठरेल, म्हणजे न केल्यासारखें होईल. म्हणून तो आगम कायम ठेवण्याकरिता 'अतो गुणे' व 'स्कोःसयोगाद्योः' या सूत्राची प्रवृत्ति करणे योग्य नाही, आणि ती सूत्रें प्रवृत्त न केल्यानें विलक्षण वैदिक रूप होण्याची आपत्ति येईल. म्हणून 'असुक् = अस्' हा आगम 'जस् = अस्' प्रत्ययातील आद्य

अकारास न करितां त्या प्रत्ययापुढेंच केला पाहिजे व तसें केल्यास 'देव + अस् + अस्' अशी स्थिति होऊन 'देवासः' असें इष्ट रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. 'असुकि कृते जसः सकारस्य श्रवणम् । असुकःसस्य विसर्गः' असें 'आज्जसेरसुक्' या सूत्रावरील शब्देन्दुशेखरांत म्हटलें आहे.) आतां 'आदेः' या द्वितीय अंशांत 'षष्ठी स्थानेयोगा' हें सूत्र संबद्ध होतें असें मानलें तर, 'षष्ठी स्थानेयोगा' व 'आदेः' या दोहोंमध्यें शंकाकारानें सुचविलेल्या पाठान्वयें पठित असलेल्या 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' व 'तस्मादित्युत्तरस्य' या दोन सूत्रांशीं देखील 'षष्ठी स्थानेयोगा' हें सूत्र संबद्ध होईल व त्यामुळें (आगमविधायक सूत्रांत स्थानषष्ठीचा निर्देश राहत नसून अवयवषष्ठीचा निर्देश राहत असल्यामुळें, तशा) आगमविधायक सूत्राचे ठिकाणीं त्या दोन्ही परिभाषा देखील प्रवृत्त न होण्याची आपत्ति येईल (आणि त्यामुळें इष्ट रूपांची सिद्धि न होतां अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येईल. उदाहरणार्थ 'छे च' सू. १४६ व 'आने मुक्' सू. ३१०१ या दोन आगमविधायक सूत्रांत जरी सप्तमी-निर्देश आहे तरी त्या सूत्रांत अनुक्रमें अनुवृत्त असलेलीं 'ह्रस्वस्य' व 'अतः अङ्गस्य = अदन्ताङ्गस्य' हीं पदें स्थानषष्ठी नसून अवयवषष्ठी आहेत. त्यामुळें त्या दोन सूत्रांत स्थानषष्ठीचा निर्देश नसल्यामुळें 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' ही परिभाषा प्रवृत्त होऊं शकणार नाहीं. तसेंच 'ङः सि धुट्' सू. १३१ या आगमविधायक सूत्रांत जरी 'ङः' हें परत्वबोधक पञ्चम्यन्त पद आहे तरी 'सि = सस्य' ही स्थानषष्ठी नसल्यामुळें त्या सूत्रांत 'तस्मादित्युत्तरस्य' ही परिभाषा प्रवृत्त होऊं शकणार नाहीं. म्हणून वर दर्शविलेल्या सर्व आपत्ति टाळण्या-करितां वरील सूत्रें जशीं व ज्या क्रमानें अष्टाध्यायींत पठित आहेत तशींच तीं असणें इष्ट आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.)

मनोरमा—"अनेकाल्" इति उदाहरणम्—"इदम इश्"

इतः। यत्तु—वृत्तिकृता "जश्शसोः शिः" इत्युदाहृतम्, तन्न, सर्वादेशतायाः प्राक् शित्त्वस्यैवालाभात्। तत्र हि डाणलोरिवानु-पूर्व्यादनेकाल्त्वेन सर्वादेशत्वमिति सिद्धान्तः इत्यादाविति। आदिशब्देन "अतो भिस ऐस्" इति गृह्यते। परत्वादिति। अत एव "आदेः परस्य" इति पृथक् क्रियते इत्युक्तम्। 'उत्तरस्य' इत्यंशस्तु औशंसोरपि प्रवर्तत एव। यत्तु—प्राचा "आदेः" इति सूत्रं विवृण्वता पञ्चमीनिर्देशेनेत्याद्युक्तं तदसम्बद्धमिति स्पष्टमेव।

'अनेकाल्शित्सर्वस्य' सू. ४५ या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या 'शित्' आदेशाचें 'इदम इश्' सू. ११४९ हें उदाहरण आहे व असा आदेश केल्यानें 'इतः' असें रूप होतें. ('इश्' हा आदेश अनेकाल् आहे असें समजू नये; कारण 'हलन्त्यम्' सू. १ या सूत्रान्वयें 'इश्' यातील अन्त्य शकार इत्संज्ञक ठरून, 'तस्य लोपः' सू. ६२ या सूत्रानें त्या शकाराचा लोप झाला असतां, 'इ' असें त्या आदेशाचें एकाल् स्वरूप होतें व 'नानुबन्धकृतमनेकाल्त्वम्'—प. ६—ही परिभाषा असल्या-मुळें 'इश्' हा सानुबन्धक आदेश अनेकाल् मानतां येत नाहीं. पण जरी तो आदेश अनेकाल् नाहीं तरी तो 'शित्' असल्यामुळें, संपूर्ण 'इदम्' चे जागीं तो सर्वादेश होतो व त्यामुळें 'पञ्चम्यास्तसिल्' सू. १९५२ या सूत्रानें 'इदम् ङसि' या पञ्चम्यन्त सर्वनामाहून 'तसिल्' हा तद्धित प्रत्यय केला असतां, 'इदम् + ङसि + तसिल्' या तद्धितान्ताला 'कृत्तद्धितसमासाश्च' सू. १७९ या सूत्रानें प्राति-पदिक संज्ञा होऊन व 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें 'ङसि' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् होऊन, 'इदम् + तस्' अशी स्थिति झाल्यावर, 'इदम इश्' या सूत्रानें 'इदम्' चे जागीं 'इश् = इ' असा सर्वादेश होऊन 'इ + तस् = इतः' असें अन्त्य सकारास रुत्व व विसर्ग होऊन, इष्ट रूप सिद्ध होतें.) काशिकाकारानें 'शि' आदेशाचें 'जश्शसोः शिः' सू. ३१२ हें जें उदाहरण दिलें आहे तें बरोबर नाहीं; कारण 'शि' हा सर्वादेश होण्यापूर्वी त्यांतील

आद्य शकाराला इत्संज्ञा होऊं शकत नाहीं. ('शि' हा आदेश अनेकाल् असल्यामुळें तो संपूर्ण 'जस्' किंवा 'शस्' प्रत्ययाचे जागीं होतो आणि तो आदेश झाल्यावरच त्याला स्थानिवद्भावानें प्रत्ययसंज्ञा प्राप्त होते आणि तशी प्रत्ययसंज्ञा त्याला प्राप्त झाल्यानंतरच 'लशक्वतद्धिते' सू. १९५ या सूत्रान्वयें त्यांतील आद्य शकाराला इत्संज्ञा होते. तो आदेश होण्यापूर्वी त्याला प्रत्ययसंज्ञा नसल्यामुळें, 'लशक्वतद्धिते' हें प्रत्ययाला लागू पडणारें सूत्र त्याला लागू पडत नाहीं व त्यामुळें त्यांतील आद्य शकाराला इत्संज्ञा होऊं शकत नाहीं, म्हणजे 'शि' हा आदेश शित् आहे असें मानतां येत नाहीं.) अशा ठिकाणीं सिद्धान्त हा आहे कीं, ज्याप्रमाणें 'डा, णल्' हे आदेश अनेकाल् असल्यामुळें प्रथम सर्वादेश होतात त्याचप्रमाणें 'जश्शसोः शिः' या सूत्रानें होणारा 'शि' हा आदेश अनेकाल् असल्यामुळें, सर्वादेश होतो. ('लुटः प्रथमस्य डारौरसः' सू. २१८८ या सूत्रानें 'लुट्' लकारांत 'तिप्' या प्रथम पुरुषाच्या एकवचनी प्रत्ययाचे जागीं 'डा' हा आदेश होणें सांगितलें आहे. तसेंच 'परस्मैपदानां णलतुस्' सू. २१७३ या सूत्रानें लिट् लकारांत 'तिप्' व 'मिप्' या प्रत्ययांचे जागीं 'णल्' आदेश होणें सांगितलें आहे. 'डा' व 'णल्' हे दोन्ही आदेश अनेकाल् असल्यामुळें, तें 'अनेकाल्शित्सर्वस्य' या प्रकृत सूत्रान्वयें संपूर्ण प्रत्ययाचे जागीं सर्वादेश होतात व ते आदेश झाल्यानंतरच त्यांना स्थानिवद्भावानें प्रत्ययसंज्ञा प्राप्त झाली असतां, 'चुटू' सू. १८९ या सूत्रानें त्या आदेशांतील आद्य 'ड्' व 'ण्' इत्संज्ञक होतात. ते आदेश होण्यापूर्वी त्यांना प्रत्ययसंज्ञा नसल्यामुळें, प्रत्ययाला लागू पडणारें 'चुटू' हें सूत्र त्यांना लागू पडत नाहीं व त्यामुळें त्या आदेशांतील आद्य वर्ण इत्संज्ञक होऊं शकत नाहीं. याचप्रमाणें 'जश्शसोः शिः' या सूत्रासंबंधानें देखील समजावें. सारांश अनेकाल्त्वामुळें प्रथम संपूर्ण प्रत्ययाचे जागीं सर्वादेश होणें, नंतर त्या आदेशाला स्थानिवद्भावानें प्रत्ययसंज्ञा होणें, आणि मग त्या

आदेशांतील आद्य वर्णाला इत्संज्ञा होणें असा क्रम असल्यामुळें, 'शि' हा आदेश शित् मानतां येत नाहीं, आणि म्हणून शित् आदेशाचें 'जश्शसोः शिः' हें जें उदाहरण काशिकाकारानें दिलें आहे तें योग्य नाहीं असें दीक्षितांच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे.) प्रकृत सूत्रावरील कौमुदींत 'अष्टाभ्य औश् इत्यादौ' असें जें म्हटलें आहे त्यांतील 'इत्यादौ' या पदानें 'अतो भिस ऐस्' सू. २०३ या सूत्रांत सांगितलेल्या 'ऐस्' आदेशाचें ग्रहण होतें. ('अष्टाभ्य औश्' सू. ३७२ या सूत्राचा 'कृताकारादष्टनः परयोर्जश्शसोरौश् स्यात्' असा अर्थ आहे. या सूत्रांत 'अष्टाभ्यः' असा पञ्चमीनिर्देश असल्यामुळें 'आदेः परस्य' सू. ४४ हें सूत्र प्रवृत्त केल्यास, 'अष्टा + जस् = अष्टा + अस्' या स्थलीं 'अस्' प्रत्ययांतील आद्य अकाराचे जागीं 'औ' आदेश होण्याची आपत्ति येते. त्याचप्रमाणें 'अतो भिस ऐस्' या सूत्रांत 'अतः' असा पञ्चमीनिर्देश असल्यामुळें त्या ठिकाणीं 'आदेः परस्य' हें सूत्र प्रवृत्त केल्यास, 'भिस्' प्रत्ययांतील आद्य वर्णाचे जागीं 'ऐस्' आदेश होण्याची आपत्ति येते. ही आपत्ति टाळण्याकरितांच व 'आदेः परस्य' या पूर्व सूत्राचा 'अनेकाल्शित् सर्वस्य' या पर सूत्रानें परत्वामुळें बाध व्हावा या करितांच) 'आदेः परस्य' असें पृथक् सूत्र केलें आहे (व तें सूत्र 'अनेकाल्शित्सर्वस्य' या सूत्राच्या पूर्वी पठित केलें आहे) हें मागें सांगितलेंच आहे. (त्यामुळें 'अनेकाल्शित्सर्वस्य' हें सूत्र 'आदेः परस्य' या सूत्राच्या मानानें परसूत्र ठरत असल्यामुळें, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' किंवा 'पूर्वात् परं बलवत्' या न्यायान्वयें 'अनेकाल्शित्सर्वस्य' हें परसूत्र 'आदेः परस्य' या पूर्व सूत्राचा बाध करतें) आणि म्हणूनच प्रकृत सूत्रावरील कौमुदींत 'परत्वादनेन बाध्यते' असें म्हटलें आहे. (सारांश 'औश्' हा आदेश शित् असल्यामुळें व 'ऐस्' हा आदेश अनेकाल् असल्यामुळें, हे आदेश प्रकृत सूत्रान्वयें संपूर्ण प्रत्ययाचे जागीं होतात व 'आदेः परस्य' हें बाधित पूर्व सूत्र त्यांचे ठिकाणीं लागू पडत नाहीं.)

'तस्मादित्युत्तरस्य' या सूत्रांतील 'उत्तरस्य' हा अंश 'औश्' व 'ऐस्' यांचे ठिकाणीं देखील प्रवृत्त होतोच. ('अनेकाल्शित्सर्वस्य' या सूत्रानें जसा 'आदेः परस्य' या पूर्वसूत्राचा बाध होतो तसा 'तस्मादित्युत्तरस्य' या सूत्राचा बाध होत नाहीं आणि तसा बाध न व्हावा म्हणूनच, 'तस्मादित्युत्तरस्यादेः' असें एक सूत्र पठित न करितां, 'तस्मादित्युत्तरस्य' व 'आदेः परस्य' हीं दोन पृथक् सूत्रें पठित केलीं आहेत व 'आदेः परस्य' हें सूत्र 'अनेकाल्शित्सर्वस्य' या सूत्राच्या पूर्वीं पठित करून 'तस्मादित्युत्तरस्य' हें सूत्र नंतर पुढें पठित केलें आहे. त्यामुळें जेथें सूत्रांत पञ्चमीनिर्देश आहे तेथें उत्तराला कार्य होतेंच—म्हणजे तेथें 'तस्मादित्युत्तरस्य' हें सूत्र प्रवृत्त होतेंच आणि 'आदेः परस्य' या सूत्रानें तें कार्य उत्तरकार्याच्या आद्य वर्णाला होतें. पण जेथें उत्तराचे जागीं अनेकाल् किंवा शित् आदेश होणें सांगितलें आहे तेथें तेवढेंच सूत्र प्रवृत होऊन, 'आदेः परस्य' हें बाधित पूर्वसूत्र प्रवृत्त होत नाही व सर्वादेश होतो.) 'आदेः परस्य' या सूत्राचें व्याख्यान करितांना प्रक्रियाकौमुदीकारांनीं 'पञ्चमीनिर्देशेन क्रियमाणं कार्यं परस्यादेः ज्ञेयम्' असें जें म्हटलें आहे तें, 'तस्मादित्युत्तरस्य' हें सूत्र तेथें संबद्ध होत नसल्यामुळें, अर्थास धरुन नाहीं हें अगदीं उघड आहे. (दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय असा आहे कीं, 'तस्मादित्युत्तरस्यादेः' असें एक सूत्र केलें असतें तर किंवा 'तस्मादित्युत्तरस्य' या सूत्रानंतर 'आदेः परस्य' हें सूत्र पठित केलें असतें तर, प्रक्रियाकौमुदीकारांनीं 'आदेः परस्य' या सूत्राचा जसा अर्थ केला आहे तसा होऊं शकला असता. परंतु 'आदेः परस्य' हें पृथक् सूत्र करुन तें 'तस्मादित्युत्तरस्य' या सूत्राच्या वरेंच पूर्वी पठित केलें असल्यामुळें, 'आदेः परस्य' या पूर्वपठित सूत्राचे ठिकाणीं पञ्चमीनिर्देशाचा कोणत्याहि रीतीनें संबंध होऊं शकत नाहीं. त्यामुळें 'पञ्चमीनिर्देशेन क्रियमाणं कार्यम्' इत्यादि जो त्या सूत्राचा प्रक्रियाकौमुदीकारांनीं अर्थ केला आहे तो संबंधास धरुन

नसल्यामुळे बरोबर मानतां येत नाही व कौमुदीत 'परस्य यद्विहितं तत्तस्यादेर्बोध्यम्' असा जो त्या सूत्राचा अर्थ केला आहे तसाच अर्थ करणे योग्य आहे.)

शब्दरत्न--डाणलोरित्वेति । आदेशानां प्रत्ययाधिकारे पाठेऽपि वाक्यार्थबोधोत्तरमेव प्रत्ययत्वज्ञानेनोपदेशे णकारे इत्त्वाप्रवृत्तेस्तदुत्तरं लक्ष्ये प्रवृतिकाले इत्त्वेऽप्यनेकाल्त्वाक्षतेरिति भावः प्रवर्तत एवेति । उपपादितमेतत् ।

जरी आदेशाचा प्रत्ययाधिकारात पाठ केला आहे तरी, ज्या आदेशविधायकसूत्रात प्रत्ययाचे जागी आदेश होणे सांगितले आहे त्या सूत्राचा ('षष्ठी स्थानेयोगा' या सूत्राशी एकवाक्यता करून) अर्थ कळल्यानंतरच प्रत्ययत्वाचे ज्ञान होत असल्यामुळे, उपदेशावस्थेत, म्हणजे 'परस्मैपदाना णलतुम्' सू. २१७३ या सूत्रात पाणिनीने जें आद्योच्चारण केलें आहे त्या अवस्थेत 'णल्' यातील (अन्त्य लकाराला जरी 'हलन्त्यम्' सू. १ या सूत्राने उपदेशावस्थेत इत्संज्ञा होते तरी) णकाराचे ठिकाणी इत्वाची प्रवृत्ति होऊं शकत नाही. सूत्राच्या अर्थाचा बोध झाल्यावर व प्रत्ययाचे जागी आदेश करून त्या आदेशाला स्थानिवद्भावानें प्रत्ययसंज्ञा प्राप्त झाल्यावर लक्ष्याचे ठिकाणी प्रवृत्ति करतेवेळी जरी णकार इत्संज्ञक होतो (व त्याचा लोप होतो) तरी त्या आदेशाने (आदेशावस्थेत) अनेकाल्त्व नष्ट होत नाही. ('परस्मैपदाना णलतुम्' ३·४·८२ या सूत्राने लिट् लकारात 'तिप्' व 'मिप्' प्रत्ययाचे जागी 'णल्' आदेश होणे सांगितले आहे. हे आदेशविधायकसूत्र प्रत्ययाधिकारात पठित आहे व प्रत्ययाधिकार अष्टाध्यायीच्या तिसऱ्या अध्यायाच्या आरंभापासून सुरू होत असून पञ्चमाध्यायाच्या अखेरपर्यंत तो चालू आहे. त्या अधिकारात 'परस्मैपदाना णलतुम्' हे सूत्र पठित असल्यामुळे, प्रत्ययाचे जागी होणाऱ्या आदेशाला देखील प्रत्ययसंज्ञा होतेच अशी कोणी शंका घेतल्यास, त्या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात

कीं, जरी आदेशविधायकसूत्रें प्रत्ययाधिकारांत पठित आहेत तरी, उपदेशावस्थेंत–उच्चारणकालीं–त्यांना प्रत्ययसंज्ञा होत नसून, जेव्हां ते आदेश प्रत्ययाचे जागीं होतात तेव्हांच त्यांना स्थानिवद्भावानें प्रत्ययसंज्ञा होते आणि तशी संज्ञा त्यांना प्राप्त झाल्यावरच 'चुटू' सू. १८९ या सूत्रान्वयें 'णल्' यांतील आद्य णकार इत्संज्ञक ठरून 'तस्य लोपः' सू. ६२ या सूत्रानें त्या णकाराचा लोप होतो. उदाहरणार्थः–'पच्' धातूचें लिट् लकाराचें प्रथम पुरुषाचें एकवचन करतेवेळीं 'पच् + तिप् = पपच् + तिप्' अशा स्थितींत 'परस्मैपदानां णलतुस्' या सूत्रानें 'तिप्' प्रत्ययाचे जागीं 'णल्' आदेश करतेवेळीं, त्याला प्रत्ययसंज्ञा नसून आदेशसंज्ञा आहे व त्यामुळें प्रत्ययाला लाग पडणारें 'चुटू' हें सूत्र त्या आदेशाला लागू पडत नाहीं. म्हणून उच्चारणकालीं–उपदेशावस्थेंत–'णल्' एकाल् आहे असें मुळींच मानतां येत नाहीं व उपदेशावस्थेंत त्याचें अनेकाल्त्व नष्ट होत नाहीं. तो अनेकाल् असल्यामुळें, 'अनेकाल्शित्सर्वस्य' या सूत्रान्वयें तो संपूर्ण 'तिप्' प्रत्ययाचे जागीं होतो. तो आदेश 'तिप्' प्रत्ययाचे जागीं झाल्यावरच त्याला स्थानिवद्भावानें प्रत्ययसंज्ञा होते आणि ती संज्ञा त्याला प्राप्त झाल्यानंतरच त्यांतील आद्य णकार 'चुटू' या सूत्रानें इत्संज्ञक ठरून व त्या णकाराचा लोप होऊन 'णल्' चें 'अ' असें, लक्ष्याचे ठिकाणीं संस्कार करतेवेळीं, एकाल् रूप होतें. पण प्रत्ययसंज्ञा झाल्यानंतर जरी असें त्याचें एकाल् रूप होतें तरी त्यामुळें उपदेशावस्थेंत असणाऱ्या त्याच्या अनेकाल्त्वाचा बाध होत नाहीं आणि म्हणूनच तो आदेश संपूर्ण प्रत्ययाचे जागीं होतो असें शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे.) 'प्रवर्तते एव' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचें व्याख्यान 'आदेः परस्य' या सूत्राचें व्याख्यान करतेवेळीं शब्दरत्नांत पूर्वी केलेंच आहे. (सारांश 'आदेः परस्य' या सूत्राचें जरी 'अनेकाल्शित्सर्वस्य' हें बाधक सूत्र आहे तरी तें सूत्र 'तस्मादित्युत्तरस्य' या सूत्राचें बाधक नसल्यामुळें,

'अष्टाभ्य औश्' व 'अतो भिस ऐस्' या सूत्रांत 'तस्मादित्युत्तरस्य' ही परिभाषा प्रवृत्त होतेच असें जें दीक्षितांनीं म्हटलें आहे तें अगदीं योग्य आहे.)

मनोरमा—परनित्येति। परान्नित्यं यथा—तुदति, रुणद्धि। परमपि लघूपधगुणं बाधित्वा शश्नमौ। तथा रन्धेर्णिच् रन्धयति। परामप्युपधावृद्धिं बाधित्वा "रधिजभोः" इति नुम्। न च सोऽपि शब्दान्तरप्राप्त्याऽनित्य इति वाच्यम्, कृताकृतप्रसङ्गमात्रेणापि क्वचिन्नित्यताऽभ्युपगमात्। अन्तरङ्गं यथा—'उभये देवमनुष्याः'। इह "प्रथमचरम" इति परमपि विकल्पं बाधित्वा "सर्वादीनि" इति सर्वनामसञ्ज्ञा, विभक्तिनिरपेक्षत्वेनान्तरङ्गत्वात्। अपवादोऽपि यद्यन्यत्र चरितार्थस्तर्ह्यन्तरङ्गेण बाध्यत एव। तद्यथा—'अयजे इन्द्रम्' 'ग्रामे इह' 'सर्वे इत्यम्' अत्रान्तरङ्गेण गुणेन सवर्णदीर्घो बाध्यते। स च यद्यपि यण्गुणयोरपवादस्तथाऽपि समानाश्रये चरितार्थः। तथा च वार्तिकम्—"इण्डशीनामाद्गुणः सवर्णदीर्घत्वात्" इति॥

असिद्धमिति। तेन 'पचावेदम्' इत्यादावेत ऐत्वं न।

अकृतव्यूहा इति। यद्यपि "कृतमपि कार्यं निवर्तयन्ति" इति परिभाषान्तरं पठ्यते, फलं च तुल्यम्, तथाऽपि 'अकृत' इत्येव लघु, 'प्रक्षालनाद्धि पङ्कस्य दूरादस्पर्शनं वरम्' इति न्यायादिति भावः। न कुर्वन्तीति। यथा 'निपेदुषीम्' इत्यादौ वसोरिटमन्तरङ्गत्वात्प्राप्तमपि भाविना संप्रसारणेन वलादित्वं नङ्क्ष्यतीत्यालोच्य न कुर्वन्तीत्यर्थः॥

('म्वग्निनाधिकारः' सू. ८६ या सूत्रावरील कौमुदींत दीक्षितांनीं 'परनित्यान्तरङ्गापवादानामुत्तरोत्तरं बलीयः' प. ३८, 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' प. ५०, 'अकृतव्यूहाः पाणिनीयाः' प. ५६, या तीन परिभाषा पठित केल्या आहेत व ते आतां प्रथम परिभाषेचें

व्याख्यान करितात.) पर सूत्रापेक्षां नित्यकार्याचें विधान करणारें सूत्र बलवत्तर असतें याचीं 'तुदति, रुणद्धि' हीं उदाहरणें आहेत. या दोन्ही उदाहरणांत परसूत्रानें होणाऱ्या लघूपधगुणाचा बाध करून 'श' व 'श्नम्' हीं विकरणें प्रथम होतात. ('तुद्+ति' किंवा 'रुध्+ति' या स्थितींत 'पुगन्तलघूपधस्य च' सू. २१८९ या सूत्रान्वयें उपधेंतील उकारास गुण होण्याची प्राप्ति आहे आणि तसेंच 'तुदादिभ्यः शः' सू. २५३४ या सूत्रानें 'तुद्' धातूला 'श' हें विकरण होण्याची आणि 'रुधादिभ्यः श्नम्' सू. २५४३ या सूत्रानें 'रुध्' धातूला 'श्नम्' हें विकरण होण्याची प्राप्ति आहे. गुणविधायक सूत्र अष्टाध्यायीच्या सप्तमाध्यायांत पठित असून विकरण होण्याचीं सूत्रें तृतीयाध्यायांत पठित आहेत, म्हणजे तीं पूर्वसूत्रें आहेत. म्हणून 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू. १७५ या सूत्रान्वयें वरील धातूंना विकरण लागण्यापूर्वी उपधेंतील उकाराचा गुण प्रथम झाला पाहिजे. पण गुण केला किंवा न केला तरी, 'तुद्+ति' किंवा 'तोद्+ति' आणि तसेंच 'रुध्+ति' किंवा 'रोध्+ति' अशा दोन्ही स्थितींत विकरण लागणारच. पण विकरण पूर्वी लावल्यास, 'तुद्+अ+ति=तुद+ति' आणि तसेंच 'रुणध्+ति' अशा स्थितींत ऱ्हस्व उकार उपधेंत राहत नसल्यामुळें, गुणाची प्राप्ति होत नाहीं. म्हणून 'कृताकृतप्रसङ्गि नित्यम्' या वचनान्वयें कृताकृतप्रसङ्गि—म्हणजे गुण पूर्वी केला किंवा मागून केला तरी दोन्ही स्थितींत अवश्य प्राप्त होणारें—विकरणकार्य नित्य ठरत असून, गुणकार्य अनित्य ठरतें; आणि गुणकार्य जरी परसूत्रानें होणारें आहे आणि विकरणविधायक सूत्रें पूर्वसूत्रें आहेत तरी, 'परान्नित्यं बलवत्' या न्यायान्वयें गुणाचा बाध होऊन विकरण प्रथम लागतें.) याचप्रमाणें 'रध्' धातूहून 'णिच्' केला असतां, 'रन्धयति' असें रूप होतें. या उदाहरणांत उपधावृद्धीचें सूत्र परसूत्र असून देखील, त्याचा बाध होऊन, 'रधिजभोरचि' सू. २३०२ या पूर्वसूत्रान्वयें

नुमागम होतो. ('रध्+णिच्' या स्थलीं 'अत उपधायाः' सू. २२८२ या सूत्रानें उपधेतील अकारास वृद्धि होण्याची प्राप्ति आहे व तसेंच अजादि प्रत्यय पुढें असल्यामुळें, 'रधिजभोरचि' या सूत्रान्वयें नुमागम होण्याची प्राप्ति आहे. नुमागमकार्य असें आहे की, उपधावृद्धि प्रथम केली किंवा न केली तरी, 'रध्+इ' किंवा 'राध्+इ' अशा दोन्ही स्थितींत नुमागम होऊं शकतो. पण नुमागम प्रथम केल्यास 'रन्ध्' अशा स्थितीत अकार उपधेंत राहत नसल्यामुळें, उपधावृद्धि-कार्य होऊं शकत नाहीं. म्हणून कृताकृतप्रसङ्गि नुमागमकार्य नित्य ठरत असून उपधावृद्धिकार्य अनित्य ठरतें आणि त्यामुळें नुमागमकार्य जरी पूर्वसूत्रानें होणारें कार्य आहे तरी, उत्तरसूत्रानें होणाऱ्या उपधावृद्धिकार्याचा बाध करून तें प्रथम होतें.) विकरण आणि नुमागम भिन्न शब्दस्वरुपास होणारे असल्यामुळें, ते देखील अनित्य आहेत असें समजूं नये; कारण क्वचित् स्थलीं 'कृताकृतप्रसङ्ग-मात्रेणापि नित्यता'—परिभाषा ४६—हा न्याय लागतो असें मानलें आहे. ('तुद्+ति' या स्थलीं गुण करण्यापूर्वी विकरण प्रथम लावल्यास, तें विकरण 'तुद्' या शब्दस्वरूपास लागतें; पण गुण प्रथम केल्यावर विकरण लावल्यास, तें विकरण 'तोद्' या भिन्न शब्दस्वरूपास लागतें. म्हणून 'शब्दान्तरस्य प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति'—परिभाषा ४३—या परिभाषान्वयें, विकरणकार्य देखील गुणकार्याप्रमाणें अनित्य ठरतें आणि या दोन्ही अनित्य कार्यांपैकीं गुणकार्य परसूत्रानें होणारें कार्य असल्यामुळें 'पूर्वापर बलवत्' या न्यायान्वयें तें प्रथम व्हावें असें शंकाकाराचें म्हणणें आहे आणि त्याचें म्हणणें बरोबर मानल्यास, 'तोदति' असें विकृत रूप होण्याची आपत्ति येते. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात की, 'क्वचित् कृताकृतप्रसङ्गमात्रेणापि नित्यता' ही परिभाषा देखील भाष्यकारांनी स्वीकारली असल्यामुळें, ती परिभाषा इष्टरूप सिद्ध होण्याकरितां प्रस्तुत स्थलीं प्रवृत्त केल्यानें विकरणकार्य नित्य ठरून तें गुणकार्याला

बाध करतें आणि तें प्रथम होऊन 'तुदति' असें इष्ट रूप सिद्ध होतें. तसेंच 'रध्+णिच्' या स्थलीं वृद्धि करण्यापूर्वी नुमागम केल्यास जरी तो अकारास होईल व वृद्धिकार्य केल्यानंतर तो केल्यास 'राध्' यांतील आकाराला होईल तरी, 'क्वचित् कृताकृतप्रसङ्गमात्रेणापि नित्यता' या न्यायान्वयें नुमागमकार्य नित्य ठरत असल्यामुळें, तें परसूत्रानें होणाऱ्या वृद्धिकार्याचा बाध करून प्रथम होतें आणि त्यामुळें 'रन्धयति' असें इष्ट रूप सिद्ध होतें. वरील न्याय नीट समजण्याकरितां परिभाषेन्दुशेखराचें मराठी भाषांतर पान १६०–६१ पाहावें.) परसूत्रानें होणाऱ्या कार्यापेक्षां अन्तरङ्गकार्य सांगणारें सूत्र बलवत्तर असतें याचें उदाहरण 'उभये देवमनुष्याः' हें आहे. या उदाहरणांत 'प्रथमचरमतयाल्प' सू. २२६ या परसूत्रान्वयें, 'जस्' प्रत्यय पुढें असतां विकल्पानें होणाऱ्या सर्वनामसंज्ञेचा बाध करून 'सर्वादीनि सर्वनामानि' सू. २१३ या पूर्वसूत्रान्वयें होणारी सर्वनामसंज्ञा होते; कारण ती संज्ञा होण्याकरितां पुढें विभक्तिप्रत्यय असण्याची अपेक्षा नसल्यामुळें, ती अन्तरङ्ग ठरते. ('उभय' हा शब्द सर्वादिगणांत पठित असल्यामुळें, 'सर्वादीनि सर्वनामानि' या सूत्रान्वयें तो नित्य सर्वनामसंज्ञक आहे. 'संख्याया अवयवे तयप्' सू. १८४३ या सूत्रान्वयें 'उभ' शब्दास 'तयप्' प्रत्यय होऊन, 'उभादुदात्तो नित्यम्' सू. १८४५ या सूत्रानें त्या 'तयप्' प्रत्ययाचे जागीं 'अयच्' असा आदेश होतो आणि तो आदेश स्थानिवद्भावानें 'तयप्' च आहे असें मानल्यास, 'उभय' हा शब्द तयप्प्रत्ययान्त ठरतो, आणि 'जस्' प्रत्यय पुढें आला असतां तयप्प्रत्ययान्त शब्दाला 'प्रथमचरमतय' या पर सूत्रान्वयें विकल्पेंकरून होणारी सर्वनामसंज्ञा त्याला विकल्पानें होण्याची प्राप्ति आहे. ही वैकल्पिक सर्वनामसंज्ञा प्राप्त होण्यास, 'जस्' प्रत्यय पुढें असणें या निमित्ताची आवश्यकता आहे. पण 'सर्वादीनि सर्वनामानि' या सूत्रान्वयें होणाऱ्या नित्य सर्वनामसंज्ञेच्या पुढें कोणतेंहि निमित्त

असण्याची आवश्यकता नाहीं. म्हणून ही विभक्तिप्रत्ययनिरपेक्ष निर्निमित्तक नित्य सर्वनामसंज्ञा, 'जस्' प्रत्ययाला मानून होणाऱ्या वैकल्पिक सर्वनामसंज्ञेच्या मानानें, अंतरङ्ग ठरते आणि जरी ही वैकल्पिक सर्वनामसंज्ञा परसूत्रानें होणारें कार्य आहे तरी, ती बहिरङ्ग असल्यामुळें, 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे'–प. ५०–या परिभाषान्वयें वैकल्पिक सर्वनामसंज्ञेचा बाध होऊन, 'उभय' या शब्दास नित्य सर्वनामसंज्ञा होते. त्यामुळें 'उभय' या शब्दापुढें 'जस्' प्रत्यय आला तरी, 'उभये, उभयाः' अशीं वैकल्पिक रूपें न होतां 'उभये' असेंच रूप होतें. 'उभय' हा शब्द तयप्प्रत्ययान्त नसून अयच्प्रत्ययान्त आहे व 'अयच्' हा स्वतंत्र प्रत्यय असून तो तयप्प्रत्ययाचे जागीं होणारा आदेश नाहीं असा देखील पक्ष आहे, आणि तो पक्ष स्वीकारल्यास, 'उभय' या शब्दास 'प्रथमचरमतय' हें सूत्र मुळींच लागू पडत नाहीं व त्यामुळें त्याला वैकल्पिक सर्वनामसंज्ञेची प्राप्तीच होत नाहीं. या विषयासंबंधानें सरलाटीकेंत असें म्हटलें आहे– "अत्र बहिरङ्गं परं नित्यं वा उभयमपि विवक्षितम् । पराद्बहिरङ्गादन्तरङ्गस्योदाहरणं 'उभये देवमनुष्याः' इति । नित्यादन्तरङ्गस्योदाहरणन्तु 'ग्रामणिनी' इति । अत्र नित्यमपि नुमं बाधित्वा अन्तरङ्गत्वाद् ह्रस्वः ।")
अपवादक सूत्र जर इतर स्थलीं चरितार्थ होत असेल तर, तें अपवादक सूत्र असून देखील, अन्तरङ्गकार्यविधायक सूत्रानें त्याचा बाध होतोच. जसें–'अयजे इन्द्रम्, ग्रामे इह, सर्व इत्थम्' या तीन्ही उदाहरणांत गुण अन्तरङ्ग असल्यामुळें, तो सवर्णदीर्घकार्याचा बाध करतो. सवर्णदीर्घकार्य जरी यण्कार्याचें व गुणकार्याचें अपवादक आहे तरी, तें सवर्णदीर्घकार्य समानाश्रयांत चरितार्थ आहे, म्हणजे ज्या स्थानीला व निमित्ताला मानून यण्कार्याची किंवा गुणकार्याची प्राप्ति आहे त्याच स्थानीला व निमित्ताला मानून जेथें सवर्णदीर्घकार्याची प्राप्ति आहे तेथें 'अकः सवर्णे दीर्घः' हें सूत्र चरितार्थ ठरतें. याच अर्थानें 'इग्यणोनामाद्गुणः सवर्णदीर्घस्यात्', म्हणजे 'इद्, ङि, धी'

हे प्रत्यय पुढें आले असतां, सवर्णदीर्घ न होतां, 'आद्गुणः' या सूत्रानें गुण होतो, हें वार्तिक पठित आहे. ('अयज + इ + इन्द्रम्' या ठिकाणीं 'अयज' यांतील अन्त्य 'अ' व त्यापुढील 'इ' हा उत्तम-पुरुषाच्या एकवचनाचा प्रत्यय यांना मानून 'आद्गुणः' सू. ६९ या सूत्रान्वयें गुणकार्याची प्राप्ति आहे. तसेंच 'इ' प्रत्यय व त्यापुढील 'इन्द्रम्' यांतील आद्य इकार यांना मानून 'अकः सवर्णे दीर्घः' सू. ८५ या सूत्रान्वयें सवर्णदीर्घकार्याची प्राप्ति आहे. या दोन कार्यांचे स्थानी व निमित्त एकच नसून भिन्न आहेत. जेथें दोन्ही कार्यांचे स्थानी व निमित्त एकच आहेत तेथें 'अकः सवर्णे दीर्घः' हें अपवादक सूत्र चरितार्थ ठरतें. जसें–'रावण + अरि' या स्थलीं 'आद्गुणः' या सूत्रानें होणाऱ्या गुणकार्याचें व तसेंच 'अकः सवर्णे दीर्घः' या सूत्रानें होणाऱ्या सवर्णदीर्घकार्याचे स्थानी व निमित्त, म्हणजे 'अ' व 'अ,' हे समान आहेत. अशा ठिकाणीं 'अकः सवर्णे दीर्घः' हें अपवादक सूत्र गुणकार्याचा बाध करतें व सवर्णदीर्घ होऊन 'रावणरिः' असें रूप न होतां, 'रावणारिः' असें रूप सिद्ध होतें. अशा रीतीनें जेथें दोन्ही कार्यांचे स्थानी व निमित्त समान आहेत तेथें हें अपवादक सूत्र चरितार्थ ठरत असल्यामुळें, ज्या उदाहरणांत वरील दोन कार्यांचे स्थानी व निमित्त भिन्न आहेत तशा ठिकाणीं अन्तरङ्ग कार्यानें, तें सूत्र अपवादकसूत्र असून देखील, बाधित होतें. 'अयज + इ + इन्द्रम्' या उदाहरणांत 'अ, इ' हे स्थानी व निमित्त गुणकार्याचे असून सवर्णदीर्घकार्याचे स्थानी व निमित्त 'इ, इ' हे भिन्न असल्यामुळें आणि गुणकार्याचें निमित्त 'इट् = इ' प्रत्यय हा समानपदांत असल्यामुळें, हें कार्य अन्तरङ्ग ठरतें, आणि सवर्णदीर्घकार्याचें निमित्त 'इन्द्रम्' या भिन्न पदांत असणारा इकार असल्यामुळें, पदद्वयाश्रित तें कार्य एकपदाश्रित गुणकार्याच्या मानानें बहिरङ्ग ठरतें व त्यामुळें अपवादरूप सवर्णदीर्घाचा बाध होऊन अन्तरङ्ग गुणकार्यच होतें. 'अयज + इ + इन्द्रम्' हें उत्तमपुरुषाच्या एकवचनाच्या 'इट्'

प्रत्ययाचें उदाहरण आहे. 'ग्राम + ङि + इह' हें सप्तमीच्या एकवचनाच्या 'ङि' प्रत्ययाचें उदाहरण आहे आणि 'सर्व + शी + इत्थम्' हें 'जसः शी' सू. २१४ या सूत्रानें होणाऱ्या 'शी' प्रत्ययाचें उदाहरण आहे. या तीन्ही उदाहरणांत गुणकार्य व सवर्णदीर्घकार्य यांचे स्थानी व निमित्त भिन्न असून पदद्वयाश्रित सवर्णदीर्घकार्याच्या मानानें एकपदाश्रित गुणकार्य अन्तरङ्ग असल्यामुळें, सवर्णदीर्घ न होतां गुणकार्यच होतें. 'विप्रतिषेधे परं कार्यम्' १·४·२ या सूत्रावरील भाष्यांत 'इण्ङशीनामाद्गुणः सवर्णदीर्घत्वात्' हें वार्तिक पठित केलें आहे व त्या वार्तिकाचा अर्थ वर दिलाच आहे. हेंच वार्तिक थोड्याशा भिन्न शब्दांत 'आद्गुणः' ६·१·८७ या सूत्रावरील भाष्यांत देखील भाष्यकारांनी पठित केले असून, 'न वा, बहिरङ्गलक्षणत्वात्,' म्हणजे असें वार्तिक असण्याची काही गरज नाही कारण त्या वार्तिकांत जे सांगितलें आहे तें बहिरङ्गत्वामुळें व 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' ही परिभाषा प्रवृत्त केल्यानें सिद्ध होतें, असें द्वितीय वार्तिक पठित करून त्या प्रथम वार्तिकाचें प्रत्याख्यान केलें आहे.) 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' ही परिभाषा असल्यामुळें, 'पचावेदम्' या स्थली एकाराचा ऐकार होत नाही. ('पचाव + इदम् = पचावेदम्' या स्थली पदद्वयनिमित्तक 'आद्गुणः' या सूत्रान्वये गुणरूप सधिकार्य झालें असल्यामुळें तें बहिरङ्ग आहे व 'एत ऐ' सू. २२५३ या सूत्रान्वये 'पचावे' यातील अन्त्य एकाराचे जागी ऐकारादेशरूप कार्य करणें हें लोट् लकाराच्या उत्तम पुरुषाला मानून होणारें केवळ वर्णनिमित्तक कार्य असल्यामुळें अन्तरङ्ग आहे. बहिरङ्ग गुणरूप कार्य झाल्यावर या ऐत्वरूप अन्तरङ्गकार्याची प्राप्ति होते आणि 'अन्तरङ्गे कर्तव्ये जातं तत्कालप्राप्तिकं च बहिरङ्गमसिद्धम्' असा 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषेचा अर्थ असल्यामुळें, वरील बहिरङ्गकार्य—म्हणजे एत्वरूप गुणकार्य—असिद्ध ठरतें आणि त्यामुळें ऐत्वरूप अन्तरङ्गकार्य करणें प्राप्त झालें असता, तें बहिरङ्गकार्य झालेंच नाही, म्हणजे एत्व झालेंच नाही,

असें मानणें भाग आहे. तसें मानल्यानें, ऐत्वाची प्राप्तीच होत नाहीं आणि त्यामुळें 'पचावेदम्' असें इष्ट रूप सिद्ध होतें. वर जी आपत्ति दाखविली आहे ती पदसंस्कारपक्षांत मुळींच उद्भवत नाहीं; वाक्य-संस्कार पक्षांत ती उद्भवते व अन्तरङ्गपरिभाषेच्या आधारानें ती आपत्ति टाळतां येते.) 'अकृतव्यूहाः पाणिनीयाः' अशी परिभाषा पठित आहे. कित्येक वैयाकरण याच अर्थाची 'कृतमपि कार्यं निवर्तयन्ति' अशी परिभाषा पठित करितात आणि ती भिन्न शब्दांत पठित केलेली परिभाषा मानल्यानें देखील जरी इष्टरूपसिद्धि होते व दोहोंचेंहि फळ सारखेंच आहे तरी, 'अकृतव्यूहाः पाणिनीयाः' या शब्दांनीं पठित केलेली परिभाषा मानण्यांत लाघव आहे; कारण चिखलानें पाय भरवून नंतर पाय धुण्यापेक्षां चिखलाला स्पर्श न करितां त्याला दुरूनच टाळणें अधिक श्रेयस्कर आहे असा न्याय आहे. (कार्य करून नंतर तें नाहीसें करणें यापेक्षां तें कार्यच न करणें यांत लाघव आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे. 'सद् + लिट' या स्थलीं 'क्वसुश्च' सू. ३०९५ या सूत्रान्वयें लिट्चे जागीं 'क्वसु = वस्' असा आदेश केल्यावर व तो आदेश स्थानिव-द्भावानें लिट्च आहे असें मानून 'लिटि धातोरनभ्यासस्य' सू. २१७७, 'हलादिः शेषः' सू. २१७९ व 'अत एकहल्मध्ये' सू. २२६० या सूत्रान्वयें कार्य केल्यावर 'सेद् + वस्' अशी स्थिति झाली असतां, 'वस्' हा वलादि आर्धधातुकप्रत्यय असल्यामुळें, 'वस्वेकाजाद् घसाम्' सू. ३०९६ या सूत्रान्वयें त्या प्रत्ययाला इडागम करून 'सेद् + इ + वस् = सेदिवस्' अशी स्थिति होते. याहून द्वितीयेच्या बहुवचनाचा 'शस् = अस्' प्रत्यय केला असतां 'सेद् + इ + वस् + अस्' या स्थितींत 'वसोः सम्प्रसारणम्' सू. ४३५ या सूत्रान्वयें 'वस्' प्रत्ययांतील वकाराला संप्रसारणकार्य प्राप्त होतें. पण तें संप्रसारणकार्य केल्यास व 'सम्प्रसारणाच्च' सू. ३३० या सूत्रान्वयें पूर्वरूप एकादेश केल्यास, 'वस्' यानें स्वरूप बदलून 'उस्' असें स्वरूप होतें आणि त्यामुळें

'वस्' प्रत्ययाचे वलादित्व नष्ट होते. 'वस्' प्रत्ययाला पूर्वी इडागम केला आहे, पण सम्प्रसारणानें त्याचे वलादित्व नष्ट झाले असल्यामुळे, 'कृतमपि कार्य निवर्तयन्ति' या न्यायान्वये पूर्वी झालेले इडागमरूप-कार्य नष्ट करावे लागते आणि तसे केले म्हणजेच, 'सेद्युषः' असे अनिष्ट रूप न होता, 'सेदुषः' असे इष्ट रूप सिद्ध होते. पण दीक्षित म्हणतात की, 'सेद्+वस्+शस्' अशा स्थितीत इडागम प्रथम करून नतर सम्प्रसारणकार्य झाल्यावर तो इडागम नाहीसा करण्यापेक्षा, सम्प्रसारणामुळें त्या इडागमाचा नाश होणार आहे हे जाणून, 'निमित्त विनाशोन्मुख दृष्ट्वा तत्प्रयुक्त कार्यंन्न कुर्वन्ति' या अर्थाच्या वाचक 'अकृतव्यूहाः' या परिभाषान्वयें इडागम प्रथम न करणे यात लाघव आहे व 'कृतमपि कार्य निवर्तयन्ति' ही भिन्न गौरवदोषयुक्त परिभाषा मानण्याची काही गरज नाही, कारण ती न मानली तरी वर सांगितल्याप्रमाणे अकृतव्यूहपरिभाषेनें इष्ट रूपाची सिद्धि करता येतेच या विषयासंबधानें परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषांतरात पान २८३–८५ येथें विस्तृत चर्चा केली आहे व ती वाचल्यास संपूर्ण विषय उत्तम रीतीने ध्यानात येईल.) उदाहरणार्थ, 'निषेदुषीम्' इत्यादि स्थळी 'क्वसु' प्रत्ययाला प्राप्त होणारे इडागमकार्य जरी अन्तरङ्ग आहे तरी, पुढें होणाऱ्या सम्प्रसारणकार्यानें 'क्वसु' प्रत्ययाचे वलादित्व नष्ट होणार आहे याचा विचार करून, इडागमकार्य शिष्ट वैयाकरण करीत नाहीत व हाच 'निमित्त विनाशोन्मुख दृष्ट्वा तत्प्रयुक्त कार्यंन्न कुर्वन्ति' याचा अर्थ आहे ('नि+सद्+वस्+ङीप्' या स्थळी केवळ 'वस्' प्रत्ययाच्या वलादित्वाला मानून होणारे इडागमरूप कार्य अन्तरङ्ग आहे व त्याच्या मानानें पुढे असणाऱ्या 'ङीप् = ई' या अजादि प्रत्ययाला मानून नंतर होणाऱ्या अङ्गाला प्राप्त होणारे सम्प्रसारणकार्य 'पूर्वनिमित्तमन्तरङ्ग परनिमित्तक बहिरङ्गम्' या न्यायान्वयें बहिरङ्ग आहे. दोन्ही कार्ये युगपत् प्राप्त आहेत. म्हणून 'असिद्ध बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषान्वयें अन्तरङ्ग

इडागम कार्य प्रथम केलें पाहिजे व नंतर बहिरङ्ग संप्रसारणकार्य केलें पाहिजे. 'सम्प्रसारणं तदाश्रयं च कार्य बलवत्'–परिभाषा १२८–या परिभाषेप्रमाणें जरी संप्रसारणकार्य बहिरङ्ग असूनहि बलवत्तर ठरतें तरी, ती परिभाषा भाष्यकारांनीं प्रत्याख्यात केली असल्यामुळें त्या परिभाषेचा आश्रय करतां येत नाहीं. म्हणून इडागमरूप अन्तरङ्ग कार्य प्रथम करून नंतरच बहिरङ्ग संप्रसारणकार्य केलें पाहिजे. पण इडागम प्रथम करून नंतर संप्रसारण केल्यास, 'वस्' प्रत्ययाचें 'उस्' असें रूपांतर होऊन त्याचें वलादित्व नष्ट होत असल्यामुळें, त्याच्या वलादित्वाला मानून जो इडागम प्रथम केला आहे तो नष्ट करावा लागणार. म्हणून इडागम प्रथम न करितां, वैयाकरण एकदम संप्रसारणकार्यच करितात. इडागम प्रथम करून नंतर संप्रसारण केल्यावर त्या इडागमाचा नाश करण्यापेक्षां, तसा इडागम पहिले-पासूनच न करणें यांत ते वैयाकरण लाघव मानतात आणि या लाघवगौरवमूलक न्यायान्वयेंच 'कृतमपि कार्य निवर्तयन्ति' अशी भिन्न परिभाषा पठित करणें उचित नाहीं असा दीक्षि-तांच्या म्हणण्याचा आशय आहे. 'निपेदुषीम्'. या स्थलीं 'उगितश्च' सू. ४५५ या सूत्रान्वयें 'ङीप्' प्रत्यय झाला आहे हें लक्षांत ठेवावें.)

शब्दरत्न––शब्दान्तरप्राप्त्येति । यद्व्यक्तिसम्बन्धितया पूर्वं प्रवृत्तिस्तद्व्यक्तिसम्बन्धितयैव पुनः प्रवृत्तौ कृताकृतप्रसङ्गित्वं प्रसिद्धमिति भावः । कृताकृतेति । व्यक्तिविशेषानाश्रयणेनेत्यर्थः । "वृध्यौत्त्वतृज्वद्भाव" इत्यस्य त्वत्र न प्राप्तिः, साहचर्येण विभक्ति-निमित्तानामेव वृध्द्यादीनां तत्र ग्रहणात्, नित्यत्वेनैव सिद्धे वाचनिकपूर्वविप्रतिषेधाऽश्रयणे फलाभावाच्चेति दिक् । अन्तरङ्ग-त्वादिति । भाष्ये त्वयच्प्रत्ययान्तरं, न तु तयबादेशः, 'उभयी' इत्यत्र ङीप्तु मात्रजिति प्रत्याहाराश्रयणेन साधितः । एवञ्चोभयशब्दे विकल्पस्य प्राप्तिरेव नेति उक्तम् । अन्तरङ्गस्य बलवत्त्वे ज्ञापकमन्यत्र

प्रपञ्चितम् । बाध्यत एवेति । निरवकाशत्वरूपस्य बलवत्त्वबीजस्याभावात् ।

तेनेति । पूर्वा तु आन्तरङ्गबहिरङ्गयोर्युगपत्प्राप्तावेवेति भावः ।

न कुर्वन्तीत्यर्थ इति । यदि तु 'सेदुषः' इत्यादौ पदावधिकेऽन्वाख्याने 'सद् वस् अस्' इति स्थिते इट्सम्प्रसारणयोः प्राप्तौ प्रतिपदविधित्वेन शीघ्रोपस्थितिकत्वात्पूर्वं सम्प्रसारणे वलादित्वाभावादिटः प्राप्तिरेव न, लक्ष्यानुरोधाच्चात्र पदावधिकमेवान्वाख्यानमिति तत्सिद्धिरित्युच्यते तदैषा परिभाषा निष्फलेति बोध्यम् । अत एव एषा भाष्ये न क्वापि व्यवहृतेत्यन्यत्र विस्तरेण निरूपितम् ।

'सोऽपि शब्दान्तरप्राप्त्याऽनित्यः' अशी जी शंका मनोरमेंत उपस्थित केली आहे ती, एखाद्या उदाहरणांत दोन सूत्रांची युगपत् प्राप्ति झाली असतां त्यापैकीं जें सूत्र प्रथम प्रवृत्त केल्यानें ज्या शब्दस्वरूपाला कार्य होतें त्याच शब्दस्वरूपाला, दुसऱ्या सूत्रानें कार्य केल्यानंतर, त्या प्रथम सूत्राच्यानें कार्य होत असेल तरच तें सूत्र नित्य समजावें, या प्रसिद्ध न्यायाच्या आधारावर केली आहे; व त्या शंकेचें निरसन करितांना 'कृताकृतप्रसङ्गमात्रेणापि क्वचिन्नित्यताऽभ्युपगमात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें, शब्दस्वरूप तेंच असलें पाहिजे याचा आश्रय करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं, असें मानून म्हटलें आहे. ('कृताकृतप्रसङ्गि नित्यम्, तद्विपरीतमनित्यम्' अशी नित्य व अनित्य शास्त्राची—सूत्रांची—व्याख्या दिली आहे व या व्याख्येचा अर्थ असा आहे कीं, एखाद्या उदाहरणांत दोन सूत्रांची युगपत् प्राप्ति झाली असतां, त्या दोन सूत्रांपैकीं ज्या सूत्राची, द्वितीय सूत्रानें प्रथम कार्य केलें किंवा न केलें तरी, अवश्य प्राप्ति होते तें नित्य सूत्र होय, व असें नित्य सूत्र जरी पूर्वसूत्र असलें तरी, परसूत्र अनित्य असल्यास, 'परान्नित्यं बलवत्'—प. ४२—या न्यायानें पूर्व नित्य सूत्र पर अनित्य सूत्राचें बाधक ठरतें. दोन्ही सूत्रें नित्य किंवा अनित्य असल्यास, 'पूर्वात्परं बलवत्' या न्यायानें परसूत्र

परत्वामुळें पूर्वसूत्राचें बाधक ठरतें. वर जी नित्यत्वाची व्याख्या दिली आहे ती देतांना भिन्न शब्दस्वरूपास कार्य होत असेल तरी तें सूत्र नित्य ठरतें किंवा त्याच शब्दस्वरूपास कार्य प्राप्त होत असेल तरच तें नित्य ठरतें याबद्दल कांहीं उल्लेख केला नाहीं. त्यामुळें दोन पक्ष उत्पन्न होतात. एक पक्ष असा कीं, एखाद्या उदाहरणांत दोन सूत्रांची युगपत् प्राप्ति झाली असतां, जें सूत्र प्रथम प्रवृत्त केल्यास ज्या शब्दस्वरूपाला कार्याची प्राप्ति होते त्याच शब्दस्वरूपास, दुसऱ्या सूत्रानें कार्य केल्यावर देखील, प्रथम सूत्र नंतर प्रवृत्त केल्यानें कार्य प्राप्त होत असेल तरच तें सूत्र नित्यसूत्र समजावें. पण जर तें सूत्र प्रथम प्रवृत्त केल्यास ज्या शब्दस्वरूपाला कार्य प्राप्त होतें त्याहून भिन्न शब्दस्वरूपाला, दुसऱ्या सूत्रानें कार्य केल्यानंतर तें सूत्र मागून प्रवृत्त केलें असतां, कार्याची प्राप्ति होत असेल तर तें सूत्र अनित्य सूत्र समजावें. या पक्षाला धरूनच 'शब्दान्तरस्य प्राप्नुवन् विधिरनित्यो भवति'—परि. ४३— ही परिभाषा पठित केली आहे व या परिभाषेचा उल्लेख 'शदेः शितः' १–३–६० या सूत्रावरील भाष्यांत केला आहे. त्या भाष्यांत 'नि + विश् + लङ' या स्थलीं प्रथम अडागम करावा किंवा प्रथम 'श' विकरण लावावें असा भाष्यकारांनीं प्रश्न केला आहे व ते म्हणतातः—'एवं तर्हीदमिह सम्प्रधार्यम्—अट् क्रियतां विकरण इति । किमत्र कर्तव्यम् ? । परत्वादडागमः । नित्या विकरणाः । कृतेऽप्यटि प्राप्नुवन्त्यकृतेऽपि प्राप्नुवन्ति । अडपि नित्यः । कृतेष्वपि विकरणेषु प्राप्नोत्यकृतेष्वपि प्राप्नोति । अनित्योऽट् । अन्यस्य कृतेषु विकरणेषु प्राप्नोत्यन्यस्याऽकृतेषु । शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति ।' या भाष्याचा थोडक्यांत असा अर्थ आहे कीं, अडागम प्रथम करावा किंवा विकरण प्रथम करावें ? 'लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः' ६.४.७१ हें अडागमाचें सूत्र परसूत्र असल्यामुळें प्रथम अडागम केला पाहिजे. पण विकरणविधायक 'तुदादिभ्यः शः' सू. ३.१.७७ हें पूर्वसूत्र आहे तरी तें सूत्र नित्यसूत्र आहे; कारण

अडागम प्रथम किंवा मागून केला तरी विकरण होणारच. पण अशा रीतीनें अडागमाचें सूत्र देखील नित्यसूत्र मानतां येतें; कारण विकरण प्रथम केलें किंवा मागून केलें तरी अडागमाची अवश्यप्राप्ति आहेच. परंतु असें आहे तरी अडागम अनित्यच ठरतो; कारण विकरण प्रथम केलें असतां ज्या शब्दस्वरूपाला अडागमाची प्राप्ति होते त्याहून भिन्न शब्दस्वरूपाला, विकरण नंतर केल्यास, अडागमाची प्राप्ति होते, म्हणजे विकरण प्रथम केल्यास 'विश्+श = विश्+अ = विश' याला अडागमाची प्राप्ति होते व विकरण नंतर केल्यास 'विश्' या भिन्न शब्दस्वरूपाला अडागमाची प्राप्ति होते, आणि 'शब्दान्तरस्य प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति' ही परिभाषा असल्यामुळें अडागम अनित्य ठरतो. आतां दुसरा पक्ष असा आहे कीं, एखाद्या उदाहरणांत दोन सूत्रांची युगपत् प्राप्ति झाल्यास, त्या दोन सूत्रांपैकीं एका सूत्रानें कार्य प्रथम केलें किंवा मागून केलें तरी दुसऱ्या सूत्रानें होणाऱ्या कार्याची अवश्यप्राप्ति होत असेल तर तें द्वितीय सूत्र नित्यसूत्र समजावें व तें द्वितीय सूत्र प्रथम प्रवृत्त केल्यास एका प्रकारच्या शब्दस्वरूपाला कार्य होत असेल व नंतर प्रवृत्त केल्यास भिन्न शब्दस्वरूपाला कार्य होत असेल तरी, त्याच्या नित्यत्वास बाध येत नाही. या द्वितीय पक्षाला धरूनच 'क्वचित् कृताकृतप्रसङ्गमात्रेणापि नित्यता'—परि. ४६—ही परिभाषा पठित केली आहे. या दोन परिभाषा परस्परविरुद्ध व अशा रीतीनें अनित्य असल्यामुळें, त्यांची इष्टानुरोधानें व्यवस्था लावावी, म्हणजे जेथें जी परिभाषा प्रवृत्त केल्यानें इष्ट रूप सिद्ध होत असेल तेथें त्या परिभाषेचा उपयोग करून इष्ट रूपाची सिद्धि करावी. उदाहरणार्थ मनोरमेंत दिलेलें 'तुदति' हें इष्ट रूप सिद्ध करतेवेळीं 'शब्दान्तरस्य प्राप्नुवन्विधिरनित्यः'—परि. ४३—या परिभाषेचा उपयोग न करितां 'क्वचित् कृताकृत'—परि. ४६—याच परिभाषेचा उपयोग केला पाहिजे. तसें न केल्यास 'तोदति' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल हें पुढें मनोरमेंत सांगितलेंच

आहे. पण 'इष्' धातूचें सन्नन्ताचें 'एषिषिषति' असें इष्ट रूप करतेवेळीं 'शब्दान्तरस्य प्राप्नुवन्'–परि. ४३–या परिभाषेचाच आश्रय करणें आवश्यक आहे. तसें न केल्यास, अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल; कारण 'इष् + सन्' या स्थलीं 'सन्यङोः' सू. २३९५ या सूत्रानें द्विर्वचन पावलें आहे व 'आर्धधातुकस्येड्वलादेः' सू. २१८४ या सूत्रानें 'सन् = स' या वलादि आर्धधातुक प्रत्ययाला इडागम पावला आहे. इडागम प्रथम न करितां द्विर्वचन प्रथम केल्यास 'अजादेर्द्वितीयस्य' सू. २१७६ या सूत्रानें 'इष् + स' यांतील 'स' या द्वितीय एकाचाला द्विर्वचनाची प्राप्ति होते, पण इडागम प्रथम केल्यास 'इष् + इ + स = इषिष' यांतील 'षिष्' या शब्दान्तराला द्विर्वचनाची प्राप्ति होते. म्हणून द्विर्वचन अनित्य ठरत असल्यामुळें, इडागम प्रथम करून नंतर द्विर्वचन करावें व तसें केल्यानें इष्ट रूपाची सिद्धि होते. सारांश वरील दोन परस्परविरुद्ध परिभाषांपैकीं जी परिभाषा इष्ट रूपाची सिद्धि करण्याकरितां उपयोगी पडत असेल तिचा आश्रय करून इष्ट रूपाची सिद्धि करावी असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'रन्वयति' या उदाहरणांत 'वृद्ध्यौत्त्वतृज्वद्भावगुणेभ्यो नुम् पूर्वविप्रतिषेधेन'–सू. ३२० वरील वार्तिक–या वार्तिकाची प्राप्तीच होत नाहीं; कारण 'सहचरितासहचरितयोः सहचरितस्यैव ग्रहणम्'–परि ११२–या साहचर्यन्यायान्वयें, विभक्ति-प्रत्ययाच्या निमित्तामुळें पावणाऱ्याच वृद्धि इत्यादि कार्याचें त्या वार्तिकांत ग्रहण केलें जातें आणि नुमागमकार्य नित्य असल्यामुळेंच ज्याअर्थी इष्ट रूपें सिद्ध होतात त्याअर्थी, पूर्वविप्रतिषेध सांगणाऱ्या वरील वार्तिकाचें ('रन्वयति' हें रूप सिद्ध करितांना) अवलंबन केल्यानें कोणतेंहि अधिक फल निष्पन्न होत नसल्यामुळें, त्या वार्तिकाचा आश्रय करण्याची कांहींच गरज नाहीं. ('वारि + ङि' या स्थलीं 'ङि' हा विभक्ति प्रत्यय पुढें असल्यामुळें त्या प्रत्ययाचे जागीं 'अच्च घेः' सू. २४७ या सूत्रानें औत्वाची प्राप्ति आहे; 'प्रियक्रोष्टु + ङि' या

स्थलीं 'शि' हा सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असल्यामुळें, 'तृज्वत्क्रोष्टुः' सू. २७४ या सूत्रानें तृज्वद्भावाची प्राप्ति आहे, आणि 'वारि + ङे' या स्थलीं 'ङे' हा विभक्तिप्रत्यय पुढें असल्यामुळें, 'घेर्ङिति' सू. २४५ या सूत्रानें गुणाची प्राप्ति आहे. वरील तीन्ही उदाहरणांत 'इकोऽचि विभक्तौ' सू. ३२० या सूत्रानें नुमागमाची देखील युगपत् प्राप्ति आहे व नुमागम जरी पूर्व सूत्रानें होणारा आहे तरी परसूत्रांनीं होणाऱ्या औत्व, तृज्वद्भाव व गुण या कार्यांचा बाध करून तो वरील वार्तिकान्वयें पूर्वविप्रतिषेधानें प्रथम होतो. या वार्तिकांत उत्तरसूत्रांनीं होणाऱ्या ज्या वृद्धि इत्यादि चार कार्यांचा प्रतिषेध होणें सांगितलें आहे त्यांपैकी वरील तीन्ही कार्यें विभक्तिप्रत्यय पुढें असतांनाच होणारी कार्यें आहेत आणि ज्याअर्थी वरील वार्तिकांत त्या कार्यांबरोबर वृद्धिकार्याचा देखील निर्देश केला आहे त्याअर्थी साहचर्यन्यायान्वयें तें वृद्धिकार्य देखील विभक्तिप्रत्यय पुढें असतांनाच होणारें कार्य आहे असें मानलें पाहिजे. 'रध् णिच्' या उदाहरणांत पावलेलें वृद्धिकार्य विभक्तिप्रत्ययाच्या निमित्तानें होणारें कार्य नसून 'णिच्' प्रत्ययाच्या निमित्तानें होणारें कार्य असल्यामुळें, या स्थलीं वरील वार्तिक लागू पडत नाहीं. इतर रीतीनें पावलेलें वृद्धिकार्य देखील वरील वार्तिकांत पठित असलेल्या 'वृद्धि' या शब्दानें गृहीत केलें जाऊं शकतें असें मानलें तरी, नुमागमकार्य नित्य असल्यामुळें, म्हणजे उत्तरसूत्रानें होणारें कार्य प्रथम केलें किंवा मागून केलें तरी नुमागमाची अवश्य प्राप्ति असल्यामुळें व अशा रीतीनें नुमागमकार्य कृताकृतप्रसङ्गि असून 'कृताकृतप्रसङ्गि नित्यम्' या वचनान्वयें तें कार्य नित्य ठरत असल्यामुळें, 'परान्नित्यं बलवत्' या न्यायान्वयें त्याच्या नित्यत्वामुळेंच त्याची प्रथम प्रवृत्ति होऊन इष्ट रूपाची सिद्धि होते व पूर्वविप्रतिषेधानें विधान करणाऱ्या वरील वार्तिकाची प्रवृत्ति केल्यानें कोणतेंहि अधिक विशिष्ट रूप निष्पन्न होत नसल्यामुळें, त्या वार्तिकाचा प्रकृत स्थलीं आश्रय करण्याची कांहींच गरज नाहीं असा

शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'सर्वादीनि सर्वनामानि' सू. २१३ या सूत्रानें सर्वनामसंज्ञा होण्याकरितां विभक्तिप्रत्यय पुढें असणें या निमित्ताची गरज नसल्यामुळें ती अन्तरङ्ग आहे असें मनोरमेंत म्हटलें आहे. पण भाष्यांत 'अयच्' हा स्वतंत्र वेगळा प्रत्यय मानला आहे व 'तयप्' प्रत्ययाचे जागीं होणारा तो आदेश नव्हे असें म्हटलें आहे. 'उभयी' या स्थलीं जो 'ङीप्' प्रत्यय झाला आहे त्याची 'मात्रच्' असा स्वतंत्र प्रत्याहार साधून सिद्धि केली आहे, आणि अशा रीतीनें 'उभय' या शब्दाचे ठिकाणीं 'जस्' प्रत्यय पुढें असतांना विकल्पेंकरून सर्वनामसंज्ञा होण्याची प्राप्तीच नाहीं असें भाष्यकारांनी म्हटलें आहे. ('स्थानिवदादेशः' १.१.५६ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतातः–'अयच् प्रत्ययान्तरम् । यदि प्रत्ययान्तरम्, उभयीति ईकारो न प्राप्नोति । मा भूदेवम् । मात्रच् इत्येवं भविष्यति । कथम् ? । मात्रजिति नेदं प्रत्ययग्रहणम् । किं तर्हि ? । प्रत्याहारग्रहणम् । क्व सन्निविष्टानां प्रत्याहारः ? । मात्रशब्दात् प्रभृति आ अयचश्चकारात् ॥' 'तयप्' प्रत्ययाचे जागीं 'अयच्' हा आदेश होतो असें मानल्यास, 'उभय' हा शब्द तयप्-प्रत्ययान्त ठरून त्याला 'प्रथमचरमतय' सू. २२६ या सूत्रान्वयें 'जस्' प्रत्यय पुढें असतां वैकल्पिक सर्वनामसंज्ञा प्राप्त होण्याची आपत्ति येते व 'उभये, उभयाः' अशीं वैकल्पिक अनिष्ट रूपें होण्याचा प्रसंग येतो. ही आपत्ति टाळण्याकरितां 'तस्य दोषस्तयादेश उभयप्रतिषेधः' असें वार्तिक भाष्यकारांनीं पठित केलें आहे. पण ते पुढें म्हणतात कीं, 'अयच्' हा 'तयप्'प्रत्ययाचे जागीं होणारा आदेश आहे असें न मानतां, तो स्वतंत्र वेगळा प्रत्यय आहे असें मानल्यास, वर दाखविलेली आपत्ति सहज टाळतां येते व वरील वार्तिक मानण्याची कांहीं गरज नाहीं. पण यावर अशी शंका करण्यांत येते कीं 'उभय' हा शब्द 'तयप्'प्रत्ययान्त मानल्यासच 'टिड्ढाणञ्' सू. ४७० या सूत्रान्वयें त्याला 'ङीप्'प्रत्यय होऊं

शकतो व 'उभयी' असे स्त्रीप्रत्ययान्त इष्ट रूप सिद्ध होऊं शकतें; जर तो शब्द 'अयच्' प्रत्ययान्त मानला तर, 'टिड्ढाणञ्' या सूत्रात 'अयच्' प्रत्ययाचे ग्रहण नसल्यामुळे, त्याला 'ङीप्' प्रत्यय होणार नाही व 'उभयी' असे इष्ट रूप सिद्ध होणार नाही. या शकेवर भाष्यकार असे उत्तर देतात की, 'टिड्ढाणञ्' या सूत्रांत निर्दिष्ट असलेला 'मात्रच्' हा शब्द 'मात्रच्' प्रत्ययाचा वाचक नसून प्रत्याहाराचा वाचक आहे व तो प्रत्याहार, 'प्रमाणे द्वयसच् दघ्नञ्मात्रचः' ५–२–३७ या सूत्रातील 'मात्र' हा शब्द घेऊन व 'द्वित्रिभ्यां तयस्यायच् वा' ५–२–४३ या सूत्रातील 'अयच्' यांतील अन्त्य चकाराला घेऊन साधला आहे आणि त्यामुळे 'उभय' हा शब्द 'अयच्' प्रत्ययान्त मानल्याने देखील, 'टिड्ढाणञ्' या सूत्रात 'मात्रच्' प्रत्याहाराचे ग्रहण केले असल्यामुळे व त्या प्रत्याहारात 'अयच्' समाविष्ट असल्यामुळे, 'उभय' या अयच्प्रत्ययान्त शब्दाहून 'ङीप्' प्रत्यय होण्यात काही अडचण येत नाही.) अन्तरङ्गशास्त्र बहिरङ्गशास्त्रापेक्षा बलवत्तर असते याचे ज्ञापक इतर ग्रन्थात–परिभाषेन्दुशेखरात–विस्तारपूर्वक सांगितले आहे. (पहा परिभाषेन्दुशेखराचे मराठी भाषान्तर पान २११.) 'अत्रान्तरङ्गेण गुणेन सवर्णदीर्घो बाध्यते' असे जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचें कारण हें आहे की, (अन्तरङ्गकार्य-विधायक सूत्रापेक्षा अपवादसूत्र बलवत्तर ठरण्यास, तें अपवादक सूत्र निरवकाश असलें पाहिजे व या) निरवकाशत्वरूप हेतूचा 'अकः सवर्णे दीर्घः' या अपवादक सूत्रात अभाव आहे. (एक सूत्र दुसऱ्या सूत्राचे अपवादक व बाधक केव्हांन ठरते की जेव्हां तें अपवादक सूत्र जेथें जेथें प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें त्या दुसऱ्या सूत्राची अवश्य-प्राप्ति असल्यामुळें, या अपवादक सूत्राला प्रवृत्त होण्यास कोणतेंहि उदाहरण मिळत नाहीं व त्यामुळें तें निरवकाश ठरूं पाहतें. सारांश अपवादक सूत्र अशा रीतीनें निरवकाश असेल तरच तें निरवकाशत्वा-मुळें बाधक ठरतें. पण 'अकः सवर्णे दीर्घः' हें अपवादक सूत्र निरवकाश

नसून समानाश्रयांत चरितार्थ आहे असें पूर्वी विस्तारपूर्वक चर्चा करून मनोरमेंत सांगितलेंच आहे. म्हणून निरवकाशत्वरूप बाधकबीज त्या सूत्रांत नसल्यामुळें, तें अन्तरङ्गकार्यविधायक सूत्रांचें बाधक होत नाहीं.) 'तेन पचावेदमित्यादावेत ऐत्वं न' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, ('असिद्धं बहिरङ्ग-मन्तरङ्गे' या परिभाषेचें उदाहरण तें समजावें आणि 'परनित्यान्त-रङ्गापवादानामुत्तरोत्तरं बलीयः' ही जी परिभाषा 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषेच्या लगेंच पूर्वी कौमुदींत पठित केली आहे ती) पूर्व परिभाषा जेथें अन्तरङ्ग व बहिरङ्ग कार्यांची युगपत् प्राप्ति आहे तेथेंच लागू पडते. (व 'पचावेदम्' इत्यादि स्थलीं जेथें बहिरङ्ग कार्य झाल्यानंतर अन्तरङ्गकार्याची प्राप्ति होते तेथें 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' ही परिभाषा लागू पडते असें समजावें.) 'इत्यालोच्य न कुर्वन्ति' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें 'अकृतव्यूहाः पाणिनीयाः' ही परिभाषा आवश्यक आहे असें गृहीत धरून म्हटलें आहे. पण 'सेदुषः' या सिद्ध पदाचें पदावधिक अन्वाख्यान करितांना—म्हणजे सिद्ध पदाचीं प्रकृतिप्रत्ययरूप शकलें पाडून त्या पदाची पाणिनीयसूत्रान्वयें सिद्धि करितांना—'सेद्+वस्+अस्' अशा स्थितींत इडागमकार्य व संप्रसारण कार्य युगपत् प्राप्त झालीं असतां, संप्रसारणकार्याचें सूत्र प्रतिपदविधि असल्यामुळें, त्याची शीघ्र उपस्थिति होते आणि त्यामुळें संप्रसारणकार्य प्रथम केल्यावर वलादि प्रत्यय राहत नसल्यामुळें, इडागमकार्याची प्राप्तिच होत नाहीं व इष्ट रूप सिद्ध करण्याकरितां या स्थलीं पदावधिक अन्वाख्यानपक्षाचाच स्वीकार करणे योग्य आहे व तो पक्ष स्वीकारल्यानें 'सेदुषः' हें इष्ट रूप सिद्ध होऊं शकतें असें जर म्हणणें असेल तर, त्या मता-प्रमाणें 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा अनावश्यक ठरते असें समजावें. आणि म्हणूनच भाष्यांत ही परिभाषा कोठेंहि उपयोगांत आणली नाहीं. या विषयाचें विस्तृत विवरण इतर ग्रन्थांत—परिभाषेन्दुशेखरांत—

केलें आहे. ('सेदुषः, निषेदुषीम्' इत्यादि रूपांची सिद्धि 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा मानून व तिचा उपयोग करून दीक्षितांनी केली आहे. पण शब्दरत्नकार म्हणतात की, या रूपांची सिद्धि करितांना पदावधिकअन्वाख्यानपक्षाचा आश्रय केल्यास, ही परिभाषा मानण्याची काहीच गरज नाही. 'अन्वाख्यान' या शब्दाचा अर्थ 'शब्दसंस्कार' असा आहे. हें अन्वाख्यान तीन प्रकारचें आहे–१ क्रमिक, २ पदावधिक, व ३ वाक्यावधिक. प्रकृतीला प्रत्यय लावून पाणिनीय शास्त्रान्वये ज्या ज्या कार्यांची प्राप्ति होते ती सर्व कार्यें शास्त्रीयक्रमानुसार करून रूपसिद्धि करणे याला क्रमिक अन्वाख्यान म्हणतात. सिद्ध पदाची शकले पाडून, म्हणजे प्रकृतिप्रत्ययविभाग करून, ते पद पाणिनीय शास्त्रान्वये कसे सिद्ध झाले आहे हे सिद्ध करून दाखविणें याला पदावधिक अन्वाख्यान म्हणतात. वाक्यांतील प्रत्येक सिद्ध पदाचा प्रकृतिप्रत्ययविभाग करून संपूर्ण वाक्य पाणिनीय शास्त्रान्वयें कसें सिद्ध झाले आहे हे सिद्ध करून दाखविणे याला वाक्यावधिक अन्वाख्यान म्हणतात. या तीन पक्षांपैकी जो पक्ष जेथें इष्ट रूप सिद्ध करण्याकरिता उपयोगी पडत असेल तेथें त्या पक्षाचा स्वीकार करून इष्टरूपाची सिद्धि करावी. क्रमिक पक्षच प्रत्येक रूपाची सिद्धि करिताना स्वीकारला पाहिजे असा मुळीच आग्रह नाही. 'सेदुषः' किंवा 'निषेदुषीम्' हे इष्टरूप सिद्ध होण्यांत, क्रमिक अन्वाख्यानपक्ष स्वीकारल्यास अडचणी येत असल्यामुळें, या उदाहरणात पदावधिक-अन्वाख्यानपक्ष स्वीकारून त्या रूपाची सिद्धि करावी व तो पक्ष स्वीकारल्यास, 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा मानण्याची काहीच गरज नाही असें शब्दरत्नकाराचें म्हणणे आहे. 'सेदुषः' हा शब्द 'सद्' धातूस 'क्वसु = वस्' प्रत्यय लागून व त्याला द्वितीयेच्या बहुवचनाचा 'अस्' प्रत्यय लागून सिद्ध झाला आहे. म्हणून त्या सिद्ध पदाची 'सद् + वस् + अस्' अशी, प्रकृतिप्रत्ययविभाग केल्यानें, शकले पडतात. या तीन शकलांतील 'सद्' या प्रथम शकलाने, पाणिनीय सूत्रें प्रवृत्त

केल्यानें पूर्वी सांगितल्याप्रमाणें, 'सेद्' असें रूपान्तर होतें व हें रूपान्तर सिद्धवत् मानून शब्दरत्नकारांनीं 'सेदुषः' या सिद्धपदाचीं 'सेद्+वस्+अस्' अशीं तीन शकलें पाडलीं आहेत. अशा स्थितींत 'वसोःसम्प्रसारणम्' सू. ४३५ या सूत्रान्वयें 'वस्' प्रत्ययाला म्हणजे त्या प्रत्ययांतील वकाराला, संप्रसारण होणें व तसेंच 'वस्वेकाजात्' सू. ३०९६ या सूत्रान्वयें 'वस्' प्रत्ययाला इडागम होणें या दोन कार्यांची युगपत् प्राप्ति होते. या दोन सूत्रांपैकीं 'वसोः सम्प्रसारणम्' या सूत्रांत 'वस्' प्रत्ययाचा उच्चार करून त्याला संप्रसारण होणें सांगितलें असल्यामुळें तो प्रतिपदविधि ठरतो व अशा प्रतिपदविधींत शब्दाचा उच्चार करून त्याला कार्य होणें सांगितलें असल्यामुळें, तसें सूत्र, इतर सूत्रांचें स्मरण होण्यापूर्वी, चटकन् ध्यानांत येतें. म्हणून शीघ्रोपस्थितिक प्रतिपदविधि इतर विलम्बोपस्थितिक विधायकसूत्रांच्या मानानें बलवत्तर मानला आहे आणि त्यामुळें तशा सूत्रानें सांगितलेलें कार्य प्रथम होतें. म्हणून 'सेद्+वस्+अस्' या उदाहरणांत 'वस्' प्रत्ययाला, म्हणजे त्या प्रत्ययांतील वकाराला, प्रतिपदोक्त संप्रसारणकार्य प्रथम केल्यास व 'सम्प्रसारणाच्च' सू. ३३० या सूत्रान्वयें पूर्वरूप एकादेश केल्यास, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, 'वस्' याचें 'उस्' असें रूपान्तर होतें आणि अशा रीतीनें त्याचें वलादित्व नष्ट होत असल्यामुळें इडागमकार्याची प्राप्तीच होत नाहीं. येथें 'उस्' हा 'वस्' च आहे असें स्थानिवद्भावानें मानतां येत नाहीं; कारण वलादित्वाला, म्हणजे वल्प्रत्याहारांतील अल्रूपवर्णाला, मानून इडागम करणें हा अल्विधि आहे व 'स्थानिवदादेशः' सू. ४९ या सूत्रांत 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें तसा अल्विधि करतेवेळीं स्थानिवद्भाव मानतां येत नाहीं. आतां 'वस्वेकाजात्' सू. ३०९६ या सूत्रांत देखील 'वस्' प्रत्ययाचें उच्चारण करून त्या प्रत्ययाला इडागम करणें हा देखील प्रतिपदविधि ठरतो व तें सूत्र परसूत्र असल्यामुळें तें सूत्र प्रथम प्रवृत्त केलें पाहिजे व तें परसूत्र प्रथम प्रवृत्त केल्यास इडागम

होणारच व त्या इडागमाचे निवारण करण्याकरिता 'अकृतव्यूहाः पाणिनीयाः'—परि. ५६—ही परिभाषा असणे आवश्यक आहे अशी कोणी शंका केल्यास, त्या शंकेवर हे उत्तर आहे की, 'वस्वेकाजात्' सू. ३०९६ हे सूत्र प्रवृत्त होण्याकरिता द्विर्वचनाची व एकाच्त्वाची अपेक्षा असल्यामुळे व 'वसोः सम्प्रसारणम्' सू. ४३५ हे सूत्र प्रवृत्त होण्याकरिता तशा प्रकारची अपेक्षा नसल्यामुळें 'वसोः सम्प्रसारणम्' हा प्रतिपदविधि अधिक बलवान् ठरतो आणि म्हणून ते सूत्र प्रथम प्रवृत्त होऊन वकाराचे संप्रसारण झाल्यावर वलादि प्रत्यय राहत नसल्यामुळे इडागमाची प्राप्तीच होत नाही आणि 'सेदुष' हे इष्टरूप आपोआपच सिद्ध होते. सारांश पदावधिक अन्वाख्यानपक्षात 'अकृतव्यूहाः पाणिनीयाः' ही परिभाषा न मानता देखील 'सेदुषः, निषेदुषीम्' इत्यादि रूपें सिद्ध होण्यात कोणतीहि अडचण येत नसल्यामुळें, ती परिभाषा मानण्याची काहीच गरज राहत नाही, आणि ज्याअर्थी भाष्यकारांनी त्या परिभाषेचा कोठेंहि उल्लेख किंवा उपयोग केला नाही त्याअर्थी ती अप्रमाण परिभाषा न मानणे हेच उचित आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. वरील मनोरमेंत ज्या परिभाषांची चर्चा केली आहे त्या सर्व परिभाषांचे विस्तृत विवरण परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषांतरात केले आहे व ते वाचल्यास, त्या सर्व परिभाषांच्या अर्थाचे यथार्थ ज्ञान होईल.)

॥ परिभाषाप्रकरणं समाप्तम् ॥

---

## ॥ अथ अच्सन्धिप्रकरणम् ॥

मनोरमा--"इको यणचि"। प्रत्याहारग्रहणेषु तद्वाच्यवाच्ये निरूढा लक्षणा, "दीर्घाज्जसि च" इति ज्ञापकात्, "ऌवादिभ्यः" इति निर्देशाच्च। तेनेक्शब्देन षट्षष्टिर्गृह्यते। यण्शब्देन सप्त, भाव्यमानत्वेन सवर्णाग्राहकत्वेऽपि गुणानामभेदकत्वेनानुनासिकानामपि यवलानां ग्रहणात्। अतो नास्ति यथासङ्ख्यम्। न च लक्ष्यार्थबोधात्पूर्वभाविनं शक्यार्थबोधमादाय यथासङ्ख्यमस्त्विति वाच्यम्, एवमपि तृतीयचतुर्थाभ्याम् ऋकारऌकाराभ्यां प्रत्येकं त्रिंशदुपस्थितौ ऌवर्णानां रेफादेशस्य, ऋवर्णानां, लादेशस्य च प्रसङ्गात्। तस्मादिह "स्थानेऽन्तरतमः" सूत्रेणेष्टसिद्धिरित्यभिप्रेत्याह--स्थानत आन्तर्यादिति ॥

('इको यणचि' सू. ४७ इत्यादि सूत्रांत 'इक्, यण्, अच्' इत्यादि ज्या प्रत्याहारांचें ग्रहण केलें आहे त्या) प्रत्याहारांनीं जे वर्ण वाच्य आहेत त्या वर्णांनीं वाच्य असलेल्या वर्णांचें निरूढलक्षणेनें ग्रहण होतें. (दीक्षितांच्या म्हणण्याचा अर्थ नीट ध्यानांत येण्याकरितां आपण अक्प्रत्याहार उदाहरणरूपानें घेऊं. अक्षरसमाम्नायांत 'अ, इ, उ, ऋ, ऌ' हे ऱ्हस्व स्वर साक्षात् पठित असून त्यांचे दीर्घप्लुतादि पठित नाहींत. त्यामुळें 'आदिरन्त्येन सहेता' सू. २ या सूत्रानें अक्प्रत्याहार जो सिद्ध होतो त्या प्रत्याहारानें 'अ, इ, उ, ऋ, ऌ' या ऱ्हस्व स्वरांचेंच ग्रहण होतें व हे पांच ऱ्हस्व स्वरच अक्प्रत्याहाराचा मूळ अभिधाशक्तीनें बोधित होणारा अर्थ आहेत. पण एवढाच जर अक्प्रत्याहाराचा अर्थ होत असेल तर 'राम + अर्पण, हरि + इच्छा, भानु + उदय' इत्यादि स्थलींच 'अ, इ, उ' या ऱ्हस्व स्वरांपुढें त्यांचा अक्षरसमाम्नायांत साक्षात् पठित असलेला सवर्ण अच् आला असल्यामुळें 'अकः सवर्णे दीर्घः' सू. ८५ या सूत्रानें दीर्घ एकादेश होईल, पण 'अहल्या + आश्रम, श्री + ईश' इत्यादि स्थलीं आकारापुढें व दीर्घ ईकारापुढें त्यांना

सवर्ण दीर्घ अच् आला असून देखील, आकार व दीर्घ ईकार हे अक् व अच्प्रत्याहारांत साक्षात् पठित वर्ण नसल्यामुळें येथें दीर्घ एकादेश न होण्याची आपत्ति येईल. परंतु दीक्षितांच्या म्हणण्याप्रमाणे ती आपत्ति येत नाही; कारण अक्प्रत्याहाराने जसा 'अ, इ, उ, ऋ, ऌ' या ऱ्हस्व स्वरांचा अभिधाशक्तीने बोध होतो त्याचप्रमाणे त्या ऱ्हस्व स्वरांच्या सवर्ण अचांचा देखील निरूढलक्षणेने बोध होतो. 'लक्षणा शक्यसम्बन्धस्तात्पर्यानुपपत्तितः' अशी लक्षणा या शब्दाची कारिकावलीत व्याख्या दिली आहे. लक्षणा दोन प्रकारची असते, एक निरूढा व दुसरी प्रयोजनवती. आपणास येथें प्रयोजनवती लक्षणेसबंधानें व्याख्यान करण्याची कांही आवश्यकता नाही. रामरुद्रीत निरूढलक्षणेची 'अनादितात्पर्यविषयलक्षणा' अशी व्याख्या दिली आहे आणि रसगङगाधरात या निरूढलक्षणेची 'अनुकूल, प्रतिकूल, अनुलोम, प्रतिलोम, लावण्य' ही उदाहरणें दिली आहेत. सारांश जेथें एखाद्या शब्दाच्या अभिधाशक्तीनें बोधित होणाऱ्या अर्थाहून अगदी भिन्न प्रकारचा त्या शब्दाचा अर्थ काही तरी सादृश्यामुळें किंवा साधर्म्यामुळें अनादि काळापासून मानला गेला आहे तसा शब्द निरूढलक्षणेचें उदाहरण ठरतो. 'कुशल, मण्डप' इत्यादि शब्द देखील निरूढलक्षणेची उदाहरणें देता येतील. या सर्व शब्दांचा जो त्यांतील अवयवांनी बोधित होणारा मूळ अभिधेय–वाच्य–अर्थ आहे त्याहून अगदी भिन्न असा अर्थ त्या शब्दाचा अनादि काळापासून चालत आला असल्यामुळे, ते सर्व शब्द निरूढलक्षणेची उदाहरणे ठरतात. 'निरूढा is based on time–honoured usage without any reference to its derivative sense' असें श्री. व्ही. ए. रामस्वामीशास्त्री यानी जगन्नाथ पण्डितांच्या चरित्रात पान १८८ मध्यें म्हटले आहे. म्हणून अक्, इक् इत्यादि प्रत्याहारानी अक्षरसमाम्नायांत साक्षात् पठित असलेल्या ऱ्हस्व स्वरांचाच जरी अभिधाशक्तीनें बोध होतो तरी त्यांच्या दीर्घप्लुतादि सवर्णांचे देखील एकजातीयत्वरूप साधर्म्यामुळें लक्षणेनें ग्रहण होतें

आणि अशी ही व्यवहारांत रुढ असलेली लक्षणा पुरातन कालापासून चालत आलेली असल्यामुळें, तिला दीक्षितांनीं निरूढलक्षणा असें म्हटलें आहे. अशा रीतीनें जसा अक्प्रत्याहारानें 'अ, इ, उ, ऋ, ऌ' या ऱ्हस्व स्वरांचा अभिधाशक्तीनें बोध होतो तसाच त्यांच्या सवर्णांचा देखील निरूढ लक्षणावृत्तीनें बोध होत असल्यामुळें, अक्प्रत्याहार हा त्यांत अन्तर्भूत असलेल्या ऱ्हस्व स्वरांचा व त्यांच्या दीर्घप्लुता- दिकांचा देखील बोधक ठरतो. याचप्रमाणें इतर प्रत्याहारांसंबंधानें देखील समजावें. आतां अशी लक्षणा मानण्यास काय प्रमाण आहे हें दीक्षित पुढील पंक्तींत सांगतात.) 'दीर्घाज्जसि च' सू. २३९ हें सूत्र, वर सांगितल्याप्रमाणें निरूढलक्षणा मानली आहे याचें, ज्ञापक आहे व 'लवादिभ्यः' सू. ३०१८ हा निर्देश अशी लक्षणा करण्यास प्रमाण आहे. ('प्रथमयोः पूर्वसवर्णः' सू. १६४ या सूत्रांत 'अकः सवर्णे दीर्घः' या पूर्वसूत्रांतून 'अकः' या पदाची व 'इको यणचि' या पूर्वसूत्रांतून 'अचि' या पदाची अनुवृत्ति होते. त्यामुळें त्या सूत्राचा असा अर्थ होतो कीं, अगन्त अङ्गांतील अकापुढें प्रथमाविभक्तीचा किंवा द्वितीयाविभक्तीचा अजादि प्रत्यय आल्यास अङ्गांतील अन्त्य अक् व विभक्तिप्रत्ययांतील आद्य अच् या दोहोंचे जागीं पूर्व सवर्ण- दीर्घरूप एकादेश होतो. या सूत्राचें 'दीर्घाज्जसि च' हें निषेधक सूत्र आहे. जर अक्प्रत्याहारानें दीर्घ अकांचें ग्रहण न होतां त्या प्रत्याहारांत साक्षात् पठित असलेल्या ऱ्हस्व 'अ, इ, उ, ऋ, ऌ' या अकांचेंच ग्रहण होतें असें मानलें तर, 'दीर्घाज्जसि च' हा निषेध व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. पण तें सूत्र मुद्दाम केलें असल्यामुळें आणि 'प्राप्तस्यैव निषेधः' असा न्याय असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, अक्प्रत्याहारानें जसें ऱ्हस्व अकांचें ग्रहण होतें तसेंच दीर्घ अकांचें देखील ग्रहण होतें, व दीर्घ अकापुढें 'जस्' प्रत्यय किंवा इजादि प्रत्यय आला असतां पूर्वसवर्णदीर्घरूप एकादेश होऊं नये याकरितां तें निषेधक सूत्र मुद्दाम केलें आहे व अशा रीतीनें

प्रत्याहारानी दीर्घप्लुतादि अचाचे देखील निरुढलक्षणेनें ग्रहण होत असते याचे ते सूत्र ज्ञापक ठरते. तसेच 'लृ+आदिभ्य' या स्थली जरी दीर्घ ऊकारापुढे 'आ' हा दीर्घ अच् आला आहे तरी, 'इको यणचि' सू. ४७ या सूत्राने यणादेश करून 'ल्वादिभ्य' सू. ३०१८ असे सूत्र पाणिनीने अष्टाध्यायीत पठित केले आहे. जर इक्प्रत्याहाराने अक्षरसमाम्नायात साक्षात् पठित असलेल्या ऱ्हस्व इकाचेच ग्रहण होते व दीर्घादि इकाचे ग्रहण होत नाही आणि अक्षरसमाम्नायात आकार पठित नसल्यामुळे त्याचे अच्प्रत्याहाराने ग्रहण होत नाही असे मानले तर, वरील पाणिनीय निर्देशात जो यणादेश केला आहे तो चूक ठरण्याची आपत्ति येते पण पाणिनीनें यणादेश करून तसा निर्देश केला असल्यामुळे हे स्पष्ट होते की, प्रत्याहारानी अक्षरसमाम्नायात पठित असलेल्या ऱ्हस्व स्वराचे जसे अभिधाशक्तीनें ग्रहण होते त्याचप्रमाणे त्याच्या दीर्घप्लुतादि सवर्णांचे देखील निरुढलक्षणेने ग्रहण होते ) अशी निरुढलक्षणा मानली असल्यामुळें, 'इक्' या शब्दाने सहासष्ट वर्णांचे ग्रहण होते व 'यण्' या शब्दानें सात वर्णांचे ग्रहण होते 'यण्' भाव्यमान–पुढे होणारा आदेश–असल्यामुळे जरी तो सवर्णांचा ग्राहक होऊ शकत नाही तरी, गुणामुळें भेद होत नाही असे मानले असल्यामुळे, यण्प्रत्याहारानें अनुनासिक यँ, वँ, लँ या वर्णांचे देखील ग्रहण होते. ('अणुदित्सवर्णस्य' सू. १४ या सूत्रावरील कौमुदीत 'अ इत्यष्टादशानां संज्ञा । तथेकारोकारौ । ऋकारस्त्रिंशतः । एवं लृकारोऽपि' असे दीक्षितानी म्हटले आहे व त्या पक्तीत 'ऋकारस्त्रिंशतः । एवं लृकारोऽपि' असे जें म्हटले आहे ते 'ऋलृवर्णयोर्मिथः सावर्ण्यं वाच्यम्' या वार्तिकाच्या आधाराने म्हटले आहे पण इक्प्रत्याहाराने एकदर किती वर्णांचे ग्रहण होते हे ठरवितेवेळी त्या वार्तिकाकडे लक्ष देण्याची काही गरज नाही व तसे केले असता, जसे इक्प्रत्याहारातील 'इ' व 'उ' हे प्रत्येकी अठरा वर्णांचे ग्राहक होतात त्याचप्रमाणे इक्-

प्रत्याहारान्तर्गत ऋकार अठरा वर्णांचा ग्राहक होतो आणि संस्कृत भाषेंत दीर्घ लृकार नसल्यामुळें लृकार बारा वर्णांचा ग्राहक होतो व अशा रीतीनें इकांची संख्या १८+१८+१८+१२ = सहासष्ट ठरते. 'इको यणचि' या सूत्रांत यणादेश होण्याचें विधान केलें असल्यामुळें, 'यण्' हा भाव्यमान–विधीयमान–ठरतो आणि 'भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं न'–परि. १९–अशी परिभाषा असल्यामुळें व 'यण्' हा वरील सूत्रांत निरनुनासिकरूपानें पठित असल्यामुळें जरी 'यवला: अनुनासिका:' या वचनान्वयें 'य्, व्, ल्' हे वर्ण अनुनासिक देखील आहेत तरी तो 'यण्' तशा अनुनासिक सवर्णांचा ग्राहक होऊं शकत नाहीं असें कोणी म्हटल्यास त्यावर दीक्षित असें उत्तर देतात कीं, गुणामुळें भेद होत नाहीं या अर्थाची 'अभेदका गुणा:'–परि. ११८–ही परिभाषा असल्यामुळें, अनुनासिकरूप गुणानें भेद होत नाहीं आणि म्हणून यण्प्रत्याहारान्तर्गत 'य्, व्, ल्' या वर्णांनीं जसें त्या निरनुनासिक वर्णांचें ग्रहण होतें तसेंच सानुनासिक 'यँ्, वँ्, लँ्,' या वर्णांचें देखील ग्रहण होतें आणि अशा रीतीनें हे सहा वर्ण व रकार मिळून एकंदर सात यण् ठरतात.) म्हणून 'इको यणचि' या सूत्रांत ('यथासङ्ख्यमनुदेश: समानाम्' सू. १२८ हा) यथासंख्यन्याय लागू पडत नाहीं. (तो न्याय अशाच ठिकाणीं लागू पडतो कीं, जेथें उद्देश्य व निमित्त, किंवा उद्देश्य व विधेय, यांची संख्या समान आहे. 'इको यणचि' या सूत्रांत इक् उद्देश्य असून यण् विधेय आहे. उद्देश्याची संख्या वर सांगितल्याप्रमाणें सहासष्ट असून विधेयाची संख्या सात आहे आणि अशा रीतीनें उद्देश्य व विधेय या दोहोंची संख्या समान नसल्यामुळें येथें यथासंख्यन्याय लागू पडत नाहीं.) लाक्षणिक अर्थाचा बोध होण्यापूर्वी जो अभिधाशक्तीनें ज्ञात होणाऱ्या अर्थाचा बोध होत असतो त्या अभिधेय अर्थाचा आश्रय केल्यानें (प्रकृत सूत्रानें चारच इक् व यण् बोधित होत असल्यामुळें) येथें यथासंख्यन्याय लागू पडतो असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण असें

जरी मानले तरी, इक्प्रत्याहारातील तृतीय व चतुर्थ वर्ण ऋकार व ऌकार या प्रत्येक वर्णानें तीस वर्णांची उपस्थिति झाली असता, ऋकाराचे जागी लकारादेश व ऌकाराचे जागी रकारादेश होण्याची आपत्ति येईल. म्हणून प्रकृत सूत्रात 'स्थानेऽन्तरतमः' सू. ३९ हे सूत्र प्रवृत्त करूनच इष्ट रूपाची सिद्धि करता येते आणि हा आशय मनात धरूनच प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'स्थानत आन्तर्यादीकारस्य यकार.' असे म्हटले आहे. ('ऋऌवर्णयोमिथ. सावर्ण्यं वाच्यम्' या वार्तिकान्वये ऋकार व ऌकार हे सवर्ण होतात व 'अणुदित्सवर्णस्य' सू. १४ या ग्रहणकशास्त्रान्वये ऋकार व ऌकार हे परस्पराचे ग्राहक होतात. त्यामुळें इक्प्रत्याहारातील ऋकारानें अठरा प्रकारच्या ऋकाराचे व बारा प्रकारच्या ऌकाराचे अशा एकदर तीस वर्णांचे ग्रहण होते व येथे यथासंख्यन्याय लावल्यास, या तीसहि वर्णांचे जागी, म्हणजे जसा अठरा प्रकारच्या ऋकाराचे जागी तसाच बारा प्रकारच्या ऌकाराचे जागी देखील, रकारादेश होण्याची आपत्ति येईल. तसेच ऌकारानें वरील तीस वर्णांचे ग्रहण होत असल्यामुळे या सर्व तीसहि वर्णांचे जागी लकारादेश होण्याची आपत्ति येईल, म्हणजे जसा तो लकारादेश बारा प्रकारच्या ऌवर्णांचे जागी होईल तसाच तो अठरा प्रकारच्या ऋवर्णांचे जागी देखील होण्याची आपत्ति येईल. ही आपत्ति टाळण्याकरिता प्रकृत सूत्रात यथासंख्यन्यायाचा उपयोग न करिता 'स्थानेऽन्तरतम.' या सूत्राचाच उपयोग करणे इष्ट आहे व तसे केल्यानें ऋकार व रकार यांचे मूर्धन्यस्थान असून ऌकार व लकार यांचे दन्तस्थान असल्यामुळें व अशा रीतीनें ऋकार व लकार आणि तसेंच ऌकार रकार यांच्यात स्थानसाम्य नसल्यामुळें, ऋकाराचे जागी लकारादेश व ऌकाराचे जागी रकारादेश होण्याची आपत्ति टळते )

शब्दरत्न—ननु व्यक्तिपक्षे इषदोपस्याप्योकारादिभिर्दीर्घादिग्रहणं न स्यात्, "उच्चारित एव शब्दः प्रत्यायको नानुच्चारितः"

इति 'अणुदित्' सूत्रे भाष्योक्तेः। न चोच्चारितस्यैव प्रत्यायकत्वे रहसि पुस्तकमीक्षमाणस्य बोधानापत्तिरिति वाच्यम्, तत्रापि पुस्तकद्रष्टुः स्वीयसूक्ष्मोच्चारणसत्त्वादित्यत आह–प्रत्याहारग्रहणेष्विति। एतेन दीर्घेकारादेर्ग्राहकशास्त्रबलेन इकारादिभिर्बोधेऽपि तेषामेकपदवृत्त्याऽनुपस्थितत्वेन तदुत्तरप्रत्ययार्थानन्वयापत्तिरित्यपास्तम्, वृत्तिप्रयोज्योपस्थितिसत्त्वेनादोषाच्च। ननु "अणुदित्" सूत्रं व्यर्थम्, न च प्रत्याहाराणामाद्यवर्णेषु चरितार्थम्, अन्यसवर्णानामिव तत्सवर्णानामपि लक्षणयैव ग्रहणसिद्धेः। न च "अस्य च्वौ" इत्यादौ चारितार्थ्यम्, व्यक्तिपक्षेऽस्य प्रत्याहारसूत्रस्यतो भेदनाण्त्वाभावादिति स्पष्टम् "अणुदित्" सूत्रे भाष्ये इति, चेन्न, लक्ष्यताऽवच्छेदकज्ञानार्थमेव तच्चारितार्थ्यात्। प्रत्याहारेत्युपलक्षणम्, तद्वाच्यवाच्येति च, "अस्य च्वौ" इत्यादावपि स्वसदृशवाच्येषु लक्षणाऽवश्यकत्वात्।

येथें अशी शंका करण्यांत येते कीं, व्यक्तिपक्ष मानल्यास, म्हणजे शब्द हा जातीचा वाचक नसून व्यक्तीचा वाचक आहे असें मानल्यास, इक्प्रत्याहारानें ज्या इ, उ, ऋ, लृ या चार ऱ्हस्व स्वरांचा बोध होतो त्या चार वर्णांपैकीं उ, ऋ, लृ या तीन वर्णांनीं त्यांच्या दीर्घादि वर्णांचें ग्रहण होऊं शकणार नाहीं कारण 'अणुदित्' १.१.६९ या सूत्रावरील भाष्यांत असें म्हटलें आहे कीं, उच्चारित शब्दच अर्थाचा बोधक होत असून अनुच्चारित शब्द अर्थाचा बोधक होत नाहीं. यावर कोणी अशी शंका करील कीं, ज्या शब्दाचा उच्चार केला जातो त्यानेंच अर्थाचा बोध होतो असें मानल्यास, एखादा पुरुष मुकाट्यानें मनांतल्या मनांत, शब्दोच्चारण न करितां, ग्रन्थावलोकन करीत असल्यास त्याला त्या ग्रन्थाच्या अर्थाचा बोध होणें शक्य नाहीं असें मानण्याची आपत्ति येईल; पण (शंकाकार म्हणतो कीं) ही प्रतिशंका बरोबर नाहीं; कारण जरी तो पुरुष मुकाट्यानें मनांतल्या मनांत ग्रन्थावलोकन करतो तरी त्याच्या मुखांतून ग्रन्थांतील शब्दांचें सूक्ष्म रीतीनें उच्चारण होत असतेंच. (म्हणून त्याला ग्रन्थाच्या

अर्थाचा बोध होण्यात काही अडचण येत नाही. येथपर्यंत शंकाग्रन्थ आहे आणि ही शंका मनात धरूनच दीक्षितांनी) 'प्रत्याहारग्रहणेषु तद्वाच्यवाच्ये निरूढा लक्षणा' असे मनोरमेत म्हटले आहे. ('अणुदित्सवर्णस्य' १.१.६९ या सूत्रावरील भाष्यात 'तत्र प्रत्याहारग्रहणे सवर्णग्रहणमनुपदेशात्' हे वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात—'तत्र प्रत्याहारग्रहणे सवर्णानां ग्रहण न प्राप्नोति । अकः सवर्णे दीर्घः इति । किं कारणम् ? । अनुपदेशात् । यथाजातीयकाना सञ्ज्ञा कृता तथाजातीयकाना सम्प्रत्यायिका स्यात् । ह्रस्वाना च क्रियते ह्रस्वानामेव सम्प्रत्यायिका स्याद्दीर्घाणा न स्यात् । ननु च ह्रस्वाः प्रतीयमाना दीर्घान्सम्प्रत्याययिष्यन्ति ।... ह्रस्वसम्प्रत्ययादिति चेदुच्चार्यमाणः शब्दः सम्प्रत्यायको भवति न सम्प्रतीयमानः । तद्यथा । ऋगित्युक्ते सपाठमात्र गम्यते नास्या अर्थो गम्यते ।' या भाष्याचा अर्थ असा आहे की, जेथे प्रत्याहाराचे ग्रहण केले असेल तेथे सवर्णाचे ग्रहण होणार नाही. उदाहरणार्थ 'अकः सवर्णे दीर्घः' या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या अक्प्रत्याहाराने दीर्घप्लुतादिकाचे ग्रहण होणार नाही, कारण अक्षरसमाम्नायात दीर्घप्लुतादिकाचा उपदेश केला नाही. 'अक्' ही संज्ञा ज्या प्रकारच्या वर्णांना केली आहे त्या प्रकारचेच वर्ण अक्प्रत्याहाराने बोधित होतील. ती संज्ञा ह्रस्वानाच केली असल्यामुळे त्या संज्ञेने ह्रस्वाचाच बोध होईल व दीर्घादिकाचा बोध होणार नाही. 'अक्' या प्रत्याहाराने जरी ह्रस्वाचाच बोध होतो तरी ते ह्रस्व 'अणुदित्' या ग्रहणकशास्त्रान्वये दीर्घादिकाचा बोध करून देतील असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही, कारण उच्चारलेला शब्दच आपल्या अर्थाचा बोधक होतो. तसा उच्चारलेल्या शब्दापासून प्रतीत झालेले शब्द साक्षात् उच्चारलेले नसल्यामुळे, ते दीर्घप्लुतादिकाचा बोध करून देण्यास समर्थ होऊ शकत नाहीत. उदाहरणार्थ 'ऋक्' हा शब्द उच्चारला असता केवळ ऋचेचा बोध होत असून त्या ऋचेच्या

अर्थाचा बोध होत नाहीं. त्या भाष्यांत पुढें भाष्यकार असें म्हणतात कीं, पाणिनीय सूत्रांत 'अस्य च्वौ' सू. २११८ 'यस्येति च' सू. ३११ इत्यादि स्थलीं 'अ, इ' इत्यादि वर्णांचा स्वतंत्ररूपानें निर्देश केला असल्यामुळें ते वर्ण आपल्या सवर्णाचें ग्रहण करूं शकणार नाहींत; कारण ते 'अण्' नव्हत. अशा प्रकारचा दोष व्यक्तिपक्ष मानल्यास येत असल्यामुळें, भाष्यकारांनीं जातिपक्ष मानून 'अणुदित्सवर्णस्य' या सूत्रांतील 'अण्' या पदाचें प्रत्याख्यान केलें आहे. परंतु आचार्य पाणिनी व्यक्तिपक्षाचे पुरस्कर्ते आहेत व म्हणूनच त्यांनीं 'अणुदित्सवर्णस्य' असें ग्रहणकशास्त्र केलें आहे. म्हणून त्या व्यक्तिपक्षावर भाष्यांत जो दोष दिला आहे व ज्याच्या आधारावर शब्दरत्नांत केलेली वरील शंका उपस्थित केली आहे त्या दोषाचें निवारण करण्याकरितां दीक्षितांनीं 'प्रत्याहारग्रहणेषु तद्वाच्यवाच्ये निरूढा लक्षणा' असें मनोरमेंत म्हटलें आहे. शब्दरत्नांत शंकाकारानें जी शंका उपस्थित केली आहे तिचा भावार्थ हा आहे कीं, 'इको यणचि' या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या इक्प्रत्याहारानें जरी इ, उ, ऋ, ऌ या चार ऱ्हस्व स्वरांचा संज्ञिरूपानें बोध होतो तरी, त्या प्रत्याहारांत 'इ' या एकट्याच वर्णाचें साक्षात् उच्चारण केलें असल्यामुळें इकार हाच 'अणुदित्' या ग्रहणकशास्त्रान्वयें आपल्या सवर्णाचा, म्हणजे अठराहि प्रकारच्या इकाराचा, ग्राहक होईल. पण इक् शब्दाचे अर्थ-संज्ञी-म्हणून उपस्थित झालेले 'उ, ऋ, ऌ' हे वर्ण साक्षात् उच्चारलेले नसल्यामुळें, ते वर्ण केवळ ऱ्हस्व 'उ, ऋ, ऌ' यांचेच बोधक होतील व आपल्या सवर्णाचे-दीर्घादिकांचे-ग्राहक होऊं शकणार नाहींत; आणि ही शंका यथार्थ आहे हें सिद्ध करण्याकरितां शंकाकारानें वरील भाष्याचा आधार दिला आहे, व या शंकेचें निवारण करण्याकरितांच दीक्षितांनीं वर सांगितल्याप्रमाणें 'तद्वाच्यवाच्ये निरूढा लक्षणा' असें म्हटलें आहे. दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, जरी ऱ्हस्व 'इ, उ, ऋ ऌ' हे चारच वर्ण इक्प्रत्याहाराचे वाच्य-

अभिधेय–अर्थ आहेत तरी निरूढलक्षणेनें ते दीर्घप्लुतादिकांचे ग्राहक होतात व अशी निरूढलक्षणा मानल्याने शकाकाराने केलेल्या शकेचें निवारण होऊ शकते.) इकारादि वर्णांनी जरी 'अणुदित्सवर्णस्य' या ग्रहणकशास्त्रान्वये दीर्घप्लुतादि इकारादिकाचा बोध होतो तरी, 'इक्' पदाच्या अभिधावृत्तीने ते दीर्घप्लुतादि इकारादिक उपस्थित होत नसल्यामुळे, त्या दीर्घप्लुतादि इकारादिकाचा 'इको यणचि' या सूत्रात 'इक्' या प्रत्याहारापुढे असलेल्या षष्ठीविभक्तीच्या 'ङस्' प्रत्ययात अन्वय न होण्याची आपत्ति येते असे जे कित्येक वैयाकरणांचे म्हणणे आहे ते निरूढ लक्षणावृत्ति मानली असल्यामुळे, चूक ठरते. दुसरे असे की, (दीक्षितानी जी निरूढलक्षणा मानली आहे ती न मानली तरी) 'इक्' शब्दाच्या अभिधावृत्तीनेच प्रयोज्यरूपाने दीर्घ-प्लुतादिक इकारादिकाची उपस्थिति होत असल्यामुळे, वर जो दोष दाखविला आहे तो दोष मुळीच येत नाही. ('प्रकृतिप्रत्ययौ सहार्थं ब्रूतः, प्रत्ययाना प्रकृत्यर्थान्वितस्यार्थबोधकत्वम्' असा न्याय असल्यामुळें, प्रकृत सूत्रातील 'इक् + ङस् = इकः' या षष्ठ्यन्त पदाने, इक् या प्रकृतीचा जो अभिधेय अर्थ आहे व 'ङस्' प्रत्ययाचा जो षष्ठ्यर्थ आहे त्या दोहोंचा मिळून, बोध होऊ शकतो. 'इक्' या प्रकृतीचा अक्षर-समाम्नायात साक्षात् पठित असलेले ऱ्हस्व 'इ, उ, ऋ, ऌ' हे स्वर, एवढाच अभिधेय अर्थ आहे, ते ऱ्हस्व स्वर व त्याशिवाय त्याचे दीर्घ-प्लुतादिक सवर्ण असा अर्थ नाही. म्हणून प्रकृत सूत्रातील 'इकः' या प्रकृतिप्रत्ययविशिष्ट षष्ठ्यन्त पदाचा 'ऱ्हस्व इ, उ, ऋ, ऌ याचे जागी' एवढाच अर्थ होऊ शकतो. त्यामुळें प्रकृत सूत्रान्वये दीर्घप्लुतादिक इकारादिकाचे जागी यणादेश न होण्याची आपत्ति येते' अशी कित्येक वैयाकरणानी शका उपस्थित केली आहे. या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, प्रत्याहाराचे ठिकाणी निरूढ लक्षणावृत्ति मानली असल्यामुळें, जशी 'इक्' या शब्दाच्या अभिधावृत्तीनें ऱ्हस्व 'इ, उ, ऋ, ऌ' यांची उपस्थिति होते त्याचप्रमाणे निरूढ लक्षणा-

वृत्तीनें दीर्घप्लुतादिक इकांची देखील उपस्थिति होत असल्यामुळें त्या दीर्घप्लुतादि इकांचा 'इको यणचि' या सौत्र वाक्यांत अन्वय होण्यांत व त्यांचे जागीं देखील यणादेश होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. सारांश 'इक् + ङस् = इकः' या स्थलीं 'इक्' या प्रकृतीचा जसा अभिधावृत्तीनें ऱ्हस्व 'इ, उ, ऋ, लृ' असा अर्थ होतो तसाच त्या प्रकृतीचा निरूढ लक्षणेनें दीर्घप्लुतादि इकारादिक असा अर्थ होतो व अशा रीतीनें त्या प्रकृतीचा ऱ्हस्वदीर्घादि सर्व प्रकारचे 'इ, उ, ऋ, लृ' असा अर्थ होत असल्यामुळें, तो अर्थ व 'ङस्' या षष्ठीच्या प्रत्ययाचा स्थानरूप अर्थ हे एकत्र अन्वित झाले असतां, 'अचि परे सति, ऱ्हस्वदीर्घादेःइकःस्थाने यण् स्यात्' असा सूत्रार्थ होतो व त्यामुळें शंकाकारानें दाखविलेली आपत्ति येत नसून सर्व प्रकारच्या इकांचे जागीं यणादेश होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. हें खरें कीं, प्रत्याहारांचे ठिकाणीं युगपत् अभिधावृत्ति व लक्षणावृत्ति मानली आहे. पण तसें मानण्यांत कोणताहि शास्त्रीय प्रत्यवाय येत नाहीं व 'गङ्गायां मीनघोषौ स्तः' इत्यादि भाषेंत प्रचलित असलेल्या प्रयोगांत 'गङ्गायाम्' या स्थलीं 'गङ्गाप्रवाहे, गङ्गातीरे' अशी युगपत् दोन्ही प्रकारची वृत्ति मानली आहे. आतां 'लक्षणा शक्य-सम्बन्धस्तात्पर्यानुपपत्तितः' अशी लक्षणेची व्याख्या असल्यामुळें व त्या व्याख्येंत 'तात्पर्यानुपपत्तितः' हें पद घातलें असल्यामुळें आणि प्रत्याहारांचा शक्यार्थ स्वीकारल्यानें देखील सूत्रार्थबोध होऊं शकत असल्यामुळें प्रत्याहारांचे ठिकाणीं लक्षणा मानतां येत नाहीं असें कोणी म्हटल्यास, शब्दरत्नकार असें म्हणतात कीं, प्रत्याहारांचे ठिकाणीं निरूढ लक्षणावृत्ति न मानतां केवळ अभिधावृत्ति मानली तरी काम भागू शकतें; कारण 'इक्' या प्रकृतीच्या अभिधाशक्तीनें जसा ऱ्हस्व इकारादिकांचा साक्षात् बोध होतो तसाच जन्यजन्यत्वरूप प्रयोज्यतेनें परंपरेनें दीर्घप्लुतादि इकांचा देखील बोध होतो. 'इक्' या प्रकृतीच्या अभिधाशक्तीनें बोधित होणारे ऱ्हस्व 'इ, उ, ऋ, लृ'

हे साक्षात् जन्य असून, त्या वर्णांनीं बोधित होणारे दीर्घप्लुतादि इक् जन्यजन्य होत. अशा रीतीनें 'इक्' शब्दाच्या अभिधावृत्तीच्या जन्यजन्यत्वरूप सामर्थ्यानेच ऱ्हस्व व दीर्घादि इकांची अनुक्रमें साक्षात् व परंपरेने उपस्थिति होत असल्यामुळे, जसा ऱ्हस्व इकांचे जागी प्रकृत सूत्राने यणादेश होतो तसाच दीर्घादि इकांचे जागी देखील त्या सूत्राने यणादेश होण्यात काही अडचण येत नाहीं आणि म्हणून शंकाकारानें उपस्थित केलेली वरील शंका निरर्थक ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. पुन्हा शंकाकार अशी शंका करतो की, निरूढ) लक्षणावृत्ति मानल्यानेच सर्व काम भागू शकते असे मानले तर, 'अणुदित्सवर्णस्य' हें ग्रहणकशास्त्र (व्यक्ति-पक्षात देखील) व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. प्रत्याहारातील आद्य वर्णाचे ठिकाणी ते सूत्र, म्हणजे 'अणुदित्' सूत्र, चरितार्थ होते हे म्हणणे बरोबर नाही; कारण प्रत्याहारांतील इतर वर्णांनी जसे लक्षणेने त्याच्या सवर्णांचे ग्रहण होऊं शकते तसेच त्यांतील आद्य वर्णानें देखील त्याच्या सवर्णाचे लक्षणेने ग्रहण होऊ शकते; 'अस्य च्वौ' सू. २११८ इत्यादि सूत्राचे ठिकाणी 'अणुदित्' सूत्र चरितार्थ ठरते हे म्हणणे देखील बरोबर नाही, कारण व्यक्तिपक्ष मानल्यास 'अस्य च्वौ' इत्यादि सूत्रात निर्दिष्ट असलेला अकार अण्प्रत्याहारा-तील अकाराहून भिन्न असल्यामुळे, त्याला 'अण्' ही संज्ञा लागूच पडत नाही व त्यामुळे तो 'अणुदित्' या सूत्राचा विषयच होऊं शकत नाही असे त्या सूत्रावरील भाष्यात स्पष्ट म्हटले आहे. (या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की) हे वरील म्हणणे बरोबर नाही; कारण ज्या अर्थामध्यें लक्षणा करणे आहे त्या अर्थाने ज्ञान होण्या-करिता 'अणुदित्सवर्णस्य' हे सूत्र चरितार्थ ठरते. ('पदाना याच्या व्यक्तिः' हा व्यक्तिपक्ष असून 'जातावेव पदाना शक्तिः' हा जातिपक्ष होय. व्यक्तिपक्षांत शब्दाने एकच व्यक्तीचा बोध होतो, म्हणजे 'घटः' हा शब्द उच्चारला असता केवळ एकच घटव्यक्तीचा बोध होतो. पण

जातिपक्षांत तसें होत नसून, शब्द उच्चारला असतां त्या शब्दानें जातीचा बोध होतो, म्हणजे 'घट' हा शब्द उच्चारला असतां त्यानें घटजातीचा बोध होतो. असा या दोन पक्षांत भेद असल्यामुळें व जाति-पक्षांत अकारादि सर्व वर्ण आपल्या सर्व सवर्णांचे एकजातीयत्वरूप समान धर्मानें ग्राहक किंवा बोधक होत असल्यामुळें, त्या पक्षांत 'अणुदित्सवर्णस्य' या सूत्रांत अण्ग्रहण असण्याची कांहींच गरज राहत नाहीं. पण व्यक्तिपक्षांत प्रत्येक वर्णानें एकच व्यक्तीचा बोध होत असल्या-मुळें, तशा वर्णानें सवर्णांचें ग्रहण व्हावें याकरितां 'अणुदित्सवर्णस्य' हें सूत्र म्हणजे या सूत्रांतील अण्ग्रहण, चरितार्थ ठरतें. पण व्यक्तिपक्ष मानून प्रत्याहारांचे ठिकाणीं दीक्षितांनीं म्हटल्याप्रमाणें निरूढ लक्षणा मानल्यास, तें सूत्र म्हणजे त्या सूत्रांत केलेलें अण् या पदाचें ग्रहण, व्यक्तिपक्षांत देखील व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते; कारण त्या पक्षांत देखील लक्षणा मानल्यानें सवर्णांचें ग्रहण होऊं शकत असल्यामुळें तें सूत्र, म्हणजे त्यांत अण्ग्रहण, असण्याची कांहींच गरज राहत नाहीं व अशा रीतीनें पाणिनीनें 'अणुदित्' हें सूत्र व्यर्थ केलें आहे असें म्हणण्याचा प्रसङ्ग येतो अशी शंकाकाराची शंका आहे. या शंकेवर अशी प्रतिशंका करण्यांत येते कीं, 'अणुदित्' या सूत्रावरील भाष्यांत 'उच्चार्यमाणः शब्दः सम्प्रत्यायको भवति, न सम्प्रतीयमानः' असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे व त्यामुळें प्रत्याहारांत आद्य वर्णच साक्षात् उच्चारलेला असल्यामुळें तोच आपल्या अर्थाचा बोधक होऊं शकतो व त्या प्रत्या-हारांतील इतर वर्ण साक्षात् उच्चारलेले नसल्यामुळें आपल्या अर्थाचे बोधक होऊं शकत नाहींत. म्हणून प्रत्याहारांतील जो आद्य वर्ण आपल्या अर्थाचा, वर सांगितल्याप्रमाणें, बोधक होतो त्या वर्णानें सवर्णांचें ग्रहण व्हावें याकरितां 'अणुदित्सवर्णस्य' हें सूत्र चरितार्थ ठरतें. या प्रतिशंकेवर शंकाकार असें उत्तर देतो कीं, व्यक्तिपक्षांत दीक्षितांनी निरूढ लक्षणा मानली असल्यामुळें प्रत्याहारानें संज्ञिरूपानें बोधित होणारे वर्ण जसे लक्षणेनें आपल्या सवर्णांचे ग्राहक होऊं

शकतात तसाच त्या प्रत्याहारांतील साक्षात् उच्चारित आद्य वर्ण देखील आपल्या सवर्णाचा लक्षणेनें ग्राहक होऊं शकतो आणि त्यामुळें 'अणुदित्' हें सूत्र, लक्षणा मानल्यानें, व्यक्तिपक्षांत देखील व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. आतां 'अस्य च्वौ' सू. २११८, 'एरच्' सू. ३२३१, 'ओः सुपि' सू. २८१ इत्यादि सूत्रांत पठित असलेल्या 'अ, इ, उ' इत्यादि प्रत्याहारघटित वर्ण नसल्यामुळें तशा वर्णांनी त्यांच्या सवर्णांचें ग्रहण व्हावें याकरितां 'अणुदित्' हें सूत्र चरितार्थ ठरतें असें कोणीं म्हटल्यास, त्यावर शंकाकार असें उत्तर देतो कीं, 'अस्य च्वौ' इत्यादि वर दिलेल्या सूत्रांत 'अ, इ, उ' इत्यादि वर्ण प्रत्याहाररूपानें पठित न करितां स्वतंत्र रीतीनें पठित केले असल्या-मुळें, ते आक्षरसमाम्नायिक वर्ण आहेत असें मुळीच मानतां येत नाही. 'अण्, अक्, अच्' असा अनुबन्धसहित प्रत्याहार उच्चारला असतांच त्या प्रत्याहारानें बोधित होणारे वर्ण आक्षरसमाम्नायिक वर्ण मानतां येतात. म्हणून तशा स्वतंत्र रीतीनें पठित केलेल्या 'अ, इ, उ' इत्यादि वर्णांचें 'अणुदित्' या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या अण्प्रत्या-हारानें ग्रहण होऊं शकत नाही आणि त्यामुळें तशा स्वतंत्र वर्णांनीं त्यांच्या सवर्णांचें ग्रहण व्हावें याकरितां 'अणुदित्' हें सूत्र चरितार्थ ठरतें हें म्हणणें बरोबर ठरत नाहीं. 'अणुदित्' १.१.६९ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात–'तस्यानुवृत्तिनिर्देशे सवर्णानां ग्रहणं न प्राप्नोति । अस्य च्वौ, यस्येति च । किं कारणम् ? । अनण्त्वात् । न ह्येतेऽणो येऽनुवृत्तिनिर्देशे । के तर्हि ? । येऽक्षरसमा-म्नाय उपदिश्यन्ते । एवं तर्हि अनण्त्वादनुवृत्तौ न, अनुपदेशाच्च प्रत्याहारे न ।' या भाष्यांतील 'अनुवृत्तिनिर्देश' या शब्दाचा 'वृत्ति वर्णसमाम्नायमनुगतः तत्सदृशः अनुवृत्तिः अकारादिः, तस्य निर्देशः स्वरूपेणोच्चारणम्' असा कैयटानें अर्थ केला आहे व वरील भाष्याचा थोडक्यात भावार्थ असा आहे कीं, 'अस्य च्वौ' इत्यादि सूत्रांत स्वतंत्ररूपानें उच्चारलेले 'अ, इ, उ' वगैरे वर्ण अण् नव्हेत. प्रत्या-

हाराचें ग्रहण केलें असतां त्या प्रत्याहारानें बोधित होणारे वर्णच अण्प्रत्याहारान्तर्गत मानतां येतात. त्यामुळें तशा स्वतंत्ररूपानें पठित केलेल्या वर्णांनी 'अणुदित्' या सूत्रान्वयें सवर्णाचें ग्रहण होऊं शकत नाहीं आणि तसेंच प्रत्याहारांत साक्षात् न उच्चारलेल्या वर्णांनीं देखील त्यांच्या सवर्णाचें ग्रहण होऊं शकत नाहीं व हे आणि असेच इतर दोष व्यक्तिपक्षांत उद्भवत असल्यामुळें, तो पक्ष न स्वीकारतां जातिपक्षच स्वीकारणें उचित आहे असा भाष्यकारांच्या म्हणण्याचा आशय आहे आणि हेंच तें भाष्य होय कीं, ज्याचा शंकाकारानें 'इति स्पष्टमणुदित्सूत्रे भाष्ये' या शब्दरत्नांतील पंक्तींत आपल्या शंकेच्या समर्थनार्थ उल्लेख केला आहे. आतां या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, लक्षणावृत्ति मानल्यानें 'अणुदित्' हें सूत्र व्यक्तिपक्षांत व्यर्थ ठरत नाहीं; कारण कोणत्या अर्थामध्यें लक्षणा करावी याचें ज्ञान होण्याकरितां तें सूत्र आवश्यक आहे. तें सूत्र नसल्यास अण्प्रत्याहारांतील वर्णाचे ठिकाणीं कोणत्या प्रकारच्या अर्थाची लक्षणा करावी हें कळणें शक्य नाहीं. 'गङ्गायां घोषः' या स्थलीं वाक्यार्थ नीट जुळण्याकरितां व त्या वाक्यापासून अर्थबोध होण्याकरितां 'गङ्गा' या पदाची 'गङ्गातीर' या अर्थामध्यें लक्षणा करणें आवश्यक आहे. पण गङ्गातीर असा जो लक्षणेनें अर्थ करावयाचा आहे त्या अर्थाचें ज्ञान पूर्वी असल्याशिवाय तशी लक्षणा करणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें अण्प्रत्याहारांतील वर्णाचे ठिकाणीं कोणत्या प्रकारच्या अर्थाची लक्षणा करावी याचें ज्ञान पूर्वी असल्याशिवाय त्या अर्थामध्यें लक्षणा करणें शक्य नाहीं. तें ज्ञान, म्हणजे 'अण् सवर्णस्य संग्राहको भवति' हें ज्ञान, 'अणुदित्' या सूत्रानेंच होऊं शकतें आणि म्हणून तें सूत्र लक्षणा करण्याकरितां आवश्यक असल्यामुळें व्यक्तिपक्षांत तें सूत्र चरितार्थ ठरतें.) 'प्रत्याहार-ग्रहणेषु तद्वाच्यवाच्ये निरूढा लक्षणा' या मनोरमेंतील पंक्तींतील 'प्रत्याहार' व 'तद्वाच्यवाच्य' हीं दोन्ही पदें उपलक्षणार्थक आहेत;

कारण 'अस्य च्वौ' इत्यादि सूत्रात स्वतन्त्ररूपानें निर्दिष्ट असलेल्या अकारादि वर्णांनी त्याच्या सदृश वर्णाचा–सवर्णाचा–देखील लक्षणेने बोध व्हावा याकरिता ती वरील दोन पदे उपलक्षणार्थक आहेत असे मानणे आवश्यक आहे. (प्रत्याहाररूपाने उच्चारलेल्या अणाचे ठिकाणीच लक्षणा करता येते असे मानल्यास, 'अस्य च्वौ, एरच्, ओ सुपि, उरण्रपरः' इत्यादि सूत्रात स्वतन्त्ररूपाने उच्चारलेल्या 'अ, इ, उ, ऋ' इत्यादि वर्णांनी त्याच्या सवर्णाचे ग्रहण होऊ शकणार नाही. म्हणून अशा दोन्ही प्रकारच्या वर्णाचे ठिकाणी लक्षणा मानणे आवश्यक आहे. प्रत्याहारान्तर्गत आक्षरसमाम्नायिक वर्ण हेच प्रत्याहाराचे वाच्य–अभिधेय–आहेत व त्याचे सवर्ण 'अणुदित्' या सूत्राच्या सामर्थ्यानें त्या प्रत्याहारान्तर्गत वर्णाचे वाच्य आहेत. पण जे अकारादिक वर्ण प्रत्याहाररूपाने सूत्रात निर्दिष्ट नसून स्वतन्त्ररूपाने निर्दिष्ट आहेत त्याचे वाच्य ते वर्णच आहेत व तशा स्वतन्त्ररूपानें निर्दिष्ट असलेल्या वर्णांना 'अणुदित्' हे सूत्र लागू पडत नसल्यामुळे व प्रत्याहाररूपाने निर्दिष्ट असलेल्या अणानाच ते सूत्र लागू पडत असल्यामुळें, तशा 'अ, इ, उ, ऋ' इत्यादि स्वतन्त्ररूपाने निर्दिष्ट असलेल्या वर्णाचे त्याचे सवर्ण वाच्य आहेत असे मानता येत नाही. पण 'मालीभवति' इत्यादि इष्ट रूपाची सिद्धि होण्याकरिता तशा वर्णांनी त्याच्या सवर्णाचे देखील लक्षणेनें ग्रहण होणे आवश्यक असल्यामुळें, 'प्रत्याहार' या शब्दाने 'अस्य च्वौ' इत्यादि सूत्रात स्वतन्त्र–अणभिन्न–रूपाने निर्दिष्ट असलेल्या अकारादिकाचें व तसेच 'तद्वाच्यवाच्य' या पदाने 'स्वसदृशवाच्य' याचे देखील ग्रहण करणे जरूर आहे. म्हणून वरील दोन्ही पदें स्वार्थमात्रपरक न मानता उपलक्षणार्थक मानणे आवश्यक आहे असा शब्दरत्नाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.)

शब्दरत्न—'अणुदित्सूत्रगृहीतलक्ष्यताऽवच्छेदकेन लक्षणा विधीयमानातिरिक्तविषये एव, "अप्रत्ययः" इत्युक्तेः । अत एव

"त्यदादीनामः" इत्यादौ न स्वसदृशवाच्येषु लक्षणा। "नाऽज्झलौ" "अणुदित्" इत्यत्र तु न लक्षणा, तद्बोधकाले लक्ष्यताऽवच्छेदकाग्रहादिति भावः। तत्र प्रमाणमाह–दीर्घादिति। अक्पदीयाकारेण स्वसवर्णग्रहणेऽपि तत्र "नाऽदिचि" इत्येव सिद्धमिति भावः। तेन = लक्षणाऽङ्गीकारेण। भाव्यमानत्वेनेति। विधीयमानविषये लक्षणाऽभावस्यानुपदमुक्तत्वादिति भावः। अभेदकत्वेनेति। शास्त्रे उच्चारितगुणानां भेदकत्वाभावेऽपि स्वरूपकृतभेदमादाय सप्तत्वसंख्या न विरुध्यते। यदि तु अणुदित्सूत्रेऽण्ग्रहणाद्यण्विषये गुणानां भेदकतैवोचितेति विभाव्यते, तदाऽपि चत्वारो यण इति यथासङ्ख्यमसङ्गतमेव। तद् ध्वनयन्नाह–अतोनास्तीति। तत्खण्डने एवाग्रहो न तु सप्तत्वसंख्यायामिति भावः। शक्यार्थबोधमादायेति। "ल्वादिभ्यः" इत्यादिनिर्देशोहिततात्पर्यानुपपत्तिग्रहस्य तत्सत्त्वे एव सम्भवेन स बोध आवश्यकः। तत्र च यथासंख्यसहायेन वाक्यार्थे निष्पन्ने "ल्वादिभ्यः" इत्यादिनिर्देशाल्लक्षणया जायमाने पुनर्वाक्यार्थबोधे लक्षितदीर्घादीनां स्ववाचकान्वयिन्येवान्वय इति भावः। स्थानेऽन्तरतमसूत्रेणैवेति। व्यक्तिपक्षे व्यक्तीनामानन्त्येन संख्याज्ञानाभावाद्यथासंख्यासम्भवाल्लक्ष्यासिद्धेश्चेति भावः।

'अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः' सू. १४ या सूत्रांत 'अप्रत्ययः' असा निषेध असल्यामुळें, अण्प्रत्याहारांतील ज्या वर्णाचें (आदेश किंवा आगम किंवा प्रत्यय या रूपानें) विधान केलें असेल तसे (व तत्सदृश स्वतंत्ररूपानें उच्चारलेले विधीयमान) वर्ण खेरीज करून इतर वर्णाचे ठिकाणींच 'अणुदित्' या सूत्राच्या आधारावर होणारी लक्षणा (त्यांच्या सवर्णाचें ग्रहण होण्याकरितां) करतां येते. असें आहे म्हणूनच, 'त्यदादीनामः' सू. २६५ इत्यादि स्थलीं (आदेशरूपानें विधीयमान असलेल्या व स्वतंत्ररूपानें निर्दिष्ट असलेल्या) अकारानें त्याच्या सदृश वर्णाचें–सवर्णाचें–लक्षणेनें ग्रहण करतां येत नाहीं. पण 'नाज्झलौ' सू. १३ व 'अणुदित्' सू. १४ या सूत्रांत

'अण्, अच्' या ज्या प्रत्याहारांचें ग्रहण केलें आहे (ते प्रत्याहार अनुवादकरूपानें—उद्देश्यरूपानें—पठित असल्यामुळें भाव्यमान नसून देखील) त्या प्रत्याहारान्तर्गत वर्णानीं त्याच्या सवर्णांचें ग्रहण लक्षणेनें करतां येत नाही; कारण त्या सूत्रांच्या अर्थाचा वोध होतेवेळी कोणत्या प्रकारच्या वर्णांचें ग्रहण करावें हें ज्ञापित करणाऱ्या 'अणुदित्' या सूत्राच्या अर्थाचा वोध झालेला नाही. (हा सिद्धान्त भाष्यकारांनी वाक्यापरिसमाप्तिन्यायाचें अवलंबन करून स्थापित केला आहे व त्या न्यायाचे विस्तृत विवेचन पूर्वी केलेंच आहे.) 'प्रत्याहारग्रहणेषु तद्वाच्यवाच्ये निरुढा लक्षणा' अशा प्रकारची लक्षणा करण्याकरितां 'दीर्घाज्जसि च' सू. २३९ हें सूत्र प्रमाण आहे असें जें दीक्षितांनी मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, अक्प्रत्याहारान्तर्गत अकारानें जरी त्याच्या सवर्णांचें ग्रहण होतें तरी, त्या ठिकाणी 'नादिचि' सू. १६५ हें निषेधक सूत्र प्रवृत्त केल्यानेंच इष्ट रूपांची सिद्धि होऊं शकते. (अक्प्रत्याहारांत अकार हा आद्यवर्णरूपानें साक्षात् उच्चारला आहे व तो आक्षरसमाम्नायिक वर्ण आहे. म्हणून 'उच्चारितः एव शब्दः प्रत्यायको भवति, नानुच्चारितः' या पूर्वी सांगितलेल्या भाष्यकारीय न्यायान्वयें तो अकार 'अणुदित्' या सूत्रान्वयें सवर्णांचा ग्राहक—वोधक—होतो. त्यामुळें जेथें सूत्रात अक्‌ला कार्य होणे सांगितले आहे तेथें अक्‌नें आकाराचें ग्रहण होत असल्यामुळें, ते कार्य आकारान्त शब्दास देखील पावते. 'अकः सवर्णे दीर्घः' या पूर्व सूत्रातून 'अकः' हे पद 'प्रथमयोः पूर्वसवर्णः' सू. १६४ या सूत्रात अनुवृत्त होत असल्यामुळें, त्या उत्तरसूत्रानें सांगितलेलें कार्य आकारान्त शब्दास देखील पावते. त्या सूत्राची 'नादिचि' सू. १६५ व 'दीर्घाज्जसि च' सू. २३९ हीं निषेधक सूत्रें आहेत व 'दीर्घाज्जसि च' या सूत्रात 'दीर्घात्' असा जो निर्देश केला आहे तो, आकारान्त शब्दास 'प्रथमयो.पूर्वसवर्णः' या सूत्रान्वयें जें सवर्णदीर्घरूप कार्य पावलें आहे तें न व्हावें याकरितां,

चरितार्थ ठरत असल्यामुळें, प्रत्याहारान्तर्गत ऱ्हस्व वर्णानें दीर्घाचें लक्षणेनें ग्रहण होतें याचा तो निषेध ज्ञापक मानतां येत नाहीं अशी शंकाकाराची शंका आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, 'दीर्घाज्जसि च' हें सूत्र आकारान्त शब्दांच्या विषयांत निरर्थक ठरतें; कारण तें सूत्र नसलें तरी, आकारान्त शब्दाचीं इष्ट रूपें 'नादिचि' हा निषेध प्रवृत्त केल्यानेंच सिद्ध होऊं शकतात. उदाहरणार्थ 'विश्वपा + औ' या स्थलीं, 'नादिचि' हा निषेध असल्यामुळें, पूर्वसवर्णदीर्घरूप एकादेश न होतां 'वृद्धिरेचि' सू. ७२ या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊन 'विश्वपौ' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकतेंच. त्याचप्रमाणें 'विश्वपा + जस् = विश्वपा + अस्' या स्थलीं 'प्रथमयोः पूर्वसवर्णः' हें सूत्र प्रवृत्त केलें तरी 'विश्वपाः' हें इष्ट रूप सिद्ध होऊं शकतेंच. एवढेंच नव्हें तर, अक्प्रत्याहारांत अकार खेरीज करून जे इकारादि इतर वर्ण अन्तर्भूत आहेत त्यांचा त्या प्रत्याहारांत जसा अकाराचा साक्षात् उच्चार केला आहे तसा साक्षात् उच्चार केला नसल्यामुळें, 'नानुच्चारितःशब्दःप्रत्यायको भवति' या पूर्वी सांगितलेल्या न्यायान्वयें त्या वर्णांनीं त्यांच्या दीर्घाचें ग्रहण होऊंच शकत नाहीं आणि म्हणून त्यांच्या विषयांत देखील 'दीर्घाज्जसि च' हें निषेधक सूत्र व्यर्थ ठरतें. सारांश अक्प्रत्याहारांतील कोणत्याहि वर्णाचे ठिकाणीं तें सूत्र वर सांगितल्याप्रमाणें चरितार्थ होत नसल्यामुळें, तें सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. पण कोणतेंहि पाणिनीय सूत्र किंवा त्यांतील कोणतेंहि पद व्यर्थ मानतां येत नाहीं असें भाष्यकारांनीं भाष्यांत वारंवार सांगितलें आहे. म्हणून ज्याअर्थी तें सूत्र पाणिनीनें मुद्दाम केलें आहे त्याअर्थी त्या सूत्रावरून हें ज्ञापित होतें कीं, प्रत्याहारान्तर्गत ऱ्हस्व वर्णानें त्याच्या दीर्घाचें ग्रहण होतें, आणि दीर्घ ईकारान्त व ऊकारान्त शब्दांपुढें 'जस्' किंवा इजादि विभक्तिप्रत्यय आल्यास पूर्वसवर्णदीर्घ होऊं नये याकरितां तें निषेधक सूत्र पाणिनीनें मुद्दाम केलें आहे; आणि तें सूत्र असल्यामुळेंच

'गौरी, वधू', इत्यादि शब्दांची इष्ट रूपें सिद्ध होऊ शकतात. सारांश शंकाकारानें केलेली शंका योग्य नसून प्रत्याहारान्तर्गत ऱ्हस्व वर्णांनी त्याच्या दीर्घांचे लक्षणेने ग्रहण करता येते याचे 'दीर्घाज्जसि च' हे सूत्र ज्ञापक आहे असे जें दीक्षितानी मनोरमेत म्हटले आहे तेच म्हणणे योग्य ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'तेनेक्शब्देन पट्पष्ठिर्गृह्यन्ते' या मनोरमेच्या पक्तीतील 'तेन' या पदाचा 'लक्षणाऽङ्गीकारेण', म्हणजे लक्षणेचा अङ्गिकार केला असल्यामुळे, असा अर्थ आहे. (याचे विवरण मनोरमेत केलेच आहे.) 'भाव्यमानत्वेन सवर्णाग्राहकत्वेऽपि' या मनोरमेंतील पक्तीत 'भाव्यमानत्वेन' असे जे म्हटले आहे, म्हणजे 'भाव्यमानेन सवर्णांना ग्रहण न'–परि. १९–अशी परिभाषा असल्यामुळे अण्-प्रत्याहारातील ज्या वर्णाचे आदेश, आगम किंवा प्रत्यय या रूपाने विधान केलें आहे तशा वर्णानें त्याच्या सवर्णांचें लक्षणेने ग्रहण होऊं शकत नाही असे जे म्हटले आहे, त्या विषयामवधाने नुकतेच पूर्वी, म्हणजे 'अणुदित्सूत्रगृहीतलक्ष्यताऽवच्छेदकिका लक्षणा विधीयमाना-तिरिक्तविषये एव, अप्रत्ययः इत्युक्तेः' या शब्दरत्नातील पंक्तीत, उल्लेख केलाच आहे. 'गुणानामभेदकत्वेन' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ असा आहे की, व्याकरणशास्त्रात उच्चारित गुणानें जरी भेद होत नाही तरी रूपामुळें, म्हणजे अनुनासिकत्व व निरनुनासिकत्व अशा भिन्न रूपामुळें, स्पष्टपणे दृग्गोचर होणाऱ्या भेदाचा आश्रय केल्यानें भाव्यमान यण् सात ठरतात आणि त्यामुळे दीक्षिताच्या म्हणण्यात काही विरोध येत नाही. (शब्दरत्नकारानी मनोरमेंतील 'गुणानामभेदकत्वेन' या पदाचा 'गुणानामभेदकत्वेऽपि' असा अर्थ केला आहे व त्याचे कारण हें की 'अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः' या सूत्रातील 'अप्रत्ययः' या निषेधक अंशातून निघालेली 'भाव्यमानेन सवर्णांना ग्रहण न'–परि. १९–ही परिभाषा जरी 'अणुदित्' या ग्रहणशास्त्रान्वये प्राप्त होणाऱ्या व जातिपक्षात

एकजातीयत्वामुळें प्राप्त होणाऱ्या सवर्णग्रहणाची निषेधक आहे तशीच ती गुणाभेदकत्वामुळें प्राप्त होणाऱ्या सवर्णग्रहणाची देखील निषेधक आहे. त्यामुळें 'इको यणचि' या सूत्रांत निरनुनासिकरूपानें उच्चारलेल्या भाव्यमान--विधीयमान--यणानें वास्तविक सानुनासिक यँ्, वँ्, लँ् यांचें ग्रहण करतां येत नाहीं व त्यामुळें भाव्यमान यण् चारच ठरतात. मग दीक्षितांनीं भाव्यमान यण् सात कसे मानले ? या प्रश्नाचें शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, अनुनासिकत्व व निरनुनासिकत्व या रूपामुळें स्पष्ट दिसणाऱ्या भेदाचा आश्रय करून दीक्षितांनीं तीन निरनुनासिक य्, व्, ल्, तीन सानुनासिक यँ्, वँ्, लँ् आणि केव्हांहि अनुनासिक नसणारा निरनुनासिक र् असे सात भाव्यमान यण् मानले आहेत व भावप्रकाशकारांनीं यासंबंधानें 'वास्तवतत्तद्धर्मवैशिष्ट्यादिना तत्तद्व्यक्तिभेदस्य प्रत्यक्षसिद्धस्य ब्रह्मणाऽपि दुर्निवारत्वात्' असें म्हटलें आहे. दीक्षितांचें बहुधा असें मत दिसतें कीं, भाव्यमानपरिभाषा–परि. १९–ही 'अभेदका गुणाः'–परि. ११८–या परिभाषेची बाधक नाहीं आणि म्हणूनच त्यांनीं मनोरमेंतील पंक्तींत 'गुणाभेदकत्वेऽपि' असें न म्हणतां 'गुणाभेदकत्वेन' असें म्हटलें आहे. त्यांच्या म्हणण्याचा आशय असा आहे कीं, 'इको यणचि' या सूत्रांत निरनुनासिक रूपानें उच्चारलेल्या भाव्यमान यणानें जरी भाव्यमानपरिभाषान्वयें सानुनासिक यँ्, वँ्, लँ् यांचें ग्रहण करतां येत नाहीं असें म्हणतां येऊं शकतें तरी, सानुनासिकत्व व निरनुनासिकत्व या गुणांमुळें उत्पन्न होणारा भेद व्याकरणशास्त्रांत भेद उत्पन्न करीत नाहीं या अर्थाची 'अभेदका गुणाः' ही परिभाषा असल्यामुळें, प्रकृत सूत्रांत निरनुनासिकरूपानें उच्चारलेल्या भाव्यमान यणानें सानुनासिक यँ्, वँ्, लँ् यांचें त्या परिभाषान्वयें ग्रहण करतां येतें आणि म्हणून भाव्यमान यण् सात ठरतातच.) 'अणुदित्सवर्णस्य' या सूत्रांत (अच्प्रत्याहाराचें ग्रहण न करितां) अण्प्रत्याहाराचें ग्रहण केलें असल्यामुळें यणाच्या विषयांत गुण भेदकच आहेत असें

मानणें योग्य आहे हें मत स्वीकारलें तरी, -त्या पक्षांत देखील यणांची संख्या चार ठरत असल्यामुळें, 'इको यणचि' या सूत्रास यथासंख्यन्याय मुळींच लागू पडत नाहीं. (अजुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः' असें सूत्र न करितां 'अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः' असें सूत्र पाणिनीनें मुद्दाम केलें असल्यामुळें त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, पाणिनीनें निरनुनासिक य्, व्, ल् हे सानुनासिक यँ्, वँ्, लँ्, यांहून भिन्न मानले होते आणि तशा निरनुनासिक य्, व्, ल् यांनी भिन्न सानुनासिक यँ्, वँ्, लँ् यांचें ग्रहण व्हावें याकरितांच पाणिनीनें 'अणुदित्' या सूत्रांत अच्प्रत्याहाराचें ग्रहण न करितां अण्प्रत्याहाराचें ग्रहण मुद्दाम केलें आणि म्हणून यणाच्या विषयांत निरनुनासिकत्व व सानुनासिकत्व हे गुण अभेदक ठरत नसून भेदक ठरत असल्यामुळें व 'इको यणचि' या सूत्रांत भाव्यमान यण् निरनुनासिकरूपानें उच्चारला असल्यामुळें आणि भाव्यमानपरिभाषा असल्यामुळें, तशा निरनुनासिक भाव्यमान यणानें सानुनासिक यँ्, लँ्, लँ् यांचें ग्रहण करतां येत नाहीं आणि म्हणून प्रकृत सूत्रांत भाव्यमान यण् सात न ठरतां चारच ठरतात असें शंकाकाराचें म्हणणें आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, विधेय यणाची संख्या शंकाकाराच्या म्हणण्याप्रमाणें चारच मानली तरी, उद्देश्य इकांची संख्या सहासष्ट असल्यामुळें व अशा रीतीनें देखील उद्देश्य व विधेय यांची संख्या समान होत नसल्यामुळें, प्रकृत सूत्रास यथासंख्यन्याय लागू पडत नाहीं.) आणि हेंच ध्वनित करण्याच्या हेतूनें दीक्षितानीं मनोरमेंत 'अतो नास्ति यथासंख्यम्' असें म्हटलें आहे व यणाची संख्या (चार न मानतां) सातच मानावी याबद्दल दीक्षिताचा काहीं आग्रह नसून, 'इको यणचि' या सूत्रात यथासंख्यन्याय लागू पडतो असें जें प्रक्रियाकौमुदीकारांचें म्हणणें आहे त्याचें खण्डण करणें या मुद्द्यावरच त्यांचा सर्व जोर आहे. (प्रक्रियाकौमुदींत 'इको यणचि' या सूत्राच्या लगेच पुढें 'यथासंख्यमनुदेशः समानाम्' हें सूत्र पठित केलें आहे व या द्वितीय सूत्राचे

'सुध्य् उपास्यः' असें उदाहरण दिलें आहे. या उदाहरणावरून हें स्पष्ट होतें कीं, प्रक्रियाकौमुदीकारांनीं 'इको यणचि' या सूत्रांत यथासंख्यन्याय लावला आहे व प्रसादकारांनीं आपल्या टीकेंत 'सुध्य् उपास्य इति स्थिते' हें प्रतीक घेऊन त्याचें व्याख्यान करितांना 'सुधी उपास्य इति स्थिते इको यणचि इति यणादेशे यथासंख्यम्–इति ईकारस्य यकारे कृते सुध्य् उपास्य इति स्थित इत्यर्थः' असें स्पष्ट म्हटलें आहे. सारांश प्रक्रियाकौमुदीकार व त्यांचे टीकाकार यांनीं 'इको यणचि' या सूत्रास जो यथासंख्यन्याय लावला आहे त्याचें खण्डन करण्याच्या हेतूनेंच दीक्षितांनीं 'इको यणचि' या सूत्रावरील मनोरमा लिहिली आहे. त्यांच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे कीं, विधेय यणांची संख्या चार मानली किंवा सात मानली तरी, उद्देश्य इकांची संख्या सहासष्ट असल्यामुळें, प्रकृत सूत्रांत यथासंख्यन्याय कोणत्याहि रीतीनें प्रवृत्त करतां येत नाहीं असें शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे.) 'शक्यार्थबोधमादाय यथासंख्यमस्तु' असें जें मनोरमेंतील शंकाग्रन्थांत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'इकः' या पदाच्या वाच्यार्थाचा बोध झाल्यानंतरच 'ल्वादिभ्यः' इत्यादि निर्देशांवरून अनुमित होणाऱ्या अर्थाची उपपत्ति न लागणें संभवत असल्यामुळें, तशा वाच्यार्थाचा बोध होणें आवश्यक आहे. (कारण शक्यार्थोपस्थितिमूलक लक्षणा असल्यामुळें म्हणजे शक्यार्थाचा–वाच्यार्थाचा–बोध झाल्यावरच लक्षणा करतां येणें शक्य असल्यामुळें, शक्यार्थाचा बोध झाल्याशिवाय 'ल्वादिभ्यः' इत्यादि निर्देशांत जो यणादेश केला आहे त्याची सिद्धि करण्याकरितां लक्षणा करतां येणें शक्य नाहीं.) तसा बोध झाल्यानंतर यथासंख्यसूत्राच्या सहायानें प्रकृत सूत्राचा अर्थ सिद्ध झाल्यावर 'ल्वादिभ्यः' इत्यादि निर्देशांमुळें लक्षणा करून पुन्हा त्या सूत्राच्या अर्थाचा (भिन्नप्रकारें) बोध झाला असतां, ऱ्हस्व इकांचे वाच्य असलेल्या ज्या दीर्घादि इकांचें लक्षणेनें ग्रहण होतें त्यांचा देखील, त्यांच्या वाचक ऱ्हस्व

इकासारखाच, 'इको यणचि' या वाक्यांतील यण् या विधेय पदांत यथासंख्य अन्वय होतो. ('लक्षणा शक्यसम्बन्धस्तात्पर्यानुपपत्तितः' अशी लक्षणेची व्याख्या पूर्वी सांगितलीच आहे. या व्याख्येवरून हें स्पष्ट होतें कीं, जेथें वक्त्यानें उच्चारलेल्या वाक्यांतील पदाचा शक्यार्थ—अभिधाशक्तीनें बोधित होणारा अर्थ—केला असतां, वक्त्याच्या म्हणण्याचा जो वास्तविक भावार्थ आहे त्याची उपपत्ति लागू शकत नाहीं तशा ठिकाणीं वक्त्याच्या तात्पर्याची उपपत्ति लावण्याकरितां शक्यार्थाशीं संबद्ध असलेल्या अर्थामध्यें लक्षणा करतां येते. तशी लक्षणा करण्याकरितां शक्यार्थाचें पूर्व ज्ञान असणें आवश्यक आहे; कारण तसें ज्ञान असल्याशिवाय वक्त्याच्या म्हणण्याचा जो भावार्थ आहे त्याची उपपत्ति लागू शकत नाहीं हें कसें कळूं शकणार व तसेंच ज्या अर्थामध्यें लक्षणा करणें आहे तो अर्थ शक्यार्थाशीं संबद्ध असणारा व जुळणारा अर्थ आहे याचें ज्ञान कसें होऊं शकणार ? उदाहरणार्थ 'नक्षत्रं दृष्ट्वा वाचं विसृजेत्' अशी श्रुति आहे व मौनव्रताचरण करणाऱ्या पुरुषाला—यजमानाला—उद्देशून हें वचन सांगितलें आहे. नक्षत्र पाहून मौन सोडावें असा या श्रुतीचा अक्षरार्थ—शक्यार्थ—आहे. पण आकाश अभ्राच्छादित असल्यास जेव्हां नक्षत्रदर्शन होऊं शकत नाहीं तेव्हां मौनव्रत केव्हां सोडावें असा प्रश्न उपस्थित झाला असतां, केवळ अक्षरार्थाचें ग्रहण केल्यास त्या प्रश्नाचें उत्तर श्रुति देत नाहीं असें म्हणण्याची आपत्ति येते. म्हणून श्रुतीच्या तात्पर्याकडे लक्ष देऊन 'नक्षत्र' या शब्दाचा त्याशीं संबद्ध असणारा नक्षत्रोदयकाल असा लक्षणेनें अर्थ करावा लागतो. तशा लक्षणेनें अर्थ करण्याकरितां 'नक्षत्र' या शब्दाच्या शक्यार्थाचें पूर्व ज्ञान असणें आवश्यक आहे. तसें ज्ञान असल्याशिवाय नक्षत्रोदयकाल या नक्षत्राशीं संबद्ध असणाऱ्या अर्थामध्यें लक्षणा करतां येणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें 'इको यणचि' या सूत्रांतील इक् या शब्दाचा पूर्वी सांगितल्याप्रमाणें 'ह्रस्व इ, उ, ऋ, ऌ' असा जो शक्यार्थ आहे त्या अर्थान्वयें त्या सूत्राचा

अर्थ केला असतां, ऱ्हस्व इ, उ, ऋ, ऌ यांच्या लगेंच पुढें अच् आल्यास त्यांचे जागीं यणादेश होतो असा सूत्रार्थ निष्पन्न होतो. असा अर्थ केला असतां ऱ्हस्व इकांची व तसेंच यणांची संख्या चारच ठरत असल्यामुळें व अशा रीतीनें उद्देश्य व विधेय यांची संख्या समान ठरत असल्यामुळें, यथासंख्यन्याय अशा स्थितींत लागू पडण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. पण इक् शब्दाच्या शक्यार्थाला धरून प्रकृत सूत्राचा वर सांगितल्याप्रमाणें अर्थ केल्यास, 'ल्वादिभ्यः' सू. ३०१८ या निर्देशाची उपपत्ति लावतां येणें शक्य नाहीं; कारण 'ॡ + आदिभ्यः = ल्वादिभ्यः' या स्थलीं, पाणिनीनें दीर्घ ऌकाराचे जागीं यणादेश केला आहे. या निर्देशावरून हें स्पष्ट होतें कीं, पाणिनीला 'इक्' या शब्दाचा चार ऱ्हस्व इक् एवढाच अर्थ अभिप्रेत नसून सर्व प्रकारचे इक् असा अर्थ अभिप्रेत होता. म्हणून सूत्रकार पाणिनीला अभिप्रेत असलेला अर्थ प्रकृत सूत्रांतून निष्पन्न करण्याकरितां त्या सूत्रांतील इक् या शब्दाचा केवळ शक्यार्थ न करितां त्या शब्दाच्या अर्थामध्यें दीर्घादि इकांचा अन्तर्भाव करणें आवश्यक आहे व त्या शब्दाचा लक्षणेनें अर्थ केल्याशिवाय दीर्घादिकांचा अन्तर्भाव करतां येणें शक्य नाहीं. म्हणून मनोरमेंत सांगितल्याप्रमाणें इक्-प्रत्याहाराचे जे ऱ्हस्व इ, उ, ऋ, ऌ वाच्य आहेत त्यांनीं वाच्य असलेल्या दीर्घादि इकांचें लक्षणेनें ग्रहण केलें पाहिजे. तशी लक्षणा केली असतां, शक्यार्थ करतेवेळीं जसा चार ऱ्हस्व इकांचा चार यणांमध्यें यथासंख्य अन्वय होतो तसाच चार चार दीर्घादि इकांचा चार यणांमध्यें यथासंख्य अन्वय होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं असें प्रकाशकारांनीं प्रक्रियाकौमुदीचें व्याख्यान करितांना प्रकृत सूत्रावरील आपल्या टीकेंत म्हटलें आहे व त्यांच्या म्हणण्याचा आशय असा आहे कीं, व्यक्तिपक्षांत देखील ऱ्हस्व, दीर्घ, प्लुप्त इत्यादि प्रत्येक प्रकारचे उद्देश्य इक् चार असल्यामुळें आणि विधेय यण् देखील चारच असल्यामुळें, प्रकृत सूत्राचे ठिकाणीं यथासंख्यन्याय लावण्यांत

कांहीं अडचण येत नाहीं. या प्रकाशकारांच्या म्हणण्याचाच दीक्षितांनीं मनोरमेंत शंकारूपानें उल्लेख केला आहे व त्यावर त्यानीं मनोरमेंत 'एवमपि तृतीयचतुर्थाभ्याम्…लादेशस्य च प्रसङ्गात्' असें उत्तर दिलें आहे आणि त्याचें विवरण मनोरमेंत केलेंच आहे.) 'स्थानेऽन्तरतम इति सूत्रेणैवेष्टसिद्धिः' असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, व्यक्तिपक्षांत व्यक्ति अनन्त असल्यामुळें त्यांच्या संख्येचें ज्ञान होऊं शकत नाहीं व त्यामुळें प्रकृत सूत्रास यथासंख्यन्याय लागू पडणें शक्य नसल्यामुळें इष्ट रूपांची सिद्धि होऊं शकणार नाहीं. (व्यक्तिपक्षांत वर्णव्यक्ति अनन्त आहेत. पाणिनीनें उच्चारलेल्या अकाराहून आज जो अकार आपण उच्चारतो तो भिन्न आहे व या क्षणीं आपण उच्चारलेल्या अकाराहून पुढच्या किंवा पूर्वीच्या क्षणीं उच्चारलेला अकार भिन्न आहे; कारण या पक्षांत एक वर्णव्यक्ति स्वतःचीच बोधक असून पूर्वी किंवा पुढें उच्चारलेल्या त्या वर्णाची ती बोधक किंवा ग्राहक होत नाहीं. कोटयावधि लोक दररोज अकारादि वर्णव्यक्ति कितीतरीदां उच्चारतात व प्रत्येक उच्चारलेली वर्णव्यक्ति दुसरीहून भिन्न आहे. म्हणून व्यक्तिपक्षांत उद्देश्य इकांची व विधेय यणांची अनन्त संख्या होत असल्यामुळें, दोहोंची संख्या किती आहे व ती समान आहे किंवा नाहीं हें कळणें शक्य नाहीं; कारण संख्या ज्ञात होत असल्यास व्यक्तींचें अनन्तत्व नाहीसें होईल. अशा रीतीनें उद्देश्यगत व विधेयगत संख्येचें व्यक्तिपक्षांत ज्ञान होणें शक्य नसल्यामुळें व जेथें उद्देश्याची व विधेयाची संख्या समान आहे तेथेंच यथासंख्यन्याय लागू पडत असल्यामुळें, प्रकृत सूत्राचे ठिकाणीं व्यक्तिपक्षांत यथासंख्यन्याय प्रवृत्त होऊं शकत नाहीं. त्यामुळें इकाराचे जागीं वकार व उकाराचे जागीं यकार, म्हणजे वाटेल त्या इकाचे जागीं वाटेल तो यण्, होण्याची आपत्ति येईल व इष्ट रूपें सिद्ध होणार नाहीत. ही आपत्ति टाळण्याकरितां प्रकृत सूत्रांत 'स्थानेऽन्तरतमः' या परिभाषेचा उपयोग करणें आवश्यक आहे व तसें

केल्यानेंच इष्ट रूपांची सिद्धि होऊं शकते असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे असें शब्दरत्नकार म्हणतात. येथपर्यंत शब्दरत्नांत जी चर्चा केली आहे ती व्यक्तिपक्षाला धरून केली आहे व असें सिद्ध केलें आहे कीं, व्यक्तिपक्ष स्वीकारल्यास प्रकृत सूत्रास यथासंख्यन्याय लागू पडत नसल्यामुळें, त्या सूत्रास 'स्थानेऽन्तरतमः' हेंच सूत्र लावणें योग्य आहे. आतां शब्दरत्नकार पुढील पंक्तींत असें सिद्ध करूं इच्छितात कीं, व्यक्तिपक्ष मानल्यास, भाष्यांत सांगितलेले अनेक दोष उद्भवत असल्यामुळें तो पक्ष न स्वीकारतां जातिपक्षच स्वीकारणें योग्य आहे व जातिपक्ष स्वीकारल्यास 'इको यणचि' या सूत्राला यथासंख्यन्याय लावण्यांत कांहीं अडचण येत नाहीं.)

शब्दरत्न—'परे तु व्यक्तिपक्षे झलादिप्रत्याहारसूत्रेषु सर्वझकारादीनां ग्रहणं दुरुपपादम् । न हि तत्र लक्षणा वक्तुं शक्या, लक्ष्यताऽवच्छेदकाग्रहात् । एवञ्च तत्र प्रत्याहारसूत्रेषु जातिनिर्देशेनैव निर्वाहो नान्यथा । एवं च "अइउण्" इत्यादावपि जातिनिर्देश एवोचितः, अर्द्धजरतीयस्यानौचित्यात् । अत एव "अणुदित्–" सूत्रे भाष्ये प्रत्याहारेषु, "अस्य च्वौ" इत्यादौ च उक्तामनुपपत्ति-माशङ्क्य जात्याश्रयणमेव कृतम् । यथासङ्ख्यसूत्रञ्च व्यक्तिसाम्य इव धर्मसाम्येऽपि प्रवर्तते । "स्यतासी लृलुटोः" इत्यादौ यथा । नाप्यत्र पक्षे ऋकारादौ लकाराद्यापत्तिः, लृत्वादिजातेऋकारादाव-भावात् । न च जातिपक्षे अणुदित्सूत्रेऽण्ग्रहणप्रत्याख्याने "उपसर्गादृति" इत्यादौ ऋकारेण लृकारग्रहणाय सावर्ण्यवचनस्थाने लृवर्णस्य ऋवदतिदेशाद् लृकारे रेफापत्तिरिति वाच्यम्, क्लृ३प्तशिखार्थं तस्यातिदेशस्यानित्यत्वाऽवश्यकत्वात् ।

परंतु इतर (भाष्यानुयायी) वैयाकरणांचें असें म्हणणें आहे कीं, ज्या सूत्रांत झलादि प्रत्याहारांचा निर्देश केला आहे तशा ठिकाणीं त्या प्रत्याहारांत अन्तर्गत असलेल्या झकारादि वर्णांनीं सर्व झकारादि व्यक्तींचें ग्रहण करणें व्यक्तिपक्षांत अशक्य आहे. त्या

प्रत्याहारान्तर्गत झकारादिकांचे ठिकाणीं लक्षणा करून सर्व झकारादि व्यक्तींचें ग्रहण करतां येतें असें म्हणतां येऊं शकत नाहीं; कारण प्रत्याहारान्तर्गत झकारादि वर्णांनीं कोणत्या सवर्णांचें ग्रहण करावें याचें ज्ञान होण्यास ('अणुदित्' या ग्रहणकशास्त्रासारखें) कोणतेंहि ग्रहणक शास्त्र पाणिनीय व्याकरणशास्त्रांत उपलब्ध नाहीं. म्हणून तशा झलादि प्रत्याहारांचे ठिकाणीं जातिपक्ष मानल्याशिवाय इतर कोणत्याहि रीतीनें निर्वाह लागूं शकत नाहीं. म्हणून ('सम्भवत्यैकरूप्ये वैरूप्यमन्याय्यम्' या न्यायान्वयें व 'उत्तरोत्तरं मुनीनां प्रामाण्यम्' या वचनान्वयें') 'अइउण्' इत्यादि स्थलीं देखील (भाष्यकारांनीं स्वीकारलेला) जातिपक्षच मानणें उचित आहे व अर्धजरतीयन्यायाचा आश्रय करणें योग्य नाहीं. ('अणुदित्सवर्णस्य' सू. १४ हें ग्रहणकशास्त्र असल्यामुळें अण्प्रत्याहारान्तर्गत वर्णांनीं कोणत्या वर्णांचें लक्षणेनें ग्रहण करतां येतें हें ज्ञात होऊं शकतें व त्यामुळें त्या वर्णांनीं त्यांच्या दीर्घादिकांचें लक्षणेनें ग्रहण करतां येतें. परंतु झल् इत्यादि अण्भिन्न प्रत्याहारांतील वर्णांनीं कोणत्या वर्णांचें लक्षणेनें ग्रहण करावें हें जाणण्यास 'अणुदित्' सूत्रासारखें कोणतेंहि ग्रहणकशास्त्र पाणिनीनें पठित केलें नाहीं. म्हणून झलादि प्रत्याहारांचे ठिकाणीं जातिपक्ष स्वीकारल्याशिवाय गत्यन्तर नाहीं, व झलादि प्रत्याहारांचे ठिकाणीं जातिपक्ष स्वीकारणें व अण्प्रत्याहारान्तर्गत वर्णांचे ठिकाणी व्यक्तिपक्ष स्वीकारणें व लक्षणा करणें हें अयोग्य आहे. दोन्ही ठिकाणीं एकच पक्ष स्वीकारणें योग्य आहे. म्हणून दोन्ही ठिकाणीं जातिपक्ष मानल्यानें काम भागत असल्यामुळें व व्यक्तिपक्ष मानला असतां जी लक्षणा करावी लागते ती करणें टळत असल्यामुळें, जातिपक्षच स्वीकारणें योग्य आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे व ते असें म्हणतात कीं अण्प्रत्याहारांत व्यक्तिपक्ष व झलादिप्रत्याहारांत जातिपक्ष मानणें हें अर्धजरतीयन्यायासारखें असल्यामुळें तसें करणें अनुचित आहे. 'अर्धजरतीय-

स्यानौचित्यात्' या शब्दरत्नांतील पंक्तींतील 'अर्धजरतीय' या शब्दाची व्युत्पत्ति पुढें दिल्याप्रमाणें आहे-'अर्ध जरत्याः इति अर्धजरती;' या स्थलीं 'अर्ध नपुंसकम्' सू. ७१३ या सूत्रानें तत्पुरुषसमास होऊन 'अर्ध' या शब्दाचा पूर्वनिपात झाला आहे व 'अर्धजरती इव अर्धजरतीयम्' या स्थलीं 'समासाच्च तद्विषयात्' सू. २०६१ या सूत्रानें 'अर्धजरती' या शब्दाहून 'इव' या अर्थाचा वाचक तद्धित 'छ' प्रत्यय होऊन 'अर्धजरतीयम्' हें रूप सिद्ध झालें आहे. 'मुखं न कामयन्ते, अङ्गान्तरं तु कामयन्ते जरत्याः' असें अर्धजरतीयन्यायाचें स्वरूप कैयटानें सांगितलें आहे व आनन्दगिरीनें 'अर्धजरतीयकौशलम्' या शब्दाचें व्याख्यान करितांना 'यथा चार्ध कुक्कुट्याः पाकाय अर्ध च प्रसवायेति कौशलं नोपलभ्यते' असें म्हटलें आहे. शब्दरत्नकार म्हणतात कीं अण्प्रत्याहारान्तर्गतवर्णाचे ठिकाणीं 'अणुदित्' हें ग्रहणकशास्त्र असल्यामुळें जसें व्यक्तिपक्षाचा व लक्षणेचा आश्रय करून काम भागूं शकतें त्याचप्रमाणें जातिपक्ष मानून देखील काम भागूं शकतें व तो पक्ष मानल्यानें लक्षणा करण्याची गरज राहत नाहीं. पण झलादिप्रत्याहारान्तर्गतवर्णाचे ठिकाणीं व्यक्तीपक्ष न लागू पडतां केवळ जातिपक्षच लागू पडतो. म्हणून सर्व प्रत्याहारान्तर्गत वर्णांना सारखाच लागू पडणारा जातिपक्ष मानणें उचित असून, कोंवडी कापून तिचे दोन समभाग करून एक भाग खाण्याच्या उपयोगांत आणणें व दुसरा भाग कोंवडीपासून अंडीं मिळावीं या हेतूनें राखून ठेवणें यांत जितकें औचित्य आहे तितकेंच अण्प्रत्याहाराचे ठिकाणीं व्यक्तिपक्ष व झलादिप्रत्याहारांचे ठिकाणीं जातिपक्ष मानण्यांत औचित्य आहे. म्हणून अशा अनुचित अर्धजरतीयन्यायाचा आश्रय करून अण्प्रत्याहाराचे ठिकाणीं व्यक्तिपक्ष मानण्यापेक्षां भाष्यकारांनीं सर्वत्र जो जातिपक्ष मानला आहे तोच पक्ष 'उत्तरोत्तरं मुनीनां प्रामाण्यम्' या वचनान्वयें स्वीकारणें योग्य आहे. तो पक्ष मानल्यास, इक्प्रत्याहारान्तर्गत 'इ, उ, ऋ, ऌ' या चार वर्णांनीं

त्यांच्या दीर्घप्लुतादि इकारादिकांचें एकजातीयत्वरूप साधर्म्यामुळें ग्रहण होत असल्यामुळें व तसेंच यण्प्रत्याहारान्तर्गत 'य, व्, ल्' वर्णांनीं तशा सानुनासिक वर्णांचें एकजातीयत्वामुळें ग्रहण होऊं शकत असल्यामुळें आणि अशा रीतीनें उद्देश्य इकांची व तसेंच विधेय यणांची संख्या जातिपक्षांत चारच ठरत असल्यामुळें, त्या पक्षांत 'इको यणचि' या प्रकृत सूत्राला यथासंख्यन्याय लावण्यांत कांहीं अडचण येत नाहीं व लक्षणेचा आश्रय न करितां 'सुध्युपास्यः, ल्वादिभ्यः' इत्यादि इष्ट प्रयोग सहज सिद्ध होऊं शकतात.) म्हणूनच, म्हणजे जातिपक्षाचा सर्वत्र आश्रय करणें उचित आहे हें सिद्ध करण्याच्या हेतूनेंच, 'अणुदित्' सू. १·१·६९ या सूत्रावरील भाष्यांत प्रत्याहारांच्या व तसेंच 'अस्य च्वौ' इत्यादि सूत्रांच्या विषयांत वर दर्शविलेल्या आपत्ति येतात हें दाखवून भाष्यकारांनीं जातिपक्षच स्वीकारला आहे. (त्या भाष्यांत 'तत्र प्रत्याहारग्रहणे सवर्णाग्रहणमनुपदेशात् । ह्रस्वसम्प्रत्ययादिति चेदुच्चार्यमाणसम्प्रत्यायकत्वाच्छब्दस्यावचनम् । तत्रानुवृत्तिनिर्देशे सवर्णाग्रहणमनण्त्वात्' हे तीन मुख्य दोष व्यक्तिपक्षावर दिले आहेत व त्यांचें विस्तृत व्याख्यान पूर्वीं केलेंच आहे. हे दोष अपरिहार्य आहेत असें मानून त्या भाष्यांत भाष्यकार म्हणतात– 'सवर्णेऽण्ग्रहणमपरिभाष्यम् । कुतः । आकृति ग्रहणात् । अवर्णाकृतिरुपदिष्टा सा सर्वमवर्णकुलं ग्रहीष्यति । तथेवर्णाकृतिः । तथोवर्णाकृतिः । ननु चान्याकृतिरकारस्याकारस्य च । अनन्यत्वाच्च । अनन्याकृतिरकारस्याकारस्य च । अनेकान्तो ह्यनन्यत्वकरः । यो ह्यनेकान्तेन भेदो नासावन्यत्वं करोति । तद्यथा । न यो गोश्च गोश्च भेदः सोऽन्यत्वं करोति । यस्तु खलु गोश्चाश्वस्य च भेदः सोऽन्यत्वं करोति ।...तद्वच्च हल्ग्रहणेषु । एवं च कृत्वा हल्ग्रहणेषु सिद्धं भवति । झलो झलि, अवात्ताम् अवात्त । यत्रैतन्नास्त्यण् सवर्णान् गृह्णातीति । अनेकान्तो ह्यनन्यत्वकर इत्युक्तार्थम् ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, जातिपक्ष मानल्यानें 'अणुदित्' या ग्रहणकशास्त्रांत 'अण्'

हा शब्द असण्याची गरज राहत नाहीं. 'अक्, इक्, अच्' इत्यादि प्रत्याहारांत व तसेंच 'अस्य च्वौ, एरनेकाचः, ओःसुपि, उरण्' इत्यादि सूत्रांत ज्या अकारादि वर्णांचें ग्रहण केलें आहे त्या वर्णांनीं त्यांच्या दीर्घप्लुतादिकांचें एकजातीयत्वामुळें ग्रहण होईल. ऱ्हस्व 'अ' व दीर्घ 'आ' यांचें स्वरूप जरी थोडें निराळें दिसतें तरी त्या थोड्या भेदामुळें त्यांच्या जातिमध्यें निराळेपणा येत नाहीं. उदाहरणार्थ बैलांमध्यें लहान, मोठा, कृश, स्थूल इत्यादि भेदांमुळें त्यांचे ठिकाणीं असणारी गोत्वजाति निराळी होत नाहीं. पण बैल व घोडा यांच्यांत जो भेद आहे त्या भेदामुळें जातीमध्यें निराळेपणा उत्पन्न होतो. अशा रीतीनें जातिपक्ष मानल्यानें जेथें हलांचा निर्देश केला असेल तेथें देखील इष्ट रूपांची सिद्धी करतां येते. उदाहरणार्थ 'झलो झलि' सू. २२८१ या सूत्रांतील 'झल्' या शब्दानें झलत्वजाति दाखविली असल्यामुळें, 'अवात्ताम्' इत्यादि उदाहरणांत असलेले दोन तकार झल् मानतां येतात आणि त्यामुळें त्यांच्यामध्यें असलेल्या सकाराचा लोप करतां येतो. झल् हा अण् नसल्यामुळें त्याला 'अणुदित्' हें ग्रहणकशास्त्र लागू पडत नाहीं. झल् या शब्दानें झलत्वजातीचें ग्रहण न करितां झल्प्रत्याहारान्तर्गत व्यक्तींचें ग्रहण केलें तर 'अवात्ताम्' या उदाहरणांत असलेल्या दोन तकारव्यक्तींचें झल् या शब्दानें ग्रहण होणार नाहीं व त्यामुळें सकारलोप न होण्याची आपत्ति येईल. 'अवात्ताम्' या उदाहरणांत जरी प्रथम तकार धातूंतील तकार आहे म्हणजे 'अ वस् सिच् ताम्' या स्थलीं 'पदव्रज' सू. २२६७ या सूत्रानें अकाराची वृद्धि होऊन 'सः सि' सू. २३४२ या सूत्रानें जो 'वस्' धातूंतील सकाराचे जागीं झालेला तकार धात्ववयव आहे व द्वितीय तकार 'ताम्' प्रत्ययांतील तकार आहे तरी, त्या भेदामुळें त्या दोन तकारांच्या जातीमध्यें 'अनेकान्तो ह्यनन्यत्वकरः' या वचनान्वयें कांहीं निराळेपणा उत्पन्न होत नाहीं. या भाष्या-वरून हें स्पष्ट होतें कीं, भाष्यकारानीं व्यक्तिपक्ष न मानतां

जातिपक्षच मानला आहे व मुनित्रयांपैकीं शेवटच्या मुनीनें—भाष्यकारांनीं—जें मानलें आहे तेंच मानणें योग्य असल्यामुळें, जातिपक्षच स्वीकारणें उचित आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) उद्देश्यगत व विधेयगत व्यक्तिसंख्या समान असल्यास जसें यथासंख्यसूत्र लागू पडतें तसेंच जेथें धर्मसाम्यानें उद्देश्यविधेयगत संख्या समान मानतां येते तेथें देखील यथासंख्यसूत्र लागू पडतें. धर्मसाम्यामुळें यथासंख्यसूत्र लागू पडण्याचीं 'स्यतासी लृलुटोः' सू. २१८६ इत्यादि सूत्रें उदाहरणें आहेत. ('स्यतासी' सू. २१८६ या सूत्रांत लृ व लुट् या निमित्तांची संख्या दोन असून 'स्य' व 'तास्' या विधेयांची संख्या देखील दोनच आहे. पण निमित्तकोटींत जो लृकार उच्चारला आहे तो लृट् व लृङ या दोहोंचे ठिकाणीं असणारा लृत्वरूप समानधर्म असल्यामुळें दोहोंचाहि वाचक आहे. म्हणून जरी 'लृ' या वर्णानें लृट् व लृङ यांचें ग्रहण होत असल्यामुळें निमित्तांची संख्या तीन ठरते तरी, लृट् व लृङ यांतील 'लृ' या समानधर्मत्वामुळें निमित्तांची संख्या दोन मानतां येते आणि त्यामुळें या स्थलीं यथासंख्यन्याय लागू पडण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. या शब्दरत्नांतील पंक्तीवर टीका करितांना भैरवीकारांनीं 'यदि व्यक्तिसाम्यस्य विवक्षा स्यात्तदा लृशब्देन लृङलृटोर्बोधनेन तत्र यथासंख्यसम्बन्धो न स्यात्' असें म्हटलें आहे.) जातिपक्षांत देखील ऋकारादिकांचे ठिकाणीं लृकारादि आदेश होण्याची आपत्ति येत नाही; कारण ऋकारादिकांचे ठिकाणीं लृत्वादि जाति नाहीं. ('ऋलृवर्णयोर्मिथः सावर्ण्यं वाच्यम्' या वार्तिकान्वयें जरी ऋकार व लृकार सवर्ण मानले आहेत तरी, दोहोंच्या जाति भिन्न असल्यामुळें ऋकार लृकारच आहे असें मानतां येत नाहीं, आणि त्यामुळें ऋकाराचे जागीं लकारादेश किंवा लृकाराचे जागीं रकारादेश होण्याची आपत्ति जातिपक्षांत येऊं शकत नाहीं. म्हणून 'लृवर्णानां रेफादेशस्य, ऋवर्णानां लादेशस्य च प्रसङ्गात्' हा जो दोष मनोरमेंत दिला आहे तो

जातिपक्षांत येत नाहीं असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. या विषयासंबंधानें बालमनोरमाकार म्हणतात:—'ननु ऋलृवर्णाभ्यां प्रत्येकं त्रिंशदुपस्थितौ लृवर्णानां रेफादेशस्य ऋवर्णानां लादेशस्य च प्रसङ्ग इति न यथासंख्यसूत्रेण निर्वाह इति चेत्, श्रुणु– ऋत्वावच्छिन्नस्य रेफो भवति, लृत्वावच्छिन्नस्य लकारो भवतीति यथासंख्य सूत्राल्लभ्यते । ऋत्वजातिश्च न लृवर्णेषु । ऋलृवर्णयोः सावर्ण्यविधिबलात्तु ऋत्वम् लृकारे, लृत्वमृकारे च आरोप्यते कार्यार्थम् । एवं च वास्तवमृत्वं लृत्वं च आदायात्र यथासंख्यप्रवृत्तिर्निर्बाधेत्यास्तां तावत् ।' ऋकार व लृकार हे दोन्ही वर्ण अक्षरसमाम्नायांत स्वतन्त्र रूपानें पठित असल्यामुळें त्यावरून देखील त्यांची जाति भिन्न आहे हें स्पष्ट होतें. तसेंच धातुपाठांत कांहीं धातु ऋदित् व कांहीं धातु लृदित् पठित केले असल्यामुळें व ऋदित्करणाचीं व लृदित्करणाचीं भिन्न प्रयोजनें पाणिनीयशास्त्रांत सांगितलीं असल्यामुळें, ऋ व लृ हे समानजातीय वर्ण नसून भिन्नजातीय वर्ण आहेत हें उघड होतें.) जातिपक्ष स्वीकारून 'अणुदित्' सू. १४ या सूत्रांतील 'अण्' या पदाचें प्रत्याख्यान केल्यास 'उपसर्गादृति धातौ' सू. ७४ इत्यादि सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या ऋकारानें लृकाराचें देखील ग्रहण व्हावें म्हणून 'ऋलृवर्णयोर्मिथः सावर्ण्यं वाच्यम्' या वार्तिकाऐवजीं 'लृवर्णस्य ऋवत्' असें अतिदेशविधायक वार्तिक मानलें असल्यामुळें लृकाराचे जागीं रकारादेश होण्याची आपत्ति येईल असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण क्लृप्तशिखः' हें इष्ट रूप सिद्ध होण्याकरितां तो अतिदेश अनित्य मानणें आवश्यक आहे. ('उपसर्गादृति धातौ' हें सूत्र 'वा सुप्यापिशलेः' सू. ७७ या सूत्रांत अनुवृत्त आहे. ऋकारानें लृकाराचें ग्रहण न केल्यास जरी 'प्रार्षभीयति, प्रर्षभीयति' अशीं पाक्षिक रूपें सिद्ध होऊं शकतील तरी 'उपाल्कारीयति उपल्कारीयति' हीं पाक्षिक रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत. तीं रूपें सिद्ध होण्याकरितां 'लृवर्णस्य ऋवत्' हें अतिदेशविधायक वार्तिक मानलें आहे व त्या

वार्तिकान्वयें ऱ्हस्व ऋकारास जें कार्य होणें सांगितलें आहे तें लृकारास देखील करतां येतें. पण हें अतिदेशविधायक वार्तिक मानल्यास, लृकाराचे जागीं रकारादेश होण्याची आपत्ति येते, कारण 'इको यणचि' या सूत्रानें ऋकाराचें जागीं रकारादेश होणें सांगितलें असल्यामुळें जर तें कार्य लृकाराचे जागीं देखील वरील अतिदेश-विधायक वार्तिकान्वयें केलें तर, लृकाराचे जागीं देखील रकारादेश होण्याची आपत्ति टाळतां येऊं शकत नाहीं असें शंकाकाराचें म्हणणें आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, वरील अति-देशविधायक वार्तिक अनित्य असल्यामुळें, इष्ट रूपांची सिद्धी करण्याकरितां तें अनित्य वार्तिक प्रवृत्त न केल्यानें वर दर्शविलेली आपत्ति टाळतां येते. तें वार्तिक अनित्य न मानल्यास, 'क्लृ३प्तशिखः' या स्थलीं लृकार प्लुत होऊं शकणार नाहीं व तसें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं; कारण 'गुरोरनृतः' सू. ९७ या सूत्रांत 'अनृतः' असा निषेध असल्यामुळें तो निषेध लृकारास देखील वरील अतिदेशान्वयें लागू पडतो असें मानल्यास, 'क्लृ३प्तशिखः' या उदा-हरणांतील लृकार प्लुत न होण्याची आपत्ति येईल. म्हणून तें वार्तिक अनित्य मानणें आवश्यक आहे व तें अनित्य मानून 'इको यणचि' या सूत्रानें यणादेश करतेवेळीं प्रवृत्त न केल्यानें लृकाराचे जागीं रकारादेश होण्याची आपत्ति टळते.)

शब्दरत्न—'तत्पक्षेऽण्ग्रहणप्रत्याख्यानेऽपि 'अप्रत्ययः' इत्यंशो वाक्यभेदेन विधीयमाने जातिग्रहणप्राप्तसवर्णग्रहणनिषेधक-स्तत्परसूत्रवदिति "त्यदादीनामः" इत्यादौ न दोषः। एवञ्चात्र यण्पदेन जात्याश्रयणेनापि न सवर्णबोधनमिति "स्वौजस्–" इत्यादौ अनुनासिकस्थानेऽपि निरननुनासिक एव। अत एव "स्थानेऽन्तरतमः" सूत्रे भाष्येऽस्य तदुदाहरणत्वमाशङ्क्य "यथासंख्यम्" इत्यनेनापि सिद्धमित्युक्तम्। तेनात्र तयोः फलाविशेष उक्तः। "उञः" इति सूत्रे नव्यानां प्रमाद एव। न च झलादिषु झकारादिभी रूपसादृश्येन

सर्वज्ञकारादिप्रतीतिरिति वाच्यम्, अगादिर्ष्वपि किञ्चित्सादृश्यमाश्रित्य दीर्घादीनामपि ग्रहणोपपत्तौ "अणुदित्–" सूत्रस्य, तद्वाच्येत्यस्य च वैयर्थ्यापत्तेः, । "ल्वादिभ्यः" इति निर्देशानामीषत्सादृश्येनापि ग्रहणमित्यर्थज्ञापकताया युक्तत्वात् । तदप्युक्तम्–"अइउण्" सूत्रे भाष्ये–"रूपसामान्याद्वा सिद्धम्" इति । अणुदित्सूत्रेऽण्ग्रहणन्तु प्रत्याहाराद्यवर्णेषु णकारादिभिश्चिन्हैः प्रत्याहारसूत्रस्थोऽयमिति प्रत्यभिज्ञासत्त्वादुपायान्तरपरम्, "आचार्याः कृत्वा न निवर्तन्ते" इति न्यायात् । इदमेवाभिप्रेत्य तत्रत्यमण्ग्रहणं प्रत्याख्यातं भाष्ये इत्याहुरिति दिक् ।

जो वर्ण तपर केला आहे तो सवर्णाचा ग्राहक न होतां 'तपरस्तत्कालस्य' सू. १५ या सूत्रान्वयें केवळ तत्कालिक वर्णाचा जसा ग्राहक होतो त्याचप्रमाणें, जातिपक्ष मानून 'अणुदित्' सू. १४ या सूत्रांतील अण् या पदाचें प्रत्याख्यान केलें तरी, योगविभाग करून 'अप्रत्ययः' असें पृथक् सूत्र तयार केल्यानें त्या निषेधक सूत्रानें विधीयमान वर्णाचे ठिकाणीं जातिपक्षांत जें त्याच्या सवर्णाचें ग्रहण प्राप्त होतें (व गुणाभेदकत्वपक्ष मानल्यानें जें सवर्णग्रहण प्राप्त होतें) त्याचा बाध होतो आणि त्यामुळें 'त्यदादीनामः' सू. २६५ इत्यादि स्थलीं कांहीं दोष येत नाहीं. (भाष्यकारांनीं जातिपक्ष मानून 'अणुदित्' या सूत्रांतील 'अण्' या पदाचें प्रत्याख्यान केलें आहे हें पूर्वी सांगितलेंच आहे. पण असें जरी केलें आहे तरी त्यामुळें जाति-पक्षांत कांहीं दोष येत नाहीं; कारण 'अणुदित्' या सूत्रांतून 'अण्' हें पद गाळल्यावर 'उदित्सवर्णस्य चाप्रत्ययः' असें जें सूत्र अवशिष्ट राहतें त्याचा योगविभाग करून 'उदित्सवर्णस्य च' व 'अप्रत्ययः' अशीं दोन पृथक् सूत्रें केलीं व प्रथम सूत्रांतून द्वितीय सूत्रांत 'सवर्णस्य' हें पद अनुवृत्त केलें म्हणजे, प्रथम सूत्राचा–अंशाचा–'उदित्सवर्णस्य ग्राहको भवति' असा अर्थ होतो. या प्रथम सूत्राशीं 'अप्रत्ययः' हें द्वितीय सूत्रांतील पद संबद्ध होत नसल्यामुळें, उदित्

वर्ण विधीयमान असला तरी तो सवर्णाचा ग्राहक होतोच व त्यामुळें 'कुहोश्चुः' सू. २२४५ या सूत्रांतील उदित् चकार विधीयमान असून देखील सवर्णाचा ग्राहक होतो आणि म्हणूनच 'जगाद, जघटे' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होतात. द्वितीय सूत्राचा--अंशाचा--'उदिद्भिन्नो विधीयमानो वर्णः सवर्णस्य ग्राहको न भवति' असा अर्थ निष्पन्न होत असल्यामुळें व 'त्यदादीनामः' सू. २६५ या सूत्रांत उदिद्भिन्न 'अ' हा वर्ण आदेशरूपानें विधीयमान वर्ण असल्यामुळें, म्हणजे तो आदेशरूपानें होण्याचें विधान केलें असल्यामुळें, ज्याप्रमाणें तपर केलेला वर्ण 'तपरस्तत्कालस्य' या सूत्रान्वयें सवर्णाचा ग्राहक न होतां तत्कालिक वर्णाचाच ग्राहक होतो त्याचप्रमाणें विधीयमान 'अ' हा दीर्घप्लुतादि सवर्णाचा ग्राहक न होतां अकाराचाच ग्राहक होतो व त्यामुळें त्यदादि सर्वनामांच्या अन्त्य वर्णाचे जागीं दीर्घप्लुतादि अवर्णाचा आदेश होण्याची आपत्ति येत नाहीं असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) 'अप्रत्ययः' असा योगविभाग केल्यानें त्याचा वर सांगितल्याप्रमाणें अर्थ होत असल्यामुळें, जातिपक्षांत देखील 'इको यणचि' या सूत्रांत निर्दिष्ट असलेला निरनुनासिक विधीयमान यण् (गुणाभेदकत्वामुळें प्राप्त होणाऱ्या) सवर्णाचा--अनुनासिकाचा--ग्राहक होऊं शकत नाहीं आणि म्हणूनच 'स्वौजस्' सू. १८३ इत्यादि स्थलीं अनुनासिकाचे जागीं देखील निरनुनासिकच आदेश होतो. ('सु औ जस्' या प्रथमाविभक्तीच्या प्रत्ययांतील 'सु' या एकवचनाच्या प्रत्ययाचा अन्त्य उकार अनुनासिक आहे व तो अनुनासिक असल्यामुळेंच 'उपदेशेऽजनुनासिक इत्' सू. ३ या सूत्रानें त्याला इत्संज्ञा होते. अशा अनुनासिक उकाराचे जागीं 'इको यणचि' या सूत्रानें जरी 'स्थानेऽन्तरतमः' सू. ३९ या सूत्रान्वयें आन्तरतम्यानें अनुनासिक वकारादेश पावला आहे तरी त्या सूत्रांतील निरनुनासिकरूपानें उच्चारलेला यण् विधीयमान असल्यामुळें, म्हणजे यणादेश होण्याचें विधान केलें असल्यामुळें, आणि योगविभागानें पृथक्

केलेल्या 'अप्रत्ययः' या सूत्राचा वर सांगितल्याप्रमाणें अर्थ होत असल्यामुळें, अनुनासिक उकाराचे जागीं अनुनासिक वकार न होतां व 'स्वँजस्' असें रूप न होतां निरनुनासिक वकार होऊन 'सु + ओजस् = स्वोजस्' असें इष्ट रूप सिद्ध होतें. 'अप्रत्ययः' याचा वर सांगितल्याप्रमाणें अर्थ होत असल्यामुळेंच, 'तद्वानासामुपधानो मन्त्रः' सू. ३४७१ या सूत्रांतील 'तद्वान्' हा निर्देश योग्य ठरतो. 'तद्वान्' या स्थलीं 'मादुपधायाः' सू. १८९७ या सूत्रानें मतुप्-प्रत्ययांतील मकार या अनुनासिक वर्णाचे जागीं वकार झाला आहे व तो वकार विधीयमान असल्यामुळें, आन्तरतम्यानें अनुनासिक न होतां, निरनुनासिकच होतो. अनुनासिक वकारादेश या स्थलीं झाला असता तर, 'प्रत्यये भाषायां नित्यम्'–सू. ११६ वरील वार्तिक–या वार्तिका-न्वयें 'तन्वाँन्' असें अनिष्ट रूप झालें असतें व 'तद्वान्' असा जो पाणिनीय निर्देश आहे तो चूक ठरण्याची आपत्ति आली असती.) भाष्यकारांना जातिपक्षच अभिप्रेत असल्यामुळें, त्यांनी 'स्थानेऽन्तरतमः' १·१·५० या सूत्रावरील भाष्यांत त्या सूत्राचीं 'इको यणचि' या सूत्रानें सिद्ध होणारीं (दध्यत्र, मध्वत्र हीं) उदाहरणें होऊं शकतात अशी शंका उपस्थित करून पुढें असें म्हटलें आहे कीं, 'यथासंख्य-मनुदेशः समानाम्' सू. १२८ हें सूत्र प्रवृत्त केल्यानें देखील तीं उदाहरणें सिद्ध होऊं शकतात. ('स्थानेऽन्तरतमः' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात–'किमुदाहरणम् । इको यणचि, दध्यत्र, मध्वत्र । तालुस्थानस्य तालुस्थान ओष्ठस्थानस्यौष्ठस्थानो यथा स्यात् । नैतदस्ति । संख्यातानुदेशेनाप्येतत्सिद्धम् ।' जर भाष्यकारांना व्यक्तिपक्ष मान्य असता तर त्यांनीं 'इको यणचि' या प्रकृत सूत्राला यथासंख्यन्याय लावला नसता; कारण त्या पक्षांत प्रकृत सूत्रांतील उद्देश्य व विधेय यांची संख्या समान ठरत नसल्यामुळें प्रकृत सूत्रास यथासंख्यन्याय लागू पडत नाहीं हें वर सिद्ध केलेंच आहे. पण ज्याअर्थी भाष्यकारांनीं 'इको यणचि' या प्रकृत सूत्राला यथासंख्यन्याय लावला

आहे त्याअर्थी हें स्पष्ट होतें कीं, त्यांना जातिपक्षच मान्य होता; कारण त्या पक्षांतच त्या सूत्रांतील उद्देश्य व विधेय यांची संख्या समान—चार—ठरत असल्यामुळें यथासंख्यन्याय त्या सूत्राला लागू शकतो.) वरील भाष्याचा आशय हा आहे कीं,'इको यणचि' या सूत्राला ('स्थानेऽन्तरतमः' व 'यथासंख्यमनुदेशः समानाम्' या दोन न्यायांपैकीं) कोणताहि न्याय लावला तरी (जातिपक्ष मानल्यानें) फलामध्यें, म्हणजे इष्ट रूप सिद्ध होण्यांत, कांहीं फरक पडत नाहीं (आणि अशा रीतीनें त्यांनीं जातिपक्ष बोधित केला आहे. 'यथासंख्यमनुदेशः समानाम्' १.३.१० या सूत्रावरील भाष्यांत देखील भाष्यकार म्हणतात—'किमिहोदाहरणम् । इको यणचि, दध्यत्र मध्वत्र । नैतदस्ति । स्थानेऽन्तरतमेनाप्येतत्सिद्धम् । कुत आन्तर्यम् । तालुस्थानस्य तालुस्थान ओष्ठस्थानस्यौष्ठस्थानो भविष्यतीति ।' या भाष्यांतील 'अपि' शब्दानें भाष्यकारांना जातिपक्ष अभिप्रेत आहे हें स्पष्ट होतें.) 'ऊञः' सू. १०६ या सूत्राचें व्याख्यान करितांना नव्य वैयाकरणांनीं—दीक्षितादिकांनीं—निःसंशय चूक केली आहे. ('ऊँ' सू. १०७ या सूत्राचें व्याख्यान करितांना शब्दकौस्तुभांत दीक्षित म्हणतात 'अप्रगृह्यस्य त्वादेशोऽनुनासिको यण् स्यात्'. दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, "अप्रगृह्य 'उञ्' चे जागीं 'ऊँ'" असा आदेश केल्यास व तो स्थानिवद्भावानें अप्रगृह्य मानल्यास, 'ऊँ + इति' या स्थलीं 'इको यणचि' या सूत्रानें अनुनासिक ऊँकाराचे जागीं अनुनासिक वकारादेश होण्याची आपत्ति येईल. शब्दरत्नकार म्हणतात कीं, दीक्षितांचें हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'अप्रत्ययः' या निषेधान्वयें प्रकृत सूत्रांत निर्दिष्ट असलेला विधीयमान—आदेशरूपानें ज्याचें विधान केलें आहे तो—निरनुनासिक यण् सवर्णाचा ग्राहक होऊं शकत नसल्यामुळें, सानुनासिक ऊँकाराचे जागीं अनुनासिक वकारादेश मुळींच होऊं शकत नाहीं व निरनुनासिक वकारादेशच होऊं शकतो. म्हणून 'सानुनासिकवकारयुक्तमनिष्टमापतति' अशी जी शब्दकौस्तुभांत

दीक्षितांनीं आपत्ति दाखविली आहे ती बरोबर नाहीं असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) जातिपक्ष न मानतां व्यक्तिपक्ष मानला तरी झलादि प्रत्याहारांतील झकारादि वर्णांनीं इतर झकारादिकांचें देखील रूपसादृश्यामुळें ग्रहण होऊं शकतें असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण अक् इत्यादि प्रत्याहारांतील ऱ्हस्व वर्णांनीं देखील, यत्किंचित्सादृश्याचा आश्रय केल्यास, दीर्घादिकांचें ग्रहण होऊं शकतें असें मानावें लागेल व तसें मानल्यास (व्यक्तिपक्षांत देखील) 'अणुदित्' या सूत्रांतील 'अण्' या पदाचें ग्रहण व्यर्थ ठरण्याची व तसेंच 'तद्वाच्यवाच्ये निरूढा लक्षणा' असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे तें देखील व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल आणि 'ल्वादिभ्यः' हा निर्देश, यत्किंचित्सादृश्यामुळें देखील दीर्घप्लुतादि सवर्णांचें ग्रहण होऊं शकतें, या अर्थाचा ज्ञापक मानावा लागेल. (वयानें लहान किंवा मोठा, कृश किंवा स्थूल, उंच किंवा ठेंगणा, वर्णानें गोरा किंवा काळा इत्यादि व्यक्तिगत भेदकगुणांकडे लक्ष न देतां अवयवरचनेकडेच लक्ष दिल्यास, अवयवरचनारूपसादृश्यामुळें हा घट आहे, हा बैल आहे, हा मनुष्य आहे असा, जातिपक्ष न मानतां व्यक्तिपक्ष मानला तरी, ज्याप्रमाणें बोध होऊं शकतो त्याचप्रमाणें झलादिप्रत्याहारान्तर्गत झकारादि व्यक्तींचे व इतर स्थलीं आढळणाऱ्या झकारादि व्यक्तींचे ठिकाणीं ध्वनिरूप सादृश्य असल्यामुळें हा झकार आहे, हा तकार आहे असा बोध होऊं शकतो. तसेंच अक्, इक् इत्यादि प्रत्याहारान्तर्गत ऱ्हस्व वर्णांचे व स्वतंत्र रूपानें उच्चारलेल्या अकारादिकांचे ठिकाणी ध्वनिरूप सादृश्य असल्यामुळें व त्यांच्या दीर्घप्लुतादिकांचे ठिकाणीं देखील थोडेसें ध्वनिरूप सादृश्य असल्यामुळें, प्रत्याहारान्तर्गत अकारादिकांनीं त्यांच्या सवर्णांचें ध्वनिरूपसादृश्यामुळें ग्रहण करतां येऊं शकतें व अशा रीतीनें व्यक्तिपक्ष मानल्यानें देखील सर्व काम भागूं शकत असल्यामुळें जातिपक्ष मानण्याची कांहीं गरज नाहीं अशी

शंकाकाराची शका आहे. या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, प्रत्याहारान्तर्गत अकारादि ऱ्हस्व वर्णानी त्याच्या दीर्घप्लुतादिकाचे यत्किंचित्ध्वनिसादृश्यामुळे ग्रहण होऊ शकते असे मानल्यास, व्यक्तिपक्षात देखील 'अणुदित्' या सूत्रातील 'अण्' या पदाचे ग्रहण व्यर्थ ठरण्याची व तसेच 'प्रत्याहारग्रहणेषु तद्वाच्यवाच्ये निरूढा लक्षणा' असे जे दीक्षितानी मनोरमेत म्हटले आहे ते व जी लक्षणा मानली आहे ती मानणे देखील व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. दुसरे असे की, भाष्यकारानी जातिपक्ष मानला आहे आणि तो पक्ष मानूनच 'अणुदित्' या सूत्रातील 'अण्' या पदाचे प्रत्याख्यान केले आहे. म्हणून 'उत्तरोत्तर मुनीना प्रामाण्यम्' या न्यायान्वये जातिपक्षच मानणे उचित आहे व यत्किंचित्ध्वनिरूपसादृश्यामुळे सवर्णाचे ग्रहण करता येते हा पक्ष स्वीकारता येत नाही. पण हा पक्ष देखील भाष्य-विरुद्ध नाही असे आता शब्दरत्नकार पुढील पक्तीत सागतात.) जातिपक्ष न मानता व्यक्तिपक्ष मानून देखील यत्किंचित्रूपसा-दृश्यामुळें सवर्णाचे ग्रहण करता येते असे देखील 'अइउण्' —शिवसूत्र १—या सूत्रावरील भाष्यात म्हटले आहे व त्या भाष्यात या वरील अर्थाचे प्रतिपादन करणारे 'रूपसामान्याद्वा सिद्धम्' असे वचन भाष्यकारानी पठित केले आहे. (त्या भाष्यात 'रूपसामान्याद्वा' असे वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात— 'रूपसामान्याद्वा सिद्धमेतत् । तद्यथा, तानेव शाटकानाच्छादयामो ये मथुरायाम् । तानेव शालीन् भुञ्ज्महे ये मगधेषु । तदेवेद भवत कार्षापण यन्मथुराया गृहीतम् । अन्यस्मिश्चान्यस्मिश्च रूपसामान्यात्तदेवेदमिति भवति । एवमिहापि रूपसामान्यात्सिद्धम् ।' या भाष्याचा भावार्थ असा आहे की, जरी इत्यादि व्यक्ति अनेक आहेत तरी त्याचे रूप सारखेच असल्यामुळे, झल्प्रत्याहारान्तर्गत झकारादि वर्णांनी इतर झकारादिकाचे ग्रहण करता येते. उदाहरणार्थ दोले निराळे असून देखील ते एकाच प्रकारचे

असल्यास आपण असें म्हणतों कीं, जे शेले आम्ही मथुरेंत पांघरत होतों तेच आम्ही येथें पांघरतों. तसेंच तांदुळ भिन्न असून देखील एकाच प्रकारचे असल्यास आपण असें म्हणतों कीं, जे तांदुळ आम्ही मगध देशांत खात होतों तेच येथें खातों. तसेंच उधार घेतलेला कार्षापण परत दिल्या जाणाऱ्या कार्षापणाहून भिन्न असून देखील दोन्ही सारखेच असल्यामुळें आपण असें म्हणतों कीं, तुझ्याकडून मथुरेंत घेतलेला हा कार्षापण परत घे. या सर्व ठिकाणीं पूर्वीचे व आतांचे पदार्थ निराळे असून देखील ते सारख्याच प्रकारचे असल्यामुळें तेच हे आहेत असा आपण व्यवहार करतों. त्याचप्रमाणें सर्व झकारादि व्यक्तींचें स्वरूप सारखें असल्यामुळें प्रत्याहारान्तर्गत झकारानें किंवा तकारानें सर्व झकारांचें किंवा तकारांचें ग्रहण करतां येऊं शकतें. या वार्तिकाच्या थोडेंच पूर्वी साधारणतः याच अर्थाचें 'एकत्वादकारस्य सिद्धम्' हें वार्तिक भाष्यकारांनीं पठित केलें आहे व ते म्हणतातः 'एकोऽयमकारो यश्चाक्षरसमाम्नाये यश्चानुवृत्तौ यश्च धात्वादिस्थः ।' सारांश वरील भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, व्यक्तिपक्ष मानला तरी प्रत्याहारनिर्दिष्ट वर्णांनीं रूपसादृश्यामुळें तशाच इतर वर्णांचें व सवर्णांचें—दीर्घादिकांचें—ग्रहण होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. पण व्यक्तिपक्ष मानून यत्किंचित् सादृश्यामुळें सवर्णांचें ग्रहण केल्यास, पूर्वी सांगितल्याप्रमाणें 'अणुदित्' या सूत्रांतील 'अण्' या पदाचें ग्रहण व्यर्थ ठरूं पाहतें. मग त्या सूत्रांत व्यक्तिपक्ष मानणाऱ्या पाणिनीनें 'अण्' या पदाचें ग्रहण कां केलें ? या प्रश्नाचें उत्तर शब्दरत्नकार पुढील पंक्तींत देतात.) 'अण्' इत्यादि प्रत्याहारांमध्यें असलेला आद्यवर्ण णकारादि अनुबन्धसहित उच्चारला असतां तो आक्षरसमाम्नायिक वर्ण आहे याची ओळख पटते व तशा वर्णानें यत्किंचित्सादृश्यामुळें त्याच्या सवर्णांचें ग्रहण करतां येतें हा देखील दुसरा उपाय आहे हें बोधित होण्याकरितां 'अणुदित्' या सूत्रांत 'अण्' या पदाचें ग्रहण केलें आहे. (पण

अण्प्रत्याहारान्तर्गत कोणत्याहि वर्णाने जर त्याच्या सवर्णाचे रूपसादृश्यामुळे ग्रहण होऊं शकते असा पक्ष पाणिनीला मान्य होता तर त्याने 'अणुदित्' या सूत्रातून 'अण्' हे पद गाळावयास हवें होते. मग पाणिनीने तसे का केले नाही ? या प्रश्नाचे शब्दरत्नकार असे उत्तर देतात की,) सूत्रकाराची अशी प्रथा आहे की, त्यानी एकदां सूत्र केल्यावर ते सूत्र (किंवा त्या सूत्रातील कोणताहि भाग) ते परत घेत नाहीत--म्हणजे ते सूत्र किंवा त्या सूत्रातील कोणताहि भाग न गाळता, ते आचार्य जसेचे तसेच पूर्वी रचलेले सूत्र ठेवतात. (आचार्याः कृत्वा न निवर्तन्ते' या न्यायाचा भाष्यकारानी पस्पशान्हिकात उल्लेख केला आहे. 'व्याकरण' याचा अर्थ 'शब्द' असा केला असतां, काय दोष येतील हे सांगताना वार्तिककाराने 'भवे' व 'प्रोक्तादयश्च तद्धिता' ही दोन वार्तिके पठित केली आहेत. भाष्यकार असा प्रश्न विचारतात की, वार्तिककाराने ही दोन भिन्न वार्तिके का पठित केली आहेत ? 'प्रोक्तादयश्च तद्धिताः' एवढे एकच वार्तिक पठित केले असते तरी, 'तत्र भवः' या अर्थामध्ये होणाऱ्या तद्धित प्रत्ययाचा त्यात संग्रह झालाच असता व 'भवे' हे वार्तिक पठित करण्याची काही गरज नव्हती. भाष्यकार म्हणतात--'किमर्थमिदमुभयमुच्यते, भवे, प्रोक्तादयश्च तद्धिता इति । न प्रोक्तादयश्च तद्धिता इत्येव भवेऽपि तद्धितश्चोदित. स्यात् ? । पुरस्तादिदमाचार्येण दृष्टं भवे तद्धित इति, तत्पठितम् । तत उत्तरकालमिदं दृष्टं, प्रोक्तादयश्च तद्धिता इति, तदपि पठितम् । न चेदानीमाचार्याः सूत्राणि कृत्वा निवर्तयन्ति ।' या भाष्यातील 'आचार्याः' या पदाचा सूत्रकार व तसेच वार्तिककार असा अर्थ समजावा. भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, वार्तिककाराच्या ध्यानात प्रथम हे आले की, 'व्याकरण' याचा 'शब्द' असा अर्थ केला असता, 'तत्र भवः' या अर्थामध्यें होणाऱ्या तद्धित प्रत्ययाची उपपत्ति लावता येऊ शकणार नाही. वार्तिककाराच्या लक्षात हा दोष येतांक्षणीच त्याने 'भवे' हे वार्तिक करून तो दोष

सांगितला. पुढें कांहीं काळानें त्याच्या लक्षांत आलें कीं, 'व्याकरण' याचा 'शब्द' असा अर्थ केल्यास, 'प्रोक्त' इत्यादि अर्थामध्यें होणाऱ्या तद्धित प्रत्ययांची उपपत्ति लावतां येऊं शकणार नाहीं. तेव्हां त्यानें तो दोष सांगण्याकरितां 'प्रोक्तादयश्च तद्धिताः' हें दुसरें वार्तिक रचलें. दुसऱ्या वार्तिकानें जरी प्रथम वार्तिक गतार्थ झालें आहे तरी, वार्तिककारानें प्रथम वार्तिक गाळून न टाकतां, तें जसेचें तसेंच कायम ठेविलें व भाष्यकार म्हणतात कीं याचें कारण हें कीं, आचार्यांची अशीच प्रथा आहे कीं, त्यांनीं एकदां सूत्रें रचलीं कीं ते केव्हांहि तीं सूत्रें माघारे घेत नाहींत, म्हणजे उत्तरसूत्रानें पूर्वसूत्र व्यर्थ झालें असलें तरी, आचार्य तें पूर्वसूत्र न गाळतां जसेचें तसेंच कायम ठेवितात. शब्दरत्नकारांनीं हा वरील न्याय 'अणुदित्' या सूत्रास लावला आहे व शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय असा आहे कीं, व्यक्तिपक्ष मानणाऱ्या पाणिनीच्या प्रथम असें लक्षांत आलें कीं, अणांच्या विषयांत उदात्तादिस्वरकृत भेद, कालप्रयुक्त ऱ्हस्व-दीर्घत्वभेद, व गुणप्रयुक्त अनुनासिकत्व निरनुनासिकत्व असा त्रिविध भेद संभवतो व झलादि वर्णांच्या विषयांत तशा प्रकारचा भेद मुळींच संभवत नाहीं. हें लक्षांत येतांक्षणींच पाणिनीनें 'अणुदित्' हें सूत्र रचतेवेळीं त्यांत अण्प्रत्याहाराचें ग्रहण केलें. पुढें जेव्हां कांहीं काळानें पाणिनीच्या हें लक्षांत आलें असावें कीं, 'अ' इत्यादि वर्णांचें स्वरूप सर्वत्र सारखें असल्यामुळें, त्या वर्णांनीं सर्व प्रकारच्या 'अ' इत्यादि वर्णांचें रूपसामान्यामुळें व तसेंच त्यांच्या दीर्घप्लुतादिकांचें देखील यत्किंचित्ध्वनिरूपसादृश्यामुळें किंवा यत्किंचित्रूपसामान्या-मुळें ग्रहण होऊं शकतें आणि म्हणून जेव्हां पाणिनीनें 'अणुदित्' हें सूत्र प्रथम रचलें तेव्हां त्या सूत्रांत अण्प्रत्याहाराचें ग्रहण करण्याची त्याला वास्तविक कांहीं गरज नव्हती. पण हें लक्षांत आल्यावर देखील, पाणिनीनें त्या सूत्रांतून 'अण्' हें पद गाळलें नाहीं व याचें कारण हेंच कीं आचार्यांनीं एकदां सूत्र रचलें म्हणजे, त्यांत ते कांहीं

फेरबदल करीत नाहीत आणि म्हणूनच पाणिनीनें 'अणुदित्' या सूत्रांतील 'अण्' ग्रहण निरर्थक असून देखील जसेचें तसेंच कायम ठेविलें. सारांश जातिपक्ष मानल्यास 'अणुदित्' या सूत्रांतील 'अण्' ग्रहण व्यर्थ ठरतें. व्यक्तिपक्ष मानला तरी 'रूपसामान्याद्वा सिद्धम्' या वचनान्वयें तें 'अण्' ग्रहण व्यर्थ ठरतेंच आणि म्हणूनच) 'रूपसामान्याद्वा सिद्धम्' या वचनाचा अङ्गिकार करूनच, भाष्यकारांनीं (व्यक्तिपक्षात देखील) 'अणुदित्' या सूत्रांतील 'अण्' ग्रहणाचें प्रत्याख्यान केलें आहे असें कांही वैयाकरणांचें म्हणणें आहे.

मनोरमा---"अनचि च" द्वे वेति । "यरोऽनुनासिक:" इति सूत्राद् वाग्रहणमनुवर्तते इति "नाज्झलौ" इति सूत्रे कैयट: । एवं च "सर्वत्र शाकल्यस्य" इति सूत्रम्, तत्प्रपञ्चभूतं, पूर्वोत्तरसूत्रद्वयं च नारम्भणीयमिति भाव: । यत्तु–"दीर्घादाचार्याणाम्" इति सूत्रे आचार्यग्रहणं पूजार्थमित्यभिप्रेत्य 'वाक्' 'वाक्क्' इति भाष्योदाहृते विकल्पे उपपत्तिचिन्तार्थं क्लिश्यन्ते, तन्मुधैव, पूजार्थताया: प्रामाणिकैरनुक्तेः, "त्रिप्रभृतिषु" इति सूत्रे शाकटायनग्रहणस्यापि तथात्वापत्तेः । न चेष्टापत्तिः, संस्स्कर्तेति त्रिसकारपरकैयटहरदत्तादिग्रन्थविरोधात्, स्वग्रन्थविरोधाच्च । अत एव प्रातिशाख्यभाष्येऽपि "आ त्वा रथम्" इति मन्त्रे तकारस्य द्वित्वविकल्प उदाहृत: । माधवेन चास्ते इत्यत्र सकारस्य द्वित्वविकल्प उक्त: । एवञ्च 'धात्र्श:' इत्यत्र तकारस्य द्वित्वमसदित्युक्तिरेवासतीति दिक् ॥

'अनचि च' सू. ४८ (या सूत्रानें सांगितलेलें द्विर्वचनकार्य विकल्पानें करावें या अर्थाचा वाचक 'वा' किंवा 'अन्यतरस्याम्' अशा प्रकारचा कोणताहि शब्द त्या सूत्रात पठित नसून देखील) या सूत्राचा अर्थ करितांना कौमुदींत 'द्वे वा स्त:' असें जें म्हटलें आहे त्याचें कारण हें की, 'नाज्झलौ' १·१·१० या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें असें म्हटलें आहे की, 'यरोऽनुनासिकेऽनुनासिको वा' या पूर्व

सूत्रांतून 'अनचि च' या प्रकृत सूत्रांत 'वा' या पदाची अनुवृत्ति होते. त्यामुळें 'सर्वत्र शाकल्यस्य' सू. ५७ हें सूत्र व त्या सूत्रांत सांगितलेल्या अर्थाचाच अनुवाद करणारीं त्याच्या मागचें व पुढचें सूत्र हीं दोन सूत्रें, म्हणजे 'त्रिप्रभृतिषु शाकटायनस्य' सू. ५६ व 'दीर्घादाचार्याणाम्' सू. ५८ हीं दोन सूत्रें, अशीं तीन्हीं सूत्रें पठित करण्याची गरज राहत नाहीं. ('नाज्झलौ' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं 'विभाषा द्विर्वचनम्'–म्हणजे 'अनचि च' या सूत्रानें होणारें द्विर्वचनकार्य वैकल्पिक आहे–असें म्हटलें आहे व या भाष्याचें व्याख्यान करितांना 'द्विर्वचनमपि विभाषा, यरोऽनुनासिकेऽनुनासिको वेत्यतो वेत्यनुवर्तनात्' असें कैयटानें म्हटलें आहे. या कैयटवृत्तीच्या आधारेंच दीक्षितांनीं प्रकृत सूत्रांत 'यरोऽनुनासिके' या पूर्व सूत्रांतून 'वा' हें पद अनुवृत्त करून 'द्वे वा स्तः' असें प्रकृत सूत्राचा अर्थ करितांना म्हटलें आहे. पण काशिकाकारांनीं व प्रक्रियाकौमुदीकारांनीं प्रकृत सूत्रांत 'वा' हें पद अनुवृत्त केलें नाहीं व 'अनचि' हा प्रसज्यप्रतिषेध न मानतां पर्युदास मानून प्रकृत सूत्राचा 'अचः परस्य यरो द्वे भवतः अनचि परतः' असा त्यांनीं अर्थ केला आहे. त्यांचें मत असें दिसतें कीं, 'सर्वत्र शाकल्यस्य' हें सूत्र जेथें जेथें द्विर्वचन होणें सांगितलें आहे तेथें तेथें तें वैकल्पिक आहे असें समजावें या अर्थाचें वाचक असल्यामुळें, भाष्यकारांनीं 'नाज्झलौ' या सूत्रावरील भाष्यांत 'विभाषा द्विर्वचनम्' असें म्हटलें आहे. सारांश त्यांच्या मतें 'अनचि च' या सूत्रानें सांगितलेलें द्वित्वकार्य नित्य असल्यामुळें, 'सर्वत्र शाकल्यस्य' हें सूत्र व त्याचाच अनुवाद करणारीं वर सांगितलेलीं दोन सूत्रें आवश्यक आहेत आणि हीं तीन्ही सूत्रें गाळल्यास 'अनचि च' या सूत्रानें होणारें द्वित्वकार्य नित्य ठरण्याची आपत्ति येईल. पण दीक्षितांनीं कैयटमतानुसार प्रकृत सूत्रांत 'वा' या पदाची अनुवृत्ति केली असल्यामुळें व अशा रीतीनें त्या सूत्रानें होणारें द्विर्वचनकार्य वैकल्पिक ठरत असल्यामुळें, वरील तीन्ही सूत्रें त्यांच्या

मते निरर्थक ठरतात. परंतु भाष्यकारांनीं 'वृद्धिरादैच्' या सूत्रावरील भाष्यांत 'प्रमाणभूत आचार्यो दर्भपवित्रपाणिः शुचाववकाशे प्राङ्मुख उपविश्य महता यत्नेन सूत्रं प्रणयति स्म, तत्राशक्यं वर्णेनाप्यनर्थकेन भवितुं किं पुनरियता सूत्रेण ।' असें स्पष्ट म्हटले आहे. कोणतेंहि पाणिनीय सूत्र व त्यांतील कोणतेहि पद व्यर्थ मानतां येत नाही असें भाष्यकारांचे मत असल्यामुळें, प्रकृत सूत्रात पूर्व सूत्रांतून 'वा' या पदाची अनुवृत्ति करणे योग्य नाही; कारण तसे केल्यास वरील तीन्ही सूत्रें व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते आणि म्हणूनच 'दीर्घादाचार्याणाम्' या सूत्रावरील टीकेंत बालमनोरमाकारानी 'अनचि चेत्यत्र वाग्रहण-मनुवर्तते इति नाज्झलाविति सूत्रे कैयटः । एवं चाऽनचि चेत्येव द्वित्वविकल्पसिद्धौ त्रिप्रभृतिष्वित्यादिसूत्रत्रयं नारम्भणीयमिति प्रौढ-मनोरमायां स्थितम् । एतत्सूत्रत्रयविरोधादनचि चेत्यत्र वाग्रहणं नानुवर्त्यमिति युक्त प्रतिभाति ।' असे म्हटलें आहे.) 'दीर्घादाचार्या-णाम्' सू. ५८ या सूत्रांतील 'आचार्याणाम्' या पदाचें ग्रहण (विकल्पाचें वाचक नसून) पूजार्थक आहे, म्हणजे त्या सूत्राने सांगितलेला द्विर्वचनकार्याचा निषेध वैकल्पिक नसून नित्य आहे, असें मानून प्रकाशकारानी, 'वाक्, वाक्क्' अशी जी भाष्यात उदाहरणें दिली आहेत ती सिद्ध करण्याकरिता, जी खटपट केली आहे ती व्यर्थ आहे; कारण भाष्यानुयायी शिष्ट वैयाकरणांनी 'आचार्याणाम्' या पदाचे ग्रहण पूजार्थक आहे असे मुळीच म्हटले नाही. ते ग्रहण पूजार्थक मानल्यास, 'त्रिप्रभृतिषु शाकटायनस्य' सू. ५६ या सूत्रातील 'शाकटायनस्य' या पदाचे ग्रहण देखील पूजार्थक आहे असें मानण्याची आपत्ति येईल. 'शाकटायनस्य' या पदाचे ग्रहण देखील पूजार्थक आहे असे मानणें इष्टापत्तीच आहे असे प्रकाशकारांचे म्हणणे असल्यास, 'मम्मार्ता' या स्वरूपी त्रिमकारयुक्त रूप व्हावे असें जे कैयटाने व हरदत्तादिकांनी म्हटले आहे व प्रकाशकारानी स्वतः देखील म्हटले आहे त्याशी विरोध येतो. (प्रक्रियाकौमुदीकारांनी 'दीर्घादाचार्या-

णाम्' या सूत्रांतील आचार्यग्रहण पूजार्थक आहे असें मानून 'आचार्याणाम्' या पदाचा 'केषांचिदाचार्याणां मते' असा अर्थ न करितां 'सर्वेषां मते' असा अर्थ केला आहे व त्यांनीं त्या सूत्राचा 'सर्वेषां मते दीर्घात्परस्य यरो न द्वे स्तः' असा अर्थ केला आहे आणि प्रसादकारांनीं आपल्या टीकेंत 'आचार्यग्रहणं पूजार्थम्' असें स्पष्ट म्हटलें आहे व प्रकाशकारांनीं देखील तसेंच म्हटलें आहे. हें म्हणणें बरोबर मानल्यास, 'दीर्घादाचार्याणाम्' या सूत्रांत सांगितलेला द्वित्वकार्याचा निषेध वैकल्पिक न ठरतां, नित्य ठरेल व त्यामुळें 'वाक्' या स्थलीं दीर्घ आकारापुढें ककार हा यर् आला असल्यामुळें त्याचें द्विर्वचन होणार नाहीं व 'वाक्क्' असें वैकल्पिक इष्ट रूप सिद्ध होणार नाहीं. पण भाष्यकारांनीं तर 'अनचि च' ८·४·४७ या सूत्रावरील भाष्यांत 'वाक्, वाक्क्' अशीं वैकल्पिक रूपें दिलीं आहेत. 'दीर्घादाचार्याणाम्' हा द्वित्वकार्याचा निषेध नित्य मानल्यास 'वाक्क्' या वैकल्पिक रूपाची सिद्धि कशी व्हावी ? त्या रूपाची सिद्धि होण्याकरितां 'अवसाने च' असें जें 'अनचि च' या सूत्रावरील भाष्यांत वार्तिक पठित केलें आहे तें मानावें लागेल. पण भाष्यकारांनीं तर 'अनचि' हा प्रसज्यप्रतिषेध मानून त्या वार्तिकाचें प्रत्याख्यान केलें आहे. त्या भाष्यांत 'अवसाने च' या वार्तिकाचें व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात—'अवसाने च द्वे भवत इति वक्तव्यम् । वाक्क् । वाक् । त्वक्क् । त्वक् । स्रुक्क्, स्रुक् । तत्तर्हि वक्तव्यम् ?। न वक्तव्यम् । नायं पर्युदासो यदन्यदच इति । किं तर्हि ?। प्रसज्यप्रतिषेधोऽचि नेति ।' हा भाष्यपाठ कैयटानें केलेल्या व्याख्येला अनुसरून दिला आहे. भाष्याच्या प्रतींत जो पाठ आढळतो तो लेखक-प्रमादामुळें झाला असावा असें कैयटानें म्हटलें आहे व तो पाठ कसा चूक आहे हें कैयटानें आपल्या टीकेंत स्पष्ट करून दाखविलें आहे आणि भाष्याचा योग्य पाठ दिला आहे. सारांश 'अवसाने च' हें वार्तिक भाष्यकारांनीं प्रत्याख्यात केलें असल्यामुळें, 'दीर्घादाचार्याणाम्'

हा द्वित्वकार्याचा निषेध नित्य मानल्यास 'वाक्क्' असें पाक्षिक इष्टरूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. म्हणून 'आचार्याणाम्' या पदाचें ग्रहण विकल्पार्थक न मानतां पूजार्थक मानणें अयोग्य आहे. दुसरें असें कीं, 'दीर्घादाचार्याणाम्' या सूत्रांतील 'आचार्याणाम्' या पदाचें ग्रहण पूजार्थक मानल्यास, 'त्रिप्रभृतिषु शाकटायनस्य' या सूत्रांतील 'शाकटायनस्य' या पदाचें ग्रहण व तसेंच 'सर्वत्र शाकल्यस्य' या सूत्रांतील 'शाकल्यस्य' या पदाचें ग्रहण देखील पूजार्थक मानावें लागेल; कारण या वरील तीन एकापुढें एक पठित केलेल्या सूत्रांपैकीं अखेरच्या, म्हणजे 'दीर्घादाचार्याणाम्' या, सूत्रांतील आचार्यग्रहण पूजार्थक आहे व पूर्वीच्या दोन सूत्रांतील शाकटायनग्रहण व शाकल्यग्रहण पूजार्थक नसून विकल्पार्थक आहे अशा प्रकारचा भेद करण्यास कांहींच प्रमाण नाहीं. आतां 'त्रिप्रभृतिषु शाकटायनस्य' या सूत्रांतील 'शाकटायनस्य' या पदाचें ग्रहण देखील पूजार्थक आहे असें मानणें इष्टापत्तीच आहे असें प्रकाशकारांचें म्हणणें असल्यास, द्वित्वनिषेधाचें तें सूत्र वैकल्पिक न ठरतां नित्य ठरेल व त्यामुळें 'सम्परिभ्यां करोतौ' सू. २५५० या सूत्रानें 'कृ' धातूस सुडागम करुन त्याहून 'ण्वुल्तृचौ' सू. २८९५ या सूत्रानें तृच् प्रत्यय केल्यावर 'सम्+स्कर्ता' या स्थलीं 'समः सुटि' सू. १३५ या सूत्रानें 'सम्' यातील अन्त्य मकाराचें रुत्व होऊन व 'अनुनासिकात्परोऽनुस्वारः' सू. १३७ या सूत्रानें 'रु'च्या पूर्वी असलेल्या 'अ' या वर्णाला अनुस्वार आगम होऊन व 'खरवसानयोर्विसर्जनीयः' सू. ७६ या सूत्रानें रेफाचा विसर्ग होऊन आणि 'विसर्जनीयस्य सः' सू. १३८ या सूत्रानें त्या विसर्गाचा सकार होऊन 'सम्+स्कर्ता = संस्स्कर्ता' अशी स्थिति झाली असतां, या उदाहरणांत दोन सकार व एक ककार असे तीन यर् एकत्र आले असल्यामुळें, 'त्रिप्रभृतिषु शाकटायनस्य' हा नित्य मानलेला द्वित्वाचा निषेध प्रवृत्त होईल व 'अनचि च' या सूत्रानें पावलेलें सकाराचें द्वित्व होणार नाहीं आणि त्यामुळें त्रिसकारयुक्त

इष्टरूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. पण कैयटानें तर 'समः सुटि' सू. ८.३.५ या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत तसें त्रिसकारयुक्त रूप होणें इष्ट आहे असें म्हटलें आहे व हरदत्तानें आणि प्रकाशकारांनीं देखील तसेंच म्हटलें आहे. म्हणून 'शाकटायनस्य' या पदाचें ग्रहण पूजार्थक न मानतां विकल्पार्थकच मानणें आवश्यक आहे. सारांश शाकटायनग्रहण देखील पूजार्थक आहे हें मानणें इष्टापत्तीच आहे असें प्रकाशकारांचें म्हणणें असल्यास तें अयोग्य ठरतें असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे. त्रिसकारयुक्त रूप कसें सिद्ध होतें याची प्रक्रिया परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषांतरांत पान ५१६–१७ मध्यें विस्तृत रीतीनें दिली आहे व तें विवरण वाचल्यास त्रिसकारयुक्तरूप कसें सिद्ध होतें हें नीट ध्यानांत येईल.) 'दीर्घादाचार्याणाम्' या सूत्रांतील आचार्यग्रहण पूजार्थक नसून विकल्पार्थक आहे म्हणूनच, प्रातिशाख्यभाष्यांत देखील 'आ त्वा रथम्' या मन्त्रांतील 'त्वा' या पदांतील तकाराला वैकल्पिक द्वित्व होतें असें म्हटलें आहे व तें वैकल्पिक द्वित्वाचें उदाहरण दिलें आहे. ('दीर्घादाचार्याणाम्' हा द्वित्वनिषेध नित्य असता तर, वरील श्रुतींत दीर्घ आकारापुढें तकार हा यर् आला असल्यामुळें, त्याचें द्वित्व होऊं शकलें नसतें व तें जें वैकल्पिक द्वित्वाचें उदाहरण दिलें आहे तें अयोग्य ठरण्याची आपत्ति येते.) माधवानें देखील 'आस्ते' या स्थलीं सकाराचें द्वित्व विकल्पेंकरून होतें असें म्हटलें आहे. ('आस्ते' या उदाहरणांत दीर्घ आकारापुढें सकार हा यर् आला आहे व 'दीर्घादाचार्याणाम्' हें द्वित्वनिषेधक सूत्र नित्य मानल्यास, सकाराचें द्वित्व होऊं शकणार नाहीं हें उघड आहे.) या वरील विवेचनावरून हें स्पष्ट होतें कीं, 'धात्रंशः' या उदाहरणांत तकाराचें द्वित्व करणें चूक आहे असें जे प्रकाशकार म्हणतात तें त्यांचेंच म्हणणें चूक ठरतें; (कारण 'दीर्घादाचार्याणाम्' हा द्वित्वकार्याचा निषेध वर सांगितल्याप्रमाणें नित्य नसून वैकल्पिक असल्यामुळें, 'धा' यांतील आकारापुढें अस-

लेल्या तकार या यर्‌चें वैकल्पिक द्वित्व होण्यात काहीच अडचण येत नाही. म्हणून 'धात्रशः' या स्थली तकाराचे द्वित्व होऊ शकत नाही हे प्रकाशकाराचे म्हणणे चूक ठरते हे उघड आहे.)

शब्दरत्न—क्लिश्यन्ते इति । "अनचि" इत्यनुवर्त्य पर्युदासपरतया हलि पर एव नित्यनिषेध इति व्याख्यानेनेति भावः । विकल्प उक्त इति । एवञ्च "सर्वत्र शाकल्यस्य" इतिवदिदमपि प्रपञ्चार्थमिति भावः । असतीति । यत्तु—"नादिनी" इत्यादौ वृत्तौ "अनचि" इति प्राप्तिमुद्भाव्य "त्रिप्रभृतिषु" "सर्वत्र" इत्यनयोः प्राप्तिमनुद्भाव्य पुनः "दीर्घात्" इत्यत्र "अनचि" इति प्राप्तिरुद्भाविता हरदत्तेन । तस्यायमाशयः निषेधविकल्पे प्राप्त्युद्‌भावनं नाऽवश्यकम्, तद्‌विकल्पे विधिविकल्पस्य फलितत्वेन विधेरेव अप्राप्तविषयविकल्पसम्भवाद्, नित्यनिषेधे तु तदुद्भावनमावश्यकमिति तन्न, विकल्पेऽपि निषेधप्रकरणान्ननुल्लेखस्यावश्यकत्वेन प्राप्त्युद्भावनस्यावश्यकत्वात्, मध्ये नञोऽसम्बन्धो मण्डूकानुवृत्तिरग्रे, इत्यत्र मानाभावाच्च, "सर्वत्र" इति सूत्रेऽस्य द्वित्वमात्रनिषेधकतेति बोधयितुं तदनुल्लेखाच्च, "त्रिप्रभृतिषु" इत्येतद्विषये नकारषकारयोर्द्विर्वचनाभावः" इति मिश्रग्रन्थेन प्राप्त्युल्लेखस्य कृतप्रायत्वाच्च, वृत्तिहरदत्तयोः "नादिन्या" "शरोऽचि" इत्यनयोरपि प्राप्त्युल्लेखस्य बहुषु पुस्तकेष्वनुपलम्भाच्चेति दिक् ।

'वाक् वाक्क् इति भाष्योदाहृते विकल्पे उपपत्तिचिन्तार्थं क्लिश्यन्ते' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की ('दीर्घादाचार्याणाम्' हा नित्य द्वित्वनिषेध मानणारे) प्रकाशकार त्या सूत्रात 'अनचि च' या सूत्रातून 'अनचि' या पदाची अनुवृत्ति करतात व हें अनुवृत्त पद त्या सूत्रात (शब्दाधिकाराने) पर्युदास मानून आणि त्या पर्युदासाचा 'हलि परे एव'—म्हणजे हल् पुढें असतानाच—असा अर्थ करून ते असे म्हणतात की, 'दीर्घादाचार्याणाम्' हें नित्यद्वित्वनिषेधक सूत्र तेथेंच लागू पडतें की, जेथें दीर्घ अचापुढें

असणाऱ्या ज्या यर्‌चें द्वित्व करणें आहे त्या यर्‌पुढें हल् आला आहे. ('दीर्घादाचार्याणाम्' हें नित्यद्वित्वनिषेधक सूत्र मानल्यास, त्या सूत्राचा 'सर्वेषामाचार्याणां मते दीर्घात्परस्य यरो द्वे न स्तः' असा अर्थ होतो. त्यामुळें 'वाक्' या स्थलीं दीर्घ आकारापुढें 'क्' हा यर् आला असल्यामुळें, ककाराचें द्वित्व होऊं शकत नाहीं. पण भाष्य-कारांनीं तर 'अनचि च' या सूत्रावरील भाष्यांत 'वाक्, वाक्क्' अशीं वैकल्पिक रूपें दिलीं आहेत. 'वाक्क्' हें वैकल्पिक रूप सिद्ध करण्याकरितां प्रकाशकारांनीं वरीच खटपट केली आहे. त्यांनीं 'अनचि च' या सूत्रांतून 'अनचि' या पदाची 'दीर्घादाचार्याणाम्' या नित्यद्वित्वनिषेधक मानलेल्या सूत्रांत मण्डूकप्लुतीनें अनुवृत्ति केली आहे व जरी 'अनचि च' या सूत्रांत त्यांनीं 'अनचि' हा भाष्यकारमतान्वयें प्रसज्यप्रतिषेध मानला आहे तरी, त्या पदाची 'दीर्घादाचार्याणाम्' या सूत्रांत अनुवृत्ति करतांना तो प्रसज्यप्रतिषेध न मानतां, शब्दाधिकाराचा आश्रय करून पर्युदास मानला आहे. पर्युदास व प्रसज्यप्रतिषेध या दोहोंमध्यें हा फरक आहे कीं पर्युदासामध्यें 'नञ्' चा संबंध उत्तरपदाशीं असतो व प्रसज्यप्रतिषेधामध्यें 'नञ्'चा संबंध क्रियेशीं असतो. 'अनचि' हा पर्युदास मानल्यानें 'नञिवयुक्तमन्यसदृशाधिकरणे'—परि. ७५— या परिभाषान्वयें त्या पदाचा 'अज्भिन्ने किन्तु अच्सदृशे' असा अर्थ होतो. अचाहून भिन्न पण अचाशीं सदृश असा हल्‌च आहे; कारण दोहोंमध्यें वर्णत्व ही जाति आहे. त्यामुळें 'दीर्घादाचार्याणाम्' या सूत्राचा प्रकाशकार 'सर्वेषामाचार्याणां मते दीर्घात्परस्य यरो हलि परे एव द्वे न स्तः' असा अर्थ करतात. असा अर्थ केल्यानें 'वाक्' या स्थलीं दीर्घ आकारापुढें 'क्' हा यर् असून त्यापुढें हल् नसल्यामुळें, त्या ककाराचें द्वित्व करण्यांत कांहीं प्रत्यवाय येत नाहीं. पण असा त्या सूत्राचा अर्थ करण्याकरितां त्या सूत्रांत 'अनचि' या पदाची मण्डूकप्लुतीनें अनुवृत्ति करावी लागते व

अशी अनुवृत्ति करणे हा दोष मानला आहे व भाष्यकारानी तशी अनुवृत्ति केली नसल्यामुळे, तशा प्रकारची अनुवृत्ति करण्यास कोणताहि आधार नाही. दुसरे असे की, 'अनचि च' या सूत्रात जरी 'अनचि' हा प्रसज्यप्रतिषेध मानला आहे तरी, त्या पदाची 'दीर्घादाचार्याणाम्' या सूत्रात अनुवृत्ति करतेवेळी तो प्रसज्यप्रतिषेध न मानता व अर्थाधिकाराचा आश्रय न करिता, शब्दाधिकाराचा आश्रय करून पर्युदास मानला आहे असे करणे देखील गौरवरूप दोषयुक्त आहे व भाष्यकारानी असे केले नसल्यामुळे, तसे करण्यास कोणताहि आधार नाही. म्हणून एवढी सर्व दोषयुक्त खटपट करण्यापेक्षा 'दीर्घादाचार्याणाम्' हे द्विर्वचननिषेधाचे सूत्र नित्य न मानता वैकल्पिक मानणे अथवा 'अनचि च' हे सूत्र असल्यामुळें व त्या सूत्राने द्वित्वकार्याचा विकल्प सिद्ध होऊ शकत असल्यामुळे, 'दीर्घादाचार्याणाम्' या सूत्राचे प्रत्याख्यान करणे योग्य आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे असे शब्दरत्नकाराचे म्हणणे आहे. 'अवसाने च' हे वार्तिक 'अनचि च' या सूत्रावरील भाष्यात पठित केले आहे. पण भाष्यकारानी त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान केले आहे हे पूर्वी सांगितलेच आहे. ते वार्तिक प्रतिप्रसवरूपानें 'दीर्घादाचार्याणाम्' या सूत्रावर भाष्यकारानी पठित केले नाही. तसे वार्तिक त्या सूत्रावर पठित केले असते तर 'वाक्क्' असे पाक्षिक रूप सिद्ध होऊ शकले असते. म्हणून वर सांगितल्याप्रमाणे 'दीर्घादाचार्याणाम्' हे नित्य द्वित्वनिषेधक सूत्र न मानता द्वित्वकार्याचा वैकल्पिक निषेध करणारे ते सूत्र आहे व त्या सूत्रातील 'आचार्याणाम्' हे पद पूजार्थक नसून विकल्पार्थक आहे हेच मानणे उचित आहे. तसे मानल्याने 'वाक् वाक्क्' अशी पाक्षिक रूपें सिद्ध होण्यात काही अडचण येत नाही.) माधवाने 'दीर्घादाचार्याणाम्' हा निषेध वैकल्पिक मानला असल्यामुळें, जसे 'सर्वत्र शाकल्यस्य' हे सूत्र गतार्थ—व्यर्थ—ठरते त्याचप्रमाणे 'दीर्घादाचार्याणाम्' हे सूत्र देखील व्यर्थ ठरते,

(कारण 'अनचि च' या सूत्रांत 'वा' या पदाची अनुवृत्ति केल्यानें व 'अनचि' हा प्रसज्यप्रतिषेध मानल्यानें पूर्वी सांगितल्याप्रमाणें सर्व इष्ट रूपांची सिद्धि होऊं शकत असल्यामुळें, 'सर्वत्र शाकल्यस्य, त्रिप्रभृतिषु शाकटायनस्य, दीर्घादाचार्याणाम्' हीं तीन्ही द्वित्वकार्याचा वैकल्पिक निषेध सांगणारीं सूत्रें त्या सूत्राचीच अनुवादक सूत्रें ठरून व्यर्थ ठरतात. 'उक्तिरेवासती' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यावर एका वैयाकरणाचें–खण्डनकाराचें–असें म्हणणें आहे कीं, 'नादिन्याक्रोशे पुत्रस्य' सू. ५५ इत्यादि सूत्रांचें व्याख्यान करितांना काशिकाकारानें ('अनचि चेति प्राप्तिः प्रतिषिध्यते,' म्हणजे) 'अनचि च' या सूत्रानें प्राप्त होणाऱ्या द्वित्वकार्याचा निषेध करणारें 'नादिन्याक्रोशे' हें सूत्र आहे (व तसेंच 'शरोऽचि' सू. ३४० या सूत्राचें व्याख्यान करितांना 'अचो रहाभ्यामिति प्राप्तिः प्रतिषिध्यते,' म्हणजे 'अचो रहाभ्यां द्वे' सू. ५९ या सूत्रानें प्राप्त होणाऱ्या द्वित्वकार्याचा निषेध करणारें 'शरोऽचि' हें सूत्र आहे) असें म्हटलें आहे; परंतु 'त्रिप्रभृतिषु शाकटायनस्य' व 'सर्वत्र शाकल्यस्य' या सूत्रांचें व्याख्यान करितांना काशिकाकारानें 'अनचि च' या सूत्रानें प्राप्त होणाऱ्या द्वित्वकार्याचा निषेध करणारीं तीं दोन सूत्रें आहेत असें म्हटलें नाहीं. तथापि 'दीर्घादाचार्याणाम्' या सूत्रावरील काशिकावृत्तीचें व्याख्यान करितांना हरदत्तानें ('दात्रमित्यादावनचि चेति प्राप्तिः' म्हणजे 'दात्रम्' इत्यादि उदाहरणांत) 'अनचि च' या सूत्रानें प्राप्त होणाऱ्या द्वित्वकार्याचा निषेध करणारें 'दीर्घादाचार्याणाम्' हें सूत्र आहे असें पदमञ्जरींत म्हटलें आहे. त्या वैयाकरणाच्या–खण्डनकाराच्या–म्हणण्याचा आशय हा आहे कीं, जेथें निषेध वैकल्पिक आहे तेथें ज्या विधिसूत्राचा तो वैकल्पिक निषेध आहे त्या विधिसूत्राची प्राप्ति दाखविण्याची कांहीं गरज नाहीं; कारण जेथें निषेध वैकल्पिक आहे तेथें विधिसूत्रानें सांगितलेलें कार्य वैकल्पिक ठरतें व त्या विधिसूत्रानें प्राप्त न होणाऱ्या विकल्पाचें तें

विधिसूत्र (त्याचा निषेध करणारें सूत्र वैकल्पिक असल्यामुळें) विधायक ठरतें. पण जेथें निषेधक सूत्रानें सांगितलेला निषेध (वैकल्पिक नसून) नित्य आहे तेथें ज्या विधिसूत्राचा तें निषेधक सूत्र निषेध करतें त्या विधिसूत्राची प्राप्ति दाखविणें आवश्यक आहे. परंतु हें (खण्डनकाराचें) म्हणणें बरोबर नाहीं; कारण निषेध जरी वैकल्पिक असला तरी हे निषेधक प्रकरण असल्यामुळें, म्हणजे 'नादिन्याक्रोशे पुत्रस्य' या सूत्रापासून निषेधप्रकरणाचा प्रारंभ झाला असल्यामुळें, व त्या निषेध-प्रकरणांत पठित असलेल्या सर्व सूत्रांत ('नादिनि' या सूत्रांतील) नञाचा जो संबंध होतो त्याचा उल्लेख करणें आवश्यक असल्यामुळें, ज्या विधिसूत्रानें प्राप्त होणाऱ्या द्वित्वकार्याचा वैकल्पिक निषेध सांगितला आहे त्या विधिसूत्राची प्राप्ति दाखविणें आवश्यक आहे. मध्यें पठित असलेल्या ('त्रिप्रभृतिषु शाकटायनस्य,' 'सर्वत्र शाकल्यस्य' या दोन) सूत्रांत ('नादिनि' या सूत्रांतील) 'नञ्' ची अनुवृत्ति न करणें व त्यांच्यानंतर पठित असलेल्या ('दीर्घादाचार्याणाम्' या) सूत्रांत मण्डूकप्लुतीनें अनुवृत्ति करणें याला कांहीं प्रमाण नाहीं, म्हणजे तशा प्रकारची मण्डूकप्लुतीनें 'नञ्' ची अनुवृत्ति करणें अयोग्य आहे. दुसरें असें कीं, 'सर्वत्र शाकल्यस्य' या निषेधक सूत्रानें सर्व द्वित्वविधायक सूत्रांनीं प्राप्त होणाऱ्या द्वित्वकार्यांचा निषेध केला आहे (व विशिष्ट सूत्राने प्राप्त होणाऱ्या द्वित्वकार्याचा निषेध केला नाहीं) हे बोधित करण्याच्या हेतूनें त्या सूत्रावरील वृत्तींत काशिकाकारानें किंवा हरदत्तानें विधिसूत्राचा उल्लेख केला नाहीं. आणखी असें कीं, 'त्रिप्रभृतिषु शाकटायनस्य' या सूत्रावरील काशिकावृत्तीचें व्याख्यान करितांना हरदत्तानें 'नकारषकारयोर्द्विर्वचनाभावः'–म्हणजे 'अनचि च' या सूत्रानें 'इन्द्रम्' या स्थलीं जी नकाराचें द्विर्वचन होण्याची प्राप्ति आहे व 'राष्ट्रम्' या स्थलीं जी षकाराचें द्विर्वचन होण्याची प्राप्ति आहे तिचा निषेध करणारें 'त्रिप्रभृतिषु शाकटायनस्य' हें निषेधक सूत्र आहे–अशी जी मिश्र पंक्ति लिहिली आहे

त्या पंक्तींत त्यानें 'अनचि च' या द्वित्वविधायक सूत्राच्या प्राप्तीचा उल्लेख केल्यासारखाच आहे. आणखी असें कीं, काशिकावृत्तींत व हरदत्ताच्या पदमञ्जरींत 'नादिन्याक्रोशे पुत्रस्य' व 'शरोऽचि' या दोन्ही नित्यनिषेधक सूत्रांवरील टीकेंत देखील त्या दोन ग्रन्थांच्या बऱ्याच प्रतींत ज्या विधिसूत्रांनीं द्वित्वकार्याची प्राप्ति आहे त्या विधिसूत्रांचा उल्लेख केलेला आढळत नाही. (खण्डनकाराचें काय म्हणणें आहे व शब्दरत्नकारांनी त्याचें म्हणणें कसें खोडून टाकलें आहे याचें विवरण करण्यापूर्वी, भावप्रकाशांत खण्डनकाराच्या म्हणण्याचा आशय काय आहे हें विस्तृत रीतीनें सांगितलें असल्यामुळें, त्या टीकेचा उतारा येथें देणें इष्ट वाटतें. भावप्रकाशकार म्हणतात : 'खण्डनकारोक्ति खण्डयति यत्त्वित्यादिना। तस्यायमाशयः। पूजार्थतायाः प्रामाणिकैरनुक्तेरित्ययुक्तम्। मुनित्रयस्यात्रौदासीन्येऽपि त्रिप्रेतिसूत्रकैयटाद्युक्त्या विकल्पस्यैव सर्वाङ्गीकृतप्रामाण्यकपूर्वतनवृत्तिहरदत्ताद्युक्त्या आचार्यग्रहणस्य पूजार्थत्वस्यैव लाभात्। माधवस्त्वयुक्त एव। प्रातिशाख्यभाष्ये आत्वारयमित्यत्र द्वित्वविकल्पोक्तिश्छान्दसत्वेन निर्वाह्या। वाक्क् इत्यादिसिद्धिस्तूक्तरीत्योक्तैवेति।' 'दीर्घादाचार्याणाम्' या सूत्रांतील आचार्यग्रहण विकल्पार्थक नसून पूजार्थक आहे व त्यामुळें तें सूत्र द्वित्वकार्याचा वैकल्पिक निषेध करणारें सूत्र न ठरतां त्या कार्याचा नित्य निषेध करणारें सूत्र ठरतें असें जें प्रकाशकारांचें मत आहे त्याचें समर्थन करण्याकरितां व त्या मताविरुद्ध 'पूजार्थतायाः प्रामाणिकैरनुक्तेः' असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे तें खोडून काढण्याकरितां प्रकाशकारानुयायी खण्डनकार असें म्हणतो कीं, काशिकाकार व हरदत्त या प्राचीन मान्य वैयाकरणांनीं आचार्यग्रहण पूजार्थक मानून 'दीर्घादाचार्याणाम्' हा द्वित्वकार्याचा नित्य निषेध मानला आहे. हें खरें कीं, त्यांनीं त्या सूत्राचें व्याख्यान करितांना 'आचार्यग्रहणं पूजार्थम्' असें आपल्या टीकेंत स्पष्ट म्हटलें नाहीं. तरी पण 'नादिन्याक्रोशे पुत्रस्य' व

'शरोऽचि' ही द्वित्वकार्याचा निषेध करणारी सूत्रे आहेत हें सर्वांना मान्य आहे व त्या सूत्राचे व्याख्यान करिताना ज्या द्वित्वविधायक सूत्राने प्राप्त होणाऱ्या द्वित्वकार्याचा ती नित्य द्वित्वनिषेधक सूत्रे निषेध करतात त्याचा उल्लेख काशिकाकाराने काशिकेत केला आहे व 'दीर्घादाचार्याणाम्' या द्वित्वनिषेधक सूत्राचे व्याख्यान करिताना ते सूत्र कोणत्या विधिसूत्रानें प्राप्त होणाऱ्या द्वित्वकार्याचा निषेध करते याचा जरी काशिकेत उल्लेख केला नाही तरी हरदत्ताने त्या सूत्राचे व्याख्यान करिताना ज्या 'अनचि च' या सूत्राने 'दात्रम्' इत्यादि उदाहरणात द्वित्वाची प्राप्ति आहे त्या द्वित्वविधायक सूत्राचा पदमञ्जरीत उल्लेख केला आहे. परतु 'त्रिप्रभृतिषु शाकटायनस्य' व 'सर्वत्र शाकल्यस्य' ही दोन सूत्रे द्वित्वकार्याचा वैकल्पिक निषेध करणारी सूत्रे आहेत हे सर्वांना संमत आहे व त्या सूत्राचे व्याख्यान करिताना काशिकाकारानें किंवा हरदत्ताने ती निषेधक सूत्रे कोणत्या विधिसूत्रानें प्राप्त होणाऱ्या द्वित्वकार्याचा विकल्पेंकरून निषेध करतात याचा उल्लेख आपल्या टीकेत केला नाही. याचे कारण हे की जे निषेधक सूत्र एखाद्या कार्याचा विकल्पेंकरून निषेध करते ते सूत्र कोणत्या विधिसूत्रानें होणाऱ्या कार्याचा वैकल्पिक निषेध करते याचा उल्लेख करण्याची काही आवश्यकता नाही, कारण 'निषेधविकल्पे विधिविकल्पस्य फलितत्वात्'—म्हणजे जेथे वैकल्पिक निषेध सांगितला आहे तेथें ज्या विधिसूत्राने प्राप्त होणाऱ्या कार्याचा वैकल्पिक निषेध केला आहे ते विधिसूत्र वैकल्पिक ठरून त्या सूत्रानें होणारे कार्य विकल्पेंकरून होते—असा न्याय असल्यामुळे, ज्या विधिसूत्राने प्राप्त होणाऱ्या कार्याचा वैकल्पिक निषेध केला जातो त्याची प्राप्ति दाखविण्याची काही गरज नाही. पण जेथें नित्यनिषेध सांगितला आहे तेथें ज्या विधिसूत्रानें प्राप्त होणाऱ्या कार्याचा नित्यनिषेध केला आहे त्या विधिसूत्राची प्राप्ति दाखविणे व त्या सूत्राचा उल्लेख करणे आवश्यक आहे. असा नियम असल्यामुळें व सर्वसंमत नित्यनिषेधक

'नादिन्याक्रोशे' व 'शरोऽचि' या दोन सूत्रांवरील वृत्तींत जशी काशिकाकारानें ज्या विधिसूत्रांचीं तीं निषेधक सूत्रें आहेत त्यांची प्राप्ति दाखविली आहे व त्यांचा उल्लेख केला आहे त्याचप्रमाणें 'दीर्घादाचार्याणाम्' या सूत्रावरील पदमञ्जरींत मान्य हरदत्तानें ज्या विधिसूत्रानें प्राप्त होणाऱ्या कार्याचा तें सूत्र निषेध करतें त्या विधिसूत्राची प्राप्ति दाखविली असून त्या विधिसूत्राचा उल्लेख केला असल्यामुळें त्या उल्लेखावरूनच हें स्पष्ट होतें कीं, 'दीर्घादाचार्याणाम्' हें नित्यनिषेधाचें सूत्र आहे व तें नित्यनिषेधाचें सूत्र ठरण्याकरितां आचार्यग्रहण विकल्पार्थक न मानतां पूजार्थक मानणें आवश्यक असल्यामुळें, 'आचार्यग्रहणं पूजार्थम्' असें जें प्रकाशकारांनी म्हटलें आहे तें अगदीं योग्य ठरतें व दीक्षितांचें म्हणणें चूक ठरतें. त्याचप्रमाणें 'आस्ते' या स्थलीं आकारापुढील सकाराचें विकल्पेंकरून द्वित्व होऊं शकतें असें जें माधवानें म्हटलें आहे तें देखील सारखेंच चूक ठरतें; कारण वर सांगितल्याप्रमाणें 'दीर्घादाचार्याणाम्' हें नित्यनिषेधाचें सूत्र ठरत असल्यामुळें, 'आ' या दीर्घ अचापुढील सकाराचें द्वित्व होऊं शकत नाहीं. हें खरें कीं, प्रातिशाख्यावरील भाष्यांत 'आ त्वा रथम्' या श्रुतींतील 'आ' या दीर्घ अचापुढें असणाऱ्या तकाराचें वैकल्पिक द्वित्व प्राप्त आहे असें म्हटलें आहे. पण तें म्हणणें जरी 'दीर्घादाचार्याणाम्' या सूत्रान्वयें चूक ठरतें तरी, 'सर्वे विधयश्छन्दसि विकल्प्यन्ते'–परि. ३५–या न्यायान्वयें त्या भाष्याची सङ्गति लावतां येते. सारांश काशिकाकार व हरदत्त या प्राचीन मान्य वैयाकरणांच्या मताकडे दुर्लक्ष करून व अर्वाचीन वैयाकरणांच्या मताचा पुरस्कार करून दीक्षितांनीं प्रकाशकारांचें मत खण्डन करण्याचा जो प्रयत्न केला आहे त्याचें कोणत्याहि रीतीनें समर्थन करतां येत नाहीं व 'आचार्यग्रहणं पूजार्थम्' हें जें प्रकाशकारांनीं म्हटलें आहे तेंच मानणें योग्य आहे असा खण्डनकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. यावर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, नित्यनिषेधाचें सूत्र असल्यास

ज्या विधिसूत्राने प्राप्त होणाऱ्या कार्याचा तें सूत्र निषेध करते त्या विधिसूत्राची प्राप्ति दाखविणे व त्या सूत्राचा उल्लेख करणे आवश्यक आहे आणि जेथे निषेधक सूत्र विकल्पेकरून निषेध होणे सागते तेथे तसे करण्याची कांही आवश्यकता नाही असा जो नियम खण्डनकाराने सागितला आहे त्या नियमाला कोणता आधार आहे हे त्यानें सागितले नाही व तसा नियम कोठें सागितला नसून तो निराधार स्वकपोल-कल्पित असल्यामुळे, तो मुळीच मानता येत नाही. तो नियम मानल्यास, ज्या प्राचीन काशिकाकाराचा व हरदत्ताचा आधार घेऊन खण्डनकाराने दीक्षिताचे म्हणणे खोडून काढण्याचा प्रयत्न केला आहे त्यानीच त्या नियमाचे उल्लघन केले आहे असे म्हणणे भाग पडेल; कारण 'दीर्घादाचार्याणाम्' हे नित्यनिषेध करणारे सूत्र आहे असे मानल्यास, काशिकाकाराने आपल्या वृत्तीत ज्या विधिसूत्राने प्राप्त होणाऱ्या कार्याचा ते सूत्र निषेध करते त्याची प्राप्ति दाखविली नाही व त्या विधिसूत्राचा उल्लेख केला नाही आणि तसेच 'त्रिप्रभृतिषु शाकटायनस्य' हे जे वैकल्पिक निषेधाचे सूत्र आहे त्या सूत्रावरील पदमञ्जरीत हरदत्ताने 'नकारपकारयोर्द्विवचनाभावः' असे सागून 'अनचि च' या विधिसूत्राची एकप्रकारे प्राप्ति दाखविली आहे. म्हणून खण्डनकाराने सागितलेला नियम मुळीच स्वीकारता येत नाही. वास्तविक निषेधक सूत्र नित्य असो किंवा वैकल्पिक असो, त्या सूत्रात नञ्चा साक्षात् निर्देश असतो किंवा अनुवृत्ति असतेच व त्या निर्दिष्ट किंवा अनुवृत्त असलेल्या नञ्चा अर्थ बोधित करण्याकरिता ज्या विधिसूत्राचा नित्य किंवा वैकल्पिक निषेध केला जातो त्या विधि-सूत्राची प्राप्ति दाखविणे व त्याचा उल्लेख करणे इष्ट व आवश्यक आहे. म्हणून ज्या निषेधक सूत्राचे व्याख्यान करिताना विधिसूत्राची प्राप्ति दाखविली आहे ते नित्यनिषेधाचे सूत्र आहे व ज्या निषेधक सूत्राचे व्याख्यान करिताना विधिसूत्राची प्राप्ति दाखविली नाही ते विकल्पाने निषेध करणारे सूत्र आहे असे मुळीच मानता येत नाही.

त्यामुळें 'दीर्घादाचार्याणाम्' या सूत्रावरील वृत्तींत हरदत्तानें 'अनचि च' या सूत्राची जी प्राप्ति दाखविली आहे तेवढ्याच कारणावरून तें नित्यनिषेधाचें सूत्र ठरतें असें जें खण्डनकारानें म्हटलें आहे तें अयोग्य ठरतें. सारांश काशिकाकार व हरदत्त यांनीं 'दीर्घादाचार्याणाम्' हें नित्यनिषेधाचें सूत्र आहे असें कोठेंहि म्हटलें नसल्यामुळें व 'नादिन्याक्रोशे' व 'शरोऽचि' हीं जीं दोन सर्वसंमत नित्यनिषेधाचीं सूत्रें आहेत त्यावरील काशिकावृत्तीच्या व पदमञ्जरीच्या अनेक उपलब्ध प्रतींत ज्या विधिसूत्रांचा तीं सूत्रें निषेध करतात त्यांची प्राप्ति दाखविली नसल्यामुळें आणि वैकल्पिक निषेध करणाऱ्या 'त्रिप्रभृतिषु' या सूत्रावरील वृत्तींत हरदत्तानें विधिसूत्राची प्राप्ति दाखविली असल्यामुळें व 'सर्वत्र शाकल्यस्य' हें वैकल्पिक निषेधाचें सूत्र वर्णद्वित्वाचें विधान करणाऱ्या सर्व विधिसूत्रांचा निषेध करणारें सूत्र आहे हें बोधित करण्याच्या हेतूनें त्या सूत्रावरील वृत्तींत काशिकाकारानें किंवा हरदत्तानें विधिसूत्राची प्राप्ति दाखविली नसल्यामुळें, खण्डनकारानें जो नियम सांगितला आहे व ज्याच्या आधारावर त्यानें दीक्षितांचें मत खण्डन करण्याचा प्रयत्न केला आहे तो नियम स्वीकारतां येत नाहीं आणि तो नियम सिद्ध होत नसल्यामुळें, त्याचें म्हणणें चूक ठरतें हें उघड आहे. आतां खण्डनकार असें म्हणतो कीं, 'त्रिप्रभृतिषु' व 'सर्वत्र शाकल्यस्य' हीं वैकल्पिक निषेधाचीं सूत्रें नसून वास्तविक वैकल्पिकद्वित्वविधायक सूत्रें आहेत व अवशिष्ट तीन सूत्रांपैकीं जशीं 'नादिन्याक्रोशे' व 'शरोऽचि' हीं दोन सर्वसंमत नित्यद्वित्वनिषेधक सूत्रें आहेत त्याचप्रमाणें 'दीर्घादाचार्याणाम्' हें देखील नित्यद्वित्वनिषेधकच सूत्र आहे असें मानलें पाहिजे; कारण तीन द्वित्वनिषेधक सूत्रांपैकीं दोन सूत्रें नित्यनिषेधक सूत्रें आहेत व एक वैकल्पिक निषेधाचें सूत्र आहे असा भेद करण्यास कांहींच प्रमाण नाहीं. पण शब्दरत्नकार म्हणतात कीं, खण्डनकाराचें हें म्हणणें देखील बरोबर मानतां येत नाहीं; कारण 'त्रिप्रभृतिषु' व

'सर्वत्र शाकल्यस्य' ही जर वैकल्पिकद्वित्वविधायक सूत्रे असती तर ती 'अनचि च' या सूत्राच्या लगेच पुढे पठित केली असती व 'नादिन्याक्रोशे' या सूत्रापासून जे निषेधप्रकरण सुरू होते त्या निषेधप्रकरणात ती सूत्रे पठित केली नसती. वर्णद्वित्वनिषेधक प्रकरणात एकदर पाच सूत्रें पठित केली आहेत. 'नादिन्याक्रोशे' या प्रथम सूत्रात 'नञ्' साक्षात् निर्दिष्ट आहे व त्या नञाची अनुवृत्ति पुढील चार सूत्रात होते त्या नञाची अनुवृत्ति लगेच पुढे पठित असलेल्या 'शरोऽचि' या सूत्रात होते व त्याच्या पुढील 'त्रिप्रभृतिषु' व 'सर्वत्र शाकल्यस्य' या दोन सूत्रात नञाची अनुवृत्ति होत नाही आणि 'दीर्घादाचार्याणाम्' या अखेरच्या पाचव्या सूत्रात नञाची मण्डूकप्लुतीने अनुवृत्ति होते हे मानण्यास काहीच प्रमाण नसल्यामुळे, ते म्हणणे बरोबर मानता येत नाही सारांश द्वित्वनिषेधप्रकरणात पठित असलेल्या पाच सूत्रांपैकी ज्या तीन सूत्रात पूर्वाचार्यांचा निर्देश केला आहे त्यातील प्रथम दोन सूत्रे जशी वैकल्पिक निषेधाची सूत्रे मानली आहेत त्याचप्रमाणे पूर्वाचार्यांचा निर्देश ज्यात केला आहे ते 'दीर्घादाचार्याणाम्' हे तिसरे सूत्र देखील वैकल्पिक निषेधाचे सूत्र आहे असेच मानणे योग्य आहे व तसे मानले असता, प्रकाशकाराचे म्हणणे चूक ठरून दीक्षिताचे म्हणणे योग्य ठरते असा शब्दरत्न-काराच्या म्हणण्याचा आशय आहे )

मनोरमा––स्थानिवदादेशः । 'धात्वङ्गकृत्तद्धिताव्ययसुप्तिङ्पदादेशाः' इति प्राचोक्तम् । तत् परिगणनम्, उदाहरणमात्रं वा ? । नाद्यः, सिच्वसचड्डादीनां श्नादेशस्य शानशश्चासङ्ग्रहापत्तेः । नान्त्यः, अव्ययस्याङ्गपदाभ्यां पृथग्ग्रहणवैयर्थ्यात् । प्रस्तुत्येति वृत्तिकारोक्तं तदुदाहरणमपि मन्दम्, क्त्वामात्रस्यानव्ययत्वात्, कृत्त्वेन सिद्धत्वाच्चेत्याशयेनाह––आदेश इति । अनल्विधाविति किम् ! तेन, तस्मात् तस्य, तस्मिश्च विधौ मा भूत् । तत्र अला विधौ यथा–द्यूढोरस्केन । अत्र सकारस्य स्थानिवत्त्वेन विसर्गवदट्त्वमाश्रित्य

"अड्व्यवाये" इति णत्वं प्राप्तम्। अलः परस्य—द्यौः, पन्थाः, हल्ङ्याब्भ्यादिलोपो न। अलो विधौ—द्युकामः, वलि लोपो न। अलि विधौ—यजेः क्तः, क इष्टः, "हशि च" इत्युत्वं न। अल् चेह स्थान्यवयव एव गृह्यते। तेन रामायेत्यादौ "सुपि च" इति दीर्घः सिद्धः। तद्विधो हि यञादित्वमाश्रितं यञ्चादेशावयवो न तु स्थान्यवयव इति तदेतत्सकलमभिप्रेत्याह—न तु स्थान्यलाश्रय इति। आश्रयणं चेह यथाकथंचिन्न तु प्राधान्येनैवेत्याग्रहः। तेन प्रपठ्येत्यत्र वलादिलक्षण इण् न। तन्निषेधादिति। स्थानिवत्त्वनिषेधादित्यर्थः॥

('स्थानिवदादेशः' सू. ४९ या सूत्राचें व्याख्यान करितांना प्रक्रियाकौमुदीकारानी 'धात्वङ्गकृत्तद्धिताव्ययसुप्तिङ्पदादेशाः स्थानिवत् स्युः' असें म्हटलें आहे. या पंक्तीचा अर्थ असा आहे कीं, धातूचे, अङ्गाचे, कृत् व तद्धित प्रत्ययांचे, अव्ययाचे, सुप्‌चे, तिङ्‌चे व पदाचे जागीं होणारे आदेश स्थानिवत् होतात, म्हणजे तशा स्थानीला मानून जीं कार्यें प्राप्त होतात तीं स्थानीचे जागी आदेश झाल्यावरहि होतात. या पंक्तीचा अर्थ नीट ध्यानांत येण्याकरितां प्रसादकारांनीं आपल्या टीकेंत जीं उदाहरणें दिलीं आहेत ती देणें आवश्यक वाटतें. (१) धातूचे ठिकाणी होणारा आदेश धातुवत् होतो याचें उदाहरण 'अस्तेर्भूः' सू. २४७० हें आहे. 'अस्' धातूहून 'ण्वुल्तृचौ' सू. २८९५ या सूत्रानें तृच्प्रत्यय करणें विवक्षित असता, तो प्रत्यय आर्धधातुक असल्यामुळें, 'अस्तेर्भूः' या सूत्रानें 'अस्' धातूचे जागीं 'भू' असा आदेश होतो व त्या आदेशाला स्थानिवद्भावानें धातुसंज्ञा होत असल्यामुळें, त्याहून तृच्प्रत्यय होऊन व गुण, इडागम, व अवादेश होऊन 'भविता' असें रूप सिद्ध होतें. (२) 'किम् + टा' या स्थली 'किमः कः' सू. ३४२ या सूत्रानें 'किम्' या अङ्गाचे जागीं 'क' असा आदेश होऊन त्या आदेशाला स्थानिवद्भावानें अङ्गसंज्ञा होते व हें अङ्ग अदन्त असल्यामुळें, 'टाङसिङसाम्' सू. २०१ या सूत्रानें 'टा' चे जागी 'इन' असा आदेश होऊन व 'आद्गुणः' सू. ६९

या सूत्रानें गुणरूप एकादेश होऊन 'केन' असें तृतीयेच्या एकवचनाचें रूप सिद्ध होतें. 'क' या आदेशाला स्थानिवद्भावानें अङ्गसंज्ञा झाली नसती तर 'टा' चे जागीं 'इन' आदेश होऊं शकला नसता. (३) 'प्र + कृ + क्त्वा' या स्थलीं 'समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप्' सू. ३३३२ या सूत्राने 'क्त्वा' या कृत् प्रत्ययाचे जागीं ल्यबादेश होतो व त्या आदेशाला स्थानिवद्भावानें कृत्संज्ञा प्राप्त होत असल्यामुळें, 'ह्रस्वस्य पिति कृति तुक्' सू. २८५८ या सूत्रानें तुगागम होऊन 'प्रकृत्य' असें रूप होतें. (४) 'अद्य' हें अव्यय असल्यामुळें, 'सायंचिरम्' सू. १३९१ या सूत्रान्वयें त्याला 'ट्युल् = यु' प्रत्यय व तुडागम होऊन आणि 'युवोरनाकौ' सू. १२४७ या सूत्रानें 'यु' चे जागीं 'अन' असा आदेश होऊन 'अद्यतन' असें रूप होतें. 'ट्युल्' हा तद्धित प्रत्यय असल्यामुळें, त्याचे जागीं होणारा 'अन' हा आदेश स्थानिवद्भावानें तद्धित प्रत्यय मानला जातो व त्यामुळें 'अद्यतन' हा शब्द तद्धितान्त ठरत असल्यामुळें, 'कृत्तद्धितसमासाश्च' सू. १७९ या सूत्रानें त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊन 'ङ्याप्प्रातिपदिकात्' सू. १८२ या अधिकारसूत्रान्वयें त्याहून सुबुत्पत्ति होऊन 'अद्यतनम्' इत्यादि रूपें सिद्ध होतात. (५) 'प्र + स्तु + क्त्वा' या स्थलीं 'क्त्वा' चे जागी 'समासेऽनञ्पूर्वे' या सूत्राने ल्यबादेश झाल्यावर, तो आदेश 'क्त्वा' च आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि केल्यानें, 'क्त्वातोसुन्कसुनः' सू. ४५० या सूत्रानें 'प्रस्तुत्य' याला अव्ययसंज्ञा प्राप्त होऊन 'अव्ययादाप्सुपः' सू. ४५२ या सूत्रानें सुब्लुक् होतो. (६) 'राम + ङे' या स्थलीं 'ङेर्यः' सू. २०४ या सूत्रानें 'ङे' चे जागी 'य' असा आदेश झाल्यावर त्याला स्थानिवद्भावानें सुप्संज्ञा होते व त्यामुळे 'सुपि च' सू. २०२ या सूत्रानें 'राम' हें अदन्त अङ्ग दीर्घ होऊन 'रामाय' असें रूप होतें. (७) 'भू + अ + तस्' या स्थलीं लोट्लकारात प्रथमपुरुषाच्या द्विवचनाच्या 'तस्' या तिङ् प्रत्ययाचे जागी, 'तस्थस्थमिपाम्'

सू. २१९९ या सूत्रान्वयें, 'ताम्' असा आदेश झाल्यावर तो आदेश स्थानिवद्भावानें तिङ मानला जातो व गुण व अवादेश होऊन 'भवताम्' असें जें रूप होतें तें तिङन्त ठरून 'सुप्तिङन्तं पदम्' सू. २९ या सूत्रानें त्याला पदसंज्ञा होते व ही पदसंज्ञा 'तस्' या तिङप्रत्ययाचे जागीं झालेल्या 'ताम्' या आदेशास स्थानिवद्भावानें तिङप्रत्यय मानल्यानेंच होते. (८) 'ग्रामो वः स्वम्' या स्थलीं 'बहुवचनस्य वस्नसौ' सू. ४०५ या सूत्रानें 'युष्माकम्' चे जागीं 'वस्' असा आदेश होऊन त्याला स्थानिवद्भावानें पदसंज्ञा होते व त्यामुळें 'ससजुषो रुः' सू. १६२ या सूत्रानें 'वस्' या पदाच्या अन्तीं असलेल्या सकाराचें रुत्व होऊन व 'खरवसानयोर्विसर्जनीयः' सू. ७६ या सूत्रानें रकाराचे जागीं विसर्ग होऊन 'वः' असें रूप होतें. आतां दीक्षित असा प्रश्न करितात कीं,) प्रक्रियाकौमुदीकारांनीं 'धात्वङ्गकृत्तद्धिताव्यय-सुप्तिङपदादेशाः' असें जें म्हटलें आहे तें परिगणन आहे, म्हणजे त्या पंक्तींत निर्दिष्ट असलेल्या 'धातु' इत्यादिकांचेच ठिकाणीं होणारा आदेश स्थानितुल्य होतो, किंवा हें केवळ उदाहरणरूपानें सांगितलें आहे ? पहिला परिगणन पक्ष मानतां येत नाहीं; कारण 'च्लि' चे जागीं होणारे 'सिच्, क्स, चङ, अङ' इत्यादि आदेश व तसेंच 'श्ना' चे जागीं होणारा 'शानच्' हा आदेश यांचा त्या परिगणनांत समावेश (केला नसल्यामुळें, ते आदेश स्थानितुल्य) न होण्याची आपत्ति येईल. ('च्लेः सिच्' सू. २२२२ या सूत्रानें 'च्लि' चे जागीं 'सिच्' आदेश होणें सांगितलें आहे. 'शलिगुपधादनिटः क्सः' सू. २३३६ या सूत्रानें 'च्लि' चे जागीं 'क्स' असा आदेश होणें सांगितलें आहे. 'णिश्रिद्रुस्रुभ्यः' सू. २३१२ या सूत्रानें 'च्लि' चे जागीं 'चङ' आदेश होणें सांगितलें असून 'पुषादिद्युतादि' सू. २३४३ या सूत्रानें 'च्लि' चे जागीं 'अङ' आदेश होणें सांगितलें आहे. 'हलःश्नः शानज्झौ' सू. २५५७ या सूत्रानें 'श्ना' चे जागीं 'शानच्' होणें सांगितलें आहे. हे आदेश

परिगणनांत निर्दिष्ट असलेल्या 'धातु' इत्यादिकांपैकीं कोणाचेहि जागीं झाले नसल्यामुळें स्थानिवत् न होण्याची आपत्ति येते व ते स्थानिवत् न मानल्यास कोणत्या आपत्ति येतील याचा विचार शब्दरत्नाचें व्याख्यान करतेवेळीं करण्यांत येईल.) द्वितीय पक्ष--म्हणजे उदाहरणपक्ष--देखील मानतां येत नाहीं; कारण 'अङ्ग' व 'पद' यांत अव्ययाचा समावेश होत असल्यामुळें, 'अव्यय' या शब्दाचें पृथक् ग्रहण व्यर्थ ठरतें. (शब्दरत्नाचें विवरण करितांना या पंक्तीचें विवरण करण्यांत येईल.) प्रक्रियाकौमुदीवर वृत्ति--टीका--लिहि-णारे प्रसादकार यानीं 'प्रस्तुत्य' हें जें अव्ययाचें उदाहरण दिलें आहे तें देखील बरोबर नाहीं; कारण केवळ 'क्त्वा' प्रत्ययाला अव्ययसंज्ञा नाहीं, (क्त्वाप्रत्ययान्ताला अव्ययसंज्ञा आहे) आणि परिगणनांत 'कृत्' चा निर्देश केला असल्यामुळें, त्या योगानें इष्टसिद्धि होऊं शकतेच. (प्रसाद-कारांनीं 'प्रस्तुत्य' हें अव्ययाचें उदाहरण देतांना, 'अव्ययस्य क्त्वो ल्यप्, तस्याव्ययत्वात् सुपो लुक्' असें म्हटलें आहे आणि या पंक्तीवर दीक्षितांचा कटाक्ष आहे. ते म्हणतात कीं, 'क्त्वा' या प्रत्ययाला अव्ययसंज्ञा नसून क्त्वान्ताला अव्ययसंज्ञा आहे व त्यामुळें ल्यपाला अव्ययसंज्ञा न होतां, ल्यबन्ताला स्थानिवद्भावानें अव्ययसंज्ञा होते. सारांश 'क्त्वा' चे जागीं झालेला ल्यबादेश अव्ययाचे जागीं झाला नसल्यामुळें, हें अव्ययाचें उदाहरण देणें बरोबर नाहीं असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे. पुढें ते असें म्हणतात कीं, प्रक्रियाकौमुदींतील पंक्तीत 'कृत्' चा निर्देश केला असल्यामुळें व 'क्त्वा' या कृत्प्रत्य-याचे जागीं झालेला ल्यबादेश स्थानिवद्भावानें 'कृत् क्त्वा' च आहे असें मानतां येत असल्यामुळें, 'प्रस्तुत्य' या क्त्वाप्रत्ययान्ताला 'क्त्वातोसुन्कसुनः' सू. ४५० या सूत्रानें अव्ययसंज्ञा होऊं शकतेच व त्यामुळें अव्ययाचें तें योग्य उदाहरण ठरत नाहीं. सारांश परिगणन करण्याची, किंवा अमुकाचे जागीं झालेला आदेश स्थानिवत् होतो असें प्रत्येकानें उदाहरण देऊन सांगण्याची कांहींच आवश्यकता

नसल्यामुळें, दीक्षित म्हणतात कीं, कौमुदींत) 'आदेशः स्थानिवत्स्यात्' असें सामान्य विधान केलें आहे. 'अनल्विधौ' असें म्हणण्याचें, म्हणजे या पदांत 'विधि' हा शब्द घालण्याचें, प्रयोजन हें आहे कीं, अलानें, किंवा अलापुढें असलेल्यास, किंवा अलाला, किंवा अलापूर्वी असलेल्याला विधि, म्हणजे कार्य करतेवेळीं आदेश स्थानिवत् न मानला जावा. ('स्थानिवत्' १·१·५६ या प्रकृत सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात–'अथ विधिग्रहणं किमर्थम्? सर्वविभक्त्यन्तः समासो यथा विज्ञायेत–अलः परस्य विधिः–अल्विधिः। अलो विधिः–अल्विधिः। अलि विधिः–अल्विधिः। अला विधिः–अल्विधिरिति।') 'अला विधिः' या तृतीयासमासाचें उदाहरण 'व्यूढोरस्केन' हें आहे. या उदाहरणांत विसर्गाचे जागीं झालेल्या सकारास स्थानिवत्, म्हणजे सकार विसर्गच आहे असें मानल्यास, विसर्गाचा अट्प्रत्याहारांत समावेश केला असल्यामुळें, 'अट्कुप्वाङ्' सू. १९७ या सूत्रान्वयें णत्वाची प्राप्ति होते. ('व्यूढं उरः यस्य' या स्थलीं 'उरः प्रभृतिभ्यः कप्' सू. ८८९ या सूत्रानें 'कप्' प्रत्यय होऊन 'व्यूढोरस्क' असें रूप होतें. 'व्यूढ+सु+उरस्+सु' येथें 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें 'सु' या दोन अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययांचा लुक् होऊन, पुढें 'उरः प्रभृतिभ्यः कप्' या सूत्रानें 'कप्' प्रत्यय केला असतां, 'व्यूढोरस्' याला 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू. २३० या सूत्रान्वयें पदसंज्ञा होते; कारण कप्प्रत्यय सर्वनामस्थानप्रत्यय नाहीं. त्यामुळें 'ससजुषो रुः' सू. १६२ या सूत्रानें 'व्यूढोरस्' यांतील अन्त्य सकाराचें रुत्व होऊन, 'खरवसानयोः' सू. ७६ या सूत्रानें रकाराचा विसर्ग होतो व त्या विसर्गापुढें कप्प्रत्ययांतील ककार हा खर् असल्यामुळें 'विसर्जनीयस्य सः' सू. १३८ या सूत्रानें त्या विसर्गाचे जागीं सकार होतो. विसर्गाचे जागीं झालेला हा सकार स्थानिवद्भावानें विसर्गच आहे असें मानलें तर अट्प्रत्याहारांत अयोगवाहांचे भाष्यकारांनीं 'अयोगवाहानामट्सूपदेशः कर्तव्यः'

इष्ट रूप सिद्ध होतें.) 'अलः विधिः' या षष्ठीसमासाचें 'द्युकामः' हें उदाहरण आहे. या स्थलीं वल्प्रत्याहारान्तर्गत वर्ण पुढें असून देखील लोप होत नाहीं. ('दिवं कामयते इति द्युकामः = दिव् ङस् काम' या स्थलीं 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें 'ङस्' प्रत्ययाचा जरी लुक् होतो तरी प्रत्यय लक्षणानें 'दिव्' याला पदसंज्ञा होते व 'दिव्' या पदाच्या अन्तीं असणाऱ्या वकाराचे जागीं 'दिव उत्' सू. ३३७ या सूत्रानें उकार होऊन व नंतर 'दि + उ' या स्थलीं यणादेश होऊन 'द्युकामः' असें रूप होतें. या उदाहरणांत वकार या अल्चे जागीं झालेला उकार हा स्थानिवद्भावानें 'व्'च आहे असें मानल्यास, त्यापुढें 'कामः' यांतील ककार हा वल् असल्यामुळें 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें त्या वकारस्थानिक उकाराचा लोप होण्याची आपत्ति येते. परंतु वकार या अलालाच मानून लोपरूप कार्य करणें प्राप्त असल्यामुळें व हें अल्स्थानिक कार्य असल्यामुळें, वकाराचे जागीं झालेल्या 'उ' या आदेशाला हा 'व्'च आहे असें मानतां येत नाहीं आणि त्यामुळें उकारलोप न होतां 'द्युकामः' हें इष्ट रूप सिद्ध होतें.) 'अलि विधिः' या सप्तमीसमासाचें उदाहरण 'क इष्टः' हें आहे. या स्थलीं 'यज्' धातूहून 'क्त = त' प्रत्यय झाला आहे (व तो प्रत्यय कित् असल्यामुळें 'वचिस्वपियजादीनां किति' सू. २४०९ या सूत्रानें 'यज्' यांतील यकाराचें संप्रसारण होऊन व 'सम्प्रसारणाच्च' सू. ३३० या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन व 'व्रश्चभ्रस्ज' सू. २९४ या सूत्रानें 'यज्' धातूंतील जकाराचे जागीं षकार होऊन आणि 'ष्टुना ष्टुः' सू. ११३ या सूत्रानें प्रत्ययांतील तकाराचा टकार होऊन 'इष्ट' असे क्तप्रत्ययान्त रूप झालें आहे. यकार या हश्प्रत्याहारान्तर्गत अलाचे जागीं 'इग्यणः सम्प्रसारणम्' सू. ३२८ या सूत्रानें झालेला संप्रसारणरूप इकार हा 'य्'च आहे व हा 'हश्'च आहे असें मानल्यास, 'क + सु + इष्टः' या स्थलीं 'क सु' या पदाच्या अन्तीं असलेल्या 'सु = स्' चें

'ससजुषो रुः' सू. १६२ या सूत्रानें रुत्व केल्यावर त्या 'रु' चें 'हशि च' सू. १६६ या सूत्रानें उत्व होण्याची आपत्ति येते. परंतु इकार हा आदेश 'य्' या अल्चे जागीं झाला असल्यामुळें व तन्निमित्तक उत्वकार्य करणें असल्यामुळें, इकार हा 'य्' च आहे असें स्थानिवद्भावानें मानतां येत नाहीं व त्यामुळें या उदाहरणांत) 'हशि च' या सूत्रानें होणारें उत्व होत नाहीं. (याचें विवरण शब्दरत्नांत विस्तृत रीतीनें करण्यांत येईल.) 'अनल्विधौ' या प्रतिषेधांत असणाऱ्या 'अल्' नें स्थानीचा अवयव असलेल्याच अल्चें ग्रहण होतें आणि असें असल्यामुळेंच, 'रामाय' इत्यादि स्थलीं 'सुपि च' सू. २०२ या सूत्रानें होणारें दीर्घकार्य सिद्ध होतें. दीर्घकार्य करण्याकरितां विभक्तिप्रत्ययाचा आद्य वर्ण यञ्प्रत्याहारान्तर्गत वर्ण असावा याचा आश्रय केला जातो. 'रामाय' या उदाहरणांत 'यञ्' हा स्थानीचा अवयव नसून आदेशाचा अवयव आहे आणि हें सर्व लक्षांत घेऊनच प्रकृत सूत्रावरील कौमुदींत 'न तु स्थान्यलाश्रयविधौ' असें म्हटलें आहे. ('राम + ङे' या स्थलीं 'ङेर्यः' सू. २०४ या सूत्रानें 'ङे' या प्रत्ययाचे जागीं 'य' हा आदेश झाला आहे आणि हा आदेश स्थानिवद्भावानें 'सुप्' मानला जातो. हा आदेश स्वतःच यञादि असल्यामुळें, 'सुपि च' या सूत्रानें 'राम' या अदन्त अङ्गांतील अन्त्य अकार दीर्घ होतो. जर आदेश यञादि नसता व तो यञ्प्रत्याहारान्तर्गत अल्रूप स्थानीचे जागीं झाला असता तर, तो आदेश यञादि आहे असें स्थानिवद्भावानें मानतां आलें नसतें; कारण स्थानींतील अलाच्या निमित्तानें प्राप्त होणारें कार्य करणें झाल्यास, आदेश स्थानिवत् मानला जात नाहीं असा 'अनल्विधौ' या प्रतिषेधाचा अर्थ आहे. पण 'रामाय' या उदाहरणांत 'ङे = ए' या अलाचे जागीं झालेला 'य' हा आदेश स्वतःच यञादि असल्यामुळें व त्याच्या यञादित्वामुळेंच दीर्घकार्य करणें असल्यामुळें आणि 'ङे = ए' या अल्चे जागीं होणाऱ्या आदेशाचे ठिकाणीं स्थानिवद्-

भावानें यञादित्वरूप धर्म आणणें नसल्यामुळें, 'यञादौ सुपि परे अदन्ताङ्गस्य दीर्घः स्यात्' या अर्थाच्या वाचक 'सुपि च' या सूत्रानें 'राम + ङे = राम + य' या स्थलीं दीर्घकार्य करतेवेळीं 'अनल्विधौ' हा प्रतिषेध आड येत नाहीं. अल् हा स्थानीमधील असो किंवा आदेशांतील असो, दोन्ही ठिकाणीं 'अनल्विधौ' हा स्थानिवद्भावाचा निषेध सारखाच लागू पडतो असा जर 'अनल्विधौ' या पदाचा अर्थ असता तर, 'रामाय' या स्थलीं इष्ट दीर्घकार्य न होण्याची आपत्ति आली असती. पण त्या पदाचा तसा अर्थ नसून 'न तु स्थान्यलाश्रयविधौ' असा अर्थ असल्यामुळें, दीर्घकार्य होण्यांत कांहीं प्रतिबंध किंवा अडचण येत नाहीं.) अलाचें आश्रयण कोणत्याहि तऱ्हेचें असलें तरी चालतें, म्हणजे तो अल्विधि मानला जातोच. ज्या ठिकाणीं प्राधान्यानें—मुख्यत्वानें—अलाचें आश्रयण केलें असेल तशाच ठिकाणीं अल्विधि मानतां येतो असा कांहीं आग्रह नाहीं. त्यामुळें 'प्रपठ्य'' या स्थलीं वलादिलक्षण इडागम होत नाहीं. ('प्र+पठ्+क्त्वा' या स्थलीं 'समासेऽनञ्पूर्वे' सू. ३३३२ या सूत्रानें क्त्वाचे जागीं ल्यप् आदेश होतो. 'क्त्वा = त्वा' हा स्थानी अल् नसल्यामुळें त्याचे जागीं होणारा 'ल्यप् = य' हा आदेश 'त्वा' च आहे असें स्थानिवद्भावानें मानतां येतें व 'त्वा' चे ठिकाणीं असणारा आर्धधातुकत्व धर्म जसा 'य' या आदेशाचे ठिकाणीं येतो तसाच त्या प्रत्ययाचे ठिकाणीं असणारा वलादित्व हा धर्म देखील आदेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भावानें येतो असें मानल्यास, म्हणजे 'ल्यप् = य' हा आदेश वलादि आर्धधातुक प्रत्यय आहे असें स्थानिवद्भावानें मानल्यास, 'आर्धधातुकस्येट्' सू. २१८४ या सूत्रानें त्या 'ल्यप् = य' आदेशाला इडागमाची प्राप्ति होते. पण इडागमकार्य करण्याकरितां स्थानी जो 'त्वा' त्याचा आद्य अल्, म्हणजे वल्प्रत्याहारान्तर्गत आद्यवर्ण तकार, याचा आश्रय करावा लागतो आणि अशा रीतीनें हा स्थान्यलाश्रयविधि ठरत असल्यामुळें, 'अनल्विधौ' या प्रतिषेधान्वयें 'य' या

परस्य विधिरल्विधिः, अलो विधिरल्विधिः, अलि विधिरल्विधिः, अला विधिरल्विधिरिति' असें भाष्यकारांनीं प्रथम उत्तर दिलें आहे. पण पुढें भाष्यकार म्हणतात कीं, 'अनल्विधौ' या स्थलीं 'विधि' या शब्दाचें जें ग्रहण केलें आहे त्याचें वर सांगितल्याप्रमाणें प्रयोजन नसून वेगळें प्रयोजन आहे व तें वेगळें प्रयोजन सांगतांना भाष्यकार म्हणतात 'इदं तर्हि प्रयोजनमुत्तरपदलोपो यथा विज्ञायेत । अलमाश्रयतेऽलाश्रयः । अलाश्रयो विधिरल्विधिरिति । इतरथा हि यत्र प्राधान्येनालाश्रीयते तत्रैव प्रतिषेधः स्यात् । यत्र विशेषणत्वेनालाश्रीयते तत्र प्रतिषेधो न स्यात् । किं प्रयोजनम् ? । प्रदीव्य प्रसीव्येति वलादिलक्षण इण्मा भूदिति ।' या भाष्यांत दिलेलीं 'प्रदीव्य, प्रसीव्य' हीं उदाहरणें मनोरमेंत दिलेल्या 'प्रपठच' या उदाहरणासारखींच आहेत व या भाष्याचा अर्थ मनोरमेंत केलेल्या विवरणाच्या सहायानें सहज ध्यानांत येण्याजोगा असल्यामुळें, त्याचा अर्थ पुन्हा येथें देण्याची आवश्यकता वाटत नाहीं; आणि या भाष्याच्या आधारावरच 'आश्रयणं चेह··· वलादिलक्षण इण् न' ही मनोरमेंतील पंक्ति लिहिली आहे.)
'अनल्विधौ इति तन्निषेधात्' या प्रकृत सूत्रावरील कौमुदीच्या पंक्तींतील 'तन्निषेधात्' या पदाचा 'स्थानिवत्वनिषेधात्' असा अर्थ आहे. ('सुधी + उपास्यः' या स्थलीं 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें 'सुधी' यांतील ईकाराचे जागीं यकारादेश होऊन 'सुध्य् + उपास्यः' अशी स्थिति झाली असतां, ईकाराचे जागीं झालेला यकारादेश ईकारच आहे असें स्थानिवद्भावानें मानल्यास, धकारापुढें 'ई' हा अच् येतो असें मानावें लागेल व त्यामुळें 'अनचि च' सू. ४८ या सूत्रांतील 'अनचि' या प्रतिषेधान्वयें त्या सूत्रानें प्राप्त होणारें द्वित्वकार्य धकाराला होऊं शकणार नाहीं अशी कोणी शंका केल्यास, त्या शंकेवर 'अनल्विधौ इति तन्निषेधात्' असें दीक्षितांनीं कौमुदींत उत्तर दिलें आहे. दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे कीं, ईकार या अल्चे जागीं यकारादेश झाला असल्यामुळें व 'अनल्विधौ'

ह्या प्रतिषेध असल्यामुळें, 'ई' या अल्‌चे ठिकाणीं असणारा अल्‌मात्रवृत्ति–केवळ अलाचे ठिकाणीं राहणारा–अच्त्व धर्म यकारा-देशाचे ठिकाणीं स्थानिवद्भावानें आणतां येऊं शकत नाहीं आणि म्हणून धकारापुढें अच् आहे असें मानतां येत नसल्यामुळें, धकाराचें द्वित्व होण्यांत कांहीं प्रत्यवाय येत नाहीं.)

शब्दरत्न—चङ्ङादीनामिति । आदिना चिण् । न केवलं च्ल्यादेशानामेवासङ्ग्रह इत्याह—श्नाऽदेशस्येति । तदभावे ह्यवादिषा-तामित्यत्रेड् न स्यात्, वसादेः कादीनामित्त्वं न स्यात्, शानचः शस्य च तन्न स्यात्, मा हि दर्शदित्यादौ अङि गुणो न स्यादिति भावः । ननु सिजादीनां प्रत्ययाधिकारे पाठात् श्नम्वत् प्रत्ययत्वमस्तीति न स्थानिवत्त्वोपयोगः । न च तेषां प्रत्ययत्वे च्लिविधानं व्यर्थम्, "मन्त्रे घस इति सूत्रे चङ्ङसिचामिति त्रयाणां ग्रहणे गौरवापत्तेः, सिचो लुकि तद्विषये "आदिः सिच" इति स्वरापत्तेश्चेति भाष्यकैयटयोः स्पष्टमित्यरुचेराह—चेति । तेनाग्रहीदित्यादाविडा-देशस्य ईटोऽसंग्रह इत्यर्थः । इदमुपलक्षणम्—अव्ययस्य पदात्पृथ-ग्ग्रहणवैयर्थ्यमपि दोष इति बोद्ध्यम् । अव्ययस्येति अत्र त्वस्यैव दोषत्वमिति भावः । नन्वव्ययस्याङ्गत्वे फलाभावेन, प्रत्ययस्य लुका लुप्तत्वेन च तदप्राप्त्या कथं तेनाव्ययसंग्रहोऽत आह–पदेति । तत्त्वं च ततः परस्य निघातार्थमावश्यकं प्रत्ययलक्षणेन सुबन्तत्वाच्च तत्त्वमिति भावः । सिद्धत्वाच्चेति । अत एवात्र तुक् । न च "सर्वे सर्वपदादेशाः" इति न्यायेन 'प्रस्तुत्वा' इत्यस्य स्थाने 'प्रस्तुत्य' इत्यादेशो तस्याव्ययत्वसिद्धिरिति वृत्त्याशय इति वाच्यम्, अर्थवत्येव स्थानित्त्वमिति तात्पर्येण क्त्वोऽप्यर्थवत्त्वेन तादृशस्थान्यादेशभाव-कल्पने मानाभावादिति दिक् ।

'सिच्क्सचङ्ङादीनाम्' या मनोरमेंतील पदांत असलेल्या 'आदि' या शब्दानें ('चिण् भावकर्मणोः' सू. २७५८, 'दीपजन' सू. २३२८ इत्यादि सूत्रांनीं 'च्लि' चे जागीं होणाऱ्या) चिण्‌चें ग्रहण होतें.

'च्लि' चे जागीं होणाऱ्या आदेशांचा परिगणनांत समावेश केला नाहीं एवढेंच नव्हें हें दर्शविण्याकरितां 'श्नादेशस्य शानचश्च' असें मनोरमेंत म्हटलें आहे. परिगणनांत यांचा समावेश केला नसल्यामुळें, 'अवादिपाताम्' या स्थलीं इडागम न होण्याची आपत्ति येते. तसेंच 'क्स' इत्यादि आदेशांच्या ककारादि आद्य वर्णाला व तसेंच 'शानच्' यांतील आद्य शकाराला इत्संज्ञा न होण्याची आपत्ति येते, आणि त्याचप्रमाणें 'मा हि दर्शत्' इत्यादि स्थलीं 'अङ' पुढें असतांना गुण न होण्याची आपत्ति येते. ('अवादिपातामित्यत्र इट् न स्यात्' असा जो शब्दरत्नांत पाठ आढळतो तो भैरवीकारांच्या मतें चूक असून 'अवाधिपातामित्यत्र इट् न स्यात्' असा पाठ मानणें त्यांच्या मतें योग्य आहे; कारण 'वद्' धातु आत्मनेपदी नसून परस्मैपदी आहे. जरी कर्मव्यतिहाररूप अर्थ वाच्य असल्यास 'कर्तरि कर्मव्यतिहारे' सू. २६८० या सूत्रानें 'वद्' धातूहून आत्मनेपदिप्रत्यय होऊं शकतात तरी, 'वदव्रजहलन्तस्याचः' सू. २२६७ या सूत्रानें जी वृद्धि होणें सांगितली आहे ती सिचापुढें परस्मैपदिप्रत्यय असतांनाच होऊं शकते आणि 'अवादिपाताम्' या लुङाच्या आत्मनेपदाच्या रूपांत तर वृद्धि केली आहे. म्हणून 'वाधृ लोडने' या भ्वादिगणांतील आत्मनेपदि धातूच्या लुङाच्या प्रथम पुरुषाच्या द्विवचनाचें 'अवाधिपाताम्' असें जें रूप होतें त्या रूपाचा वास्तविक शब्दरत्नांत उल्लेख केला असून 'अवादिपाताम्' असें रूप लेखकप्रमादामुळें शब्दरत्नांत लिहिलें गेलें असावें असें भैरवीकारांचें म्हणणें आहे. 'अ + वाध् + च्लि + आताम्' या स्थलीं 'च्लेः सिच्' सू. २२२२ या सूत्रानें 'च्लि' प्रत्ययाचे जागीं 'सिच्' असा आदेश होतो. प्रक्रियाकौमुदीकारांनीं केलेल्या परिगणनांत 'कृत्, तद्धित, सुप्, तिङ' या चार विशिष्ट प्रत्ययांचाच निर्देश केला आहे, इतर प्रत्ययांचा त्या परिगणनांत निर्देश केला नाहीं, किंवा सामान्यरूपानें 'प्रत्यय' या शब्दाचा त्यांत निर्देश

केला नाहीं. 'च्लि लुङि' सू. २२२१ या सूत्रानें होणारा च्लिप्रत्यय वरील चार प्रकारच्या प्रत्ययांपैकीं कोणत्याहि प्रकारचा प्रत्यय नसून धातूहून लुङ्लकारांत होणारा 'आर्धधातुकं शेषः' सू. २१८७ या सूत्रान्वयें आर्धधातुकसंज्ञक प्रत्यय आहे. अशा प्रकारच्या प्रत्ययाचा परिगणनांत अन्तर्भाव केला नसल्यामुळें, च्लिप्रत्ययाचे जागीं होणारा सिच् हा आदेश च्लिप्रत्ययच आहे असें स्थानिवद्भावानें मानतां येऊं शकणार नाहीं आणि म्हणून 'सिच्' हा आदेश आर्धधातुकप्रत्यय ठरत नसल्यामुळें, 'आर्धधातुकस्येड्वलादेः' सू. २१८४ या सूत्रानें त्या सिच्ला इडागम न होण्याची आपत्ति येईल व इडागम न केल्यास 'अबाधिपाताम्' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. तसेंच 'क्र्यादिभ्यः श्ना' सू. २५५४ या सूत्रान्वयें क्र्यादि धातूहून होणारा 'श्ना' हा शित् प्रत्यय परिगणनांत निर्दिष्ट असलेल्या चार प्रकारच्या प्रत्ययांपैकीं कोणत्याहि प्रकारचा प्रत्यय नसल्यामुळें, 'हलः श्नः शानज्झौ' सू. २५५७ या सूत्रानें श्नाचे जागीं होणाऱ्या शानच् आदेशाला स्थानिवद्भावानें होणारी प्रत्ययसंज्ञा होणार नाहीं व त्यामुळें त्या आदेशांतील आद्य शकाराला 'लशक्वतद्धिते' सू. १९५ या सूत्रानें होणारी इत्संज्ञा होऊं शकणार नाहीं. त्याचप्रमाणें च्लिचे जागीं 'शल इगुपधात्' सू. २३३६ इत्यादि सूत्रांनीं होणाऱ्या 'क्स' या आदेशाला, 'णिश्रिद्रुस्रुभ्यः' सू. २३१२ इत्यादि सूत्रांनीं होणाऱ्या 'चङ' या आदेशाला, व 'चिण् ते पदः' सू. २५१३ इत्यादि सूत्रांनीं होणाऱ्या 'चिण्' या आदेशाला स्थानिवद्भावानें होणारी प्रत्ययसंज्ञा होऊं शकणार नाहीं व त्यामुळें प्रत्ययाच्या आद्य वर्णाला इत्संज्ञा होण्याचें विधान करणाऱ्या 'चुटू' सू. १८९ व 'लशक्वतद्धिते' या सूत्रानें होणारी इत्संज्ञा त्या आदेशांच्या आद्य वर्णास होऊं शकणार नाहीं; कारण वर सांगितल्याप्रमाणें च्लिप्रत्ययाचे जागीं होणाऱ्या आदेशांचा परिगणनांत निर्देश केला नाहीं. तसेच 'दृशिर्' हा शलन्त इगुपध परस्मैपदी धातु इरित् पठित असल्यामुळें व 'न दृशः'

सू. २४०७ हें निषेधक सूत्र असल्यामुळें, च्लिचे जागीं 'शल इगुपधात्' या सूत्रानें प्राप्त होणारा 'क्स' हा आदेश न होतां, 'इरितो वा' सू. २२६९ या सूत्रानें विकल्पेंकरून 'अङ' व 'सिच्' हे आदेश होतात व च्लिचे जागीं 'अङ' आदेश केला असतां तो स्थानिवद्भावानें प्रत्ययसंज्ञक आहे असें मानतां येऊं शकत नसल्यामुळें, 'ऋदृशोऽङि गुणः' सू. २४०६ या सूत्रानें प्राप्त होणारा गुण न होण्याची आपत्ति येईल. 'ऋदृशोऽङि गुणः' हें सूत्र अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें, त्या सूत्रांत 'अङ्गस्य' या अधिकारसूत्राची अनुवृत्ति होते व त्यामुळें 'अङ' पुढें असतां अङ्गाला गुण होतो असा त्या सूत्राचा अर्थ निष्पन्न होतो. पण 'यस्मात् प्रत्ययविधिः' सू. १६९ या सूत्रान्वयें अङ्गसंज्ञा होण्याकरितां पुढें प्रत्यय असणें आवश्यक आहे. परंतु वर सांगितल्याप्रमाणें परिगणनांत च्लिप्रत्ययाचा व त्या प्रत्ययाचे जागीं होणाऱ्या आदेशांचा निर्देश केला नसल्यामुळें, च्लिचे जागीं होणाऱ्या 'अङ' या आदेशाला स्थानिवद्भावानें प्रत्ययसंज्ञा होऊं शकणार नाहीं आणि त्यामुळें 'अ + दृश् + च्लि = अ + दृश् + अङ' यांतील 'अ + दृश्' याला अङ्गसंज्ञा होऊं शकणार नाहीं. त्यामुळें 'ऋदृशोऽङि गुणः' या सूत्रानें 'दृश्' धातूच्या उपधेंतील 'ऋ' या इकाला गुण होऊं शकणार नाहीं व 'अदर्शत्' असें इष्ट रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येईल. सारांश परिगणनपक्ष मानल्यास, वर सांगितलेले अनेक दोष उद्भवत असल्यामुळें व अशा रीतीनें परिगणन न्यून ठरत असल्यामुळें, तो पक्ष मानणें योग्य नाहीं असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) कित्येक वैयाकरण असें म्हणतात कीं, (च्लिचे जागीं होणाऱ्या) 'सिच्' इत्यादि आदेशांचा प्रत्ययाधिकारांत पाठ केला असल्यामुळें, ज्याप्रमाणें ('रुधादिभ्यः श्नम्' सू. २५४३ या सूत्रानें होणारा) 'श्नम्' हा प्रत्यय मानला जातो (व त्यामुळेंच त्यांतील आद्य शकाराला 'लशक्वतद्धिते' सू. १९५ या सूत्रानें इत् संज्ञा होते) त्याचप्रमाणें च्लिचे जागीं होणाऱ्या 'सिच्' इत्यादि आदेशांना देखील

प्रत्यय मानता येते. म्हणून त्या आदेशांना प्रत्ययसंज्ञा प्राप्त करून देण्याकरिता स्थानिवद्भावाचा उपयोग करण्याची कांहीच गरज नाही. 'सिच्' इत्यादिकाना (ते प्रत्ययाधिकारात पठित असल्यामुळे) प्रत्ययसज्ञा होते असे मानले तर 'च्लि लुङि' सू. २२२१ हे सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते असे कोणी म्हटल्यास, ते वैयाकरण म्हणतात की, हे म्हणणे बरोबर नाही; कारण 'मन्त्रे घसव्हरणश' सू. ३४०२ या सूत्रात 'लेः' असे जे म्हटले आहे त्याच्याऐवजी ('च्लि लुङि' हे सूत्र नसते तर) 'चङक्सिचाम्' एवढे मोठें पद, त्या तीहीचे ग्रहण करण्याकरिता, उच्चारणे भाग पडले असते व तसे करण्यात गौरवरूप दोष आला असता. दुसरे असे की, 'मन्त्रे घसव्हर' सू. ३४०२ या सूत्रात ('च्लि' चा लुक् होणे न सागता) सिचाचा लुक् होणे सागितले असते तर ('सिजन्तस्यादिरुदात्तो वा' असे विधान करणाऱ्या) 'आदि सिचोऽन्यतरस्याम्' सू. ३७३१ या सूत्रान्वये (प्रत्ययलक्षणाने) आद्युदात्त स्वर होण्याची आपत्ति आली असती हे ('च्लि लुङि' ३·१·४३ या सूत्रावरील) भाष्यात व त्या भाष्यावरील कैयटाच्या वृत्तीत स्पष्टपणे सागितले आहे. (लुङाच्या रूपात 'च्लि' कोठेहि आढळत नसुन त्या 'च्लि' चे जागी होणारे 'सिच्' इत्यादि आदेशच आढळतात व ते आदेश प्रत्ययाधिकारात पठित असल्यामुळे जर त्याना स्वतत्र रीतीने प्रत्ययसज्ञा होऊ शकते व त्याचे ठिकाणी प्रत्ययत्व धर्म आणण्याकरिता स्थानिवद्भावाचा उपयोग करण्याची काहीच गरज नाही असे मानले तर, 'च्लि' चे जागी होणाऱ्या आदेशाना स्थानिवद्भावाने प्रत्ययसज्ञा व्हावी याकरिता मुद्दाम पठित केलेले 'च्लि लुङि' हे सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते आणि म्हणून 'च्लि लुङि' असे सूत्र पठित न करिता 'सिच् लुङि' असे सूत्र पठित करावयास पाहिजे होते व तसे सूत्र पठित केले असते तर, 'सिच्' प्रत्यय उत्सर्ग ठरून 'क्स, चङ, अङ' इत्यादि लुङात होणारे प्रत्यय सिच्चे अपवाद ठरले असते. असे असून देखील पाणिनीने

'सिच् लुङि' असें सूत्र पठित न करितां 'च्लि लुङि' असें सूत्र मुद्दाम पठित केलें असल्यामुळें, त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, च्लिचे जागीं होणाऱ्या आदेशांना स्थानिवद्भावानें प्रत्ययसंज्ञा व्हावी याकरितां तें सूत्र मुद्दाम केलें आहे व म्हणून 'च्लि' चे जागीं होणारे आदेश प्रत्ययाधिकारांत पठित असल्यामुळें त्या योगानेंच त्यांना प्रत्ययसंज्ञा होते व त्यांचे ठिकाणीं प्रत्ययत्व आणण्याकरितां स्थानिवद्भावाचा उपयोग करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं असें जें कित्येक वैयाकरणांचें मत आहे तें चूक ठरतें अशी शंकाकाराची शंका आहे. या शंकेवर ते वैयाकरण असें उत्तर देतात कीं, 'च्लि' चे जागीं होणारे आदेश प्रत्ययाधिकारांत पठित असल्यामुळें त्यांना त्या योगानें आपोआपच प्रत्ययसंज्ञा प्राप्त होते असें मानल्यास 'च्लि लुङि' हें सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते असें जें शंकाकाराचें म्हणणें आहे तें बरोबर नाहीं; कारण 'च्लि लुङि' हें सूत्र अन्य रीतीनें चरितार्थ ठरतें. तें सूत्र पठित केलें नसतें तर, 'मन्त्रे घसह्वर-णश…लेः' सू. ३४०२ या सूत्रांत 'लेः' असें जें पद पठित केलें आहे व ज्याचा 'च्लेः' असा अर्थ आहे त्या पदानें कांहींच बोध होऊं शकला नसता व त्या पदाऐवजीं 'चङङ्सिचाम्' एवढें मोठें पद त्या सूत्रांत पठित करावें लागलें असतें. तें टाळण्याकरितां पाणिनीनें 'च्लि लुङि' हें सूत्र पठित केलें आहे आणि अशा रीतीनें तें सूत्र चरितार्थ ठरत असल्यामुळें तें व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते असें जें शंकाकाराचें म्हणणें आहे तें चूक ठरतें. ते वैयाकरण आपलें म्हणणें बरोबर आहे हें सिद्ध करण्याकरितां 'च्लि लुङि' ३·१·४३ या सूत्रावरील भाष्याचा व कैयटवृत्तीचा आधार देतात. त्या भाष्यांत भाष्यकार म्हणतातः—'क्वाऽयं च्लिः श्रूयते ? । न क्वचिच्छ्रूयते । एतस्य सिजादय आदेशा उच्यन्ते । यदि न क्वचिच्छ्रूयते किमर्थस्तर्हि च्लिरुत्सर्गः क्रियते न सिजुत्सर्ग एव कर्तव्यः । तस्य क्सादयोऽपवादा भविष्यन्ति । अत उत्तरं पठति । च्ल्युत्सर्गः सामान्यग्रहणार्थः ।

च्लिरुत्सर्गः क्रियते । किं प्रयोजनम् ? । सामान्यग्रहणार्थः । क्व सामान्यग्रहणार्थेनाऽर्थः ? । मन्त्रे घसव्हरणश-वृदहा…ले: इति । तत्राऽत्ररतस्त्रयाणां ग्रहणं कर्तव्यं स्यात् । चङङोः सिचश्चेति ।' या भाष्याचा अर्थ वरील विवरणांत स्पष्ट केलान आहे. या भाष्यावर टीका करिताना कैयटाने 'तथा मन्त्रे घसेति यदि सिचो लुक्क्रियते तदा आदिः सिचोन्यतरस्यामिति स्वरः स्यात् । लुमता लुप्तेऽपि तस्मिन् प्रत्ययलक्षणेनाऽस्य स्वरस्येष्टत्वात् ।' असे म्हटले आहे, आणि त्या वैयाकरणाचे म्हणणे वरील भाष्याला व कैयटवृत्तीला धरून असल्यामुळे ते म्हणणे चूक आहे असे मानता येत नाही. साराश च्लिचे जागी होणारे आदेश प्रत्ययाधिकारात पठित असल्यामुळें व अशा रीतीने त्याना आपोआपच प्रत्ययसंज्ञा होत असल्यामुळें, त्याना प्रत्ययसंज्ञा प्राप्त करून देण्याकरिता स्थानिवद्भावाचा आश्रय करण्याची कांहीच गरज नाही व त्यामुळे च्लिप्रत्ययाचे जागी होणाऱ्या आदेशाच्या विषयात मनोरमेत दाखविलेले दोप वास्तविक उद्भवत नाहीत, आणि) ही अरुचि मनात धरूनच दीक्षितानी मनोरमेत 'श्नादेशस्य शानचश्च' असा दुसरा दोप परिगणनपक्षावर दिला आहे. ('हलः श्नः शानज्झौ' सू. २५५७ हे सूत्र प्रत्ययाधिकारात पठित नसून अङ्गाधिकारात पठित आहे. त्यामुळे श्नाचे जागी होणाऱ्या 'शानच्' या आदेशाला स्थानिवद्भाव केल्याशिवाय प्रत्ययसज्ञा प्राप्त होऊ शकत नाही व ती सज्ञा त्याला प्राप्त न झाल्यास, 'तिङ्शित्सार्वधातुकम्' सू. २१६६ या सूत्राने होणारी सार्वधातुकसज्ञा त्याला होणार नाही व तो शानच् अपित् असल्यामुळे 'सार्वधातुकमपित्' सू. २२३४ या सूत्रान्वये तो सार्वधातुक ङित् प्रत्यय आहे असे म्हणता येणार नाही आणि त्यामुळे 'गृहाण' या स्थली ङित् किंवा कित् प्रत्यय पुढे आला असता 'ग्रहिज्या' सू. २४१२ या सूत्राने 'ग्रह्' धातूतील रकाराचे जे सप्रसारण होणे सांगितले आहे ते होऊ शकणार नाही व 'गृहाण' असे इष्ट रूप

सिद्ध होऊं शकणार नाहीं.) मनोरमेंतील 'शानचश्च' या पदांत जो चकार घातला आहे त्याचा अर्थ असा आहे कीं, 'अग्रहीत्' इत्यादि स्थलीं इट्चे जागीं होणाऱ्या 'ईट्' या आदेशाचा देखील परिगणनांत संग्रह केला नाहीं. ('अ + ग्रह् + इ + सिच् + ई + त्' या स्थलीं 'अस्तिसिचोऽपृक्ते' सू. २२२५ या सूत्रानें 'त्' या अपृक्त एकाल्प्रत्ययाला 'ईट् = ई' आगम झाला आहे व 'सिच्' या वलादि आर्धधातुकप्रत्ययाला 'आर्धधातुकस्येट्' सू. २१८४ या सूत्रानें 'इट् = इ' आगम झाला आहे. सिच्प्रत्ययास झालेला इडागम 'ग्रह्' धातूपुढें आला असल्यामुळें 'ग्रहोऽलिटि दीर्घः' सू. २५६२ या सूत्रानें तो दीर्घ होतो, म्हणजे ह्रस्व इकाराचे जागीं दीर्घ ईकारादेश होतो. हा दीर्घ ईकारादेश इट्च आहे असें स्थानिवद्भावानें न मानल्यास, 'इट ईटि' सू. २२६६ या सूत्रानें होणारा सिचाचा लोप होऊं शकणार नाहीं व अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल. 'इट्' हा प्रत्यय नसून आगम आहे व 'ग्रहोऽलिटि दीर्घः' हें सूत्र प्रत्ययाधिकारांत पठित नसून अङ्गाधिकारांत पठित आहे. म्हणून इट्चे जागीं झालेला 'ईट्' हा आदेश इट्च आहे असें मानण्याकरितां स्थानिवद्भावाचा आश्रय करणें भाग आहे. पण परिगणनांत आगमाचा निर्देश केला नसल्यामुळें व त्यांत निर्दिष्ट असलेल्या धात्वादिकांत इडागमाचा अन्तर्भाव होत नसल्यामुळें, परिगणनपक्ष मानल्यास, इट्चे जागीं झालेला 'ईट्' आदेश इट्च आहे असें स्थानिवद्भावानें मानतां येऊं शकत नाहीं व अशा रीतीनें परिगणन न्यून व दूषित ठरतें असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'अग्रहीत्' हें उदाहरण देऊन नुकताच जो वर दोष दाखविला आहे तो देखील उपलक्षणार्थक आहे, म्हणजे परिगणनपक्ष मानल्यास वर दाखविलेल्या दोषाखेरीज इतर दोष देखील दाखवितां येतात, व त्या इतर दोषांपैकीं एक दोष हा आहे कीं, परिगणनांत पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें अव्ययाचें पृथक् ग्रहण करण्याची कांहींच गरज नव्हती हें ध्यानांत

ठेवावे. (अव्यय अर्थवान् असल्यामुळे 'अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम्' सू. १७८ या सूत्राने त्याला प्रातिपदिकसंज्ञा होते व 'ङ्याप्प्रातिपदिकात्' सू. १८२ या अधिकारसूत्रान्वये त्याहून सुबुत्पत्ति होऊन त्याला पदसंज्ञा प्राप्त होते. 'अव्ययादाप्सुपः' सू. ४५२ या सूत्राने जरी सुब्लुक् होतो तरी, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ या सूत्राने त्याला पदसंज्ञा होण्यात काही अडचण येत नाही. त्याला पदसंज्ञा करतेवेळी 'न लुमताङ्गस्य' सू. २६३ हा निषेध लागू पडत नाही, कारण पदसंज्ञा करणे हे अङ्गमात्रास सांगितलेले कार्य नाही. म्हणून परिगणनात पदग्रहण केले असल्यामुळे अव्ययाचे पृथक् ग्रहण करावयास नको होते.) मनोरमेत सांगितलेल्या द्वितीय पक्षावर दीक्षितांनी 'अव्ययस्याङ्गपदाभ्यां पृथग्ग्रहणवैयर्थ्यात्' असा जो दोष दाखविला आहे तेवढाच एक दोष त्या पक्षात येतो. (वास्तविक पद व अङ्ग यांचे ग्रहण करून पुन्हा जे अव्ययाचे ग्रहण केले आहे ते देखील ब्राह्मणवशिष्ठन्यायाचा आश्रय केल्याने दोषरहित ठरते व त्यामुळे द्वितीय पक्षात कोणताहि दोष येत नाही असे भैरवीकारांनी म्हटले आहे.) अव्ययाचे ठिकाणी अङ्गसंज्ञा केल्याने कोणतेहि फल निष्पन्न होत नसल्यामुळे व अव्ययापुढे आलेल्या विभक्तिप्रत्ययाचा 'अव्ययादाप्सुपः' सू. ४५२ या सूत्राने लुक् होऊन अव्ययाला अङ्गसंज्ञा प्राप्त होत नसल्यामुळे (व 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या सूत्राने त्याला पदसंज्ञा होत असल्यामुळे आणि 'आ कडारादेका संज्ञा' सू. २३२ या सूत्रान्वये दोन संज्ञा न होता एकच संज्ञा होणे शक्य असल्यामुळे व उत्तर पदसंज्ञा पूर्व अङ्गसंज्ञेची 'विप्रतिषेधे परं कार्यम्' या न्यायान्वये बाधक होत असल्यामुळें) 'अङ्ग' या शब्दात अव्ययाचा समावेश होऊ शकत नाही असे कोणी म्हटल्यास (दीक्षितांनी ती अरुचि मनात धरूनच मनोरमेतील 'अव्ययस्याङ्गपदाभ्याम्' या पक्तीत) 'पद' या शब्दाचे मुद्दाम ग्रहण केले आहे. (या म्हणण्याचा अर्थ असा आहे की, जरी

अव्ययाचा 'अङ्ग' या शब्दांत समावेश होऊं शकत नाहीं असें मानलें तरी त्याचा 'पद' या शब्दांत समावेश होऊं शकत असल्यामुळें, पुन्हा अव्ययाचें वेगळें ग्रहण करण्याची कांहीं गरज नव्हती.) अव्ययापुढें येणाऱ्या तिङन्ताला ('तिङ्ङतिङः' सू. ३९३५ या सूत्रान्वयें) निघातस्वर–अनुदात्तस्वर–होण्याकरितां अव्ययाला पदसंज्ञा होणें आवश्यक आहे (व अव्ययापुढें येणाऱ्या विभक्तिप्रत्ययाचा जरी 'अव्ययादाप्सुपः' या सूत्रानें लुक् होतो तरी 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या सूत्रानें) अव्ययाला प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञा होते. ('प्रातर्भवति' या उदाहरणांत 'प्रातर्' या अव्ययाला पदसंज्ञा असल्यामुळेंच त्या अतिङन्त पदापुढें असलेलें 'भवति' हें तिङन्त पद आद्युदात्त असून देखील सर्वानुदात्त होतें. 'भू + शप् + तिप्' या स्थलीं 'भू' हा धातु 'धातोः' सू. ३६७१ या सूत्रानें उदात्त–अन्तोदात्त–आहे व 'शप्' आणि 'तिप्' हे प्रत्यय पित् असल्यामुळें 'अनुदात्तौ सुप्पितौ' सू. ३७०९ या सूत्रानें अनुदात्त आहेत. त्यामुळें 'भवति' हें पद आद्युदात्त होतें. तरी पण तें तिङन्त पद पदसंज्ञक अतिङन्त अव्ययापुढें आलें असल्यामुळें सर्वानुदात्त होतें.) 'क्त्वा' या कृत्प्रत्ययाचे जागीं होणारा 'ल्यप्' हा आदेश स्थानिवद्भावानें कृत्प्रत्यय मानला जात असल्यामुळेंच, 'प्रस्तुत्य' या उदाहरणांत ('ह्रस्वस्य पिति कृति तुक्' सू. २८५८ या सूत्रानें) तुगागम होतो असा मनोरमेंतील 'कृत्त्वेन सिद्धत्वाच्च' या पदांचा अर्थ आहे. 'सर्वे सर्वपदादेशाः' या न्यायान्वयें 'प्रस्तुत्वा' याचे जागीं 'प्रस्तुत्य' असा आदेश झाला आहे असें मानतां येऊं शकत असल्यामुळें (व 'क्त्वातोसुन्कसुनः' सू. ४५० या सूत्रान्वयें 'प्रस्तुत्वा' हें क्त्वान्त पद अव्ययसंज्ञक असल्यामुळें त्याचे जागीं होणाऱ्या) 'प्रस्तुत्य' या आदेशाला (स्थानिवद्भावानें) अव्ययसंज्ञा प्राप्त होते असा प्रसादकारांच्या ('प्रस्तुत्य। अव्ययस्य क्त्वो ल्यप्, तस्याव्ययत्वात् सुपो लुक्।' या) म्हणण्याचा आशय आहे असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण

'सर्वे सर्वपदादेशाः' या न्यायाचा असा अर्थ आहे की, जो अर्थवान् आहे तो स्थानी होऊ शकतो आणि ज्याअर्थी 'क्त्वा' हा प्रत्यय देखील अर्थवान् आहे त्याअर्थी 'प्रस्तुत्वा' या समुदायाचे ठिकाणी 'प्रस्तुत्य' असा समुदायरूप आदेश होतो असे मानण्यास काहीच प्रमाण नाही. (प्रसादकारानुयायींचें असे म्हणणे आहे की, प्रसादकारानी आपल्या टीकेत 'अव्ययस्य क्त्वो ल्यप्, तस्याव्ययत्वात् सुपो लुक्' असे जे म्हटले आहे त्याचा 'क्त्वा' हे अव्यय असून त्याचे जागी होणारा ल्यबादेश अव्ययसंज्ञक होतो असा अर्थ नसून 'प्रत्ययेन प्रत्ययान्तस्य ग्रहणम्' या सिद्धान्तान्वयें, 'क्त्वातोसुन्कसुनः' सू. ४५० या सूत्राने अव्ययसंज्ञक ठरणाऱ्या क्त्वान्ताचे जागी 'सर्वे सर्वपदादेशाः' या न्यायान्वयें होणारा 'प्रस्तुत्य' हा ल्यबन्त आदेश अव्ययसंज्ञक होतो असा वास्तविक अर्थ आहे व तो ल्यबन्त आदेश स्थानिवद्भावाने अव्ययसंज्ञक होत असल्यामुळे त्याच्यापुढील विभक्तिप्रत्ययाचा 'अव्ययादाप्सुपः' सू. ४५२ या सूत्राने लुक् होतो असा प्रसादकाराच्या म्हण-ण्याचा आशय आहे यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, प्रसादटीकेतील पंक्तीचा मनोरमेत जसा अर्थ केला आहे तो बरोबर नसून वर दिलेला अर्थ बरोबर आहे असे मानले तरी, 'सर्वे सर्वपदादेशा' हा न्याय 'प्रस्तुत्य' या उदाहरणात मुळीच लागू पडत नाही; कारण त्या न्यायातील 'पद' या शब्दाचा 'सुप्तिङन्त पदम्' या सूत्राने पदसंज्ञक होणारे पद असा अर्थ नसून, 'पद्यते गम्यते अर्थः अनेन = अर्थवत्' असा अर्थ आहे. त्यामुळे जेथे स्थानी अर्थवान् नाही तशाच ठिकाणी तो न्याय लागू पडतो व त्या न्यायान्वयें अर्थवान् समुदायाचे जागी अर्थवान् आदेश होतो असे मानता येते. उदाहरणार्थ 'एरु' सू २१९६ इत्यादि सूत्रात अर्थवान् नसणाऱ्या 'इ' या स्थानीचा निर्देश केला असल्यामुळे तशाच ठिकाणी वरील न्याय लागू पडतो व 'इ' चे जागी 'उ' हा आदेश होतो असे न

मानतां 'ति' या अर्थवान् समुदायाचे जागीं 'तु' असा आनुमानिक समुदायरूप आदेश होतो असें मानावें लागतें. परंतु 'समानकर्तृकयोः पूर्वकारते' सू. ३३२० या सूत्रानें त्या अर्थामध्यें होणारा 'क्त्वा' हा प्रत्यय अर्थवान् असल्यामुळें वरील न्याय प्रकृत उदाहरणास लागू पडत नाहीं आणि म्हणून 'प्रस्तुत्वा' या क्त्वान्त समुदायाचे जागीं 'प्रस्तुत्य' असा समुदायरूप आदेश झाला आहे असें मुळींच मानतां येत नाहीं व त्यामुळें दीक्षितांनीं मनोरमेंत दिलेला दोष योग्य ठरतो असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.)

शब्दरत्न—अनल्विधाविति किमिति विधिग्रहणविशिष्टं किमर्थमिति प्रश्नः। णत्वं प्राप्तमिति। न च सकारे स्वतोऽड्भिन्नत्वसत्त्वादड्भिन्नव्यवाये नेति निषेधात्कथं णत्वप्राप्तिरिति वाच्यम्, अतिदिश्यमानधर्मविरुद्धस्वाश्रयधर्मप्रयुक्तकार्याभावस्यातिदेशस्वभावसिद्धत्वात्। इदञ्चासिद्धवत्सूत्रे कैयटे स्पष्टम्। द्युकाम इति। यद्यपि वत्वं हल्त्वाद्यपेक्षया विशेषधर्मस्तथाप्येतद्वाक्योपप्लुते 'वकारवदुकारः' इति वाक्ये उपात्तधर्मापेक्षया न तस्य तत्त्वम्, सूत्रक्लृप्तस्थान्यादेशभावमादायैवैतत्कृतवाक्योपप्लवादिति भावः॥

क इष्ट इति। यद्यपीदं रूपमुत्वे, गुणे, अवादेशे च पाक्षिकलोपेन सिध्यति, तथाऽपि पक्षे कविष्ट इति स्यात् कयिष्ट इति चेष्यते इति भावः। स्थान्यवयव एवेति। उपलक्षणमेतत्स्थानिरूपोऽपीति बोद्ध्यम्। अत एव "आदेशिन्यल्याश्रीयमाणे प्रतिषेधः" इति भाष्ये उक्तम्। न तु स्थान्यवयव इति। अतः प्रत्ययत्वं स्थानिवत्त्वेन भवत्येवेति भावः। अग्रहीदित्यादौ "ग्रहोऽलिटि" इत्यनेनेट एव दीर्घविधानान्नाल्त्वेन तस्य स्थानितेति तद्वृत्तीट्त्वाश्रयस्य सिचो लोपस्य सिद्धिरिति बोध्यम्। यथा कथंचिदिति। व्याख्यानादिति भावः॥

(प्रकृत सूत्रांत 'अनलि' असें न म्हणतां) 'विधि' या शब्दानें ग्रहण करून 'अनल्विधौ' असें कां म्हटलें आहे असा 'अनल्विधाविति

किम्' या मनोरमेंत केलेल्या प्रश्नाचा अर्थ आहे. 'व्यूढोरस्केन' या स्थलीं णत्वाची प्राप्ति आहे असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे त्यावर अशी शंका करण्यांत येते कीं, विसर्गाचे जागीं झालेला 'स्' हा आदेश स्वतःच अट्भिन्न वर्ण असल्यामुळें आणि अट्भिन्नवर्णाचें व्यवधान असल्यास णत्व होत नाहीं असा ('अट्कुप्वाङ्नुम्व्यवायेऽपि' सू. १९७ या नियामक सूत्राचा 'नियमशास्त्राणां निषेधमुखेन प्रवृत्तिः' या न्यायान्वयें निषेधरूप) अर्थ होत असल्यामुळें, 'व्यूढोरस्केन' या उदाहरणांत णत्वाची प्राप्तीच होत नाहीं. पण ही शंका बरोबर नाहीं; कारण स्थानीचे ठिकाणीं असणाऱ्या ज्या धर्माचा आदेशाचे ठिकाणीं अतिदेश केला जातो त्या धर्मविरुद्ध आदेशांत असणाऱ्या धर्मानें होणाऱ्या कार्याचा प्रतिबंध करणें, म्हणजे तसें कार्य होऊं न देणें, हा अतिदेशाचा स्वतःसिद्ध स्वभाव आहे असें 'असिद्धवदत्राभात्' सू. ६·४·२२ या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें स्पष्ट म्हटलें आहे. ('व्यूढोरस्केन' या उदाहरणांत विसर्गाचे जागीं सकारादेश झाला आहे हें मनोरमेंतील विवरणांत सांगितलेंच आहे. स्थानी जो विसर्गरूप अयोगवाह आहे त्याचा भाष्यकारांनीं अट्प्रत्याहारांत उपदेश केला असल्यामुळें त्याचे ठिकाणीं अट्त्व हा धर्म आहे. त्याचे जागीं झालेल्या 'स्' या आदेशाचे ठिकाणीं अट्भिन्नत्व हा धर्म आहे. हे दोन धर्म जरी परस्परविरुद्ध आहेत तरी 'स्थानिवदादेशः' या अतिदेश-शास्त्रान्वयें स्थानीचे ठिकाणीं असणारा अट्त्वरूप धर्म आदेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भावानें प्राप्त होतो. त्यामुळें जरी सकाराचे ठिकाणीं अट्भिन्नत्व हा धर्म आहे तरी, स्थानिवद्भावानें त्याचे ठिकाणीं अट्त्वरूप धर्म येत असल्यामुळें व अशा रीतीनें 'व्यूढोरस्केन' या उदाहरणांत रकार व नकार या दोन वर्णामध्यें अट्रूप विसर्गाचें व्यवधान होतें असें मानतां येत असल्यामुळें, या उदाहरणांत णत्वाची प्राप्ति होते हें उघड आहे. हें खरें कीं, 'स्' या आदेशाचे ठिकाणीं असणाऱ्या अट्भिन्नत्वरूप धर्माचा आश्रय केल्यास णत्वाची प्राप्ति होत नाहीं.

पण अतिदेशाचा हा स्वभावच आहे कीं, स्थानीचे ठिकाणीं जो धर्म आहे त्याविरुद्ध आदेशांत असणाऱ्या धर्माला तो दाबून टाकतो, म्हणजे नाहींसा करतो, व आदेशांत असणाऱ्या विरुद्ध धर्मानें प्राप्त झालेलें कार्य होऊं देत नाहीं. 'असिद्धवदत्राभात्' या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें 'सत्यसति वा वतौ अतिदेशेषु आतिदेशिकाऽविरुद्धस्वाश्रयकार्याऽनिवृत्तिः' असें म्हटलें आहे, व या पंक्तीचें विवरण करितांना उद्योतकारांनीं 'अतिदेशस्वभाव एवाऽयं यदतिदिश्यमानधर्माविरुद्धस्वाश्रयकार्यानिवृत्तिः' म्हणजे अतिदेशाच्या विषयांत अशी स्वभावसिद्धच मर्यादा आहे कीं आदेशाचे ठिकाणीं अतिदेशानें आरोपित केला जाणारा जो धर्म त्याच्या उलट आदेशांत असलेला जो मुळचा स्वाभाविक धर्म त्याच्या निमित्तानें पावणारें कोणतेंहि कार्य करतां येत नाही, असें म्हटलें आहे. म्हणून सकारादेश जरी अट्भिन्नत्वरूपधर्मयुक्त आहे तरी स्थानीचे ठिकाणीं असणारा अट्त्वरूप धर्म त्याचे ठिकाणीं अतिदेशानें प्राप्त होत असल्यामुळें णत्वाची प्राप्ति आहे. पण 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें आणि प्रकृत स्थलीं विसर्गरूप स्थानी या अलाला मानून णत्वकार्य करणें असल्यामुळें, णत्व होत नाहीं.) 'द्युकामः' या उदाहरणांत जरी असें म्हणतां येतें कीं, हल्त्वरूप धर्माच्या मानानें 'वत्व' हा विशेष धर्म आहे तरी, 'स्थानिवदादेशः' या अतिदेशविधायक वाक्याचें उच्चारण करून त्याच्या आधारानें 'वकारवत् उकारः' असें जें वाक्य तयार होतें त्यांत ज्या धर्माचें ग्रहण केलें आहे त्या धर्माच्या मानानें वत्वरूप धर्म विशेष धर्म ठरत नाहीं; कारण 'दिव उत्' सू. ३३७ या सूत्रांत सांगितलेले स्थानी व आदेश यांना मानूनच 'स्थानिवदादेशः' या सूत्राच्या आधारें 'वकारवदुकारः' हें वाक्य तयार करून उच्चारलें आहे. ('द्युकामः' या स्थलीं अलौकिकप्रक्रियावाक्यांतील अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययांचा 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें लुक् झाला असतां, 'प्रत्ययलोपे

प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ या सूत्राने 'दिव्' याला पदसंज्ञा होते व 'दिव्' यातील वकार पदान्ती येत असल्यामुळें 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषेच्या सहायाने 'दिव उत्' या सूत्रान्वये वकाराचे जागी उकारादेश होतो. हा उकारादेश स्थानिरूप वकारच आहे अशी स्थानिवद्भावाने वुद्धि केल्यास त्याच्या पुढे 'कामः' यातील ककार हा वल् असल्यामुळे, 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें वकार-स्थानिक उकाराचा लोप पावतो. परतु 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळे, 'व्' या अल्चे जागी झालेल्या उकाराचा लोप होत नाही व 'इको यणचि' सू. ४७ या सूत्राने यणादेश होऊन 'द्युकामः' असे इष्टरूप सिद्ध होते हे पूर्वी मनोरमेत सागितलेच आहे. यावर शकाकार अशी शका करतो की, 'द्युकाम.' या उदाहरणात वकार-लोपाची प्राप्तीच होत नाही. वकार या हल्मध्ये सर्व हलात असणारा 'हल्त्व' हा सामान्य धर्म असून, केवळ वकाराचेच ठिकाणी असणारा 'वत्व' हा विशेष धर्म आहे व 'सामान्यातिदेशे विशेषा-नतिदेश.'–परि. ११०–अशी परिभाषा असल्यामुळे, 'व्' या हल्रूप स्थानीचे ठिकाणी असणाऱ्या हल्त्वरूप सामान्य धर्माचाच उकारा-देशाचे ठिकाणी 'स्थानिवदादेशः' या प्रकृत अतिदेशविधायक शास्त्रान्वये अतिदेश करता येतो व त्या स्थानिरूप वकाराचे ठिकाणी असणाऱ्या वत्वरूप विशेष धर्माचा आदेशाचे ठिकाणी अतिदेश करता येत नाही म्हणून उकाररूप आदेशाचे ठिकाणी जरी स्थानिवद्भावाने हल्त्वबुद्धि करता येते तरी त्याचे ठिकाणी वत्ववुद्धि–'उ' हा 'व्' च आहे अशी वुद्धि–करता येऊ शकत नसल्यामुळे, प्रकृत उदाहरणात वकारलोपाची प्राप्तीच होत नाही. या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'दिव उत्' या विधिसूत्रात अलोऽन्त्यपरिभाषान्वये वकार हा स्थानी व उकार हा आदेश ठरत असल्यामुळे व 'स्थानिवदादेश' असे अतिदेशविधायक सूत्र असल्यामुळे, 'स्थानिवत्' या शब्दाचे जागी 'वकारवत्' हा शब्द आणि 'आदेश.' या शब्दाचे

जागीं 'उकारः' हा शब्द घातल्यानें 'वकारवदुकारः' असें जें वाक्य तयार होतें त्या वाक्यांत स्थानीच्या ज्या धर्माचें ग्रहण केलें आहे व ज्याचा अतिदेश केला आहे तो हल्त्वरूप धर्म नसून वत्वरूप धर्मच असल्यामुळें, या स्थलीं 'सामान्यातिदेशे विशेषानतिदेशः' ही परिभाषा लागूच पडत नाहीं; कारण वर सांगितल्याप्रमाणें निष्पन्न झालेल्या 'वकारवदुकारः' या वाक्यांत वकाररूप स्थानीचे ठिकाणीं 'वत्व' हाच धर्म विवक्षित आहे व त्यामुळें त्या वत्वरूप धर्माला प्रकृत स्थलीं विशेष धर्म मानतांच येत नाहीं. भावप्रकाशकारांनीं या विषया-संबंधानें 'वाक्यजन्यधीविषयवत्वापेक्षया वत्वस्य न विशेषधर्मत्वम्' असें म्हटलें आहे. म्हणून प्रकृत स्थलीं उकारादेशाचे ठिकाणीं तो वकारच आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि करतां येत असल्यामुळें वकारलोपाची, म्हणजे वकाराचे जागीं झालेल्या उकाराच्या लोपाची, प्राप्ति होते. पण 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें उकारलोप होत नाहीं.) 'क इष्टः' या उदाहरणांत ('स्थानिवद्भाव मानला तरी) उत्व, गुण, अवादेश व पाक्षिक लोप करून जरी इष्ट प्रयोग सिद्ध होऊं शकतो तरी, 'कविष्टः' असें वैकल्पिक रूप सिद्ध होण्याची आपत्ति येते; परंतु 'कयिष्टः' असें वैकल्पिक रूप सिद्ध होणें इष्ट आहे. ('किम्+सु+यज्+क्त+सु' या स्थलीं 'किमः कः' सू. ३४२ या सूत्रानें 'किम्' चे जागीं 'क' असा आदेश होऊन व 'वचिस्वपियजादीनां किति' सू. २४०९ या सूत्रानें 'यज्' धातूंतील यकाराचें संप्रसारण होऊन आणि 'सम्प्रसारणाच्च' सू. ३३० या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन 'क+सु+इष्टः' अशी स्थिति झाली असतां, यकाराचे जागीं संप्रसारणानें झालेला इकार हा, 'अनल्विधौ' या प्रतिषेधाकडे दुर्लक्ष करून, हश्प्रत्याहारान्तर्गत यकारच आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि केल्यास, 'क+सु' यांतील 'सु' चे जागीं 'ससजुषो रुः' सू. १६२ या सूत्रानें झालेल्या 'रु' चें 'हशि च' सू. १६६ या सूत्रानें उत्व होऊन 'करु+इष्टः=क उ+इष्टः' अशी

स्थिति होते. अशा स्थितीत 'आद्‌गुण:' सू. ६९ या सूत्राने 'ओ' हा गुणरूप एकादेश करून 'को इष्ट:' अशी स्थिति झाली असता, 'एचोऽयवायाव:' सू. ६१ या सूत्राने 'को' यातील ओकाराचे जागी अवादेश होऊन 'कव् + इष्ट:' अशी स्थिति होते. अशा स्थितीत 'लोप. शाकल्यस्य' सू. ६७ या सूत्राने वकाराचा विकल्पेंकरून लोप केल्यास, 'क इष्ट:' व 'कविष्ट:' अशी वैकल्पिक रूपे सिद्ध होतात. पण अशा रीतीने जरी 'अनल्विधौ' या प्रतिषेधाकडे दुर्लक्ष करून देखील 'क इष्ट:' असे इष्ट रूप सिद्ध होते तरी 'कविष्ट:' असे अनिष्ट पाक्षिक रूप होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टाळण्याकरिता 'अनल्विधौ' या प्रतिषेधाकडे दुर्लक्ष करता येत नाही आणि यकाराचे जागी झालेला इकारादेश अल्रूप स्थानीचे जागी झालेला असल्यामुळे तो यकारच आहे अशी स्थानिवद्भावाने बुद्धि करता येत नाही. म्हणून 'क + सु + इष्ट:' या स्थली 'ससजुषो रु.' या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचे रुत्व केल्यावर 'करु + इष्ट:' अशी स्थिति झाली असता, 'इष्ट:' यातील इकार हश्‌प्रत्याहारान्तर्गत यकार नाही व 'अश्' इकारच आहे अशी बुद्धि करणे भाग पडत असल्यामुळे, 'भोभगोअघो' सू. १६७ या सूत्राने 'रु' चे जागी उकार न होता यकार होऊन व 'लोप: शाकल्यस्य' या सूत्राने त्या यकाराचा विकल्पाने लोप होऊन 'क इष्ट:' व 'कयिष्ट.' अशी इष्ट वैकल्पिक रूपे सिद्ध होतात )

'अल् चेह स्थान्यवयव एव गृह्यते' असे जे मनोरमेत म्हटले आहे त्यातील 'स्थान्यवयव:' हे पद उपलक्षणार्थक आहे व त्या पदानें स्थानिरूप अल्चे देखील ग्रहण होते असे समजावे. अल्रूप स्थानीचे ठिकाणी देखील होणाऱ्या आदेशाला 'अनल्विधौ' हा प्रतिषेध लागू पडत असल्यामुळेच, 'आदेशिन्यल्याश्रीयमाणे प्रतिषेध.' असे भाष्यात म्हटले आहे. ('स्थानिवदादेश.' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'किं पुनरादेशिन्यल्याश्रीयमाणे प्रतिषेधो भवत्याहोस्विदविशेषेणादेश आदेशिनि च,' म्हणजे जेथें स्थानीमधील अलाच्या किंवा स्थानिरूप

अलाच्या आश्रयानें प्राप्त होणारा विधि असेल तेथेंच 'अनल्विधौ' हा प्रतिषेध लागू पडतो किंवा अविशेषेंकरून स्थानी अथवा आदेश यापैकीं कोणांहि मधील अलाच्या आश्रयानें प्राप्त होणारा विधि असेल तेथें देखील 'अनल्विधौ' हा प्रतिषेध लागू पडतो, असा प्रश्न केला आहे व दोन्ही पक्षांचा उहापोह करून अखेरीस भाष्यकार म्हणतात—'किं पुनरत्र ज्यायः। आदेशिन्यल्याश्रीयमाणे प्रतिषेध इत्येतदेव ज्यायः।' याचा अर्थ असा कीं, स्थानीमधील अलाच्या किंवा स्थानिरूप अलाच्या आश्रयानें प्राप्त होणारा विधि असेल तरच 'अनल्विधौ' हा प्रतिषेध लागू पडतो हाच पक्ष वरील दोन पक्षांपैकीं अधिक श्रेयस्कर पक्ष आहे. 'आदेशिन्यलि' असें जें वरील भाष्यांत म्हटलें आहे त्यांतील 'आदेशिनि' या पदाचा 'स्थानिनि' असा अर्थ आहे, व 'आदेशिनि अलि = स्थानिनि अलि' या पदांचा 'स्थान्यवयवे अलि' व 'स्थानिरूपे अलि' असा दोन्ही प्रकारें अर्थ करतां येतो. 'आदेशिनि' व 'अलि' या दोन्ही सप्तम्यन्त पदांचा सामानाधिकरण्यानें विशेषण-विशेष्यभावरूप अन्वय केल्यास, 'स्थानिरूपे अलि' असा अर्थ निष्पन्न होतो. 'आदेशिनि अलि' या स्थलीं 'आदेशिनि' हें पद 'आदेशिनः' या अवयवषष्ठीचें वाचक असून देखील 'विवक्षातः कारकाणि भवन्ति' या न्यायान्वयें आधाराची विवक्षा करून 'आदेशिनः' या अवयवषष्ठीचा 'आदेशिनि' असा सप्तमींत उपयोग—प्रयोग—केला आहे असें मानल्यास, 'स्थान्यवयवे अलि' असा दुसरा अर्थ निष्पन्न होतो असें भैरवींत सांगितलें आहे. म्हणूनच 'द्युकामः' या स्थलीं अल्रूप वकार या स्थानीचे जागीं झालेल्या उकाराचे ठिकाणी तो वकारच आहे अशी प्रथम अर्थान्वयें 'अनल्विधौ' या प्रतिषेधान्वयें स्थानिवद्भावानें वृद्धि करतां येत नाहीं. परंतु 'आदेशिनि अलि' या पदांचा 'स्थान्यवयवे अलि' एवढाच द्वितीय अर्थ केल्यास, ज्या वकाराचे जागीं वरील उदाहरणांत उकार झाला आहे तो स्थान्यवयव अल् नसून स्थानिरूप अल् असल्यामुळें, त्याला वरील प्रतिषेध लागू पडणार नाहीं व

त्यामुळे उकारादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भावाने तो वकारच आहे अशी वुद्धि होण्याची आपत्ति येते. म्हणून 'आदेशिनि अलि' याचे वर जे दोन अर्थ दिले आहेत ते दोन्ही अर्थ मानणे इष्ट आहे. साराश स्थानीच्या अल्रूप अवयवाचे जागी आदेश झाला असो किंवा अल्रूप स्थानीचे जागी आदेश झाला असो, दोन्ही स्थली 'अनल्विधौ' हा प्रतिषेध सारखाच लागू पडतो असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) म्हणून 'यञ्चादेशावयवो न तु स्थान्यवयवः' या मनो-रमेतील पंक्तीत 'न तु स्थान्यवयवः' असे म्हटले आहे व त्यामुळे ('ङे' चे जागी झालेला 'य' हा आदेश) स्थानिवद्भावाने प्रत्ययसंज्ञक होतोच (आणि तो आदेश स्वत.सिद्ध यञादि असल्यामुळे, 'राम + ङे = राम + य' या स्थली 'राम' या अदन्त अङ्गापुढे 'य' हा यञादि विभक्तिप्रत्यय आला असल्यामुळे 'सुपि च' सू. २०२ या सूत्राने 'राम' हे अदन्त अङ्ग दीर्घ होऊन 'रामाय' असे इष्ट रूप सिद्ध होते, व याचे कारण हेच की, स्थानिवद्भावाने प्रत्ययसज्ञक होणाऱ्या 'य' याचे ठिकाणी यञादित्व आणण्याकरिता 'ङे = ए' या अल्रूप स्थानीचा आश्रय केला नाही. 'ङेर्यः' सू. २०४ या सूत्रात उच्चा-रलेला 'ङे' हा स्थानी 'नानुबन्धकृतमनेकाल्त्वम्'—परि. ६—या परि-भाषान्वये जर 'ए' असा अल्रूप स्थानी ठरतो तरी, 'वल्त्व, यञ्त्व' इत्यादि जसे अल्मात्रवृत्ति, म्हणजे केवळ अलाचे ठिकाणी राहणारे, धर्म आहेत तसा 'सुप्त्व' हा धर्म केवळ अलाचे ठिकाणी राहणारा धर्म नसून 'जस्, शस्, भिस्, आम्' इत्यादि अनलाचे ठिकाणी देखील राहणारा धर्म असल्यामुळे, 'ङे = ए' स्थानीचे जागी 'य' हा आदेश झाला असता, 'ङे' चे ठिकाणी असणारा 'सुप्त्व'—प्रत्ययत्व—धर्म 'य' चे ठिकाणी स्थानिवद्भावाने येतो आणि 'अनल्विधौ' हा प्रतिषेध येथें लागू पडत नाही. स्थानिवद्भावानें प्रत्ययसज्ञा होते, आणि अशा रीतीने त्याला प्रत्ययसज्ञा प्राप्त झाल्यावर 'सुपि च' या सूत्राने जी दीर्घकार्याची प्राप्ति होते ती 'ङे' या अलाला मानून

होत नसून 'य' या आदेशांतील 'य्' या अलालाच मानून होत असल्यामुळें, दीर्घकार्य करतेवेळीं स्थानिवद्भावनिषेध लागू पडत नाहीं आणि म्हणूनच 'यञ्चादेशावयवो न तु स्थान्यवयवः' असें मनोरमेंत म्हटलें आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) 'अग्रहीत्' इत्यादि स्थलीं 'ग्रहोऽलिटि दीर्घः' सू. २५६२ या सूत्रानें इट्चेंच जागीं दीर्घ होण्याचें विधान केलें असल्यामुळें, अनुबन्धरहित 'इट्', म्हणजे 'इ', या अल्ला स्थानी मानतां येत नाहीं व टकारानुबन्धविशेषणयुक्त 'इट्' हा अनल् स्थानी मानल्यानें 'सिच्' प्रत्ययाच्या लोपाची सिद्धि होते, म्हणजे 'सिच् = स्' चा लोप होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. ('ग्रहोऽलिटि दीर्घः' या सूत्रांत 'आर्धधातुकस्येट्' या पूर्वसूत्रांतून 'इट्' या पदाची अनुवृत्ति होऊन त्याचें षष्ठींत 'इटः' असें विभक्तिविपरिणामानें रूपान्तर होतें व 'इटः' ही स्थानषष्ठी होते. त्यामुळें सूत्रनिर्दिष्ट टकारानुबन्धविशेषणविशिष्ट 'इट्' हा दीर्घादेशाचा स्थानी ठरतो आणि हा स्थानी अल् नसून अनल् असल्यामुळें, दीर्घकार्य केल्यानंतर जेव्हां त्या इट्चें 'ईट्' असें दीर्घरूप होतें तेव्हां तो दीर्घ 'ईट्' इट्च आहे असें स्थानिवद्भावानें मानतां येतें व येथें अलाश्रित विधि झाला नसल्यामुळें, 'अनल्विधौ' हा प्रतिषेध लागू पडत नाहीं. म्हणून 'अ + ग्रह् + इट् + सिच् + ईट् + त्' या स्थलीं 'ग्रह्' धातूपुढील 'इट्' 'ग्रहोऽलिटि दीर्घः' या सूत्रानें दीर्घ झाल्यावर देखील तो ऱ्हस्व इट्च आहे असें स्थानिवद्भावानें मानतां येत असल्यामुळें, 'इट ईटि' सू. २२६६ या सूत्रानें होणारा सिच्चा लोप होण्यांत व 'अग्रहीत्' असें इष्ट रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. 'स्थानिवदादेशः' १-१-५६ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं 'इह च प्रतिषेधो न भविष्यति, अग्रहीदिति । विशिष्टं ह्येषोऽनलमाश्रयते इटं नाम' असें या विषयासंबंधानें स्पष्ट म्हटलें आहे.) 'आश्रयणं चेह यथाकथञ्चित् न तु प्राधान्येनैवेत्याग्रहः' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे

त्याचें कारण हें कीं, भाष्यकारांनीं प्रकृत सूत्रावरील भाष्यांत तसें व्याख्यान केलें आहे. (तें भाष्य पूर्वी मनोरमेंत दिलेंच आहे. त्या भाष्यावरील टीकेंत कैयटानें 'अनलित्युच्यमाने यत्र कार्ये स्वातन्त्र्येणालाश्रीयते, तत्रैव निषेधः स्यात्–क इष्टः स इष्ट इत्यादौ। प्रदीव्येत्यादौ इटः प्रतिषेधो न स्यात्। नह्यीड्विधौ वलः स्वातन्त्र्येणाश्रयणम्, वलादेरित्यन्यपदार्थस्य प्राधान्याद्गुणभावाद्वलः। उत्तरपदलोपे त्वलाश्रयत्वादिड्विधेः प्रतिषेधसिद्धिः।' असें म्हटलें आहे व या विषयाचें विवेचन देखील पूर्वी मनोरमेत केलेंच आहे.)

मनोरमा––"अचः"। अल्विध्यर्थमिति। तेन वव्रश्चेत्यत्र वस्य संप्रसारणं न उरदत्वस्य स्थानिवत्त्वेन संप्रसारणतया "न संप्रसारण" इति निषेधात्। न चोरदत्वं परनिमित्तं नेति वाच्यम्, अङ्गाक्षिप्ते प्रत्यये परे तद्विधानात्, 'प्रागभ्यासविकारेभ्योऽङ्गाधिकारः' इति पक्षं दूषयित्वा 'आसप्तमसमाप्तेः' इति पक्षस्यैव आकरे सिद्धान्तितत्वात्। किं च पूर्वसूत्रेण स्थानिप्रयुक्तमतिदिश्यते नत्वादेशप्रयुक्तं वार्यते, नायकः, पावक इत्यादौ "एचोऽयवायावः" इत्यादीनामप्रवृत्तिप्रसङ्गात्। अनेन तु वार्यते, शब्दाधिकारमाश्रित्य भावाभावयोरुभयोरप्यतिदेशोऽयमिति स्वीकारात्। न पदान्त" इति सूत्रे यलोपदीर्घादिग्रहणं चेह लिङ्गम्। अत एव गणयतीत्यादौ न वृद्धिः, स्थानिनि सत्यभवन्त्यास्तस्या आदेशेऽप्यभावातिदेशात्। उक्तं च "काममतिदिश्यतां वा सच्चासच्चापि नेह भारोऽस्ति" इति। स्यादेतत्–पूर्वत्वस्य सावधित्वेन सन्निहितस्यैव अवधित्वमुचितम्। सन्निहितं चेह त्रयम् स्थानी, आदेशो, निमित्तं च। तत्र न तावत् स्थानी अवधिः, तस्यादेशेनापहारात्। नाप्यादेशनिमित्ते, 'वैयाकरणः' इत्यत्र ऐकारस्यायादेशापत्तेरित्याशङ्क्याह–अचः पूर्वत्वेन दृष्टस्येति। पूर्वत्वमुपलक्षणं, न तु विशेषणमिति भावः। एतेन "अचः पूर्वत्वविज्ञानादचोः सिद्धम्" इति वार्तिकं व्याख्यातम्॥

अलाला किंवा अल्मात्रवृत्तिधर्माला मानून जेथें कांहीं कार्य

करणें आहे तेथें देखील स्थानिवद्भाव व्हावा याकरितां 'अचःपरस्मिन् पूर्वविधौ' सू. ५० हें सूत्र केलें आहे. (अलाश्रयविधि करते वेळीं 'स्थानिवदादेशः' या पूर्वसूत्रांतील 'अनल्विधौ' या प्रतिषेधानें स्थानिवद्भावाचा निषेध सांगितला होता. पूर्वाला कार्य कर्तव्य असतां अचाचे जागीं होणाऱ्या आदेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करणें हा जरी अलाश्रित विधि आहे तरी, तशा स्थलीं स्थानिवद्भावाचा निषेध लागू न पडावा व अजादेश स्थानवत् मानला जावा याकरितां प्रकृत सूत्र अपवादरूपानें पठित केलें आहे. या प्रकृत सूत्रांत पूर्वसूत्रांतून 'स्थानिवदादेशः' हीं पदें अनुवृत्त होत असून 'आदेशः' हें अनुवृत्त पद प्रकृतसूत्रांतील 'अचः' या पदाशीं अन्वित होतें व 'परस्मिन्' ही निमित्तसप्तमी असल्यामुळें व आदेशाचें विशेषण असल्यामुळें, 'परनिमित्तकः अजादेशः स्थानिवद्भवति, पूर्वविधौ कर्तव्ये' असा प्रकृत सूत्राचा अर्थ निष्पन्न होतो.) हें सूत्र असल्यामुळेंच, 'वव्रश्च' या स्थलीं वकाराचें संप्रसारण होत नाहीं; कारण 'उरत्' सू. २२४४ या सूत्रानें ऋकाराचे जागीं जो अकार होतो तो स्थानिवद्भावानें संप्रसारणरूप ऋकारच आहे असें मानतां येत असल्यामुळें व 'न सम्प्रसारणे सम्प्रसारणम्' सू. ३६३ हें निषेधक सूत्र असल्यामुळें, वकाराचें संप्रसारण होत नाहीं. 'उरत्' या सूत्रानें ऋकाराचे जागीं जो अकार होतो तो पुढें असलेल्या कोणत्याहि निमित्तामुळें झाला नाहीं असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण अङ्गानें प्रत्यय आक्षिप्त होत असल्यामुळें प्रत्यय पुढें असतांनाच अभ्यासांतील ऋकाराचे जागीं अकार होण्याचें विधान केलें आहे असें सिद्ध होतें. अङ्गाधिकार अभ्यासविकाराचीं सूत्रें सुरू होईपर्यंतच चालू आहे असा जो पक्ष आहे त्या पक्षांत दोष दाखवून भाष्यकारांनीं असाच सिद्धान्त सांगितला आहे कीं सप्तमाध्यायाच्या अखेरपर्यंत अङ्गाधिकार चालू आहे. ('ओ व्रश्चू छेदने' या धातूचें लिटाचें प्रथम पुरुषाचें एकवचनाचें रूप करितांना, 'लिटि धातोरनभ्यासस्य' सू. २१७७

या सूत्रान्वयें द्विर्वचन करून 'व्रश्च् व्रश्च् + णल्' अशी स्थिति झाली असतां, 'लिट्यभ्यासस्योभयेषाम्' सू. २४०८ या सूत्रानें 'व्रश्च्' या अभ्यासांतील रकारास संप्रसारण होऊन व 'सम्प्रसारणाच्च' सू. ३३० या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन 'वृश्च्' असें अभ्यासाचें रूप झाल्यावर, 'उरत्' या सूत्रानें अभ्यासांतील ऋकाराचे जागीं अकार होऊन व 'उरण्रपरः' सू. ७० या सूत्रानें तो अकार रपर होऊन 'वर्श्च' असें अभ्यासाचें रूप झालें असतां, 'हलादिः शेषः' सू. २१७९ हें सूत्र प्रवृत्त केल्यानें 'व' असें अभ्यासाचें रूप होऊन 'व + व्रश्च् + णल्' अशी स्थिति होते. अशा स्थितींत 'लिट्यभ्यासस्योभयेषाम्' या सूत्रानें अभ्यासांतील वकारास देखील संप्रसारण पावलें आहे. येथें 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत्प्रवृत्तिः' हा न्याय लागू पडत नाहीं; कारण वरील सूत्रान्वयें पूर्वी रकारास संप्रसारण केलें होतें व आतां वकार या भिन्न लक्ष्याला संप्रसारण करणें आहे. वकाराचें संप्रसारण केल्यास, 'वव्रश्च' असें इष्ट रूप सिद्ध न होतां, 'उव्रश्च' असें अनिष्ट रूप सिद्ध होण्याची आपत्ति येईल. 'अचः परस्मिन्पूर्वविधौ' हें सूत्र असल्यामुळें ती आपत्ति टळते; कारण 'वृ' या अभ्यासवर्णातील ऋकाराचे जागीं 'उरत्' या सूत्रान्वयें जो अकार झाला आहे त्याला, त्याच्या-पूर्वी असलेल्या वकारास संप्रसारणकार्य करतेवेळीं, स्थानिवद्भावानें तो अकार संप्रसारणच आहे असें प्रकृतसूत्रान्वयें मानतां येतें व तसें मानल्यानें वकारापुढें संप्रसारण येत असल्यामुळें, 'न सम्प्रसारणे सम्प्रसारणम्' या निषेधक सूत्रान्वयें संप्रसारण होत नाहीं व 'वव्रश्च' असें इष्ट रूप सिद्ध होतें. हें खरें कीं, प्रकृत उदाहरणांत अलाश्रयविधि करून, म्हणजे संप्रसारणरूप 'ऋ' या अलाचे जागीं झालेला 'अ' हा आदेश संप्रसारणच आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि करून, वकारास होणारें संप्रसारण टाळलें आहे. 'स्थानिवदादेशः' या पूर्वसूत्रांत 'अनल्विधौ' हा निषेध असल्यामुळें असा अलाश्रयविधि करतां येणें शक्य नव्हतें. परंतु प्रकृत सूत्र त्या पूर्वसूत्राचें अपवादक

सूत्र असून, प्रकृत सूत्रास 'अनल्विधौ' हा निषेध लागू पडत नाहीं व परनिमित्तामुळें अचाचे जागीं झालेला आदेश, त्याच्या पूर्वी असलेल्या वर्णास कार्य करतेवेळीं, प्रकृत सूत्रान्वयें स्थानिवत् मानतां येतो आणि त्यामुळें 'ऋ' या अल्चे जागीं झालेला अकार हा संप्रसारणच आहे अशी स्थानिवद्भावानें वृद्धि करून वकाराचें संप्रसारण टाळण्यांत कांहींच अडचण येत नाहीं. आतां शंकाकार अशी शंका करतो कीं, 'उरत्' या सूत्रान्वयें 'ऋ' या अचाचे जागीं झालेला अकारादेश परनिमित्तक नसल्यामुळें, म्हणजे पुढें असलेल्या कोणत्याहि निमित्तामुळें झाला नसल्यामुळें, प्रकृत उदाहरणांत 'अचः परस्मिन्' हें सूत्र लागू पडत नाहीं व त्यामुळें स्थानिवद्भाव करतां येत नाहीं. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात कीं, अभ्यासविकार सांगणारें 'उरत्' हें सूत्र अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें, त्या सूत्रांत 'अङ्गस्य' हें पद अन्वित होऊन 'अङ्गावयवस्य अभ्यासऋकारस्य स्थाने अकारादेशो भवति' असा त्या सूत्राचा अर्थ होतो आणि 'यस्मात् प्रत्ययविधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गम्' सू. १९९ या सूत्रान्वयें अङ्गसंज्ञा प्राप्त होण्यास पुढें प्रत्यय असणें आवश्यक असल्यामुळें, अङ्ग म्हटलें कीं त्याबरोबर प्रत्यय येतोच व अङ्गाला जें कार्य होणें सांगितलें आहे तें पुढें असणाऱ्या प्रत्ययाच्या निमित्तानेंच होतें असें मानलें पाहिजे. म्हणून प्रकृत उदाहरणांत ऋकाराचे जागीं जो अकार झाला आहे तो पुढें असलेल्या लिट्लकाराच्या णल्प्रत्ययरूप निमित्तामुळेंच झाला आहे असें मानणें भाग आहे. सारांश 'ऋ' या अचाचे जागीं झालेला 'अ' हा आदेश परनिमित्तक ठरत असल्यामुळें, प्रकृत सूत्रान्वयें त्या आदेशाचे ठिकाणीं, स्थानिवद्भाव करतां येतो व स्थानिवद्भावानें तो आदेश संप्रसारणच आहे असें मानल्यानें, पूर्वी असलेल्या वकाराचें संप्रसारण टळतें. येथें कित्येक असें म्हणतात कीं, अभ्यासविकाराचीं सूत्रें सुरू होण्यापूर्वी, म्हणजे 'अत्र लोपोऽभ्यासस्य' हें अभ्यासविकाराचें सूत्र सुरू होईपर्यंतच,

अङ्गाधिकार चालू आहे. पण 'अङ्गस्य' सू. ६.४.१ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारानी 'अङ्गस्य' हा अधिकार अभ्यासविकाराची सूत्रें सुरू होईपर्यंतच चालू आहे किंवा सप्तमाध्याय समाप्त होईपर्यंत चालू आहे असा प्रश्न उपस्थित करून व दोन्ही पक्षात दोप दाखवून अखेरीस 'आ सप्तमाध्यायपरिसमाप्तेरङ्गाधिकारः' असा सिद्धान्त सांगितला आहे. त्या भाष्यांत भाष्यकार म्हणतात–'आ कुतोऽयमधिकारः ? । आ सप्तमाध्यायपरिसमाप्तेरङ्गाधिकारः । यदि तर्ह्या- सप्तमाध्यायपरिसमाप्तेरङ्गाधिकारो गुणो यङ्लुकोरिति यङ्लुग्ग्रहण कर्तव्यम् । प्रागभ्यासविकारेभ्यः पुनरङ्गाधिकारे सति प्रत्ययलक्षणेन सिद्धम् । अस्तु तर्हि प्रागभ्यासविकारेभ्योऽङ्गाधिकारः । यदि प्रागभ्यासविकारेभ्योऽङ्गाधिकारो–वव्रश्च–वकारस्य सम्प्रसारण प्राप्नोति । आ सप्तमाध्यायपरिसमाप्तेः पुनरङ्गाधिकारे सत्युरदत्त्वस्य स्थानिवद्भावात्से सम्प्रसारणे सम्प्रसारणमिति प्रतिपेधः सिद्धो भवति ।... अस्तु तर्ह्या सप्तमाध्यायपरिसमाप्तेरङ्गाधिकारः । ननु चोक्तं गुणो यङलुकोरिति यङ्लुग्ग्रहणं कर्तव्यमिति । क्रियते न्यास एव' । हें भाष्य स्पष्ट असल्यामुळे त्याचा अर्थ देण्याची आवश्यकता वाटत नाही. या भाष्याला धरूनच दीक्षितांनी मनोरमेंत 'तेन वव्रश्चेत्यत्र... आकरे सिद्धान्तितत्वात्' ही पंक्ति लिहिली आहे. आतां 'स्थानिवदादेशः' या पूर्वसूत्रात व प्रकृतसूत्रांत काय फरक आहे हें दीक्षित पुढील पक्तीत सागतात.) दुसरे असे की, 'स्थानिवदादेशः' या पूर्वसूत्राने स्थानीला मानून होणाऱ्या कार्याचा अतिदेश केला असून, आदेशाला मानून होणाऱ्या कार्याचे वारण केले नाही. आदेशाला मानून होणाऱ्या कार्याचे वारण केलें असतें तर, 'नायकः, पावकः' इत्यादि उदाहरणात 'एचोऽयवायावः' सू. ६१ इत्यादि सूत्रांची प्रवृत्ति न होण्याची आपत्ति आली असती. परतु प्रकृत सूत्राने आदेशाला मानून होणाऱ्या कार्याचें वारण केले आहे, म्हणजे तसे कार्य होत नाही; कारण भाष्यकारानी प्रकृत सूत्रात 'स्थानिवदादेशः'

या पूर्वसूत्रांतून 'स्थानिवदादेशः' या पदांची शब्दाधिकाराचा आश्रय करून अनुवृत्ति केली आहे व असें म्हटलें आहे कीं, प्रकृत सूत्रानें भाव व अभाव या दोहोंचाहि अतिदेश केला जातो. ('स्थानिवदादेशः' या पूर्व सूत्रांत व प्रकृत सूत्रांत हा फरक आहे कीं, 'स्थानिवदादेशः' या पूर्व सूत्रानें आदेशाचे ठिकाणीं स्थानिवद्बुद्धि करून स्थानी विद्यमान असतांना जें कार्य पावलें आहे तें कार्य आदेश झाल्यावर देखील होतें आणि तसेंच स्थानी विद्यमान असतांना प्राप्त न होणारें पण आदेश झाल्यावर त्या आदेशाला मानूनच प्राप्त झालेलें कार्य 'स्थानिवदादेशः' या पूर्व सूत्रानें निषिद्ध केलें जात नाहीं, म्हणजे तसें कार्य देखील करतां येतें. म्हणूनच पूर्व सूत्र केवळ भावातिदेश करणारें सूत्र आहे व त्या सूत्रानें अभावाचा अतिदेश होत नाहीं असें म्हटलें आहे. पण प्रकृत सूत्रानें स्थानी विद्यमान असतांना जें कार्य पावलें आहे तेवढेंच कार्य आदेशाचे ठिकाणीं स्थानिवद्बुद्धि करून करतां येतें; परंतु आदेश झाल्यावर त्या आदेशाला मानून प्राप्त झालेलें कार्य करतां येत नाहीं. 'स्थानिनि सति यद्भवति तदादेशेऽपि भवति' याला भावातिदेश म्हणतात व 'स्थानिनि सति यन्नभवति तदादेशे कृते प्राप्तमपि न भवति' याला अभावातिदेश म्हणतात व या दोन्ही अतिदेशांचीं उदाहरणें प्रकृत सूत्रावरील भाष्यांत दिलीं आहेत. त्या भाष्यांत 'काममतिदिश्यतां वा सच्चासच्चापि नेह भारोऽस्ति कल्प्यो हि वाक्यशेषो वाक्यं वक्तर्यधीनं हि ॥' म्हणजे भाव व अभाव या दोहोंचाहि इच्छेप्रमाणें अतिदेश करतां येतो. भावाचा व अभावाचा अतिदेश करितांना सूत्रावर भार पडत नाहीं; कारण वाक्य कसें तयार करणें हें वक्त्याच्या इच्छेवर अवलंबून असल्यामुळें, वाटेल तसा इच्छेप्रमाणें वाक्यशेष कल्पून अतिदेश करतां येतो, असें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचें व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात:—'अथवा वतिनिर्देशोऽयं कामचारश्च वतिनिर्देशे वाक्यशेषं समर्थयितुम् । तद्यथा । उशीनरवन्मद्रेषु यवाः । सन्ति न सन्तीति ।

मातृवदस्याः कला । सन्ति न सन्तीति । एवमिहापि स्थानिवद्भवति स्थानिवन्न भवतीति वाक्यशेप समर्थयिष्यामहे । इह तावत् पट्व्या मृद्व्येति यथा स्थानिनि यणादेशो भवत्येवमादेशेऽपि भवति । इहेदानीं वाय्वो अध्वर्य्वोरिति, यथा स्थानिनि यलोपो न भवत्येवमादेशेऽपि न भवति ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'पूर्वविधौ कर्तव्ये परनिमित्तक. अजादेश स्थानिवद्भवति' या प्रकृत सूत्रातून निष्पन्न होणाऱ्या वाक्यात 'स्थानिवत्' असा वतिप्रत्ययान्त निर्देश असल्यामुळे, वाक्यशेप इच्छेप्रमाणे करता येतो व अभावातिदेश करताना सूत्रनिर्दिष्ट शब्दावर काही भार पडत नसून तो अर्थ देखील सूत्रातूनच निघू शकतो. उदाहरणार्थ 'उशीनरवन्मद्रेपु यवा ' असे म्हटले असता, उशीनरदेशामध्ये जर यव असले तर तसेच यव मद्रदेशात देखील आहेत असे ज्ञात होते व उशीनरदेशामध्ये जर यव नसतील तर मद्रदेशात देखील यव नाहीत असे त्याच वाक्यावरून बोधित होते. तसेच 'मातृवदस्या कला ' असे म्हटले असता, जर आईचे ठिकाणी कलाकौशल्य असेल तर मुलीचे ठिकाणीहि ते आहे असे ज्ञात होते व आईचे ठिकाणी जर कलाकौशल्य नसेल तर मुलीचेहि ठिकाणी ते नाही असे त्याच वाक्यावरून बोधित होते. त्याचप्रमाणे प्रकृत सूत्रात आदेश स्थानीसारखा होतो असे म्हटले असल्यामुळे, स्थानी जर एखाद्या कार्याला कारणीभूत होत असेल तर त्याचे ठिकाणी झालेला आदेश देखील त्या कार्याला कारणीभूत होतो असे म्हणता येते, म्हणजे असा भावातिदेश करता येतो व स्थानी जर एखाद्या कार्याला कारणीभूत होत नसेल तर त्या स्थानीचे जागी झालेला आदेश देखील त्या कार्याला कारणीभूत होऊ शकत नाही असा अभावातिदेश देखील त्याच वाक्यातून निष्पन्न होतो म्हणून 'पट्व्या, मृद्व्या' या उदाहरणात 'पटु + ङीप् + आ, मृदु + ङीप् + आ' अशा स्थितीत 'ङीप् = ई' हा स्थानी असताना जसा त्याच्या निमित्ताने 'इको यणचि' सू. ४७ या सूत्राने 'पटु' यातील उकाराचे जागी वकारादेश करता येतो

त्याचप्रमाणें त्या इकाराचे जागीं प्रथम उत्तरयणादेश करून झालेला यकारादेश देखील पूर्व यणादेशाला कारणीभूत होतो, म्हणजे इकार हा स्थानी विद्यमान असतांना जसा 'पटु+ई, मृदु+ई' या ठिकाणीं पूर्व यणादेश पावला होता तसाच 'ई+आ' या ठिकाणीं उत्तर यणादेश केल्यावर तो यणादेश–यकार–हा ईच आहे असें मानून पूर्व यणादेश देखील होऊं शकतो. 'पट्व्या, मृद्व्या' हीं भावातिदेशाचीं उदाहरणें होत. 'वाय्वोः, अध्वर्योः' हीं अभावातिदेशाचीं भाष्यांत दिलेलीं उदाहरणें आहेत. 'वायु+ओस्, अध्वर्यु+ओस्' या स्थलीं उकार हा स्थानी विद्यमान असतांना पूर्व यकाराचा 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें होणारा लोप पावला नसल्यामुळें, उकाराचे जागीं 'इको यणचि' या सूत्रानें वकारादेश झाल्यावर जरी यकारापुढें वकार येतो तरी त्या वकारादेशाला मानून होणारा यकाराचा लोप करतां येत नाहीं, म्हणजे वकारादेश यकारलोपाला कारणीभूत होऊं शकत नाहीं. वरील भाष्यांत 'पट्व्या, मृद्व्या' हीं जीं भावातिदेशाचीं उदाहरणें दिलीं आहेत तीं वास्तविक अन्यथासिद्ध आहेत असें भाष्यांतच सांगितलें आहे. 'पटु+इ+आ' या स्थलीं परनिमित्त जो 'आ' त्याच्या योगानें उत्तर यणादेश पावला आहे व पूर्व निमित्त जो 'इ' त्याच्या योगानें पूर्व यणादेश पावला आहे. म्हणून पूर्व यणादेश प्रथमोपस्थितनिमित्तक–पूर्वी असलेल्या निमित्तामुळें होणारा–असल्यामुळें व उत्तर यणादेश परोपस्थितनिमित्तक–पुढें असणाऱ्या निमित्तामुळें होणारा–असल्यामुळें व 'पूर्वोपस्थितनिमित्तकमन्तरङ्गं परोपस्थितनिमित्तकं बहिरङ्गम्' असा न्याय असल्यामुळें, पूर्व यणादेशाच्या मानानें उत्तर यणादेश बहिरङ्ग ठरतो व 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे'–परि. ५०–ही परिभाषा असल्यामुळें उत्तर यणादेश प्रथम न होतां पूर्व यणादेशच प्रथम होतो व उत्तर यणादेश प्रथम होऊंच शकत नाहीं. पूर्व यणादेश झाल्यावरच, म्हणजे 'पट् इ आ = पट्वी आ' अशी स्थिति झाल्यावरच, उत्तर यणादेश होऊन 'पट्व्या' असें रूप

सिद्ध होतें. म्हणून ईकार हा स्थानी विद्यमान असतांना त्याच्या निमित्तानें पूर्व यणादेश पावला असल्यामुळे, 'पूर्वात्परं बलवत्' या न्यायान्वये उत्तर यणादेश प्रथम केला तरी, ईचे जागी होणारा यकारादेश स्थानिवद्भावानें ईच आहे असे मानल्याने पूर्व यणादेश नंतर करता येतोच व अशा रीतीनें 'पट्व्या, मृद्व्या' ही भावातिदेशाची उदाहरणे ठरतात असे जे भाष्यात म्हटले आहे ते एकदेशीचे वचन मानले पाहिजे; कारण प्रकृत सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात–'आरभ्यमाणे त्वस्मिन् योगे नित्यः पूर्वयणादेशः। कृतेऽपि परयणादेशे प्राप्नोत्यकृतेऽपि। परयणादेशोऽपि नित्यः। कृतेऽपि पूर्वयणादेशे प्राप्नोत्यकृतेऽपि। व्यवस्थया चासौ परः। न चास्ति यौगपद्येन सम्भवः। कथं च सिद्ध्यति ?। बहिरङ्गेण सिद्ध्यति। असिद्धं बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षणे इत्यनेन सिद्ध्यति।' या भाष्याचा अर्थ असा आहे की, प्रकृत सूत्रान्वये स्थानिवद्भाव मानला असतां, म्हणजे ईचे जागी होणारा यकारादेश ईच आहे असे स्थानिवद्भावानें मानले असता, पूर्व यणादेश नित्य ठरतो; कारण पर यणादेश प्रथम केला तरी स्थानिवद्भावाने पूर्व यणादेश प्राप्त होतो व पर यणादेश करण्यापूर्वीहि तो प्राप्त होतो. पण अशा रीतीनें परयणादेश देखील नित्य ठरतो; कारण तो देखील पूर्व यणादेश केल्यानंतर व तसेच पूर्व यणादेश करण्यापूर्वीहि प्राप्त होतो. शिवाय वरील उदाहरणातील वर्णक्रमाकडे लक्ष दिले असता तो उत्तर यणादेश पर ठरतो आणि दोन्ही यणादेश एकदम करता येत नाहीत. मग 'पट्व्या, मृद्व्या' ही रूपें कशी सिद्ध होणार ? 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषेनें ती रूपे सिद्ध होतात. या भाष्यावरून हे स्पष्ट होते की, 'पट्व्या, मृद्व्या' ही भावातिदेशाची योग्य उदाहरणे मानता येत नाहीत. म्हणून 'निगाल्यते' हे भावातिदेशाचे उदाहरण मानणे योग्य आहे. 'नि + गृ + णिच् + यक् + ते' या स्थली 'गृ' धातूपुढें 'णिच्' हा णित् प्रत्यय आला असल्यामुळें 'अचोञ्णिति' सू. २५८ या सूत्रानें 'गृ' यातील अन्त्य

ऋकाराची वृद्धि होऊन निगार् + णि + यक् + ते' अशी स्थिति झाली असतां, 'णेरनिटि' सू. २३१३ या सापादिक सूत्रानें णिलोप प्रथम होऊन 'निगार् + यते' अशी स्थिति होते व अशा स्थितींत णिलोपाचे ठिकाणीं तो 'णि = इ' विद्यमान आहे अशी प्रकृत सूत्रान्वयें स्थानिवद्भावानें वृद्धि केल्यानें, 'णि' प्रत्यय कायम असतांना 'अचि विभाषा' सू. २५४१ या त्रैपादिक सूत्रानें जें वैकल्पिक लत्वकार्य पावलें होतें तें 'णि = इ' या अचाचे जागीं लोपरूप आदेश झाल्यावर देखील होतें. आतां 'शब्दाधिकारमाश्रित्य ......स्वीकारात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, भाष्यकारांनीं पूर्व सूत्रांतून प्रकृत सूत्रांत 'स्थानिवदादेशः' हीं जीं पदें अनुवृत्त केलीं आहेत त्यांचा 'आदेशः स्थानिवद्भवति' असा जो पूर्व सूत्रांत अर्थ आहे त्या अर्थाला धरून त्या पदांची अनुवृत्ति केली नसून केवळ त्या पदांची अनुवृत्ति केली आहे, म्हणजे अर्थाधिकाराचा आश्रय न करितां शब्दाधिकाराचा आश्रय करून त्या पदांची प्रकृत सूत्रांत अनुवृत्ति केली आहे व त्या पदांचा 'स्थानिनि सति यद्भवति तद्भवति, स्थानिनि सति यन्न भवति तन्न भवति' असा भावाभावातिदेशरूप भिन्न प्रकारचा अर्थ केला आहे. 'क्लृप्तार्थ-परित्यागेन शब्दमात्रस्य सम्बन्धो यत्र तत्र शब्दाधिकार इति व्यवहारः, यत्र तु क्लृप्तार्थसम्बद्धशब्दस्यान्यत्र सम्बन्धस्तत्रार्थाधिकार इति–' म्हणजे पूर्व सूत्रांतील पदांचा त्या सूत्रांत जसा अर्थ केला आहे त्या अर्थाचा परित्याग करून जर त्या पदांची उत्तर सूत्रांत अनुवृत्ति केली असेल तर तेथें शब्दाधिकार मानावा व त्या अर्थाला धरूनच जर अनुवृत्ति केली असेल तर तेथें अर्थाधिकार मानावा, असा या दोन अधिकारांत फरक आहे असें भैरवींत म्हटलें आहे. 'स्थानिवदादेशः' या सूत्रानें अभावाचा अतिदेश केला नसल्यामुळेंच व स्थानीचे जागीं आदेश केल्यावर त्या आदेशाच्या निमित्तानें ज्या कार्याची प्राप्ति होते तें कार्य करूं नये असा प्रतिबंध केला नसल्यामुळेंच 'नायकः,

पावकः' ही इष्ट रूपें सिद्ध होऊं शकतात असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'नी' व 'पू' धातूहून 'ण्वुल्तृचौ' सू. २८९५ या सूत्राने 'ण्वुल् = व्' प्रत्यय केला असता, तो प्रत्यय णित् असल्यामुळें, 'अचो ञ्णिति' सू. २५४ या सूत्राने त्या धातूंतील अन्त्य अचाला वृद्धि पावली आहे व तसेच 'युवोरनाकौ' सू. १२४७ या सूत्राने 'ण्वुल् = व्' प्रत्ययाचे जागी 'अक' असा आदेश पावला आहे. हे आदेशरूप कार्य निर्निमित्तक असून वृद्धिकार्य पुढें असणाऱ्या 'ण्वुल्' प्रत्ययाच्या निमित्ताने होणारे असल्यामुळे, आदेशरूपकार्य वृद्धिकार्यांच्या मानाने अन्तरङ्ग ठरते व त्यामुळे 'ण्वुल् = व्' चे जागी 'अक' असा आदेश प्रथम होतो व हा आदेश 'ण्वुल्' प्रत्ययच आहे अशी पूर्व सूत्रान्वये स्थानिवद्भावाने वुद्धि करतां येते व त्यामुळें वृद्धि होऊन 'नै + अक, पौ + अक' अशी स्थिति झाली असता, 'अक' या आदेशातील अकाराला मानून 'एचोऽयवायावः' सू. ६१ या सूत्राने जे आयादेशरूप व आवादेशरूप कार्य पावलें आहे ते देखील होतें व तें आदेशरूप कार्य करतेवेळी 'स्थानिवदादेशः' हे पूर्व सूत्र आड येत नाही आणि म्हणूनच 'नायकः, पावकः' अशी इष्ट रूपें सिद्ध होतात. स्थानी विद्यमान असताना जे कार्य पावलें नव्हते ते कार्य, आदेश झाल्यावर त्याच्या निमित्ताने प्राप्त होत असले तरी, करता येत नाही असा जर पूर्व सूत्राने अभावाचा अतिदेश केला असता तर, 'नायकः, पावकः' ही इष्ट रूपें सिद्ध होऊं शकली नसती; कारण 'ण्वुल् = व्' हा स्थानी विद्यमान असतांना आयादेश व आवादेश पावले नव्हते व त्या स्थानीचे जागी 'अक' असा आदेश केल्यानतर त्या आदेशाच्या निमित्तानेंच ती आदेशरूप कार्यें पावली. साराश पूर्व सूत्रात व प्रकृत सूत्रात हा फरक आहे की, पूर्व सूत्रानें अभावाचा अतिदेश होत नाही व प्रकृत सूत्रानें भाव व अभाव या दोहोंचाहि अतिदेश होतो.) प्रकृत सूत्रानें अभावाचा देखील अतिदेश होतो याचे 'न पदान्त' सू. ५१ या सूत्रांत केलेले

यलोप, दीर्घ इत्यादिकांचें ग्रहण ज्ञापक आहे. (यलोपाचें 'यातिः' हें उदाहरण आहे. 'या' धातूहून 'धातोरेकाचः' सू. २६२९ या सूत्रानें 'यङ=य' प्रत्यय करून व यङन्ताहून 'क्तिच्क्तौ च' सू. ३३१३ या सूत्रानें 'क्तिच्=ति' प्रत्यय करून व 'सन्यङोः' सू. २३१५ या सूत्रानें द्विर्वचन करून 'याया+यङ+क्तिच्=याया+य+ति' अशी स्थिति झाली असतां, 'क्तिच्' हा आर्धधातुकप्रत्यय पुढें असल्यामुळें 'यङ=य' यांतील अकाराचा 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें लोप होऊन 'यायाय्+ति' अशी स्थिति होते. अशा स्थितींत 'ति' हा वलादिप्रत्यय पुढें असल्यामुळें 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें यकाराचा लोप पावला आहे. 'यङ=य' या प्रत्ययांतील अकार विद्यमान असतांना अकाराच्या व्यवधानामुळें यकारलोप होऊं शकत नव्हता. म्हणून अकाराचा लोप झाल्यावर देखील 'स्थानिनि सति यन्न भवति तदादेशेऽपि न भवति' या अभावातिदेशरूप वचनान्वयें यकारलोप होऊं नये; पण यकारलोप होणें इष्ट आहे व म्हणून यलोप करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होऊं नये व अभावातिदेशामुळें जो यकाराचा लोप होऊं शकत नव्हता तो व्हावा याकरितां 'न पदान्त' या स्थानिवद्भावनिषेधक सूत्रांत यलोपाचें ग्रहण केलें आहे, आणि अशा रीतीनें त्या सूत्रांतील यलोपाचें ग्रहण प्रकृत सूत्रानें होत असणाऱ्या अभावातिदेशाचें ज्ञापक ठरतें. यकाराचा लोप होऊन 'याया+ति' अशी स्थिति झाली असतां, यङमधील जो अकाराचा लोप झाला आहे त्या लोपाचे ठिकाणीं तो ङित् आर्धधातुक अजादिप्रत्यय अकारच आहे अशी प्रकृत सूत्रान्वयें स्थानिवद्भावानें वृद्धि केल्यानें 'आतो लोप इटि च' सू. २३७२ या सूत्रानें 'याया' यांतील अन्त्य आकाराचा लोप होऊन 'याय्+ति' अशी स्थिति झाल्यावर 'लोपो व्योर्वलि' या सूत्रानें यकारलोप होऊन 'यातिः' असें प्रथमेच्या एकवचनाचें रूप सिद्ध होतें. तसेंच 'प्रतिदिवन्+शस्' या स्थलीं 'अल्लोपोऽनः' सू. २३४

या सूत्रानें 'प्रतिदिवन्' या भसंज्ञक अङ्गांत असणाऱ्या "अन्' यांतील अकाराचा लोप केल्यावर 'दिव्' या इगुपध वान्त धातूपुढें नकार हा हल् येत असल्यामुळें 'हलि च' सू. ३५४ या सूत्रानें 'दिव्' यांतील इकार या उपधेचें दीर्घकार्य होणें पावलें आहे. पण जेव्हां अकार विद्यमान होता तेव्हां दीर्घकार्य होऊं शकत नव्हतें; कारण त्यावेळीं नकार या हल्पूर्वी अकार असल्यामुळें त्या अकाराच्या व्यवधानामुळें 'दिव्' धातूंतील इकार उपधेंत आहे असें मानतां येत नव्हतें. म्हणून 'स्थानिनि सति यन्न भवति तदादेशेऽपि न भवति' या प्रकृत सूत्रानें होणाऱ्या अभावातिदेशान्वयें वरील उदाहरणांत उपधा-दीर्घकार्य होऊं शकलें नसतें. परंतु तें दीर्घकार्य होणें इष्ट आहे. म्हणून दीर्घकार्य करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होऊं नये व प्रकृत सूत्रान्वयें होणाऱ्या अभावातिदेशामुळें जें दीर्घकार्य होऊं शकत नव्हतें तें व्हावें याकरितां 'न पदान्त' या निषेधक सूत्रांत 'दीर्घ' या पदाचें ग्रहण केलें आहे व अशा रीतीनें तें ग्रहण प्रकृत-सूत्रानें अभावाचा देखील अतिदेश होतो याचें ज्ञापक ठरतें.) प्रकृत सूत्रानें अभावाचा अतिदेश होत असल्यामुळेंच, 'गणयति' इत्यादि स्थलीं वृद्धि होत नाहीं; कारण स्थानी विद्यमान असतांना वृद्धि पावली नसल्यामुळें, आदेश झाल्यावर जरी ती पावली आहे तरी देखील अभावातिदेशामुळें ती होऊं शकत नाहीं. (कथादिगणांत पठित असलेल्या 'गण' या चुरादि अदन्त धातूहून 'णिच्इ' प्रत्यय केला असतां, 'गण + णिच् + शप् + ति = गण + इ + अ + ति' अशा स्थितींत 'गण' धातूंतील गकारापुढें असणारा अकार उपधेंत नसल्यामुळें, म्हणजे तो अकार व णिच् हा णित् प्रत्यय या दोहोंमध्यें णकारापुढील अकाराचें व्यवधान असल्यामुळें, 'अत उपधायाः' सू. २२८२ या सूत्रानें णिच् प्रत्ययाला मानून पावलेली वृद्धि त्या अकारास होऊं शकत नव्हती. म्हणून 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें 'गण' धातूंतील अन्त्य अकाराचा लोप झाल्यावर जरी गकारापुढील अकार

उपधारूप होतो तरी, 'स्थानिनि सति यन्न भवति तदादेशेऽपि न भवति' या प्रकृत सूत्रानें होणाऱ्या अभावातिदेशामुळें त्याची वृद्धि होऊं शकत नाहीं आणि त्यामुळेंच 'गाणयति' असें अनिष्ट रूप न होतां, 'गणयति' असें इष्ट रूप सिद्ध होतें.) प्रकृतसूत्रानें सत्‌चा—भावाचा—व तसेंच असत्‌चा—अभावाचा—इच्छेप्रमाणें अतिदेश करावा व असा दोन्ही प्रकारचा अतिदेश केल्यानें सूत्रावर कांहीं भार पडत नाहीं असें प्रकृत सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं म्हटलें आहे. (तें भाष्य पूर्वी दिलेंच आहे व या भाष्यांतील 'नेह भारोऽस्ति' या पदांचा कैयटानें आपल्या वृत्तींत 'न हि अभावातिदेशे अधिकं सूत्रं पठनीयम्, विधिशब्दं चान्तरेण सिध्यति' असा अर्थ केला आहे व कैयटाच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे कीं, प्रकृत सूत्रांत जे शब्द पठित व अनुवृत्त आहेत त्यांतूनच भावाभावातिदेशरूप अर्थ निघूं शकतो आणि तो अर्थ प्रकृत सूत्रांतून निष्पन्न करण्याकरितां त्या सूत्रांत अधिक शब्द घालण्याची कांहींच गरज नाहीं.) येथें असा प्रश्न उपस्थित होण्याचा संभव आहे कीं, 'पूर्व' या (सापेक्ष दिग्वाचक) शब्दाला अवधीची अपेक्षा आहे आणि जो सन्निहित—जवळ—आहे तोच अवधि मानणें उचित आहे. ज्या पूर्व वर्णाला कार्य करणें आहे त्याला सन्निहित स्थानी, आदेश व निमित्त हे तीन्ही आहेत. या तीनपैकीं स्थानी हा अवधि मानतां येत नाहीं; कारण त्याचे जागीं आदेश झाल्यावर तो नाहींसा होतो. आदेश व निमित्त हे देखील अवधि मानतां येत नाहींत; कारण तसें मानल्यास, 'वैयाकरणः' या स्थलीं 'ऐ' चे जागीं आयादेश होण्याची आपत्ति येते आणि म्हणूनच ही शंका मनांत धरून प्रकृत सूत्राचें व्याख्यान करितांना 'अचः पूर्वत्वेन दृष्टस्य' असें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे. ('व्याकरणमधीते वेद वा वैयाकरणः' या स्थलीं 'तदधीते तद्वेद' सू. १२६९ या सूत्रानें 'व्याकरण' या शब्दाहून 'अण्' प्रत्यय होऊन 'वैयाकरणः' असें रूप होतें. 'वि + आ + करण + अण्' या स्थलीं 'वि' या

उपसर्गातील इकाराचे जागीं 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें यणादेश केला असतां 'व्य् + आ + करण + अण्' अशी स्थिति होते. या स्थलीं 'व्य्' यांतील यकार पदान्तीं असून त्यापुढें आकार आहे. म्हणून 'न य्वाभ्यां पदान्ताभ्यां पूर्वौ तु ताभ्यामैच्' सू. १०९८ हें निषेधक सूत्र असल्यामुळें, 'तद्धितेष्वचामादेः' सू. १०७५ या सूत्रानें पावलेली आद्यचाची वृद्धि न होतां, यकारापूर्वी 'ऐ' असा आगम होऊन 'व् + ऐ + य् + आ + करण + अण् = वैयाकरणः' असें रूप होतें. प्रकृत सूत्रांतील 'पूर्वविधौ' या पदाचा 'आदेशात् निमित्तात् वा पूर्वस्य विधौ–कार्ये–कर्तव्ये' असा अर्थ केला तर, यणादेशानें 'इ' या स्थानीचे जागीं जो यकार झाला आहे त्याच्या लगेंच पूर्वी 'ऐ' असल्यामुळें व तसेंच यणादेशाचें निमित्त जो 'आ' त्याच्या पूर्वी देखील 'ऐ' असल्यामुळें, जर 'य्' या आदेशाचे ठिकाणीं तो इकारच आहे अशी प्रकृत सूत्रान्वयें स्थानिवद्भावानें बुद्धि केली तर, 'ऐ' च्या पुढें 'इ' हा अच् आहे असें मानावें लागेल व त्यामुळें 'ऐ' चे जागीं "एचोऽयवायावः' सू. ६१ या सूत्रानें आयादेश होण्याची आपत्ति येईल व इष्ट रूप सिद्ध होणार नाहीं. म्हणून जसा स्थानी पूर्वीचा अवधि मानतां येत नाहीं त्याचप्रमाणें आदेश व निमित्त यांना देखील अवधि मानतां येत नाहीं. या सर्व अडचणी लक्षांत घेऊनच 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टस्य'–म्हणजे स्थानी अच् विद्यमान असतांना त्याच्या पूर्वी जो वर्ण होता त्या वर्णाला कार्य करतेवेळी–असें, प्रकृत सूत्राचा अर्थ करितांना, कौमुदीत म्हटलें आहे. स्थानी इकार विद्यमान असतांना त्याच्या पूर्वी 'ऐ' नव्हता. त्या स्थानीचे जागीं यकारादेश झाल्यावर 'ऐ' आगमरूपानें आला. म्हणून तशा स्थानी विद्यमान असतां नसणाऱ्या 'ऐ' ला आयादेशरूप कार्य करतेवेळीं यकारादेशाचे ठिकाणीं तो इकारच आहे अशी प्रकृत सूत्रान्वयें स्थानिवद्भावानें बुद्धि करतां येत नाहीं व त्यामुळें 'ऐ' चे जागीं आयादेश होण्याची आपत्ति टळते. म्हणून प्रकृत सूत्राचा जसा अर्थ कौमुदींत केला आहे

तोच अर्थ मानणें योग्य आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) 'पूर्वविधौ' यांतील 'पूर्व' हें विशेषण नसून उपलक्षण आहे. ('अविद्यमानं सत् व्यावर्तकमुपलक्षणम्, विद्यमानं सत् व्यावर्तकं विशेषणम्' असा उपलक्षण व विशेषण या दोहोंत फरक आहे. 'काकवत् देवदत्तस्य गृहम्' हें उपलक्षणाचें उदाहरण असून 'नीलो घटः' इत्यादि विशेषणाचीं उदाहरणें होत. देवदत्ताच्या घरावर जरी आतां कावळे बसलेले दिसत नाहींत तरी त्या घरावर पूर्वी कावळे बसत होते म्हणून पूर्वकालीन वस्तुस्थितीचा आश्रय करुन त्या घराला 'काकवत्' असें म्हणतात. या स्थलीं 'काकवत्' हें 'गृहम्' याचें उपलक्षण आहे, म्हणजे सद्यःस्थितिप्रदर्शक तो शब्द नसून पूर्वस्थितिप्रदर्शक तो शब्द आहे, आणि म्हणूनच त्याला उपलक्षण म्हणतात. परंतु विशेषण हें सद्यःस्थितिप्रदर्शक असतें. एके वेळीं जो घट नीलवर्णाचा होता तो आतां तांबड्या वर्णाचा असल्यास, त्याला 'नीलो घटः' असें म्हणतां येत नाहीं म्हणजे त्याला 'नीलः' हें विशेषण लावतां येत नाहीं. त्या विशेषणाचा उपयोग करतेवेळीं जर तो निळ्या वर्णाचा असेल तरच त्याला 'नीलः' असें विशेषण लावणें उपपन्न ठरतें. स्थानीचा आदेशानें अपहार होत असल्यामुळें, म्हणजे आदेश झाल्यावर स्थानी नाहींसा होत असल्यामुळें, ज्या वर्णाला विधि–कार्य–करणें आहे तो वर्ण विधि करतेवेळीं स्थानीच्या पूर्वी असणें असंभवनीय आहे. म्हणून या ठिकाणीं 'साम्प्रतिकाभावे भूतपूर्वगतिः'–परि. ७७–या न्यायाचा, म्हणजेच उपलक्षणाचा, आश्रय करणें भाग आहे व ज्या वर्णाला विधि करणें आहे तो वर्ण स्थानीचे जागीं आदेश होण्यापूर्वी स्थानीच्या पूर्वी होता म्हणून, त्याला भूतपूर्वगतीनें, म्हणजे उपलक्षणानें, स्थानीच्या पूर्वी असणारा वर्ण असें म्हणतां येतें.) 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टस्य विधौ कर्तव्ये' असा प्रकृत सूत्रांतील 'पूर्वविधौ' या पदाचा अर्थ केला असल्यामुळें, 'अचः पूर्वत्वविज्ञानात् ऐचोः सिद्धम्' हें वार्तिक गतार्थ होतें, म्हणजे हें वार्तिक

मानण्याची कांहीं गरज नाहीं. (प्रकृत सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात– 'इह वैयाकरणः सौवश्व इति य्वोः स्थानिवद्भावादायावौ प्राप्नुतस्तयोः प्रतिषेधो वक्तव्यः ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, 'वि+आ+करण+अण्+सु, सु+अश्व+अण्+सु' या उदाहरणांत 'वि' या उपसर्गातील अन्त्य इकारापुढें 'आ' हा अच् व 'सु' या उपसर्गातील अन्त्य उकारापुढें 'अ' हा अच् आला असल्यामुळें 'इको यणचि' या सूत्रानें त्या इकाराचे व उकाराचे जागीं अनुक्रमें यकारादेश व वकारादेश केल्यास ते यकार व वकार पदान्तीं येत असल्यामुळें 'न य्वाभ्याम्' सू. १०९८ या सूत्रानें यकारापूर्वी 'ऐ' व उकारापूर्वी 'औ' असे आगम होतात व त्या आगमांपुढील यकार व वकार हे इकार व उकार आहेत असें प्रकृत सूत्रान्वयें स्थानिवद्भावानें मानल्यास, 'एचोऽयवायावः' सू. ६१ या सूत्रानें 'ऐ' चे जागीं 'आय्' व 'औ' चे जागीं 'आव्' हे आदेश प्राप्त होतात व ते आदेश झाल्यास, 'वैयाकरणः, सौवश्वः' अशीं इष्ट रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत. म्हणून त्या आगमांचे जागीं आयादेश व आवादेश न व्हावा यासाठीं स्थानिवद्भावाचा प्रतिषेध सांगणें आवश्यक आहे. असें सांगून भाष्यकार 'अचः पूर्वविज्ञानादैचोः सिद्धम्'–म्हणजे स्थानी विद्यमान असतांना त्या स्थानीच्या पूर्वी जो वर्ण आहे त्याला कार्य कर्तव्य असल्यास आदेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येतो असें मानल्यानें 'ऐ,औ' या आगमांचें श्रवण सिद्ध होतें–हें वार्तिक पठित करतात व त्या वार्तिकाचें व्याख्यान करितांना असें म्हणतात:– 'योऽनादिष्टादचः पूर्वस्तस्य विधिं प्रति स्थानिवद्भाव, आदिष्टाच्चैषोऽचः पूर्वः । किं वक्तव्यमेतत् ? । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । अच इति पञ्चमी । अचः पूर्वस्य । यद्येवमादेशोऽविशेषितो भवति । आदेशश्च विशेषितः । कथम् ? । न ब्रूमो यत्पष्ठीनिर्दिष्टमज्ग्रहणम् तत्पञ्चमीनिर्दिष्टं कर्तव्यमिति । किं तर्ह्यन्यत्कर्तव्यम् ? । अन्यच्च न कर्तव्यम् । यदेवादः पष्ठीनिर्दिष्टमज्ग्रहणं तस्य दिक्शब्दैर्योगे पञ्चमी भवति ।

अजादेश: परनिमित्तक: पूर्वस्य विधिं प्रति स्थानिवद्भवति । कुत: पूर्वस्य । अच इति ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, जो वर्ण स्थानी विद्यमान असतांना त्या अच्रूप स्थानीच्या पूर्वी असेल तशा वर्णाला कार्य कर्तव्य असल्यास, स्थानिवद्भाव होतो असा 'पूर्वविधौ' या प्रकृत सूत्रांतील पदाचा अर्थ केल्यास, 'ऐ, औ' या आगमांचे जागीं आयादेश व आवादेश होण्याची आपत्ति टळते; कारण हे आगम स्थानिभूत अच् विद्यमान् असतांना नव्हते व आदेश झाल्यावर त्यांचा प्रादुर्भाव झाला. पण असें वरील अर्थाचें वाचक वर दिलेलें वार्तिक पठित करण्याची गरज आहे काय ? तसें वार्तिक पठित करण्याची कांहीं गरज नाहीं. पण तसें वार्तिक पठित न केल्यास वार्तिकांत सांगितलेला अर्थ प्रकृत सूत्रांतून कसा निष्पन्न होऊं शकणार ? तो अर्थ प्रकृत सूत्रांतूनच काढतां येतो; कारण प्रकृत सूत्रांतील 'अच:' हें पद पञ्चमी मानल्यानें त्या पदाचा 'पूर्वस्य' या दिग्वाचक सापेक्ष शब्दाशीं अन्वय होऊन 'अच: पूर्वस्य' असा अर्थ निष्पन्न होतो. पण अशा रीतीनें 'अच:' हें पद पञ्चमी मानून त्याचा 'पूर्वस्य' या पदाशीं अन्वय केल्यास, तें पद 'आदेश:' या प्रकृत सूत्रांत अनुवृत्त असलेल्या पदाशीं अन्वित होऊं शकणार नाहीं व त्यामुळें हल्चे जागीं होणाऱ्या आदेशाचे ठिकाणीं देखील स्थानिवद्भाव होण्याची आपत्ति येईल व असें करणें हें पूर्वसूत्रांतील 'अनल्विधौ' या प्रतिषेधाच्या विरुद्ध आहे. या शंकेवर भाष्यकार असें उत्तर देतात कीं, प्रकृत सूत्रांतील 'अच:' या पदाचा 'आदेश:' या अनुवृत्त पदाशीं देखील अन्वय करतां येतो. आमचें असें म्हणणें नाहीं कीं, प्रकृत सूत्रांत 'अच:' हें जें षष्ठ्यन्त पद आहे तें पञ्चम्यन्त मानावें. आमचें असेंहि म्हणणें नाहीं कीं, प्रकृत सूत्रांत 'अच:' या दुसऱ्या पञ्चम्यन्त पदाचा अध्याहार करावा. 'अच:' हें जसें 'अच्' या शब्दाचें षष्ठीचें एकवचनाचें रूप आहे तसेंच तें पञ्चमीच्या एकवचनाचें देखील रूप आहे. म्हणून 'अच:' या षष्ठ्यन्त पदाचा 'आदेश:' या अनुवृत्त पदाशीं अन्वय करून 'अच: स्थाने आदेश:'

असा अर्थ केल्यावर, 'पूर्वस्य' या दिग्वाचक सापेक्ष शब्दाला अवधीची आकांक्षा असल्यामुळें, 'कशाच्या पूर्वी' असा सहजच प्रश्न उद्भवतो व त्यावेळीं 'अचः' हें पञ्चम्यन्त पद मानून 'अचः पूर्वस्य' असा अर्थ केल्यानें, वार्तिकांत सांगितलेला अर्थ प्रकृत सूत्रांतूनच निघूं शकतो. या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, भाष्यकारांनीं प्रकृत सूत्रांतील 'पूर्वविधौ' या पदाचा 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टस्य विधौ कर्तव्ये' असा अर्थ करून वरील वार्तिकाचें प्रत्याख्यान केलें आहे व या भाष्याच्या आधारेंच दीक्षितांनीं प्रकृत सूत्राचा कौमुदींत जसा अर्थ दिला आहे तसा अर्थ करून असें म्हटलें आहे कीं, तसा अर्थ केल्यानें वरील वार्तिक मानण्याची कांहीं गरज राहत नाही.)

शब्दरत्न—दूषयित्वेति । "अङ्गस्य" इति सूत्रे भाष्ये इति शेषः । एतदसिध्यैव दूषयित्वेत्यर्थः । विस्तरस्त्वन्यत्र द्रष्टव्यः । अनेन तु वार्यत इति । स्थानिनि सति यद्भवति तदादेशेऽपि भवति, तत्र सति यन्न भवति तदादेशेऽपि न भवतीत्यर्थात् । अजादेशो ऽच्कार्यं लभते, न लभते चेति वाच्योऽर्थः । तत्रोपपत्तिमाह—शब्देति । पूर्वसूत्रे स्थानिवत्पदस्य तद्वत्कार्यं लभत इत्येतन्मात्रार्थकस्येहोभयार्थ-कत्वात्तदाश्रयणमिति भावः । यलोपदीर्घादीति । यलोपदीर्घावादी येषामित्यर्थः । यलोपादयो दीर्घादयश्चेति यावत् । तेन स्वरादीना-मपि सङ्ग्रहः । यलोपादीत्येव सिद्धे एवमुक्तिर्वैचित्र्याय । न हि यलोपादिविषये भावातिदेशप्रसक्तिरिति भावः । न वृद्धिरिति । "अत उपधायाः" इति वृद्धिर्नेत्यर्थः । "क्विलुगुपधात्व"—(वा०) इति निषेधस्तूपधात्वनिमित्तकप्रत्ययविधावेव नान्यत्रेति भाष्ये स्पष्टम् । अयादेशापत्तेरिति । यणः स्थानिवत्त्वेनाच्त्वादिति भावः । पूर्वत्वं चात्र व्यवहिताव्यवहितसाधारणम्, स्वरे निषेधात् । अतो यण्निमित्ताकारापेक्षयाऽप्यैकारस्य पूर्वत्वमस्तीति तत्पक्षेऽप्ययं दोष इति भावः । आदेशेनापहारात् कथं स्थानिनोऽवधित्वमित्यत आह—उपलक्षणमिति ॥

'इति पक्षं दूषयित्वा' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यांतील 'दूषयित्वा' या पदापूर्वी 'अङ्गस्य इति सूत्रे भाष्ये' हीं पदें अध्याहृत आहेत, म्हणजे 'प्रागभ्यासविकारेभ्योऽङ्गाधिकारः' हा जो पक्ष भाष्यकारांनीं दोपयुक्त ठरविला आहे तो 'अङ्गस्य' ६.४.१ या सूत्रावरील भाष्यांत ठरविला आहे व तो दोषयुक्त ठरविण्याचें कारण हेंच कीं, तो पक्ष मानल्यास 'वव्रश्च' हें रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. (हें भाष्य वर मनोरमेचें विवेचन करतांना दिलेंच आहे.) या विपयासंबंधानें इतर ग्रन्थांत–कैयटादिकांच्या वृत्तींत–जें विस्तृत विवरण केलें आहे तें त्या ग्रन्थांत पाहावें. "अनेन तु वार्यते' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, 'स्थानिनि सति यद्भवति तदादेशेऽपि भवति, तत्र सति यन्न भवति तदादेशेऽपि न भवति' असा प्रकृत सूत्रानें भाव व अभाव या दोहोंचाहि अतिदेश होतो असा प्रकृत सूत्राचा अर्थ मानून म्हटलें आहे. 'अजादेशः स्थानिवत्' या पदांचा अक्षरार्थ असा होतो कीं, अचाचे जागीं झालेला जो आदेश त्याचे ठिकाणीं तो अच्च आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि करून पूर्व वर्णास पावलेलें कार्य (स्थानी विद्यमान असतांना पावलेलें असल्यास) होतें व (स्थानी विद्यमान असतांना पावलेलें नसल्यास) होत नाहीं. प्रकृत सूत्रांतून असा अर्थ कसा निघतो याची उपपत्ति दीक्षितांनीं 'शब्दाधिकारमाश्रित्य··· इति स्वीकारात्' या मनोरमेंतील पंक्तींत सांगितली आहे (व या पंक्तीचें विवरण मनोरमेंत केलेंच आहे.) 'स्थानिवदादेशः' या पूर्व सूत्रांतील 'स्थानिवत्' या पदाचा 'स्थानिवत्कार्यं लभते' एवढाच अर्थ केला असून, प्रकृत सूत्रांत अनुवृत्त असलेल्या त्या पदाचा 'स्थानिवत्कार्यं लभते, न लभते' असा जो भावाभावरूप उभयविध अर्थ केला आहे तो शब्दाधिकाराचा आश्रय करूनच केला आहे. (याचें विस्तृत विवरण मनोरमेंत केलेंच आहे.) मनोरमेंतील 'यलोपदीर्घादिग्रहणम्' या पदांत असणाऱ्या 'यलोपदीर्घादि' याचा 'यलोपदीर्घौ आदी येषाम्' असा विग्रह आहे (व 'यलोपश्च दीर्घश्च

यलोपदीर्घौ' हा द्वन्द्वसमास असून त्यापुढें असलेला 'आदि' हा शब्द, 'द्वन्द्वान्ते श्रूयमाणं पदं प्रत्येकमभिसम्बध्यते' या न्यायान्वयें, यलोप व दीर्घ या दोहोंशीं अन्वित होत असल्यामुळें, 'यलोपदीर्घादि' या पदाचा) 'यलोपादयः दीर्घादयश्च' असा अर्थ होतो व त्यामुळें ('न पदान्त' या निषेधक सूत्रांत) जें स्वरादिकांचें ग्रहण केलें आहे त्यांचा देखील अन्तर्भाव होतो. 'यलोपादि' एवढेंच पद उच्चारून काम भागत असतां देखील 'यलोपदीर्घादि' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे ती केवळ वैचित्र्योक्ति आहे, म्हणजे अर्थ स्पष्ट व्हावा याकरितां तसें म्हटलें आहे. ('यलोपादि' एवढेंच जरी दीक्षितांनीं म्हटलें असतें तरी दीर्घ, स्वर इत्यादिकांचें ग्रहण झालेंच असतें. तरी पण 'यलोपदीर्घादि' असें जें दीक्षितांनीं म्हटलें आहे तें अर्थ स्पष्ट व्हावा एवढ्याच हेतूनें अधिक शब्दांचें ग्रहण करून व गौरवाकडे दुर्लक्ष करून म्हटलें आहे.) यलोपादिकांच्या विषयांत, म्हणजे यलोपादि कार्य करतेवेळीं, भावातिदेशाची प्राप्ति होत नाहीं. (केवळ अभावातिदेशाचीच प्राप्ति होते, व हें मनोरमेंत यकारलोपाच्या उदाहरणाचें व्याख्यान करितांना स्पष्ट केलेंच आहे.) 'अत एव गणयतीत्यादौ न वृद्धिः' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें 'अत उपधायाः' सू. २२८२ या सूत्रानें प्राप्त होणाऱ्या वृद्धीसंबंधानें म्हटलें आहे. ('गणयति' या रूपाची मनोरमेंत प्रक्रिया सांगतांना हें स्पष्ट केलेंच आहे.) 'क्विलुगुपधात्व' या वार्तिकानें सांगितलेला स्थानिवद्भावनिषेध उपधारूप निमित्तामुळें जेथें प्रत्यय होणें सांगितलें असेल तेथेंच लागू पडतो व इतर ठिकाणी लागू पडत नाही असें ('न पदान्त' १.१.५८ या सूत्रावरील) भाष्यात स्पष्टपणें सांगितलें आहे. ('गण+णिच्+शप्+ति' या स्थलीं णिच्प्रत्यय पुढें असल्यामुळें 'गण' यांतील अन्त्य अकाराचा 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें लोप झाल्यावर 'गण्' या धातूतील 'अ' या उपधेला 'अत उपधायाः' सू. २२८२ या सूत्रानें वृद्धि करतेवेळीं त्या लोपरूप अजादेशाचे ठिकाणीं अकार

कायमच आहे अशी स्थानिवद्भावानें 'क्विलुगुपधात्व' या स्थानिवद्भावनिषेधक वार्तिकान्वयें वृद्धि करतां येत नाहीं, कारण तें वृद्धिकार्य उपधारूप संज्ञेला मानून होणारें कार्य आहे व तें वार्तिक असें सांगतें कीं उपधासंज्ञेच्या निमित्तानें होणारें कार्य करतेवेळीं स्थानिवद्भाव होत नाहीं. म्हणून 'गण्' या धातूच्या उपधेंत असणाऱ्या अकारास 'अत उपधायाः' या सूत्रानें वृद्धि पावते अशी शंकाकाराची शंका आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, उपधारूप निमित्तामुळें जेथें प्रत्यय होणें सांगितलें आहे तेथेंच वरील वार्तिकांत सांगितलेला स्थानिवद्भावाचा निषेध लागू पडतो असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. 'क्विलुगुपधात्वचङ्परनिर्ह्रासकुत्वेषूपसंख्यानम्' असें तें पूर्ण वार्तिक असून 'न पदान्त' या सूत्रावरील भाष्यांत तें पठित केलें आहे व त्या वार्तिकाचा अर्थ असा आहे कीं, 'क्वि' प्रत्ययाच्या निमित्तामुळें होणाऱ्या अचाच्या लोपाचे ठिकाणीं व तसेंच ज्या प्रत्ययाचा लुक् झाला आहे त्याचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं, आणि उपधासंज्ञेच्या निमित्तानें होणारें कार्य, चङ्पर 'णि' पुढें असतांना होणारें ऱ्हस्वकार्य, व तसेंच कुत्वकार्य करतेवेळीं स्थानिवद्भाव होत नाहीं. या वार्तिकाचें व्याख्यान करितांना भाष्यकार 'उपधात्वे किमुदाहरणम्' असा प्रश्न करून 'पारिखीयः' हें उदाहरण आहे असें अखेरीस सांगतात आणि नंतर चङ्पर 'णि' पुढें असतांना होणारें ऱ्हस्वकार्य करतेवेळीं स्थानिवद्भाव होत नाहीं याचें 'वादितवन्तं प्रयोजितवान्, अवीवदत् वीणां परिवादकेन' हें उदाहरण देतात व पुढें अशी शंका करतात कीं, उपधासंज्ञेच्या निमित्तानें होणारें कार्य करतेवेळीं स्थानिवद्भाव होत नाहीं या म्हणण्यानेंच 'अवीवदत्' हें उदाहरण सिद्ध होऊं शकतें आणि अखेरीस असा सिद्धान्त सांगतात कीं, उपधासंज्ञेच्या निमित्तामुळें जेथें प्रत्यय होणें सांगितलें असेल तेथेंच तो निषेध लागू पडतो व इतरत्र लागू पडत नाहीं. भाष्यकार म्हणतात–'ननु चैतदप्युपधात्वविधि

प्रति न स्थानिवदित्येव सिद्धम् । विशेष एतद्वक्तव्यम् । क्व । प्रत्ययविधाविति । इह मा भूत् । पटयति लघयतीति ।' याच भाष्याचा शब्दरत्नांत निर्देश केला आहे. 'परिखायाः अदूरभवः पारिखः' या स्थलीं 'परिखा' या शब्दाहून 'अदूरभवश्च' सू. १२८२ या अर्थामध्यें चातुर्रथिक 'अण्' प्रत्यय केला असतां, 'तद्धितेष्वचामादेः' सू. १०७५ या सूत्रानें आद्य अकाराची वृद्धि होऊन व 'यस्येति च' सू. ३११ या सूत्रानें 'परिखा' यांतील अन्त्य आकाराचा लोप होऊन 'पारिख' असें रूप सिद्ध होतें व 'पारिख' हा शब्द 'वृद्धिर्यस्याचामादिस्तद्वृद्धम्' सू. १३३५ या सूत्रान्वयें वृद्धसंज्ञक असून त्याच्या उपधेंत खकार असल्यामुळें, 'वृद्धादकेकान्तखोपधात्' सू. १३६५ या सूत्रानें 'पारिखेभवः' या अर्थामध्यें 'छ' प्रत्यय होऊन 'पारिखीयः' असें रूप सिद्ध होतें. या उदाहरणांत 'यस्येति च' या सूत्रानें झालेल्या आकारलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव केल्यास, म्हणजे आकार कायमच आहे असें मानल्यास, 'अण्' प्रत्ययांतील अकारापूर्वी 'परिखा' यांतील आकार आहे व त्यापूर्वी खकार आहे असें मानावें लागेल व अशा रीतीनें आकाराच्या व्यवधानामुळें खकार उपधेंत येत नाहीं असें मानणें भाग पडेल व त्यामुळें खोपधनिमित्तामुळें होणारा 'छ' प्रत्यय होणार नाहीं व 'पारिखीयः' असें इष्ट रूप सिद्ध होणार नाही. तसें रूप सिद्ध व्हावें म्हणून 'क्विलुगुपधात्व' या स्थानिवद्भावनिषेधक वार्तिकांत 'उपधात्व' हा शब्द घातला आहे. परंतु 'गणयति' या उदाहरणांत उपधारूप निमित्तामुळें कोणताहि प्रत्यय होत नसल्यामुळें त्या उदाहरणाला वरील वार्तिकांत सांगितलेला 'उपधात्व' निषेध लागू पडत नाहीं व त्यामुळें लोपरूप अजादेशाचे ठिकाणीं, म्हणजे अकारलोपाचे ठिकाणीं, स्थानिवद्भाव करतां येतो, म्हणजे 'गण' या धातूंतील अन्त्य अकार कायमच आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि करतां येते, आणि त्यामुळें वृद्धिकार्य टळून 'गणयति' असें इष्ट रूप सिद्ध होतें.) 'वैयाकरणः इत्यत्र ऐका-

रस्यायादेशापत्तेः' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'इ' या अचाचे ठिकाणीं झालेला यकारादेश स्थानिवद्भावानें अच् म्हणजे 'इ' च आहे असें मानल्यास, 'ऐ' चे जागीं आयादेश होण्याची आपत्ति येते. ('वैयाकरणः' या शब्दाची मनोरमेंत प्रक्रिया देतांना हा विषय स्पष्ट केलाच आहे.) 'अचः परस्मिन पूर्वविधौ' या सूत्रांतील 'पूर्व' या शब्दानें अव्यवहितपूर्व व व्यवहितपूर्व या दोहोंचेंहि ग्रहण होतें. (प्रकृतसूत्रावरील भाष्यांत १·१·५७ भाष्यकार म्हणतात–'व्यवहितेऽपि पूर्वशब्दो वर्तते । तद्यथा । पूर्वं मथुरायाः पाटलिपुत्रमिति ।' जरी मथुरा व पाटलिपुत्र या दोन शहरांत अनेक गावांचें व्यवधान आहे तरी 'पूर्वं मथुरायाः पाटलिपुत्रम्' असा भाषेंत प्रयोग होत असल्यामुळें, 'पूर्व' हा शब्द व्यवहितपूर्वाला देखील लागू पडतो असा भाष्यकारांच्या म्हणण्याचा आशय आहे व या भाष्याला धरूनच शब्दरत्नांतील वरील पंक्ति लिहिली आहे.) 'पूर्व' या शब्दानें व्यवहितपूर्वाचें देखील ग्रहण करणें आवश्यक आहे; कारण 'न पदान्त' या सूत्रांत स्वरविधि करतेवेळीं स्थानिवद्भाव होण्याचा जो निषेध सांगितला आहे तो निषेध व्यवहितपूर्व अचालाच स्वर करितांना चरितार्थ ठरतो. (उदाहरणार्थ 'कृ + सन् + ण्वुल् = चिकीर्षक' या स्थलीं 'लिति' सू. ३६७६ या सूत्रानें लित्प्रत्ययापूर्वी असणाऱ्या अचाला उदात्त स्वर पावला आहे. वरील उदाहरणांत 'ण्वुल् = वु् = अक' या लित् प्रत्ययापूर्वी 'की' यांतील ईकार नसून त्या दोहोंमध्यें रकार व षकार यांचें व्यवधान आहे, म्हणजे ईकार हा अच् अव्यवहितपूर्व–लगेंच मागें–नसून व्यवहितपूर्व आहे. तरी पण त्या ईकाराला उदात्तस्वर होतोच व तो उदात्तस्वर करतेवेळीं 'ण्वुल्' या आर्धधातुक प्रत्ययाच्या निमित्तामुळें 'चिकीर्ष' यांतील अन्त्य अकाराचा 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें जो लोप झाला आहे त्याचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं; कारण स्वरविधि करतेवेळीं 'न पदान्त' सू. ५१ या सूत्रानें अजादेशाचे ठिकाणीं

स्थानिवद्भाव होण्याचा निषेध सांगितला आहे. 'चिकीर्षकः' या उदाहरणांत अकारलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव केला असता तर, लोपामुळें जो अकार नाहींसा झाला आहे त्याला उदात्तस्वर होण्याची आपत्ति आली असती व तो अकार लोपानें नाहींसा झाला असल्यामुळें त्याच्याबरोबर उदात्तस्वर देखील नाहींसा झाला असता आणि 'चिकीर्षक' या स्थलीं इष्ट उदात्तस्वर झाला नसता.) 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टस्य' असा प्रकृत सूत्रांतील 'पूर्वविधौ' या पदांतील 'पूर्व' या शब्दाचा अर्थ न करितां 'निमित्तात्पूर्वस्य' असा अर्थ केला तर, 'वैयाकरणः' या उदाहरणांत यणादेशाचें निमित्त जो आकार त्याच्या पूर्वी 'ऐ' असल्यामुळें व्यवहितपूर्वपक्षांत देखील 'ऐ' चे जागीं आयादेश होण्याची आपत्ति येतेच. ('वि + आ + करण + अण् + सु' या स्थलीं 'वि' यांतील अन्त्य इकाराचे जागीं जो 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें यकार होतो तो 'आ' हें अच्‌रूप निमित्त पुढें असल्यामुळें होतो व 'न य्वाभ्याम्' सू. १०९८ या सूत्रानें यकारापूर्वी 'ऐ' असा आगम होऊन 'व् + ऐ + य् + आकरण + अण् + सु' अशी स्थिति होते. या स्थितींत 'आ' या निमित्ताच्या लगेंच मागें 'ऐ' नसून दोहोंमध्यें यकाराचें व्यवधान आहे, म्हणजे 'ऐ' हा 'आ' या निमित्ताच्या अव्यवहितपूर्व नसून व्यवहितपूर्व आहे. म्हणून प्रकृत सूत्रांतील 'पूर्वविधौ' या पदाचा 'निमित्तात्पूर्वस्य विधौ कर्तव्ये' असा अर्थ केला तर, 'पूर्व' या शब्दानें वर सांगितल्याप्रमाणें व्यवहितपूर्वाचें देखील ग्रहण होत असल्यामुळें, यकारादेशाचे ठिकाणीं तो इकारच आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि केल्यास त्या पक्षांत देखील 'ऐ' चे जागीं 'एचोऽयवायावः' सू. ६१ या सूत्रानें आयादेश होण्याची आपत्ति येते. परंतु 'पूर्वविधौ' या पदाचा 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टस्य विधौ कर्तव्ये' असा अर्थ केला असल्यामुळें व इकार हा स्थानी विद्यमान असतांना त्याच्या पूर्वी ऐकार नसून इकाराचे जागीं यकारादेश झाल्यावर त्याचा प्रादुर्भाव

झाला असल्यामुळें, यकारादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं व त्यामुळें 'ऐ' चे जागीं आयादेश होण्याची आपत्ति टळते.) 'पूर्वत्वमुपलक्षणं न तु विशेषणम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, स्थानीचे जागीं आदेश झाल्यावर स्थानी नाहींसा होत असल्यामुळें, स्थानीला अवधि मानतां येत नाहीं (आणि म्हणूनच 'पूर्वविधौ' या पदाचा 'स्थानिनः पूर्वस्य विधौ कर्तव्ये' असा अक्षरार्थ न करितां, पूर्वी सांगितल्याप्रमाणें 'साम्प्रतिकाभावे भूतपूर्वगतिः' या न्यायाचा आश्रय करून त्या पदाचा 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टस्य विधौ कर्तव्ये' असा दीक्षितांनीं कौमुदींत अर्थ केला आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.)

मनोरमा—न पदान्त । पदस्य चरमावयव इति । वृक्षं वेतीति वृक्षवीः । वातीति वृक्षवाः । तमाचष्टे वृक्षव् । विच् । इह "लोपो व्योः–" इति वलोपो न, स्थानिवत्त्वात् । न च "न पदान्त–" इति निषेधः, इह विधेयस्य लोपस्य पदानवयवत्वात् । पदान्तस्य स्थाने विधौ नेति व्याख्याने तु नेदं सिध्येत्, "सुबन्ताण्णिच्" इति हरदत्तादिमते ऽन्तर्वर्तिसुपा पदत्वात् । न च "इष्ठवत्" इत्यतिदिष्टेन णिचि भत्वेन पदत्वबाधो, णेर्लुप्तत्वात् । न च प्रत्ययलक्षणम्, वर्णाश्रयत्वादिति भावः । द्विर्वचनादौ चेति । यलोपादय आदिशब्दग्राह्याः । 'वरे' इति तु वरे योऽजादेशः स न स्थानिवदिति व्याख्येयम् । सहविवक्षाऽभावे ऽपि निपातनाद् द्वन्द्वः, सप्तम्यलुक् च । अथोदाहरणानि, पदान्ते—कानि सन्ति, कौ स्तः । द्विर्वचने—सुद्ध्युपास्यः । वरे—यायावरः । "यश्च यङः" इति वरच् । अतो लोपः । स च "आतो लोप इटि च" इत्यालोपे कर्तव्ये न स्थानिवत् । यलोपे—यातिः । यातेर्यङन्तात् क्तिच् । अतो लोपः । यलोपः । अल्लोपस्य स्थानिवत्त्वादातो लोपः । यलोपः । न च पुनरालोपः शङ्क्यः, चिणोलुङ्न्यायेनातो लोपस्यासिद्धत्वात्, स्थानिवद्भावाच्च । स्वरे—चिकीर्षकः । सनोऽतो लोपो "लिति" इति

**ककारेकारस्य उदात्तत्वे कर्तव्ये न स्थानिवत्। सवर्णानुस्वारयोः–शिण्ढि। दीर्घ–प्रतिदीव्ना। जशि–सग्धिश्च मे। अदनं ग्धिः। अदेः क्तिनि "बहुलं छन्दसि" इति घस्लादेशः। "घसिभसोर्हलि–" इत्युपधालोपः। "झलो झलि" इति सलोपः। धत्वम्। घस्य जश्त्वम्। सहस्य सः–" इति सूत्रात् स इत्यनुवर्तमाने "समानस्य च्छन्दस्यमूर्द्धप्रभृत्युदर्केषु" इति सूत्रेण सः। चरि–जक्षतुः॥**

'न पदान्त' सू. ५१ या सूत्रातील 'पदान्तविधौ' या शब्दाचा 'पदस्य चरमावयवे कर्तव्ये' असा कौमुदीत अर्थ केला आहे. (त्या शब्दाचा 'पदान्तस्य स्थाने विधौ–कार्ये–कर्तव्ये' असा आपाततः निघणारा अर्थ न करिता 'पदस्य अन्तः चरमावयवः तस्य पदान्तस्य विधौ विधाने, पदान्तकर्मके विधाने = पदस्य चरमावयवे कर्तव्ये' असा अर्थ का केला आहे याचे कारण दीक्षित पुढील पक्तीत सांगतात.) 'वृक्ष वेतीति वृक्षवीः' किंवा 'वृक्ष वातीति वृक्षवाः, तमाचष्टे वृक्षव्' या स्थळी ('तत्करोति तदाचष्टे' या अर्थामध्ये 'वृक्षवा' किंवा 'वृक्षवी' या शब्दाहून णिच् प्रत्यय करून त्या णिजन्त रूपाहून) विच् प्रत्यय केल्यास, 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्राने पावलेला वकारलोप होत नाही; कारण येथे स्थानिवद्भाव होतो. 'न पदान्त' या सूत्राने जो स्थानिवद्भावाचा निषेध केला आहे तो वरील उदाहरणात लागू पडतो असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही; कारण येथे ('लोपो व्योर्वलि' या सूत्राने) ज्या लोपाचे विधान केले आहे तो लोप पदाचा अवयव होत नाही. पदाच्या अन्त्य वर्णाला कार्य करतेवेळी स्थानिवद्भाव होत नाही असा जर 'न पदान्तविधौ' या पदाचा अर्थ केला तर 'वृक्षव्' हे इष्टरूप सिद्ध होऊ शकणार नाही. ('प्रातिपदिकात् धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च' या गणसूत्रान्वये 'वृक्षवा' किंवा 'वृक्षवी' या प्रातिपदिकाहून 'तत्करोति तदाचष्टे' या अर्थामध्ये णिच्प्रत्यय करून त्या णिजन्ताहून 'अन्येभ्योऽपि दृश्यन्ते' सू. २९८० या सूत्राने विच्प्रत्यय केल्यास,

'वृक्षवा + णिच् + विच्' किंवा 'वृक्षवी + णिच् + विच्' अशी स्थिति झाली असतां, णिच् प्रत्यय पुढें असल्यामुळें इष्ठवद्भावानें 'टेः' सू. १७८६ या सूत्रानें 'वृक्षवा' किंवा 'वृक्षवी' यांतील 'टि' चा– अन्त्य आकाराचा किंवा ईकाराचा–लोप होऊन व 'णेरनिटि' सू. २३१३ या सूत्रानें णिच् प्रत्ययाचा लोप होऊन 'वृक्षव् + विच्' अशी स्थिति होते. येथें 'वृक्षव्' यांतील अन्त्य वकारापुढें विच्प्रत्ययांतील वकार हा वल् असल्यामुळें, 'लोपो व्योर्वलि' या सूत्रानें 'वृक्षव्' यांतील अन्त्य वकाराचा लोप पावतो. पण तो लोप होत नाहीं; कारण लुप्त झालेल्या 'टि' चे–आकाराचे किंवा ईकाराचे–ठिकाणीं व तसेंच 'णिच् = इ' या प्रत्ययाचे ठिकाणीं तो 'टि' व णिच् प्रत्यय विद्यमान आहेत अशी 'अचः परस्मिन्' सू. ५० या सूत्रान्वयें स्थानिवद्भावानें वृद्धि करतां येते आणि अशा रीतीनें दोन वकारांमध्यें टिचें व 'णिच् = इ' प्रत्ययाचें व्यवधान होत असल्यामुळें, 'वृक्षव्' यातील अन्त्य वकाराचा लोप होत नाहीं. आतां येथें अशी शंका करण्यांत येते कीं, 'वृक्षव्' या पदाच्या अन्तीं असलेल्या वकाराचा लोप करणें हा पदान्तविधि असल्यामुळें 'न पदान्त' या स्थानिवद्भावनिषेधक सूत्रान्वयें टिलोपाचे किंवा णिलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं, म्हणजे टि व णि प्रत्यय विद्यमानच आहेत असें स्थानिवद्भावानें मानतां येत नाहीं. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात कीं, 'वृक्षव्' या स्थलीं जो वकाराचा लोप करणें आहे तो लोप पदाचा अन्त्य अवयव होत नसून, उलट पदाच्या अन्त्यावयवाचा नाश करणारा आहे, म्हणजेच तो लोप भावरूप नसून अभावरूप आहे, आणि 'पदान्तविधौ' या पदाचा 'पदस्य चरमावयवे कर्तव्ये', म्हणजे 'पदाच्या अन्तीं भावरूप अवयव करणें असल्यास', असा अर्थ केला असल्यामुळें, 'न पदान्त' या सूत्रानें जो स्थानिवद्भावाचा निषेध केला आहे तो प्रकृत उदाहरणांत लागू पडत नाहीं. 'पदान्तस्य स्थाने विधौ कर्तव्ये', म्हणजे पदाच्या अन्त्य वर्णास कोणतेंहि कार्य करणें

असल्यास, मग तें चरमावयवरूप भावकार्य असो किंवा लोपरूप अभावकार्य असो, असा जर 'पदान्तविधौ' या शब्दाचा अर्थ केला तर, 'वृक्षव्' यांतील अन्त्य वकाराचा लोप करतेवेळीं टिलोपाचे किंवा णिलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होणार नाहीं व त्यामुळें त्या वकाराचा लोप होण्याची आपत्ति येईल आणि 'वृक्षव्' असें इष्ट रूप सिद्ध होणार नाहीं. या सर्व अडचणी लक्षांत धरूनच 'पदान्तविधौ' या शब्दाचा 'पदान्तस्य स्थाने विधौ कर्तव्ये' असा अर्थ न करितां 'पदस्य चरमावयवे कर्तव्ये' असा अर्थ केला आहे. आतां येथें शंकाकार अशी शंका करतो कीं, 'वृक्षव्' हा शब्द वास्तविक पदसंज्ञक नसून प्रातिपदिकसंज्ञक आहे आणि म्हणून त्या शब्दांतील अन्त्य वकाराचा लोप करणें हा पदान्तविधि ठरत नसून प्रातिपदिकान्तविधि ठरतो व त्यामुळें 'न पदान्त' या सूत्रांत सांगितलेला स्थानिवद्भावाचा निषेध वरील उदाहरणांत लागूच पडत नाहीं आणि वकारलोप होण्याची आपत्तीच येत नसल्यामुळें, 'वृक्षव्' हें पदान्तविधीचें योग्य प्रत्युदाहरण ठरत नाहीं. या शंकेवर दीक्षित पुढील पंक्तींत असें उत्तर देतात कीं,) हरदत्तादिकांचें असें मत आहे कीं, ('तत्करोति तदाचष्टे' या अर्थांत होणारा) णिच्प्रत्यय सुबन्ताहून, म्हणजे द्वितीयान्त पदाहून, होत असतो व (जरी अन्तर्वर्ति द्वितीयाविभक्तिप्रत्ययाचा पुढें लुक् होतो तरी त्या) अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाला मानून 'वृक्षव्' या शब्दाला पदसंज्ञा होते. ('प्रातिपदिकात् धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च' या गणसूत्रांत) 'इष्ठवच्च' असा अतिदेश सांगितला असल्यामुळे, (ज्याप्रमाणे 'इष्ठन्' प्रत्यय पुढें आला असतां, पदसंज्ञेचा बाध होऊन भसंज्ञा होते त्याचप्रमाणें णिच्प्रत्यय पुढें आला असतां देखील) पदसंज्ञेचा बाध होऊन भसंज्ञा होते असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ज्या णिच् प्रत्ययाला मानून भसंज्ञा करणें आहे त्या प्रत्ययाचा ('णेरनिटि' सू. २३१३ या सूत्रानें) लोप झाला आहे. येथें 'प्रत्ययलोपे प्रत्यय-

लक्षणम्' सू. २६२ हें सूत्र प्रवृत्त केल्यानें 'वृक्षव्' याला भसंज्ञा होऊं शकते असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण भसंज्ञा होणें हें वर्णाश्रयकार्य आहे. ('वृक्षवां आचष्टे = वृक्षवा + अम् + णिच् + विच्' या स्थलीं 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें 'अम्' या अन्तर्वर्ति द्वितीयाविभक्तिप्रत्ययाचा लुक् होऊन व 'णेरनिटि' या सूत्रानें णिप्रत्ययाचा लोप होऊन आणि 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें 'विच् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन 'वृक्षव्' असें रूप सिद्ध होतें. येथें जरी 'अम्' प्रत्ययाचा लुक् होतो तरी 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या सूत्रान्वयें त्या 'अम्' प्रत्ययाला मानून 'वृक्षवा' या शब्दाला जशी पदसंज्ञा होते त्याचप्रमाणें एकदेशविकृत 'वृक्षव्' या शब्दाला देखील 'एकदेशविकृतमनन्यवत्'—परि. ३७—या न्यायान्वयें पदसंज्ञा होते. येथें 'न लुमताङ्गस्य' सू. २६३ हा निषेध लागू पडत नाहीं; कारण पदसंज्ञा करणें हें अङ्गमात्रास होणारें कार्य नव्हें हें पूर्वी सांगितलेंच आहे. म्हणून 'वृक्षव्' यांतील अन्त्य वकाराचा लोप करतेवेळीं पदान्तविधि करणें आहे असें एकप्रकारें म्हणतां येतें. तरी पण तो विधि पदचरमावयवरूप विधि नसून पदान्तलोपरूप विधि असल्यामुळें, 'न पदान्त' हा निषेध वरील उदाहरणांत लागू पडत नाहीं व त्यामुळें टिलोपाचे व णिलोपाचे ठिकाणीं 'अचः परस्मिन्' सू. ५० या सूत्रानें स्थानिवद्भाव होऊन 'वृक्षव्' यांतील अन्त्य वकाराचा लोप होण्याची आपत्ति टळते व 'वृक्षव्' असें इष्ट रूप सिद्ध होतें. णिच्प्रत्यय पुढें असतांना अङ्गाला भसंज्ञा कां होत नाहीं याचें विस्तृत विवरण शब्दरत्नाचें व्याख्यान करतांना करण्यांत येईल.) 'द्विर्वचनादौ च कर्तव्ये' असें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे त्यांतील 'आदि' या शब्दानें यलोप इत्यादिकांचें ग्रहण करावें. प्रकृत सूत्रांतील 'वरे' या शब्दाचें 'वरे योऽजादेशः स न स्थानिवत्' म्हणजे 'वरच्' हा प्रत्यय पुढें आला असतां त्या निमित्तामुळें अचाचे ठिकाणीं

होणारा आदेश स्थानिवत् मानतां येत नाही, असें व्याख्यान करावें. येथें जरी सहविवक्षा नाही तरी निपातनानें द्वन्द्व झाला आहे व तसेच सप्तमीचा लुक् देखील निपातनानें झाला नाही. ('चार्थे द्वन्द्वः' सू. ९०१ या सूत्रान्वयें जो इतरेतरयोगद्वन्द्व होत असतो तो अशाच पदाचा होत असतो की, जी पदें सामानाधिकरण्यानें वाक्यातील एखाद्या पदाशी एकाच तऱ्हेनें अन्वित असतात. परंतु 'पदान्त-द्विर्वचनवरेयलोपसवर्णानुस्वारदीर्घजश्चर्विधिषु' या द्वन्द्वसमासातील 'वरे' हा शब्द खेरीज करून इतर सर्व शब्द जरी एकाच रीतीनें 'विधि' या शब्दाशी अन्वित आहेत, म्हणजे 'पदान्तरूपो यो विधिः' किंवा 'पदान्तस्य यो विधिः' अशा रीतीने अन्वित आहेत, तरी 'वरे' हा शब्द 'विधि' या शब्दाशी सामानाधिकरण्याने किंवा षष्ठयर्थाने अन्वित नसून, 'वरे परे सति' अशा सप्तम्यर्थाने अन्वित आहे. म्हणून वास्तविक येथें द्वन्द्व समास होऊं शकत नव्हता. तरी पण तो निपातनाने झाला आहे असे समजावे. त्याचप्रमाणे समासात सप्तमीचा अलुक् होण्याची जी सूत्रे अष्टाध्यायीत पठित आहेत त्यापैकी कोणत्याहि सूत्राने 'वरे' यातील सप्तमीचा अलुक् सिद्ध होऊं शकत नाही आणि म्हणूनच तो निपातनानें झाला आहे असे म्हटले आहे.) आता पदान्त इत्यादि विधीची उदाहरणे पुढें क्रमवार देण्यात येतात. पदान्तविधीचें उदाहरण 'कानि सन्ति, कौ स्तः' हे आहे. ('कानि सन्ति, कौ स्तः' या उदाहरणात 'श्नसोर-ल्लोपः' सू. २४६९ या सूत्राने 'सन्ति' व 'स्तः' या 'अस्' धातूच्या रूपातील अकाराचा लोप झाला आहे. या अलोपाचे ठिकाणी स्थानिवद्भावाने अकार विद्यमानच आहे अशी बुद्धि केल्यास व 'कानि' या पदापुढे 'अस्' धातूतील अकार आहे असे मानल्यास, 'इको यणचि' सू. ४७ या सूत्राने यणादेश होऊन 'कान्य् सन्ति' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते व तसेच 'कौ' या पदापुढें 'अस्' धातूतील अकार आहे असे मानल्यास, 'एचोऽयवायावः'

सू. ६१ या सूत्रानें आवादेश होऊन 'काव् स्तः' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. पण यणादेश व आवादेश पदाच्या अन्तीं करणें हा पदान्तविधि–पदचरमावयविधि–ठरत असल्यामुळें, 'न पदान्त' या निषेधान्वयें, अलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं व त्यामुळें वरील आपत्ति टळते.) 'सुद्ध्युपास्यः' हें द्विर्वचनाचें उदाहरण आहे. (सुधी+उपास्यः' या स्थलीं 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें यणादेश होऊन 'सुध्य्+उपास्यः' अशी स्थिति झाली असतां, धकारापुढें असलेला इकारस्थानिक यकार इकारच आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि केल्यास, 'अनचि च = न तु अचि' सू. ४८ या निषेधान्वयें धकाराचें द्वित्व होणार नाहीं. पण येथें द्विर्वचनविधि करणें असल्यामुळें व तसा विधि करतेवेळीं अजादेश स्थानिवत् होत नाहीं असें 'न पदान्त' या निषेधक सूत्रांत सांगितलें असल्यामुळें, स्थानिवद्भाव करतां येत नाहीं. त्यामुळें धकाराचें द्वित्व होऊन व 'झलां जश् झशि' सू. ५२ या सूत्रानें पूर्व धकाराचा दकार होऊन 'सुद्ध्युपास्यः' असें इष्ट रूप सिद्ध होतें.) 'वरे' याचें उदाहरण 'यायावरः' हें आहे. या उदाहरणांत 'यश्च यङः' सू. ३१५६ या सूत्रानें यङन्त 'या' धातूहून 'वरच्' प्रत्यय केला असतां, 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें जो अकारलोप होतो तो, 'आतो लोप इटि च' सू. २३७२ या सूत्रानें आकारलोप करतेवेळीं, स्थानिवत् होत नाहीं. ('या' धातूहून 'यङ' प्रत्यय केला असतां, 'यश्च यङः' या सूत्रानें 'वरच्' प्रत्यय होतो व 'सन्यङोः' सू. २३९५ या सूत्रानें द्विर्वचन होऊन व 'ह्रस्वः' सू. २१८० या सूत्रानें अभ्यासऱ्हस्व केल्यावर 'दीर्घोऽकितः' सू. २६३२ या सूत्रानें अभ्यास पुन्हा दीर्घ होऊन 'याया+यङ+वरच् = याया+य+वर' अशी स्थिति झाली असतां, 'वरच्' हा आर्धधातुकप्रत्यय पुढें असल्यामुळें, 'अतो लोपः' या सूत्रानें 'य' यांतील अकाराचा लोप होऊन 'यायाय्+वर' अशी स्थिति होते. अशा स्थितींत यकारापुढें वकार हा वल् आला असल्या-

मुळें, 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें यकारलोप होण्याची प्राप्ति आहे. पण अकाराचा जो लोप झाला आहे त्याचे ठिकाणीं तो अकार विद्यमानच आहे अशी स्थानिवद्भावानें वुद्धि केल्यास, यकार व वकार या दोहोंत अकाराचें व्यवधान होत असल्यामुळें, यलोप होऊं शकणार नाहीं. परंतु वरच्प्रत्ययनिमित्तामुळें जो अलोप झाला आहे त्याचे ठिकाणीं, 'न पदान्त' या निषेधक सूत्रान्वयें, स्थानिवद्‌वुद्धि करतां येत नसल्यामुळें आणि अशा रीतीनें अकाराचें व्यवधान होत नसल्यामुळें, यकारलोप होतो व ज्याप्रमाणें यकारलोप करतांना अलोपाचे ठिकाणीं स्थानिवत् वुद्धि करतां येत नाहीं त्याचप्रमाणें यकारलोप केल्यावर 'याया' यांतील अन्त्य आकाराचा लोप कर्तव्य असतां वरच्प्रत्ययनिमित्तक अकारलोपाचे ठिकाणीं स्थानिवत् वुद्धि करतां येत नसल्यामुळें व अशा रीतीनें 'यङ=य' प्रत्ययांतील अकाराचा व अवशिष्ट यकाराचा लोप झाल्यावर 'याया' यांतील अन्त्य आकारापुढें अजादि ङित् प्रत्यय आहे असें मानतां येत नसल्यामुळें, ङित् अजादि आर्धधातुक प्रत्यय पुढें आला असतां 'आतो लोपः' या सूत्रानें होणारा 'याया' यांतील अन्त्य आकाराचा लोप होत नाहीं आणि 'यायावरः' असें इष्ट रूप सिद्ध होतें. या उदाहरणासंबंधानें 'यश्च यङः' या सूत्रावरील टीकेंत बालमनोरमाकार म्हणतात— 'अल्लोपोऽयमार्धधातुके वरे परे विहितः। अतः तस्य स्थानिवत्वाभावान्न यङोऽकारमाश्रित्य आतो लोप इटि च इत्यस्य प्रवृत्तिरित्यर्थः। एवं च न पदान्त इति सूत्रे वरे इत्यंशस्य यलोपे इत्यंशस्य च यायावर इत्युदाहरणमिति बोध्यम्।') यलोपाचें 'यातिः' हें उदाहरण आहे. यङन्त 'या' धातूहून 'क्तिच्=ति' प्रत्यय केला असतां (तो प्रत्यय आर्धधातुक असल्यामुळें, 'याया + यङ + क्तिच् = याया + य + ति' या स्थलीं) 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें 'यङ=य' प्रत्ययांतील अकाराचा लोप होऊन नंतर ('यायाय् + ति' अशी स्थिति झाली असतां, यकारापुढें तकार हा वल् असल्यामुळें, 'लोपो व्योर्वलि'

सू. ८७३ या सूत्रानें यङ्प्रत्ययांतील अवशिष्ट) यकाराचा लोप होतो. आकारलोप करतेवेळीं अकारलोप स्थानिवत् होत असल्यामुळें, 'याया' यांतील अन्त्य आकाराचा 'आतो लोपः' सू. २३७२ या सूत्रानें लोप होऊन ('याय्+ति' अशी स्थिति झाली असतां, जसा आकारलोप करतेवेळीं अकारलोपाचे ठिकाणीं 'अचः परस्मिन् पूर्वविधौ' सू. ५० या सूत्रानें स्थानिवद्भाव करतां येत होता तसा यकारलोप करतेवेळीं प्रकृत निषेधक सूत्रान्वयें त्या अकारलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नसल्यामुळें, 'लोपो व्योर्वलि' या सूत्रानें) यकाराचा लोप होतो. यकाराचा लोप झाल्यावर ('या+ति' अशी स्थिति झाली असतां) प्रथम 'या' यांतील आकाराचा लोप पुन्हा होऊं शकतो असें समजू नये; कारण 'चिणो लुक्' या न्यायान्वयें आकाराचा लोप असिद्ध ठरत असल्यामुळें व तसेंच स्थानिवद्भाव होत असल्यामुळें, प्रथम 'या' यांतील आकाराचा लोप होऊं शकत नाहीं. ('यातिः' या रूपाची प्रक्रिया पूर्वी दिलीच आहे व वर देखील ती थोडक्यांत सांगितलीच आहे. मनोरमेंतील वरील पंक्तींत ज्या 'चिणो लुक्' न्यायाचा निर्देश केला आहे त्या न्यायाचें स्वरूप हें आहे कीं, 'चिण् भावकर्मणोः' सू. २७५८ या सूत्रानें 'च्लि' चे जागीं 'चिण्' झाला असतां त्या चिण्पुढें 'त' हा शब्द आल्यास त्या 'त' चा 'चिणो लुक्' सू. २३२९ या सूत्रानें लुक् होतो. उदाहरणार्थ 'अ+पच्+चिण्+त+तराम्=अपाचितराम्' या स्थलीं 'चिण्' पुढें 'त' आला असल्यामुळें, त्या 'त' प्रत्ययाचा लुक् होऊन 'अ+पच्+चिण्+तराम्' अशी स्थिति होते. अशा स्थितींत देखील चिण्प्रत्ययापुढें 'तराम्' यांतील 'त' आला असल्या-मुळें त्या 'त' चा 'चिणो लुक्' या सूत्रानें लुक् पावतो. पण 'चिणो लुक्' हें सूत्र आभीय अधिकारांत पठित असल्यामुळें, ज्या चिण्प्रत्ययरूप निमित्तामुळें 'त' प्रत्ययाचा लोप झाला आहे त्याच चिण्प्रत्ययनिमित्तामुळें 'तराम्' यांतील 'त' चा लोप करतेवेळीं

समानाश्रय–समाननिमित्तक–असा पूर्वी झालेला 'त' प्रत्ययाचा लोप 'असिद्धवदत्राभात्' सू. २१८३ या सूत्रान्वयें असिद्ध ठरतो, म्हणजे तो झालाच नाहीं असें मानावें लागतें. तसें मानलें असतां 'चिण्' व 'तराम्' या दोहोंत 'त' प्रत्ययाचें व्यवधान होतें असें मानणें भाग पडतें व त्यामुळें 'तराम्' यांतील 'त' चा लोप होत नाहीं. हा वर सांगितलेला 'चिणो लुक्' न्याय दीक्षितांनीं 'यातिः' या वर दिलेल्या उदाहरणास लावला आहे. 'या+यङ+क्तिच्=याया+य+ति' या स्थलीं 'या+ति' अशी पूर्वी सांगितल्याप्रमाणें स्थिति झाल्यावर या स्थितीत प्रथम 'या' यांतील आकाराचा लोप कां होऊं नये अशी कोणी शंका केल्यास त्या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात कीं, 'चिणो लुक्' या न्यायान्वयें त्या आकाराचा लोप होऊं शकत नाहीं. दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे की, 'यङ=य' या प्रत्ययांतील अन्त्य अकाराचा जो लोप झाला होता त्याचे ठिकाणीं स्थानिवत् बुद्धि करून म्हणजे तो अकार विद्यमानच आहे असें मानून, त्या अकाररूप निमित्तामुळें 'याया' यांतील अन्त्य आकाराचा 'आतो लोपः' सू. २३७२ या सूत्रानें लोप केला असल्यामुळें व 'आतो लोपः' सू. २३७२ हें सूत्र आभीय अधिकारांत पठित असल्या-मुळें, पुन्हा त्याच अकाररूप–समानाश्रय–निमित्तामुळें प्रथम 'या' यांतील आकाराचा लोप करतेवेळीं पूर्वी झालेला 'याया' यांतील अन्त्य आकाराचा लोप 'असिद्धवदत्राभात्' सू. २१८३ या सूत्रान्वयें असिद्ध ठरतो आणि त्यामुळें 'याया' यांतील अन्त्य आकाराचा लोप झालाच नाहीं असें मानावें लागतें. तसें मानलें असतां, प्रथम 'या' यांतील आकार व 'यङ=य' यांतील अकार या दोहोंमध्यें द्वितीय 'या' यांतील आकाराचें व्यवधान होतें असें मानावें लागतें व त्यामुळें प्रथम 'या' यांतील आकाराचा लोप होऊं शकत नाहीं. प्रथम 'या' यांतील आकाराचा लोप होऊं शकत नाहीं याला 'स्थानिवद्भावाच्च' असें दुसरें कारण दीक्षित देतात. त्यांच्या

म्हणण्याचा भावार्थ हा आहे कीं, 'यङ = य' यांतील जो अकारचा लोप झाला आहे त्या लोपाचे ठिकाणीं स्थानिवत् वृद्धि करून प्रथम 'या' यांतील आकाराचा लोप करतेवेळीं 'याया' यांतील पूर्वी झालेला अन्त्य आकाराचा लोप 'अचः परस्मिन्' सू. ५० या सूत्रान्वयें स्थानिवत् ठरत असल्यामुळें आणि अशा रीतीनें प्रथम 'या' व यङ्प्रत्ययांतील अकार या दोहोंत 'याया' यांतील अन्त्य आकाराचें व्यवधान होतें असें मानणें भाग पडत असल्यामुळें, प्रथम 'या' यांतील आकाराचा लोप होत नाहीं व 'यातिः' असें इष्ट रूप सिद्ध होतें.) स्वरकार्य करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नाहीं याचें 'चिकीर्षकः' हें उदाहरण आहे. या उदाहरणांत 'सन् = स' प्रत्ययांतील अकाराचा 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें जो लोप झाला आहे त्या लोपाचे ठिकाणीं, 'लिति' सू. ३६७६ या सूत्रान्वयें 'की' यांतील ईकारास उदात्तस्वर करतेवेळीं, स्थानिवत् वृद्धि करतां येत नाहीं. (सन्नन्त 'कृ' धातूहून 'ण्वुल्तृचौ' सू. २८९५ या सूत्रानें 'ण्वुल् = वु' प्रत्यय केला असतां, 'ण्वुल् = वु' चे जागीं 'युवोरनाकौ' सू. १२४७ या सूत्रानें 'अक' असा आदेश होऊन 'चिकीर्ष + अक' अशी स्थिति होते. अशा स्थितींत 'चिकीर्ष' यांतील अन्त्य अकाराचा 'अतो लोपः' या सूत्रानें जो लोप होतो त्या लोपाचे ठिकाणीं, 'लिति' या सूत्रानें स्वरविधि करतेवेळीं, अकार विद्यमानच आहे अशी स्थानिवद्भावानें वृद्धि करतां येत नाहीं व त्यामुळें 'ण्वुल् = अक' हा लित् प्रत्यय व 'चिकीर्ष' या दोहोंत अकाराचें व्यवधान होतें असें मानतां येत नसल्यामुळें, 'की' यांतील ईकारास 'लिति' या सूत्रानें होणारा इष्ट उदात्तस्वर होतो.) सवर्णविधि व अनुस्वारविधि करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नाहीं याचें 'शिण्ढि' हें उदाहरण आहे. (रुधादिगणांत पठित असलेल्या 'शिष्लृ विशेषणे' या धातूचें लोट्लकाराच्या मध्यमपुरुषाचें एकवचनाचें 'शिण्ढि' हें रूप आहे. 'रुधादिभ्यः श्नम्' सू. २५४३ या सूत्रानें

'शिप्' धातूस 'श्नम् = न' हे मित् विकरण होऊन 'शिनप् + सि' अशी स्थिति झाली असता, 'सेर्ह्यपिच्च' सू. २२०१ या सूत्रानें 'सि' प्रत्ययाचे जागी 'हि' असा आदेश होतो व तो आदेश अपित् असल्यामुळे 'श्नसोरल्लोप.' सू. २४६९ या सूत्राने 'श्नम् = न' यातील अन्त्य अकाराचा लोप होऊन व 'हुझल्भ्यो हेर्धि.' सू. २४२५ या सूत्रानें 'हि'चे जागी 'धि' होऊन 'शिन्प् + धि' अशी स्थिति झाली असता, 'ष्टुना ष्टु:' सू. ११३ या सूत्राने 'धि' यातील धकाराचा ढकार होऊन व 'झला जश् झशि' सू. ५२ या सूत्रानें पकाराचा डकार होऊन 'शिन्ड् + ढि' अशी स्थिति होते. अशा स्थितीत 'नश्चापदान्तस्य झलि' सू. १२३ या सूत्राने नकाराचा अनुस्वार होणे व त्या अनुस्वाराचा 'अनुस्वारस्य ययि परसवर्ण.' सू. १२४ या सूत्राने परसवर्ण णकार होणे ही दोन्ही कार्यें पावली आहेत. ही कार्यें करतेवेळी, 'न पदान्त' हा निपेध असल्यामुळे, 'श्नम् = न' यातील जो अन्त्य अकाराचा लोप झाला आहे त्याचे ठिकाणी स्थानिवत् बुद्धि करता येत नाही, म्हणजे अकार विद्यमान आहे असे मानता येत नाही. तशी बुद्धि केल्यास व अकार विद्यमान आहे असे मानल्यास, नकारापुढें 'ड्' हा झल् येत नसून 'अ' हा अच् येतो असे मानावे लागेल व त्यामुळे नकाराचा अनुस्वार होऊ शकणार नाही आणि अनुस्वाराचाच परसवर्ण होणे सांगितले असल्यामुळे, अनुस्वार न झाल्यास परसवर्णहि होऊ शकणार नाही पण 'न पदान्त' हा निपेध असल्यामुळें अकारलोपाचे ठिकाणी स्थानिवत् बुद्धि करता येत नाही व त्यामुळे नकाराचा अनुस्वार होऊन व अनुस्वाराचा परसवर्ण णकार होऊन आणि 'झरो झरि सवर्णे' सू. ७१ या सूत्रानें 'शिण्ड्' यातील डकाराचा विकल्पाने लोप होऊन 'शिण्ढि' व 'शिण्ड्ढि' अशी वैकल्पिक रूपें सिद्ध होतात.) दीर्घविधि करतेवेळी अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होत नाही याचे 'प्रतिदीव्ना' हे उदाहरण आहे ('प्रतिदिवन् + टा = प्रति-

दिवन् + आ' या स्थलीं 'प्रतिदिवन्' या अन्नन्त अङ्गाला 'यचि भम्' सू. २३१ या सूत्रानें भसंज्ञा होत असल्यामुळें, 'अल्लोपोऽनः' सू. २३४ या सूत्रानें 'दिवन्' यांतील वकारापुढील 'अन्' मधील अकाराचा लोप होऊन 'प्रतिदिव्न् + आ' अशी स्थिति झाली असतां, 'हलि च' सू. ३५४ या सूत्रानें 'दिव्' या वान्त धातूची 'इ' ही उपधा दीर्घ करतेवेळीं 'अल्लोपोऽनः' या सूत्रानें झालेला अकारलोप, 'न पदान्त' हा निषेध असल्यामुळें, स्थानिवत् मानतां येत नाहीं, म्हणजे अकार विद्यमानच आहे असें मानतां येत नाहीं. तसें मानल्यास, 'दिव्' या वान्त धातूपुढें 'न्' हा हल् नसून 'अ' अच् आहे असें मानणें भाग पडेल व त्यामुळें उपधा दीर्घ होणार नाहीं आणि 'प्रतिदीव्ना' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं.) जश्‌विधि करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नाहीं याचें 'सग्धिश्च मे' या श्रुतींतील 'सग्धिः' हें उदाहरण आहे. 'ग्धिः' याचा 'अदनम् = खाणें किंवा भोजन करणें' असा अर्थ आहे. 'अद्' धातूहून ('स्त्रियां क्तिन्' सू. ३२७२ या सूत्रानें) क्तिन्प्रत्यय केला असतां, 'बहुलं छन्दसि' सू. ३३९८ या सूत्रानें 'अद्' चे जागीं 'घस्' असा आदेश होऊन व 'घसिभसोर्हलि च' सू. ३५५० या सूत्रानें 'घस्' यांतील ('अ' या) उपधेचा लोप होऊन ('घ्स् + ति' अशी स्थिति झाली असतां, 'घ्' या झल्पुढें सकार आला असून त्या सकारापुढें 'ति' प्रत्ययांतील तकार हा झल् आला असल्यामुळें) 'झलो झलि' सू. २२८१ या सूत्रानें सकाराचा लोप होऊन व ('झषस्तथोर्धोऽधः' सू. २२८० या सूत्रानें 'ति' प्रत्ययांतील तकाराचा) धकार होऊन ('घ् + धि' अशी स्थिति होते व येथें 'घ्' या झल्पुढें 'ध्' हा झश् आला असल्यामुळें 'झलां जश् झशि' सू. ५२ या सूत्रानें) घकाराचें जश्त्व—गकार—होऊन 'ग्धि' असें रूप होतें. 'सहस्य सः' सू. १००९ या पूर्व सूत्रांतून 'समानस्य च्छन्दस्यमूर्द्ध-प्रभृत्युदर्केषु' सू. १०१२ या उत्तर सूत्रांत 'सः' या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळें, 'समाना ग्धिः सग्धिः' या स्थलीं 'समान' या

शब्दाचे जागी 'स' असा आदेश होऊन 'सग्धिः' हे रूप सिद्ध होते. ('अद् + क्ति = घस् + क्ति' या स्थली 'घसिभसोर्हलि च' या सूत्राने 'घस्' यातील उपधारूप अकाराचा जो लोप झाला आहे त्या लोपाचे ठिकाणी, घकाराचे जश्त्व–गकार–करतेवेळी, 'न पदान्त' हा निषेध असल्यामुळे, स्थानिवत् बुद्धि करता येत नाही, म्हणजे अकार विद्यमानच आहे असे मानता येत नाही तसे मानल्यास, घकारापुढे 'ध्' हा झश् नसून 'अ' हा अच् आहे असे मानावे लागेल व त्यामुळे घकाराचे जश्त्व–गकार–होणार नाही व 'ग्धि.' असे इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाही.) चर्विधि करतेवेळी अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होत नाही याचे 'जक्षतुः' हे उदाहरण आहे. ('अद्' धातूच्या लिटाचे प्रथमपुरुषाचे द्विवचन करतेवेळी 'अद् + अतुस्' अशा स्थितीत 'लिट्यन्यतरस्याम्' सू. २४२४ या सूत्राने 'अद्' चे जागी विकल्पेकरून 'घस्' असा आदेश होऊन व नंतर द्विर्वचन आणि अभ्यासाचे 'कुहोश्चुः' सू. २२४५ या सूत्राने चुत्व–झकार–होऊन व त्या झकाराचे 'अभ्यासे चर्च' सू. २१८२ या सूत्राने जश्त्व–जकार–होऊन व 'गमहनजनखनघसा लोपः' सू. २३६३ या सूत्राने 'घस्' यातील उपधारूप अकाराचा लोप होऊन आणि 'शासिवसिघसीनां च' सू. २४१० या सूत्राने सकाराचा षकार होऊन 'जघ् + ष् + अतुस्' अशी स्थिति होते. अशा स्थितीत घकारापुढे षकार हा खर् असल्यामुळे 'खरि च' सू. १२१ या सूत्रानें त्या घकाराचे चर्त्व–ककार–करतेवेळी, 'घस्' यातील उपधारूप अकाराचा 'गमहनजन' सू. २३६३ या सूत्रानें जो लोप झाला आहे त्या लोपाचे ठिकाणी, 'न पदान्त' हा निषेध असल्यामुळें, स्थानिवत् बुद्धि करता येत नाही, म्हणजे अकार विद्यमानच आहे असे मानता येत नाही. तसे मानल्यास, घकारापुढें 'ष्' हा खर् नसून 'अ' हा अच् आहे असे मानणे भाग पडेल व त्यामुळें 'जक्षतु.' हे इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाही.)

शब्दरत्न—अन्तशब्दस्य चरमावयववाचित्वं, विधिशब्दो भावसाधनः, कर्मषष्ठ्या समासेन पदचरमावयवे कर्त्तव्ये इत्येवं व्याख्याने फलमाहृदृक्षमिति । विजिति । क्विपि तूठ् स्यादिति भावः । स्थानिवत्त्वादिति । णिलोपस्य, टिलोपस्य वा स्थानिवत्त्वादित्यर्थः । नन्वस्य पदत्वाभावात्कुतोऽसिद्धिरतआह—सुबन्तादिति । अन्तर्वर्त्ति-सुब्निमित्तकपदत्वस्यैकदेशविकृतन्यायेन वान्तेऽपि सत्त्वमिति भावः । प्रत्ययलक्षणमिति । स्थानिवत्त्वेन प्रत्ययनिमित्तं कार्यमित्यर्थः । वर्णाश्रयत्वादिति । "णाविष्ठवद्–" इत्यनेन "यचि भम्" इति शास्त्रस्यैवातिदेशः तच्च वर्णाश्रयम्, एवं च स्थानिवत्त्वस्याप्रसक्तिः । कार्यातिदेशे ऽपि यन्निमित्तवैकल्यप्रयुक्तोपदेशाप्रवृत्तिस्तन्निमित्ता-तिरिक्तसर्वनिमित्तकत्वमतिदेशस्यापीत्यङ्गीकाराद्वर्णाश्रयत्वाक्षतिः । प्रत्ययलक्षणसूत्रं तु भाष्यकृता प्रत्ययस्य यत्रासाधारणं रूपमाश्रीयते तत्रैव प्रत्ययलक्षणमिति नियमार्थत्वेन स्थापितं, न त्वप्राधान्येनाला-श्रयणे विध्यर्थमिति भावः । न च "अचः परस्मिन्" इति णिलोपस्य स्थानिवत्त्वेन भत्वं सुलभमिति वाच्यम्, णिलोपस्येव टिलोपस्यापि स्थानिवत्त्वापत्तौ वान्ते भत्वस्य दुर्लभत्वेन तत्र पदत्वानिवृत्तेः, "प्रकल्प्य चापवादविषयम्" इति न्यायेन निषेधविषये तत्प्रतिबन्धाय स्थानिवत्त्वाप्रवृत्तेश्च । हरदत्तादिमते इत्यनेनारुचिर्बोधिता । तद्बीजं त्वयं पक्षो न सूत्रवार्तिकभाष्यसंमत इति प्रातिपदिकात्तदुत्पत्तौ पदत्वाभाव इति । चरमावयवे कार्य इति व्याख्याने फलं तु 'एषो यन् हसति' इत्यादौ यणः स्थानिवत्त्वाद् "एतत्तदोः" इति सुलोपाभावः । इणः शतरि यन्निति रूपम् । उत्वे च न स्थानिवद्, अनेन निषेधादिति तत्त्वम् ।

'न पदान्त' या सूत्रांतील 'अन्त' या शब्दाचा 'चरमावयव = अन्त्य अवयव' असा अर्थ आहे. या सूत्रांतील 'विधि' हा शब्द ('वि' या उपसर्गपूर्वक 'धा' धातूहून) 'भावे' या अर्थामध्यें 'कि' प्रत्यय होऊन सिद्ध झाला आहे व तो प्रत्यय 'भावे' या अर्थामध्यें

झाला असल्यामुळें, 'पदान्तस्य' या कर्मणिषष्ठीशी 'विधि' या शब्दाचा समास होऊन 'पदान्तविधौ' या शब्दाचा 'पदचरमावयवे कर्तव्ये' असा अर्थ होत असल्याने कोणते फल निष्पन्न होते हे दीक्षितानी 'वृक्ष वेतीति · व्याख्याने तु नेद सिध्येत्' या मनोरमेतील पक्तीत सागितले आहे. ('उपसर्गे घोः किः' सू. ३२७० या सूत्राने 'धा' धातुहून होणारा 'कि' प्रत्यय 'भावे' सू. ३१८४ या सूत्राने 'भावे' या अर्थामध्ये व तसेच 'अकर्तरि च कारके' सू. ३१८६ या सूत्राने कर्तृभिन्न कोणत्याहि कारकाच्या अर्थामध्ये होऊ शकतो. परतु शब्द-रत्नकार म्हणतात की प्रकृत सूत्रातील 'विधि' हा शब्द 'भावे' या अर्थामध्येंच, म्हणजे 'विधान विधिः' या अर्थामध्येच, 'कि' प्रत्यय होऊन सिद्ध झाला आहे असेच मानणे योग्य आहे, व तसे म्हणण्याचे कारण हे की, 'भावे' या अर्थात 'कि' प्रत्यय झाला नसून 'कर्मणि' या अर्थात 'कि' प्रत्यय झाला आहे असे मानल्यास, 'पदान्तस्य विधिः पदान्तविधि.' या स्थली 'षष्ठी' सू. ७०२ या सूत्रानें झालेल्या षष्ठीतत्पुरुषसमासातील 'पदान्तस्य' ही षष्ठी, कर्म उक्त असल्यामुळे, सबधसामान्यषष्ठी मानावी लागेल व तसे मानल्यास,' पदस्य अन्त्यावयव-सम्बन्धिनि यस्मिन् कस्मिश्चित् भावरूपे अभावरूपे वा कार्ये कर्तव्ये' असा 'पदान्तविधौ' या शब्दाचा अर्थ होईल व तसा अर्थ मानल्यास, 'वृक्षव्' या शब्दातील अन्त्य वकाराचा लोप करतेवेळी प्रकृत सूत्रान्वये स्थानिवद्भावाचा निषेध होईल व वकारलोप होण्याची आपत्ति येईल आणि 'वृक्षव्' असे इष्टरूप सिद्ध होऊं शकणार नाही. म्हणून 'विधि' या स्थली 'विधीयते इति विधि.', म्हणजे ज्याचे विधान केले जाते ते कार्य, अशा रीतीनें 'कर्मणि' या अर्थामध्ये 'कि' प्रत्यय झाला आहे असे न मानता, 'भावे' या अर्थामध्यें तो प्रत्यय झाला आहे हेच मानणे उचित आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे तसे मानले असता, कर्म अनुक्त असल्यामुळे, 'पदान्तस्य विधि पदान्तविधिः' या समासातील 'पदान्तस्य' ही

'कर्तृकर्मणोः कृति' सू. ६२३ या सूत्रान्वयें कर्मणिषष्ठी होऊन व 'कृद्योगा च षष्ठी समस्यते इति वाच्यम्'–सू. ७०३ वरील वार्तिक–या वार्तिकान्वयें 'पदान्तस्य' या कर्मणि षष्ठीशीं 'विधिः' या शब्दाचा षष्ठीसमास होऊन 'पदचरमावयवकर्मकविधाने' असा 'पदान्तविधौ' या शब्दाचा अर्थ होतो व तसा अर्थ झाल्यानें जेथें पदाच्या अन्तीं चरमावयवरूप भावकार्य करणें आहे तशाच ठिकाणीं स्थानिवद्भावाचा निषेध होऊन, 'वृक्षव्' यांतील अन्त्य वकाराचा लोप होण्याची आपत्ति टळते; कारण पूर्वी सांगितल्याप्रमाणें 'वृक्षव्' यांतील अन्त्य वकाराचा लोप करणें हें पदाचे ठिकाणीं चरमावयवरूप कार्य करणें नसून पदान्तीं असणाऱ्या वर्णाचा लोप करून त्याचा नाश करणें असें अभावरूप कार्य असल्यामुळें, 'न पदान्त' हा निषेध येथें लागू पडत नाहीं व 'अचः परस्मिन्' या पूर्व सूत्रानें अजादेशाचे ठिकाणीं, म्हणजे टिलोपाचे व णिलोपाचे ठिकाणीं, स्थानिवद्भाव होतो च अशा रीतीनें 'वृक्षव्' यांतील वकारापुढें 'करोति' यांतील ककार हा वल् नसून दोहोंमध्यें टिचे व णिचें व्यवधान आहे असें मानावें लागत असल्यामुळें, वकाराचा 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें होणारा लोप होत नाहीं आणि 'वृक्षव्' असें इष्ट रूप सिद्ध होतें. प्रकृत सूत्रावरील शब्दकौस्तुभांत दीक्षितांनीं हा विषय स्पष्ट केला आहे व ते म्हणतात–'विधिशब्दश्चेह न कर्मसाधनः। तथात्वे हि कर्मधारयो वा स्याच्छेषषष्ठ्यन्तेन सह तत्पुरुषो वा। नाद्यः। विधिशब्दस्य क्रियाशब्दतया पूर्वनिपातप्रसङ्गात्। नान्त्यः। पदान्तस्य कस्मिंश्चित्कर्तव्ये न स्थानिवदिति पर्यवसानेन वृक्षवित्यत्र वलोपापत्तेः। द्वन्द्वनिर्दिष्टेषु द्विर्वचनादिषु अनन्वयापत्तेश्च। तस्माद्भावसाधन एवाऽन्तरङ्गत्वाच्च।' या वर दिलेल्या उताऱ्यावरून हें स्पष्ट होतें कीं, प्रकृत सूत्रांतील 'विधि' हा शब्द 'भावे' या अर्थामध्यें 'कि' प्रत्यय होऊन सिद्ध झाला असून 'पदान्तविधौ' या शब्दाचा 'पदस्य चरमावयवे कर्तव्ये' असाच अर्थ निष्पन्न होतो.) 'वृक्षव्'

या स्थलीं 'वृक्षवा' किंवा 'वृक्षवी' या शब्दाहून णिच्प्रत्यय केल्यावर क्विप्प्रत्यय होतो असें न म्हणतां विच्प्रत्यय होतो असें जें दीक्षितांनीं म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, क्विप्प्रत्यय केला असता तर, ('च्छ्वोः शूठ्' सू. २५६१ या सूत्रानें 'वृक्षव्' यांतील अन्त्य वकाराचे जागीं) 'ऊठ्=ऊ' झाला असता (व 'एत्येधत्यूठ्सु' सू. ७३ या सूत्रानें 'वृक्ष' यांतील अन्त्य 'अ' व 'ऊठ्=ऊ' या दोहोंचे ठिकाणी वृद्धिरूप एकादेश होऊन 'वृक्षौः' असें रूप झालें असतें व हें पदचरमावयवविधीचें प्रत्युदाहरण ठरलें नसतें.) 'लोपो व्योः इति वलोपो न, स्थानिवत्त्वात्' या मनोरमेच्या पंक्तीतील 'स्थानिवत्त्वात्' या पदाचा 'णिलोपस्य टिलोपस्य वा स्थानिवत्त्वात्', म्हणजे 'णेरनिटि' सू. २३१३ या सूत्रानें जो णिलोप झाला आहे त्या लोपाचे ठिकाणी किंवा 'वृक्षवा' यांतील 'आ' या टिचा 'टेः' सू. १७८६ या सूत्रानें जो लोप झाला आहे त्या लोपाचे ठिकाणीं 'अचः परस्मिन्' सू. ५० या सूत्रानें स्थानिवद्भाव होत असल्यामुळें वकारलोप होत नाहीं, असा अर्थ आहे. 'वृक्षव्' हें (प्रातिपदिक असून) पद नसल्यामुळें 'न पदान्त' हें निषेधक सूत्र या उदाहरणास लागू पडत नाहीं असें कोणी म्हटल्यास, त्याला उत्तर म्हणून दीक्षितांनी मनोरमेंत 'सुवन्तात् णिच्' असें हरदत्ताचें मत दिलें आहे व त्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे कीं, ज्या अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा लुक् होतो त्या प्रत्ययाच्या निमित्तामुळें 'वृक्षवा' याला प्राप्त झालेली पदसंज्ञा एकदेशविकृतन्यायानें 'वृक्षव्' या एकदेशविकृत वकारान्त रूपास देखील होते. (याचें विवरण पूर्वी मनोरमेंत केलेंच आहे.) 'न च प्रत्ययलक्षणम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा 'स्थानिवत्त्वेन प्रत्ययनिमित्तं कार्यं न', म्हणजे 'णेरनिटि' या सूत्रानें जो णिप्रत्ययाचा लोप झाला आहे त्या लोपाचे ठिकाणीं णिप्रत्यय कायमच आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि केली असतां त्या णिप्रत्ययाच्या निमित्तानें 'वृक्षव्' या अङ्गाला भसंज्ञा

होणें हें कार्य होऊं शकत नाहीं, असा अर्थ आहे. भसंज्ञा न होण्याचें 'वर्णाश्रयत्वात्' असें जें मनोरमेंत कारण दिलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'णौ इष्ठवत्' या अतिदेशविधायक शास्त्रानें 'यचि भम्' या शास्त्राचाच अतिदेश होतो व हें शास्त्र (यकार व अच् या वर्णांना मानून प्रवृत्त होणारें शास्त्र असल्यामुळें) वर्णाश्रय आहे आणि त्यामुळें स्थानिवद्भावाची प्राप्तीच होत नाहीं. (शास्त्रातिदेशपक्ष न मानतां) कार्यातिदेशपक्ष मानला तरी, ज्या निमित्ताच्या वैकल्यामुळें–अभावामुळें–विधिसूत्रानें सांगितलेल्या कार्याची प्रवृत्ति होऊं शकत नाहीं तें निमित्त खेरीज करून, म्हणजे ज्याचे ठिकाणीं अतिदेश केला आहे त्यांत तें निमित्त नसून देखील त्यामध्यें असणारींच सर्व निमित्तें अतिदिष्ट कार्याचीं निमित्तें ठरतात असा सिद्धान्त मानला असल्यामुळें, त्या कार्यातिदेशपक्षांत देखील भसंज्ञारूप कार्य करणें हें वर्णाश्रय–अलाश्रयनिमित्तक–कार्य ठरतें आणि त्यामुळें स्थानिवद्भाव होऊं शकत नाहीं. ('न च प्रत्ययलक्षणम्' या मनोरमेंतील पंक्तीचा आपाततः असाच अर्थ होतो कीं, 'वृक्षव्' या स्थलीं 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ हें सूत्र प्रवृत्त केलें असतां, ज्या णिप्रत्ययाचा लोप झाला आहे त्या णिप्रत्ययाला मानून 'वृक्षव्' या अङ्गाला भसंज्ञा होऊं शकत नाहीं. परंतु शब्दरत्नकार या पंक्तीचा वेगळ्या रीतीनें अर्थ करितात. या पंक्तींत ते 'स्थानिवत्वेन' हें पद अध्याहृत करून 'प्रत्ययलक्षणम्' या पदाचा 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणमिति सूत्रम्' असा अर्थ न करितां, 'प्रत्ययः लक्षणं निमित्तं यस्य कार्यस्य तत् प्रत्ययनिमित्तकं कार्यम्' असा अर्थ करतात. त्यांच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें, ज्या अल्रूप 'णि = इ' प्रत्ययाचा लोप झाला आहे तो प्रत्यय कायमच आहे अशी स्थानिवद्भावानें वृद्धि करतां येत नाहीं व त्या प्रत्ययाच्या निमित्तानें होणारें भसंज्ञारूप कार्य करतां येत नाहीं. असा जो त्यांनीं भिन्न रीतीनें अर्थ केला आहे त्याचें कारण हें कीं, 'प्रत्यय-

लोपे प्रत्ययलक्षणम्' १.१.६२ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं असे म्हटलें आहे की, 'न ङिसम्बुद्धयो:' सू. ३५२ हें सूत्र पाणिनीनें केले असल्यामुळे त्यावरून हे ज्ञापित होते कीं, प्रत्ययलक्षणानें भसंज्ञा होत नाही. भाष्यकार म्हणतात—'भसंज्ञायां तावन्न दोषः। आचार्य-प्रवृत्तिर्ज्ञापयति न प्रत्ययलक्षणेन भसंज्ञा भवतीति यदयं न ङिसम्बुद्धयो: इति ङौ प्रतिषेधं शास्ति।' या भाष्यावरून हे स्पष्ट होते की, प्रत्ययलक्षणाने भसंज्ञा होत नाही आणि म्हणूनच या भाष्याला धरून शब्दरत्नकारांनी मनोरमेतील वरील पंक्तीचा वर सांगितल्याप्रमाणे अर्थ केला आहे. सारांश मनोरमेत जी शंका उपस्थित केली आहे ती 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या सूत्राची प्रसक्ति—प्राप्ति—आहे अशा अर्थाची नसून 'स्थानिवदादेश:' या सूत्राची प्राप्ति आहे अशा अर्थाची आहे असें समजावे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे व हा भावार्थ 'ननु प्रत्ययलक्षणमित्याशङ्का कृता सा न सङ्गच्छते, तस्य सूत्रस्य नियमार्थत्वसिद्धान्तादत आह—स्थानिवत्त्वेनेति। एवञ्च स्थानिवत्सूत्रस्यैव प्रसक्तिशङ्केयमिति भाव:' या भैरवीतील अवतरणा-वरून स्पष्ट होतो. णिलोपाचे ठिकाणी स्थानिवत् वृद्धि करतां येत नाही याचे कारण 'वर्णाश्रयत्वात्'—म्हणजे भसंज्ञा करणे हे अलाश्रय-निमित्तक कार्य आहे असे जे मनोरमेंत दिले आहे त्याचे विवरण करितांना शब्दरत्नकार असे म्हणतात की, 'णौ इष्ठवत्' हे अति-देशविधायक शास्त्र असल्यामुळे शास्त्रातिदेशपक्षांत त्याचा असा अर्थ होतो की, 'इष्ठप्रत्यये परे सति यानि शास्त्राणि प्राप्नुवन्ति तानि सर्वाणि णौ प्रत्यये परे सति प्राप्नुवन्ति।' म्हणून शास्त्रातिदेशपक्षात भसंज्ञारूप कार्याचा अतिदेश न होता, 'यचि भम्' या शास्त्राचाच अतिदेश होतो व हे शास्त्र प्रवृत्त होण्याकरिता अङ्गापुढें यकारादि किंवा अजादि प्रत्यय असणे आवश्यक असल्यामुळे व ज्या णिप्रत्ययाच्या निमित्तामुळें भसंज्ञा करणे आहे त्या प्रत्ययाचा 'णेरनिटि' सू. २३१३ या सूत्रानें 'वृक्षव्' या स्थली लोप झाला असल्यामुळें व अशा रीतीनें

'वृक्षव्' या अङ्गापुढें 'णि = इ' हा अजादि प्रत्यय नसल्यामुळें, 'यचि भम्' या शास्त्राची या स्थलीं प्रवृत्ति होऊं शकत नाहीं. णिलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करून तो णिप्रत्यय कायमच आहे असें मानतां येत नाहीं; कारण 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें, 'णि = इ' या अल्चा जो लोप झाला आहे त्याचे ठिकाणीं णिप्रत्यय कायमच आहे अशी स्थानिवद्भावानें वृद्धि करतां येत नाहीं व त्यामुळें 'यचि भम्' हें वर्णनिमित्तक शास्त्र वरील उदाहरणांत प्रवृत्त होऊं शकत नाहीं आणि म्हणून 'वृक्षव्' या अङ्गाला भसंज्ञा होऊं शकत नाहीं. आतां 'यचि भम्' सू. २३१ या सूत्रांतील 'यचि' हें पद प्रत्ययाचें विशेषण असल्यामुळें, यजादित्व हें अप्रधान ठरून प्रत्यय प्रधान ठरतो आणि अशा रीतीनें 'यचि भम्' या सूत्रांत प्राधान्यानें अल्चा आश्रय केला नसून अप्राधान्यानें अल्चा आश्रय केला असल्यामुळें, हें वर्णाश्रयशास्त्र ठरत नाहीं आणि म्हणून 'अनल्विधौ' हा प्रतिषेध येथें लागू पडत नाहीं व णिप्रत्ययाच्या लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येतो अशी कोणी शंका केल्यास, ती शंका बरोबर नाहीं; कारण प्राधान्यानें किंवा अप्राधान्यानें अलाश्रय केला असला तरी, तशा दोन्ही ठिकाणीं 'अनल्विधौ' हा निषेध सारखाच लागू पडतो हें 'स्थानिवदादेशः' या सूत्रावरील मनोरमेंत पूर्वी स्पष्ट सांगितलेंच आहे. आतां अतिदेशविधायक शास्त्रान्वयें शास्त्राचा अतिदेश होत नसून, शास्त्रनिर्दिष्टकार्य प्रधान असल्यामुळें प्राधान्यानें कार्याचाच अतिदेश होतो असा पक्ष मानला तर, त्या पक्षांत 'णौ इष्ठवत्' या अतिदेशशास्त्राचा 'इष्ठप्रत्यये परे सति यानि कार्याणि भवन्ति तानि सर्वाणि कार्याणि णौ प्रत्यये परे सति भवन्ति' असा अर्थ होतो व या अर्थान्वयें ज्याप्रमाणें इष्ठप्रत्यय पुढें आला असतां मागील अङ्गाला भसंज्ञा होते त्याचप्रमाणें णिप्रत्यय पुढें आला असतां देखील मागील अङ्गाला 'णौ इष्ठवत्' या अतिदेशान्वयें भसंज्ञा होते असें शंकाकाराचें म्हणणें आहे. या शंकेवर

शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, भसंज्ञा होण्याकरिता अङ्गापुढे असणारा प्रत्यय 'स्वौजस्' सू. ४.१.२ या सूत्रापासून 'उर:प्रभृतिभ्यः कप्' सू. ५.४.१५१ या सूत्रापर्यंत जे प्रत्यय अष्टाध्यायीत पठित आहेत त्यात अन्तर्भूत असणे व तो यकाराने किंवा अचानें सुरु होणारा असणे व सर्वनामस्थानप्रत्यय नसणे या निमित्ताची आवश्यकता आहे. 'इष्ठ' प्रत्यय 'अतिशायने तमबिष्ठनौ' सू. ५.३.५५ या सूत्रात पठित असल्यामुळें, तो 'स्वौजस्' या सूत्रापासून 'कप्' प्रत्ययापर्यंत जे प्रत्यय पठित आहेत त्यात अन्तर्भूत आहे व तो अजादि देखील आहे. पण 'णि' प्रत्यय जरी अजादि आहे तरी तो 'स्वौजस्' या सूत्रापासून 'उरःप्रभृतिभ्यः कप्' या सूत्रापर्यंत जे प्रत्यय पठित आहेत त्यात अन्तर्भूत नसून, अष्टाध्यायीच्या तृतीयाध्यायात पठित आहे आणि अशा रीतीने 'णि' प्रत्ययाचे ठिकाणी जरी द्वितीय निमित्त–अजादित्व–विद्यमान आहे तरी त्यात प्रथम निमित्ताचा–स्वादिकप्प्रत्ययावधिकत्वरूपनिमित्ताचा–अभाव आहे व ज्याचे ठिकाणी अतिदेश केला जातो त्यात असणाऱ्या ज्या निमित्ताच्या अभावामुळे उपदेशाची, म्हणजे 'यचि भम्' या पाणिनीय शास्त्राची, प्रवृत्ति होत नाही ते निमित्त त्यात नसून देखील त्यात विद्यमान असणारी निमित्तेच अतिदिष्ट कार्याची निमित्ते ठरतात असा सिद्धान्त मानला असल्यामुळे, 'णि' प्रत्यय अङ्गापुढे आला असता त्या अङ्गाला भसंज्ञारूप कार्य होणे हे त्या 'णि'च्या केवळ अजादित्वामुळें होणारे कार्य ठरते आणि अजादित्व हा अच्प्रत्याहारान्तर्गत वर्णांचे ठिकाणी राहणारा धर्म असल्यामुळें, ते वर्णाश्रयनिमित्तक कार्य ठरते. सारांश 'णौ इष्ठवत्' या अतिदेशशास्त्रानें ज्या 'णि' प्रत्ययाचे ठिकाणी अतिदेश केला जातो त्या 'णि' प्रत्ययात स्वादिकप्प्रत्ययावधिकत्व या निमित्ताचा अभाव असल्यामुळे, 'यचि भम्' या सूत्राने होणारे भसंज्ञारूप कार्य जरी वास्तविक प्राप्त होत नाही तरी, 'णौ इष्ठवत्' या अतिदेशाच्या सामर्थ्याने त्या कार्याची प्राप्ति होते.

पण त्या अतिदिष्ट भसंज्ञारूप कार्याचें स्वादिकप्प्रत्ययावधिकत्व हें जें वरील निमित्तांपैकीं एक निमित्त आहे त्या निमित्ताचा 'णि' प्रत्ययांत अभाव असल्यामुळें तें निमित्त अतिदिष्ट कार्याचें निमित्त होत नसून, त्यांत अजादित्व हें जें केवळ द्वितीय निमित्त विद्यमान आहे तेवढेंच निमित्त वरील सिद्धान्तान्वयें अतिदिष्ट कार्याचें निमित्त ठरतें व अजादित्व हा केवळ वर्णमात्रवृत्ति, म्हणजे केवळ वर्णाचे ठिकाणीं राहणारा, धर्म असल्यामुळें, तशा निमित्तामुळें होणारें भसंज्ञारूप कार्य वर सांगितल्याप्रमाणें वर्णाश्रयनिमित्तक कार्य ठरतें. म्हणून 'वृक्षव्' याला भसंज्ञा प्राप्त करून देण्याकरितां, ज्या 'णि' प्रत्ययाचा लोप झाला आहे तो 'णि = इ' कायमच आहे अशी, 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें, स्थानिवद्भावानें वृद्धि करतां येत नाहीं व त्यामुळें कार्यातिदेशपक्षांत देखील 'वृक्षव्' याला भसंज्ञा होऊं शकत नाहीं. येथें हें देखील सांगणें आवश्यक आहे कीं, 'अम्' या पूर्वी असणाऱ्या अन्तर्वर्ति सुप् प्रत्ययाच्या निमित्तामुळें 'वृक्षव्' या एकदेशविकृताला जी पदसंज्ञा प्राप्त झाली आहे ती 'पूर्वनिमित्तकमन्तरङ्गं परनिमित्तकं बहिरङ्गम्' या न्यायान्वयें पुढें असणाऱ्या 'णि' प्रत्ययाच्या निमित्तानें होणाऱ्या भसंज्ञेच्या मानानें अन्तरङ्ग ठरते व परनिमित्तक भसंज्ञा बहिरङ्ग ठरते आणि त्यामुळें देखील पूर्वी झालेल्या अन्तरङ्ग पदसंज्ञेचा बहिरङ्ग भसंज्ञा पर असून देखील बाध करूं शकत नाहीं. सारांश शास्त्रातिदेशपक्ष मानला किंवा कार्यातिदेशपक्ष मानला तरी, या दोन्ही पक्षांत णिलोपाचे ठिकाणीं तो प्रत्यय कायमच आहे अशी 'अनल्विधौ' या प्रतिषेधान्वयें स्थानिवद्भावानें वृद्धि करतां येत नसल्यामुळें, 'वृक्षव्' या अङ्गाला भसंज्ञा होऊं शकत नाहीं आणि 'वृक्षवा' या अङ्गाला 'अम्' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाच्या निमित्तामुळें जी पदसंज्ञा पूर्वीं झाली आहे व जी 'वृक्षव्' या एकदेश-विकृताला प्राप्त होते ती संज्ञा कायम राहते. म्हणून 'वृक्षव् करोति'

या उदाहरणांत, 'पदान्तविधौ' या शब्दाचा 'पदान्तस्य स्थाने विधौ कर्तव्ये' असा अर्थ केला तर, 'न पदान्त' या निषेधक सूत्रान्वयें णिलोपाचे ठिकाणी स्थानिवद्भाव करतां येत नसल्यामुळें, वकार-लोपाची 'लोपो व्योर्वलि' या सूत्रानें प्राप्ति होते. परंतु 'पदान्तविधौ' या शब्दाचा 'पदस्य चरमावयवे कर्तव्ये' असा पूर्वी सांगितल्याप्रमाणें अर्थ होत असल्यामुळें व प्रकृत स्थलीं पदचरमावयवरूप भावकार्य करणें नसून लोपरूप अभावकार्य करणें असल्यामुळें, 'न पदान्त' हा निषेध येथें लागू पडत नाहीं व वकारलोप होण्याची आपत्ति टळते हें पूर्वी सांगितलेंच आहे.) 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ या सूत्रासंबंधानें भाष्यकारांनीं असा सिद्धान्त सांगितला आहे कीं, जेथें केवळ प्रत्ययाचे ठिकाणीं असणाऱ्या (व इतर ठिकाणीं नसणाऱ्या अशा) असाधारण धर्माचा आश्रय करून कांहीं कार्य होणें सांगितलें आहे तेथेंच तें सूत्र लागू पडावें असा नियम करून देण्याकरितां तें सूत्र केलें आहे व जेथें प्रत्ययांत असलेल्या अलाचा अप्राधान्यानें आश्रय करून कांहीं कार्य होणें सांगितलें आहे तसें कार्य व्हावें याकरितां, म्हणजे तशा ठिकाणीं अल्विधि असून देखील स्थानिवद्भाव व्हावा याकरितां, तें सूत्र विधिरूपानें पठित केलें नाहीं. (सारांश 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हें सूत्र अल्विध्यर्थक नसून नियमार्थक सूत्र आहे असा भाष्यकारांनीं सिद्धान्त सांगितला असल्यामुळें, जरी 'यचि भम्' या सूत्रांत यजादित्व हें प्रत्ययाचें विशेषण असून त्याचा अप्राधान्यानें निर्देश केला आहे तरी, त्या ठिकाणीं ज्या णिप्रत्ययाचा लोप झाला आहे तो 'णि = इ' कायमच आहे असें 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या सूत्रान्वयें मानतां येत नाहीं. कारण ती भसंज्ञा 'णि' प्रत्ययाच्या असाधारणधर्मत्वामुळें प्राप्त होणारी नसून इतर ठिकाणीं देखील असू शकणाऱ्या अजादित्व या साधारण धर्मामुळें प्राप्त होणारी अल्निमित्तक संज्ञा आहे व 'वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम्' असा न्याय असल्यामुळें

देखील णि लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं व त्यामुळें 'वृक्षव्' या अङ्गाला भसंज्ञा होऊं शकत नाहीं. त्या भाष्यांत (१–१–६२) भाष्यकार म्हणतात–'प्रत्ययं गृहीत्वा यदुच्यते तत्प्रत्ययलक्षणेन यथा स्यात्। शब्दं गृहीत्वा यदुच्यते तत्प्रत्ययलक्षणेन मा भूदिति। किं प्रयोजनम्। शोभना दृषदोऽस्य सुदृषद्ब्राह्मणः। सोर्मनसी अलोमोषसी इत्येष स्वरो मा भूदिति।' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हें सूत्र असण्याची वार्तिककारांनीं जीं प्रयोजनें सांगितलीं आहेत तीं प्रयोजनें नसून वास्तविक प्रयोजन हें आहे कीं, प्रत्ययाला धरून, म्हणजे प्रत्ययाचेच ठिकाणीं असणाऱ्या असाधारण धर्माला धरून, जें कार्य होणें सांगितलें आहे तेंच कार्य प्रत्ययाचा लोप झाला असतां प्रत्ययलक्षणानें व्हावें व एखाद्या शब्दाला धरून जें कार्य होणें सांगितलें आहे तें कार्य प्रत्ययाचा लोप झाला असतां प्रत्ययलक्षणानें होऊं नये असा नियम करून देण्याकरितां तें सूत्र केलें आहे, व असा नियम करून दिला असल्यामुळें, 'शोभनाः दृषदः अस्य सः सुदृषद्ब्राह्मणः' या उदाहरणांत 'सुदृषद्' या बहुव्रीहिसमासांत 'दृषद्' या उत्तरपदाहून केलेल्या 'जस्' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें जो लुक् झाला आहे त्याचे ठिकाणीं प्रत्ययलक्षण करून असन्त उत्तरपद आहे असें मानतां येत नाहीं आणि त्यामुळें त्या उत्तरपदाला 'सोर्मनसी अलोमोषसी' सू. ३८५१ या सूत्रानें प्राप्त होणारा आद्युदात्त स्वर होत नाहीं. वार्तिककाराचें असें म्हणणें होतें कीं, 'स्थानिवदादेशः' या सूत्रांत 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें जेथें स्थानिवद्भाव होऊं शकत नव्हता तेथें तो व्हावा याकरितां, म्हणजेच अल्विधि व्हावा याकरितां, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हें सूत्र पाणिनीनें मुद्दाम केलें आहे व तें सूत्र करण्याची वार्तिककारानें 'ङौ नकारलोप,' 'इत्व' व 'इम्विधि' अशीं तीन प्रयोजनें सांगितलीं होतीं. भाष्यकारांनीं हीं तीन्ही प्रयोजनें इतर रीतीनें सिद्ध होतात असें सिद्ध करून वर

सांगितलेला सिद्धान्त स्थापित केला आहे. या भाष्याला धरूनच शब्दरत्नांतील वरील पंक्ति लिहिली आहे. त्या पंक्तीचा अर्थ नीट ध्यानांत येण्याकरितां आपण क्विप् व 'जस् = अस्' या दोन प्रत्ययांचीं उदाहरणें घेऊं. 'क्विप्' हा पित् प्रत्यय आहे. पित्व हा धर्म प्रत्यय व अप्रत्यय यांचे ठिकाणीं राहणारा साधारण धर्म नसून, केवळ प्रत्ययाचेच ठिकाणीं राहणारा असाधारण धर्म आहे. पण 'जस् = अस्' हा जसा प्रत्यय आहे तसा 'अस्' हा धातु देखील आहे व तो सुपयस्, सुयशस्, सुस्रोतस्, इत्यादि असन्त शब्दांचा एकदेशहि आहे. म्हणून 'द्युतिगमिजुहोतीनां द्वे च'–सू. ३१५८ वरील वार्तिक–या वार्तिकान्वयें 'गम्' धातूहून क्विप् प्रत्यय होऊन व त्या धातूचें द्विर्वचन होऊन व 'कुहोश्चुः' सू. २२४५ या सूत्रानें अभ्यासांतील गकाराचे जागीं जकार होऊन आणि 'गमः क्वौ' सू. २९८६ या सूत्रानें 'गम्' यातील मकाराचा लोप होऊन 'जग + क्विप्' अशी स्थिति झाली असतां, 'ह्रस्वस्य पिति कृति तुक्' सू. २८५८ या सूत्रानें 'जग' या ह्रस्वान्त अङ्गाला तुगागमाची व तसेंच 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें क्विप् = व् या प्रत्ययाच्या लोपाची प्राप्ति होते. क्विप् प्रत्ययाचा लोप होणें हें निर्निमित्तक कार्य असून, क्विप् प्रत्ययाच्या निमित्तामुळें होणारें तुगागमकार्य असल्यामुळें, क्विप् प्रत्ययाचा लोप होणें हें कार्य तुगागमकार्याच्या मानानें अन्तरङ्ग ठरतें. म्हणून जरी तें कार्य पूर्व सूत्रानें पावलें आहे तरी अन्तरङ्गत्वामुळें प्रथम होतें व अशा रीतीनें जरी तुगागम कार्य होण्यापूर्वी क्विप् प्रत्ययाचा लोप होतो तरी, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या सूत्रान्वयें तो लुप्त क्विप्-प्रत्यय कायमच आहे अशी बुद्धि करतां येत असल्यामुळें, 'जग' या ह्रस्वान्त अङ्गाला तुगागम होऊन 'जगत्' असें इष्ट रूप सिद्ध होतें. परंतु 'शोभनाः दृषदः यस्य सः सुदृषद् प्रासादः' या स्थलीं 'सु + दृषद् + जस् + सु' यांतील 'जस् = अस्' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें लुक् केल्यावर तो

'जस् = अस्' प्रत्यय कायमच आहे असें, पूर्वी सांगितलेल्या कारणा-मुळें, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या सूत्रान्वयें मानतां येत नाहीं. तसें मानल्यास, असन्त अङ्ग आहे असें मानावें लागेल व त्यामुळें 'अत्वसन्तस्य चाधातोः' सू. ४२५ या सूत्रानें उपधा दीर्घ होण्याची आपत्ति येईल व 'सुदृषद्' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. हें खरें कीं, पूर्वी सांगितल्याप्रमाणें 'यचि भम्' सू. २३१ या सूत्रांत 'यचि' हें प्रत्ययाचें विशेषण असल्यामुळें यजादित्व हा धर्म अप्रधान ठरतो. तरी पण यजादित्वाला मानून भसंज्ञा करणें हा अल्विधि ठरत असल्यामुळें व 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें जशी णिलोपाचे ठिकाणीं तो प्रत्यय कायमच आहे अशी स्थानिवद्भावानें वुद्धि करतां येत नाहीं त्याचप्रमाणें 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हें सूत्र वर सांगितल्याप्रमाणें अल्विध्यर्थक नसल्यामुळें, त्या सूत्रान्वयें देखील णिप्रत्यय कायमच आहे अशी वुद्धि करतां येत नाहीं व त्यामुळें 'वृक्षव्' या अङ्गाला भसंज्ञा होऊं शकत नाहीं असा शब्दरत्न-कारांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) 'अचः परस्मिन्' सू. ५० या सूत्रानें णिलोपाचे ठिकाणीं तो णिप्रत्यय कायमच आहे अशी स्थानिव-द्भावानें वुद्धि करतां येते व त्यामुळें 'वृक्षव्' या अङ्गाला भसंज्ञा सहज होऊं शकते असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें वरोवर नाहीं; कारण णिलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव केल्यास टिलोपाचे ठिकाणीं देखील त्याचप्रमाणें स्थानिवद्भाव होण्याची आपत्ति येईल व टिलोप स्थानिवत् मानला तर, 'वृक्षव्' या वकारान्त अङ्गाला भसंज्ञा होणें दुर्लभ–अशक्य–असल्यामुळें, त्या वकारान्त अङ्गाला (पूर्वी प्राप्त झालेल्या पदसंज्ञेचा वाध न होतां) पूर्वी झालेली पदसंज्ञा निवृत्त होऊं शकत नाहीं, म्हणजे ती पदसंज्ञा जशीची तशीच कायम राहते. दुसरें असें कीं, 'प्रकल्प्य चापवादविषयं तत उत्सर्गोऽभिनिविशते'– परि. ६४–, म्हणजे अपवादाच्या कक्षेंत येणारीं उदाहरणें वगळून वाकींच्या उदाहरणांतच सामान्य शास्त्र प्रवृत्त होतें, असा न्याय

असल्यामुळें, जो निषेधाचा विषय आहे त्याचे ठिकाणी निषेधक शास्त्राची प्रवृत्ति बंद करण्याकरिता स्थानिवद्भावाची प्रवृत्ति करता येत नाही. ('वृक्षवा+अम्+णिच्+विच्+सु' या स्थली 'वृक्षवा' यातील 'आ' या टिचा लोप, 'अम्' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक्, णिचा, विच्चा, व 'सु' प्रत्ययाचा लोप होऊन 'वृक्षव् करोति' अशी स्थिति होते हे पूर्वी सांगितलेंच आहे. 'अम्' या अन्तर्वर्ति-विभक्तिप्रत्ययामुळे 'वृक्षवा' याला व त्याच्या एकदेशविकृत शब्द-स्वरूपाला—'वृक्षव्' याला—प्राप्त झालेल्या पदसंज्ञेचा बाध करून 'वृक्षव्' याला भसंज्ञा प्राप्त करून देण्याकरितां जर शंकाकार 'अचः परस्मिन्' या सूत्राने णिलोपाचे ठिकाणी स्थानिवद्भाव करतो तर त्याने टिलोपाचे ठिकाणी देखील तसाच स्थानिवद्भाव केला पाहिजे. ज्या 'टि'च्या अव्यवहितपूर्व 'वृक्षव्' हे शब्दस्वरूप आहे त्या 'टि'चे ठिकाणी स्थानिवद्भाव न करिता, ज्या 'णि'च्या व्यवहित-पूर्व 'वृक्षव्' हा शब्द आहे त्या 'णि'चेच ठिकाणी स्थानिवद्भाव करणे हे अयोग्य आहे. हे खरे की, व्यवहितपूर्वाला देखील कार्य करतेवेळी 'अचः परस्मिन्' या अल्विध्यर्थक सूत्रानें अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव करता येतो. पण पदसंज्ञेचा बाध करण्या-करिता पर णिलोपाचे ठिकाणी स्थानिवद्भाव करणे व पूर्व टिलोपाचे ठिकाणी स्थानिवद्भाव न करणे अशा प्रकारचा भेद करण्यास काहीच प्रमाण नाही. जर 'अचः परस्मिन्' या सूत्राने अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव करणे असेल तर तो टिलोप व णिलोप या दोहोचे ठिकाणी सारख्याच प्राप्त असल्यामुळे, त्या दोहोंचेहि ठिकाणी स्थानिवद्भाव करणे योग्य आहे. तसे केल्यास, 'वृक्षवा' यालाच भसंज्ञा प्राप्त होते व 'वृक्षव्' याला ती संज्ञा प्राप्त होऊ शकत नाही व त्या एकदेशविकृत शब्दस्वरूपाला पूर्वी प्राप्त झालेल्या पदसंज्ञेचा बाध न होता त्याची ती पदसंज्ञा जशीची तशीच कायम राहते. म्हणून पदान्ती असणाऱ्या वर्णाचा लोप करणे हा देखील शंकाकाराच्या मते

पदान्तविधि ठरत असल्यामुळें व ‘न पदान्त’ हा निषेध असल्यामुळें, ‘व्’ लोप करतेवेळीं णिलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं व त्यामुळें शंकाकाराच्या पक्षांत ‘वृक्षव्’ यांतील अन्त्य वकाराचा लोप होण्याची आपत्ति येते हें उघड आहे. ती आपत्ति टाळण्याकरितां शंकाकार ‘वृक्षव्’ याला भसंज्ञा प्राप्त करून देण्याची जी खटपट करतो ती व्यर्थ आहे; कारण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, ‘न पदान्त’ हें ‘अचः परस्मिन्’ याचें निषेधक सूत्र आहे, म्हणजे ‘अचः परस्मिन्’ या सामान्यशास्त्रानें जी पूर्वविधि करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं सर्वत्र स्थानिवद्भावाची प्राप्ति होत होती ती पदान्तविधि व द्विर्वचन इत्यादि विधि करतेवेळीं न व्हावी याकरितांच तें निषेधक सूत्र पाणिनीनें मुद्दाम केलें आहे, व ‘वृक्षव्’ याला पदसंज्ञा प्राप्त झाली असल्यामुळें, पदान्तविधि करतेवेळीं त्या निषेधक सूत्राच्या कक्षेंत येणाऱ्या त्या शब्दाला ‘अचः परस्मिन्’ हें सामान्यशास्त्र मुळींच लागू पडत नाही; कारण ‘प्रकल्प्य चापवादविषयं तत उत्सर्गोऽभिनिविशते’ म्हणजे जो अपवादाचा किंवा निषेधाचा विषय आहे त्याला अपवादक किंवा निषेधक शास्त्रच लागू पडतें व त्याचें ठिकाणीं सामान्यशास्त्राची मुळींच प्रवृत्ति करतां येत नाहीं, असा नियम असल्यामुळें, पदान्तविधि करतेवेळीं निषेधक शास्त्राच्या कक्षेंत येणाऱ्या ‘वृक्षव् करोति’ या उदाहरणांत ‘अचः परस्मिन्’ या सामान्यशास्त्राची प्रवृत्ति करून णिलोपाचे ठिकाणीं तो ‘णि’ कायमच आहे अशी स्थानिवद्भावानें वृद्धि करतां येत नाहीं, व त्यामुळें ‘वृक्षव्’ याला ‘यचि भम्’ या सूत्रानें प्राप्त होणारी भसंज्ञा न होतां त्याला पूर्वी प्राप्त झालेली पदसंज्ञा कायम राहते आणि म्हणून पदान्तीं असलेल्या वर्णाचा लोप करणें हा पदान्तविधि ठरतो असें मानल्यास, ‘वृक्षव्’ यांतील अन्त्य वकाराचा ‘लोपो व्योर्वलि’ या सूत्रानें लोप होण्याची आपत्ति येते असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे तें योग्य ठरतें असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. दीक्षि-

तांच्या मतें ती आपत्ति कशी टळते हें पूर्वी सांगितलेंच आहे.) 'सुबन्तात् णिच् इति हरदत्तादिमतेऽन्तर्वर्तिसुपा पदत्वात्' या मनोरमेच्या पंक्तींत 'हरदत्तादिमते' हें पद घातलें असल्यामुळें, दीक्षित त्या मतासंबंधानें आपली अरुचि प्रदर्शित करतात, म्हणजे तें मत त्यांना मान्य नाहीं हें ते सुचवितात. त्याचें कारण हें कीं, 'सुबन्तात् णिच्' हा जो पक्ष हरदत्तादिकांनीं सांगितला आहे तो सूत्रकार पाणिनीस किंवा वार्तिककारास किंवा भाष्यकारास मान्य नसून त्यांच्या मतें (सुबन्ताहून णिच् न होतां) प्रातिपदिकाहूनच णिच् होत असल्यामुळें, प्रातिपदिकाहून णिच् प्रत्यय केल्यानें त्याला पदत्व येत नाहीं, म्हणजे त्याला पदसंज्ञा होऊं शकत नाहीं. ('प्रातिपदिकात् धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च' या पाणिनीय गणसूत्रांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं 'तत्करोति तदाचष्टे' इत्यादि अर्थामध्यें होणारा णिच् प्रत्यय प्रातिपदिकाहूनच होत असतो. त्यामुळें 'सुबन्तात् णिच्' हें म्हणणें पाणिनीय गणसूत्राविरुद्ध जातें आणि म्हणून तें म्हणणें बरोबर मानतां येत नाहीं. त्यामुळें 'तत्करोति तदाचष्टे' या अर्थामध्यें ज्या 'वृक्षवा' शब्दाहून णिच् प्रत्यय झाला आहे तो प्रातिपदिक असल्यामुळें त्याला पदसंज्ञा होऊं शकत नाहीं आणि अशा रीतीनें 'वृक्षव्' हा शब्द पद ठरत नसल्यामुळें, त्याला पदान्तविधीचें प्रत्युदाहरण मानतां येत नाहीं. 'वृक्षव्' यांतील वकार पदाच्या अन्तीं नसून प्रातिपदिकाच्या अन्तीं असल्यामुळें, 'न पदान्त' हा निषेध त्याला लागू पडत नाहीं व 'अचः परस्मिन्' या सूत्रान्वयें 'आ' या टिचा लोप व णिलोप व या दोहोंचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होतो आणि अशा रीतीनें 'वृक्षव्' यांतील अन्त्य वकाराच्या व 'करोति' यांतील ककार या वल्च्या मध्यें 'आ' व 'णि = इ' यांचें व्यवधान होतें असें मानावें लागत असल्यामुळें, वकारलोपाची वास्तविक प्राप्तीच होत नाहीं.) 'पदान्तविधौ' या शब्दाचा 'पदस्य चरमावयवे कर्तव्ये' असा अर्थ केल्याचें फल हें आहे कीं, 'एपो यन् हसति' इत्यादि स्थलीं

यणादेश स्थानिवत् होत असल्यामुळें, 'एतत्तदोः सुलोपः' सू. १७६ या सूत्रानें होणारा 'सु' प्रत्ययाचा लोप होत नाहीं. 'इण् = इ' या धातूहून 'शतृ = अत्' प्रत्यय केला असतां 'यन्' असें (पुल्लिङ्गाचें प्रथमेच्या एकवचनाचें) रूप होतें. परंतु उत्व करतेवेळीं, 'न पदान्त' हा निषेध असल्यामुळें, यणादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होऊं शकत नाहीं. (ई + शतृ = इ + अत्' या स्थलीं 'इ' या धातूपुढें 'अत्' हा अजादि प्रत्यय असल्यामुळें 'इणो यण्' सू. २४५५ या सूत्रानें 'इ' चे जागीं यकारादेश होऊन 'य्+अत्=यत्' असें शतृप्रत्ययान्त रूप होतें व त्याच्या पुल्लिङ्गाचें प्रथमेच्या एकवचनाचें 'यन्' हें रूप आहे. 'एष + सु + यन्' या स्थलीं 'इ' चे जागीं झालेला यकारादेश इकारच आहे अशी 'अचः परस्मिन्' या सूत्रान्वयें स्थानिवद्भावानें वुद्धि केल्यानें 'सु' प्रत्ययापुढें यकार हा हल् नसून इकार हा अच् आहे असें मानावें लागत असल्यामुळें, 'एतत्तदोः' या सूत्रानें होणारा 'सु' प्रत्ययाचा लोप होत नाहीं. येथें चरमावयवरूप कार्य करणें नसून लोपरूप कार्य करणें असल्यामुळें, म्हणजे 'एपस्' या पदाच्या अन्तीं असणाऱ्या सकाराचा लोप करणें असल्यामुळें, 'न पदान्त' हा स्थानिवद्भावाचा निषेध या स्थलीं लागू पडत नाहीं व स्थानिवद्भाव केल्यानें 'सु' प्रत्ययाचा लोप होण्याची आपत्ति टळते. पण त्या 'सु' प्रत्ययाचे 'ससजुषो रुः' सू. १६२ या सूत्रानें रुत्व करून 'एपरु + यन्' अशी स्थिति झाली असतां, 'रु' चे जागीं 'हशि च' सू. १६६ या सूत्रान्वयें उकारादेश करणें हें पदचरमावयवरूप कार्य असल्यामुळें, 'न पदान्त' या निषेधान्वयें 'इ' चे जागीं झालेल्या यकारादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं, म्हणजे तो 'इ' च आहे असें मानतां येत नाहीं, आणि अशा रीतीनें 'रु' च्या पुढें यकार हा हश् येत असल्यामुळें, 'हशि च' या सूत्रानें त्याचें उत्व होऊन व 'आद्गुणः' सू. ६९ या सूत्रानें 'एप' यांतील अन्त्य अकार व त्यापुढील 'रु' चे जागीं झालेला उकार या दोहोंचे जागीं 'ओ'

असा गुणरूप एकादेश होऊन 'एपो यन्' हा इष्ट प्रयोग सिद्ध होतो. साराश पदान्ती असणाऱ्या वर्णाचा लोप करतेवेळी अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होतो व पदचरमावयव विधि करतेवेळी तसा स्थानिवद्भाव होऊं शकत नाही हे दोन्ही सिद्धान्त 'एपो यन् हसति' या उदाहरणावरून स्पष्ट होतात.)

शब्दरत्न---कानि सन्तीति। वाक्यसंस्कारपक्ष एतत्। तत्र पक्षे पूर्वोपस्थितनिमित्तकत्वरूपान्तरङ्गत्वमादायान्तरङ्गाणां पूर्वं प्रवृत्तेरिकारादेः स्थानिभूतादचः पूर्वत्वं द्रष्टव्यम्। एतन्मूलकमेव वाक्यसंस्कारपक्षे श्रुतवर्णक्रमेणैव लक्ष्यसंस्कार इति वदन्ति। न स्थानिवदिति। तेन आतो लोपो नेति भावः। न च पूर्वमल्लोपस्ततो वलि लोप इति क्रमसत्त्वादकारेणार्द्धधातुकत्वाद्यलाभात्कथमतिदेशेन तल्लाभः, सम्भावनामात्रेणापि तल्लाभस्य वरेग्रहणेन ज्ञापनात्। अस्ति चात्रापि 'यदि पूर्वं यल्लोपः स्यात्तदाऽकारेण प्रत्ययत्वं लब्धं स्यात्, इति सम्भावना। फलं तु यातिरित्यादिसिद्धिरिति दिक्। वित्तजिति। "वित्तच्क्तौ च संज्ञायाम्" इत्यनेन। क्तिन् तु न, "अ प्रत्ययात्" इत्यनेन बाधात्। न स्थानिवदिति। स्थानिवत्त्वे हि स्वराप्रवृत्तिरेव स्यात्। अकारस्य तु न, स्वविधौ स्थानिवत्त्व-निषेधात्। लित्वं तु कारक इत्यादौ सावकाशमिति भावः।

'कानि सन्ति, कौ स्तः' हीं पदान्तविधीची वाक्यसंस्कारपक्षातील उदाहरणे आहेत. या वाक्यसंस्कारपक्षांत 'पूर्वोपस्थितनिमित्तक-मन्तरङ्गम्' या न्यायाचा आश्रय करून अन्तरङ्गकार्य प्रथम केल्यावर 'अस्' धातूतील ज्या अकाराचा लोप झाला आहे त्या लोपाचा स्थानी अकार विद्यमान असताना त्याच्यापूर्वी 'कानि' यातील अन्त्य इकार व 'कौ' यातील अन्त्य औकार होते, आणि म्हणून ते इकार व औकार 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्ट' होते हे स्पष्ट आहे. 'पूर्वोपस्थितनिमित्तकमन्तरङ्गम्' या न्यायाला धरूनच वाक्यसंस्कार-पक्षात वाक्यातील वर्ण ज्या क्रमानें ऐकू येतात त्याच क्रमानें

पूर्व पूर्व वर्णाचे ठिकाणीं प्रथम संस्कार होत असून नंतर उत्तरोत्तर वर्णाचे ठिकाणीं संस्कार होत असतात असें वैयाकरणांचें म्हणणें आहे. ('कानि सन्ति' या लौकिक वाक्याचें 'किम् + जस् + अस् + झि' असें अलौकिक प्रक्रियावाक्य होतें. या वाक्यांत 'जस् = अस्'रूप निमित्त प्रथम उपस्थित असल्यामुळें त्या निमित्तामुळें होणारीं कार्यें अन्तरङ्ग ठरून प्रथम होतात व 'किमः कः' सू. ३४२ या सूत्रानें 'किम्'चे जागीं 'क' असा आदेश होऊन व 'जश्शसोः शिः' सू. ३१२ या सूत्रानें 'जस्' चे जागीं 'शि = इ' असा आदेश होऊन व 'शि' हें 'शि सर्वनामस्थानम्' सू. ३१३ या सूत्रान्वयें सर्वनामस्थान असल्यामुळें, 'नपुंसकस्य झलचः' सू. ३१४ या सूत्रानें 'क' या अङ्गाला नुमागम होऊन आणि 'सर्वनामस्थाने चासम्वुद्धौ' सू. २५० या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन 'कानि' असें रूप सिद्ध झाल्यावरच परोपस्थित 'झि' प्रत्ययरूप निमित्तामुळें होणारीं कार्यें करतां येतात, म्हणजे झिप्रत्ययांतील झकाराचे जागीं 'झोऽन्तः' सू. २१६९ या सूत्रान्वयें 'अन्त्' असा आदेश करून व 'श्नसोरल्लोपः' सू. २४६९ या सूत्रानें 'अस्' धातूंतील अकाराचा लोप करून 'सन्ति' असें रूप नंतर सिद्ध होतें. या परोपस्थित निमित्तामुळें होणारीं कार्यें करण्यापूर्वी 'कानि' या पूर्वी सिद्ध झालेल्या रूपांतील अन्त्य इकारापुढें 'अस्' धातूंतील अकार होता व जेव्हां 'झि' या परोपस्थित प्रत्ययाच्या निमित्तानें कार्यें करून 'सन्ति' असें रूप सिद्ध केलें तेव्हां जरी अकाराचा लोप झाला तरी, 'सन्ति' हें रूप तयार करण्यापूर्वी अकारापूर्वी इकार विद्यमान होता म्हणून, त्या इकाराचे जागीं 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें यणादेश करतेवेळीं तो इकार 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्ट' होता हें स्पष्ट होतें. म्हणून 'अचः परस्मिन् पूर्वविधौ' सू. ५० या सूत्रानें अलोपाचे ठिकाणीं, त्याच्या पूर्वी असलेल्या इकाराचे जागीं यणादेश करतेवेळीं, स्थानिवद्भावाची प्राप्ति होते. परंतु 'कानि' या पदाच्या अन्तीं यणादेशरूप चरमावयव कार्य करणें

अमल्यामुळे, 'न पदान्त' हा निषेध येथे लागू पडतो आणि त्यामुळें अलोपाचे ठिकाणी तो अकार विद्यमानच आहे अशी स्थानिवद्भावानें वृद्धि करता येत नाही व त्यामुळे 'कानि' यातील इकाराचे जागी यणादेश होण्याची आपत्ति टळते व 'कानि सन्ति' असा इष्ट प्रयोग सिद्ध होतो. 'कौ स्त.' या लौकिक वाक्याचे 'किम्+औ+अस्+तस्' असे अलौकिक प्रक्रियावाक्य होते या वाक्यात 'औ' हे प्रत्ययरूप निमित्त प्रथम उपस्थित असल्यामुळे त्या निमित्तानें होणारी कार्यें प्रथम होतात, म्हणजे 'किम क' या सूत्राने 'किम्' चे जागी 'क' असा आदेश होऊन व 'वृद्धिरेचि' सू. ७२ या सूत्राने वृद्धिरूप एकादेश होऊन 'कौ' असे रूप सिद्ध होते. ते रूप सिद्ध झाल्यावर 'तस्' या परोपस्थित प्रत्ययाच्या निमित्तानें होणारी कार्यें मागून होतात, म्हणजे 'श्नसोरल्लोप' या सूत्रानें 'अस्' धातूतील अकाराचा लोप होऊन 'स्त.' असे रूप नतर सिद्ध होते. हे रूप सिद्ध करण्यापूर्वी 'कौ' या पूर्वी सिद्ध झालेल्या रूपातील अन्त्य औकारापुढे 'अस्' धातूतील अकार विद्यमान होता. म्हणून 'एचोऽयवायाव' सू ६१ या सूत्रानें 'औ' चे जागी आवादेश करतेवेळी तो 'औ' अलोपाचा स्थानी जो अकार त्याच्यापूर्वी विद्यमान होता म्हणून, त्याला 'स्थानिभूतादच पूर्वत्वेन दृष्ट' होता असे म्हणता येते व त्यामुळे त्याच्या पूर्वी असणाऱ्या 'औ' चे जागी 'आव्' असा आदेश करतेवेळी 'अच परस्मिन्' या सूत्रान्वये अलोपाचे ठिकाणी स्थानिवद्भावाची प्राप्ति होते. पण आवादेश करणे हे पदचरमावयवरूप कार्य असल्यामुळे, 'न पदान्त' या निषेधान्वये स्थानिवद्भाव होत नाही व आवादेश होण्याची आपत्ति टळून 'कौ स्त.' असा इष्ट प्रयोग सिद्ध होतो मनोरमेत व शब्दरत्नात जी पदान्तविधीची उदाहरणे व प्रत्युदाहरणे दिली आहेत ती वाक्यसस्कारपक्षाचीच उदाहरणे आहेत परतु पदान्तविधीची पदसस्कारपक्षाची देखील उदाहरणे व प्रत्युदाहरणे देता येतात व तशी उदाहरणे टीकाकारानी

दिलीं आहेत. त्यांपैकीं 'प्रतीचः' व 'गिरिव्रामः' हीं दोन उदाहरणें आपण येथें घेऊं. 'प्रतीचः' हें पदान्तविधीचें उदाहरण असून 'गिरिव्रामः' हें प्रत्युदाहरण आहे. 'प्रति+अञ्च्+क्विन्+शस्' या स्थलीं 'ऋत्विग्दधृक्' सू. ३७३ या सूत्रानें 'क्विन्' प्रत्यय झाला आहे व हा प्रत्यय कित् असल्यामुळें 'अनिदितां हल उपधायाः' सू. ४१५ या सूत्रानें 'अञ्च्=अन्च्' या धातूंतील नकाराचा लोप होऊन व 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें 'क्विन्=व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन 'प्रति+अच्+अस्' अशी स्थिति झाली असतां, 'अचः' सू. ४१६ या सूत्रानें 'अच्' यांतील अकाराचा लोप होऊन 'प्रति+च्+अस्' अशी स्थिति होते. अशा स्थितींत 'प्रति' यांतील अन्त्य इकाराला 'चौ' सू. ४१७ या सूत्रानें दीर्घकार्य पावलें आहे. 'प्रति' हें समासांतील पूर्व पद आहे व लुप्त अकाराचे ठिकाणीं स्थानिवद्भाव केल्यास या पदाच्या अन्त्य अवयवाचे, म्हणजे इकाराचे, ठिकाणीं पदचरमावयवरूप यण्कार्याची प्राप्ति होते. पण 'न पदान्त' हा निषेध असल्यामुळें, 'अच्' यांतील जो अकाराचा लोप झाला आहे त्या लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नाहीं व यणादेश होण्याची आपत्ति टळून व दीर्घकार्य होऊन 'प्रतीचः' असें इष्ट रूप सिद्ध होतें. आतां आपण 'गिरिव्रामः' हें पदान्तविधीचें प्रत्युदाहरण घेऊं. 'गिरिं वातीति गिरिवाः' अशी 'गिरिवा' या शब्दाची व्युत्पत्ति आहे. 'गिरिवा' या प्रातिपदिकाहून 'तत्करोति तदाचष्टे' या अर्थामध्यें 'णिच्' केल्यास व त्या णिजन्ता-हून 'विच्' प्रत्यय केल्यास, 'गिरिवा+णिच्+विच्' या स्थितींत 'टेः' सू. १७८६ या सूत्रानें 'गिरिवा' यांतील 'टि' चा, म्हणजे अन्त्य आकाराचा, लोप होऊन व 'णेरनिटि' सू. २३१३ या सूत्रानें णिलोप होऊन व 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें 'विच्=व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन 'गिरिव्' असें रूप होतें. 'गिरिवः रामः गिरिव्रामः' या षष्ठीसमासांत 'गिरिव्+ङस्+राम+सु+सु'

या स्थितींत 'सुपो धातुप्रातिपदिकयो:' सू. ६५० या सूत्रानें 'ङस्' व 'सु' या अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययांचा लुक् होऊन 'गिरिव्राम:' असें रूप सिद्ध होतें. या स्थलीं जरी 'ङस्' प्रत्ययाचा लुक् झाला आहे तरी 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम् सू. २६२ या सूत्रानें 'गिरिव्' यास प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञा होते व या पदाच्या अन्तीं वकार असून त्यापुढें 'राम:' यांतील रकार हा 'वल्' आला असल्यामुळें, 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें वकारलोपाची प्राप्ति होते. पण येथें चरमावयवविधि करणें नसून पदाच्या अन्तीं असलेल्या वकाराचा लोप करणें असल्यामुळें, 'न पदान्त' हा निषेध या स्थलीं लागू पडत नाहीं आणि त्यामुळें 'अच: परस्मिन्' या सूत्रान्वयें णिलोपाचे व आलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत असल्यामुळें व अशा रीतीनें 'व्' आणि 'र्' या दोहोंमध्यें 'आ' व 'इ' यांचें व्यवधान आहे असें मानावें लागत असल्यामुळें, वकारलोपाची आपत्ति टळते व 'गिरिव्राम:' असें इष्ट रूप सिद्ध होतें.) 'आलोपे कर्तव्ये न स्थानिवत्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, ('याया + यङ + वरच्' अशा स्थितींत वरच् प्रत्ययाच्या निमित्तामुळें 'अतो लोप:' सू. २३०८ या सूत्रानें 'यङ = य' यांतील अन्त्य अकाराचा जो लोप झाला आहे त्याचे ठिकाणीं, 'याया' यांतील अन्त्य आकाराचा लोप कर्तव्य असतां, 'न पदान्त' हा निषेध असल्यामुळें, स्थानिवद्वुद्धि करतां येत नाहीं, म्हणजे यङ = य यांतील अकार विद्यमान आहे असें मानतां येत नाहीं, कारण 'न पदान्त' या निषेधक सूत्रांत असें स्पष्ट सांगितलें आहे कीं, वरच्-प्रत्ययनिमित्तक अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं, आणि म्हणून 'आतो लोप:' सू. २३७२ या सूत्रानें होणारा) आकाराचा लोप होत नाहीं. ('यङ = य' यांतील अकाराचा जो लोप झाला आहे त्याचे ठिकाणीं स्थानिवद्वुद्धि करतां आली असती तर, 'याया' यापुढें अजादि आर्धधातुक ङित्प्रत्यय आहे असें मानावें

लागलें असतें व त्यामुळें 'याया' यांतील अन्त्य आकाराचा लोप होण्याची आपत्ति आली असती व 'यायावर:' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकलें नसतें. पण वरच्प्रत्ययनिमित्तक अजादेशाचे ठिकाणीं 'न पदान्त' या निषेधान्वयें स्थानिवद्भाव करतां येत नसल्यामुळें, 'याया' यांतील अन्त्य आकाराचा लोप होण्याची आपत्ति टळते व 'यायावर:' असें इष्ट रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाही. आतां येथें शंकाकार अशी शंका करतो कीं, 'याया + यङ + वरच्' या स्थलीं) 'अतो लोप:' या सूत्रानें 'यङ = य' या प्रत्ययांतील अन्त्य अकाराचा लोप प्रथम झाल्यावरच अवशिष्ट (राहिलेल्या यकारापुढें 'वरच्' यांतील वकार हा वल् येत असल्यामुळें 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें त्या) यकाराचा लोप होण्याची नंतर प्राप्ति होते व अशा तऱ्हेनें कार्य होण्याचा क्रम असल्यामुळें, अकारलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव केला तरी अकाराचे ठिकाणीं आर्धधातुकत्वादि धर्म येऊं शकत नसल्यामुळें, 'अच: परस्मिन्' या अतिदेशान्वयें अजादेशाचे ठिकाणीं ते आर्धधातुकत्वादि धर्म कसे प्राप्त होऊं शकणार? (शंकाकाराचें असें म्हणणें आहे कीं, वरच् प्रत्यय पुढें असल्यामुळें 'यङ = य' या प्रत्ययांतील अन्त्य अकाराचा लोप होऊन जेव्हां त्या प्रत्ययांतील यकार अवशिष्ट राहतो तेव्हां त्या प्रत्ययांत असलेले प्रत्ययत्व, आर्धधातुकत्व इत्यादि धर्म 'योऽवशिष्यते स लुप्यमानार्थाभिधायी' या न्यायान्वयें त्या अवशिष्ट यकाराचे ठिकाणीं येतात व पूर्वलुप्त अकाराचे ठिकाणीं ते धर्म राहत नाहींत. यकार हा अच् नसल्यामुळें 'अच: परस्मिन्' या सूत्रान्वयें यकारलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्बुद्धि करतांच येत नाहीं. तशी बुद्धि केवळ अकारलोपाचे ठिकाणींच 'अच: परस्मिन्' या सूत्रान्वयें करतां येते. पण अकारलोपाचे ठिकाणीं जरी स्थानिवद्बुद्धि केली व अकार हा विद्यमान आहे असें मानलें तरी, यकारलोप होण्यापूर्वी लुप्त होणाऱ्या अकाराचे ठिकाणीं प्रत्ययत्व, आर्धधातुकत्व

इत्यादि धर्माचा अभाव होत असल्यामुळे, अजादि आर्धधातुक प्रत्यय पुढे आहे असे मानता येत नाही व त्यामुळे 'याया' यातील अन्त्य आकाराच्या लोपाची प्राप्तीच होत नाही. या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की,) 'न पदान्त' या सूत्रात 'वरच्' प्रत्ययाचे मुद्दाम ग्रहण केले असल्यामुळें त्यावरून हे ज्ञापित होते की, जेथें केवळ संभावना आहे तेथें देखील प्रत्ययातील ज्या वर्णाचा–अकाराचा–प्रथम लोप झाला आहे त्या लुप्त वर्णाचे ठिकाणी प्रत्ययाचे धर्म येतात. प्रकृत स्थली अशी संभावना–कल्पना–करता येते की, जर 'यङ' प्रत्ययातील यकाराचा लोप प्रथम झाला असता तर अवशिष्ट राहिलेल्या अकाराचे ठिकाणी प्रत्ययत्व, आर्धधातुकत्व इत्यादि धर्म प्राप्त होऊ शकले असते. अशी संभावना मानण्याचे फल हे आहे की, 'याति' इत्यादि रूपाची सिद्धि होऊ शकते. (शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, जेथे, वर सांगितल्याप्रमाणे, संभावना करता येते तेथे प्रत्ययातील ज्या वर्णाचा प्रथम लोप झाला आहे त्या वर्णाचे ठिकाणी देखील, पूर्ण प्रत्ययाचा लोप झाला असता, प्रत्ययाचे सर्व धर्म येतात आणि म्हणूनच 'यङ = य' प्रत्ययातील अकाराचा लोप जरी पूर्वी झाला आहे तरी, यकारलोप नंतर झाला असता संपूर्ण 'यङ' प्रत्ययाचा जेव्हा लोप होतो तेव्हा, त्या अकारलोपाचे ठिकाणी स्थानिवद्बुद्धि केल्यास, तो अजादि आर्धधातुकप्रत्यय आहे असे मानता येते. अशी संभावना न मानली तर, 'वरच्प्रत्ययनिमित्तकोऽजादेश. न स्थानिवत्' असे जे प्रकृत निषेधक सूत्रात सांगितले आहे ते व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते व 'याति' हे इष्ट रूप देखील सिद्ध होणे शक्य नाही. 'याया + यङ + वितच्' या स्थली देखील 'वितच्' हा आर्धधातुक प्रत्यय पुढे आला असल्यामुळें, 'अतो लोप.' सू. २३०८ या सूत्रानें 'यङ = य' या प्रत्ययातील अकाराचा लोप प्रथम होतो व यकार अवशिष्ट राहतो. या अवशिष्ट यकाराचे ठिकाणीच आर्धधातुकत्वादि धर्म प्राप्त

होतात व पूर्वी लुप्त झालेल्या अकाराचे ठिकाणीं ते धर्म प्राप्त होत नाहींत असें मानल्यास, 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें यकाराचा लोप होऊन संपूर्ण 'यङ' प्रत्यय नाहींसा झाल्यावर, 'आतो लोपः' सू. २३७२ या सूत्रानें होणारा 'याया' यांतील अन्त्य आकाराचा लोप होऊं शकणार नाहीं व 'यातिः' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. तें रूप सिद्ध होण्याकरितां हें मानणें आवश्यक आहे कीं, जरी 'यङ' प्रत्ययांतील अकाराचा लोप प्रथम झाला आहे तरी त्याचे ठिकाणीं आर्धधातुकत्वादि धर्म येऊं शकतात; कारण यकाराचा लोप झाल्यानंतर जर 'यङ' प्रत्ययांतील अकाराचा लोप झाला असता तर त्याचे ठिकाणीं आर्धधातुकत्वादि धर्म येण्याची संभावना–शक्यता–होती व या संभवाचा आश्रय करून अकाराचे ठिकाणीं आर्धधातुकत्वादि धर्म येतात असें मानणें आवश्यक आहे. तशा संभावनेचा आश्रय केल्यानेंच 'याया' यांतील अन्त्य आकाराचा लोप होऊं शकतो व 'यातिः' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकतें. सारांश अशी संभावना मानण्याचें फल हें आहे कीं, 'यातिः' या रूपाची सिद्धि होते. म्हणून तशा संभावनेचा–संभावाचा–आश्रय करणें आवश्यक आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'यातिः' या स्थलीं 'क्तिच्क्तौ च संज्ञायाम्' सू. ३३१३ या सूत्रानें 'क्तिच् = ति' प्रत्यय झाला आहे. 'स्त्रियां क्तिन्' सू. ३२७२ या सूत्राचें 'अ प्रत्ययात्' सू. ३२७९ हें बाधक सूत्र असल्यामुळें, 'यातिः' या स्थलीं 'क्तिन्' प्रत्यय होऊं शकत नाहीं. ('स्त्रियां क्तिन्' हें पूर्वसूत्र सामान्यशास्त्र असून 'अ प्रत्ययात्' हें उत्तरसूत्र त्याचें बाधक आहे व या सूत्रावरील काशिकेंत 'क्तिनोऽपवादः' असें स्पष्ट म्हटलें आहे. या सूत्राचा 'प्रत्ययान्तेभ्यो धातुभ्यः स्त्रियामकारः प्रत्ययो भवति' असा अर्थ आहे. प्रकृत स्थलीं 'या' हा धातु यङप्रत्ययान्त असल्यामुळें, त्याहून स्त्रीवाचक क्तिन्प्रत्यय होणें शक्य नाहीं आणि म्हणूनच या स्थलीं 'क्तिच्क्तौ च संज्ञायाम्' या उत्तरसूत्रानें क्तिच्प्रत्यय झाला

आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे असे शब्दरत्न-काराचे म्हणणे आहे ) 'चिकीर्षक ' या स्थली (ण्वुल् हा आर्धधातुक प्रत्यय पुढे असल्यामुळे 'सन् = स' या प्रत्ययातील अन्त्य अकाराचा जो लोप झाला आहे त्या लोपाचे ठिकाणी तो अकार विद्यमानच आहे अशी) स्थानिवद्भावाने वृद्धि केल्यास, स्वराची प्रवृत्तीच होणार नाही, म्हणजे 'चिकीर्षक ' यातील ककारापुढील ईकारास जो उदात्त स्वर होणे इष्ट आहे तो होऊ शकणार नाही. लुप्त अकाराचे ठिकाणी उदात्त स्वर करता येत नाही, कारण ज्याचा लोप झाला आहे त्याचे ठिकाणी काही कार्य करणे असल्यास, स्थानिवद्भाव होऊ शकत नाही. ('अच. परस्मिन् पूर्वविधौ' या सूत्रावरूनच हे स्पष्ट होते. त्या सूत्रातील 'पूर्वविधौ' या पदाचा 'पूर्वस्य विधौ' किंवा 'पूर्वस्मात् विधौ' असा विग्रह केला तरी, ज्या अचाचा लोप झाला आहे त्याच्या पूर्वी किंवा पुढें असणाऱ्या वर्णास काही कार्य कर्तव्य असताच, अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव करता येतो असा त्या सूत्राचा अर्थ निष्पन्न होतो. म्हणून ज्या अचाचा लोप झाला आहे त्याचेच ठिकाणी स्वरविधि कर्तव्य असता स्थानिवद्भाव होऊ शकत नाही हे स्पष्ट होते. लुप्त अकाराचे ठिकाणी उदात्त स्वर केल्यास, तो अकार लुप्त झाला असल्यामुळे उदात्त स्वराचे श्रवण होऊ शकणार नाही हे उघड आहे सारांश स्वरविधि करतेवेळी लुप्त अकाराचे ठिकाणी तो अकार विद्यमान आहे असे 'अच. परस्मिन्' या सूत्रान्वये स्थानि-वद्भावाने मानता येत नसल्यामुळें व 'स्वरविधौ व्यञ्जनमविद्य-मानवत्'–परि ८०–ही परिभाषा असल्यामुळें आणि तसेच पूर्वी सांगितल्याप्रमाणे 'पूर्वविधौ' यातील 'पूर्व' या शब्दाचा व्यवहितपूर्व असा देखील अर्थ होत असल्यामुळें, लुप्त अकारापूर्वी असणाऱ्या ककारापुढील ईकारास उदात्त स्वर होऊन 'चिकीर्षक ' असे इष्ट-उदात्तस्वरयुक्त रूप सिद्ध होते.) 'कारक ' इत्यादि स्थली लित्व सावकाश आहे. (शंकाकाराची अशी शंका आहे की, स्थानिवद्भावाचा

निषेध केल्याशिवाय 'चिकीर्षकः' इत्यादि स्थलीं 'लिति' सू. ३६७६ हें सूत्र मुळींच प्रवृत्त होऊं शकत नसल्यामुळें, त्या सूत्रारंभाच्या सामर्थ्यानेंच हें ज्ञापित होतें कीं, स्वरविधि करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नाहीं आणि म्हणून 'न पदान्त' या सूत्रांत स्वरविधि करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होऊं नये असा जो निषेध सांगितला आहे तो सांगण्याची कांहीं गरज नव्हती. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, स्वरविधि करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं याचें 'लिति' हें सूत्र ज्ञापक ठरत नाहीं; कारण तें सूत्र जेथें स्थानिवद्भावाची प्राप्ति नाहीं अशा स्थलीं देखील चरितार्थ ठरतें. उदाहरणार्थ 'ण्वुल्तृचौ' सू. २८९५ या सूत्रानें 'कृ' धातूहून 'ण्वुल् = वु' हा आर्धधातुक प्रत्यय केला असतां, तो प्रत्यय णित् असल्यामुळें 'अचो ञ्णिति' सू. २५४ या सूत्रानें 'कृ' यांतील अन्त्य ऋकाराची वृद्धि होऊन व 'युवोरनाकौ' सू. १२४७ या सूत्रानें 'ण्वुल् = वु' चे जागीं 'अक' असा आदेश होऊन 'कार् + अक = कारक' असें रूप होतें व या रूपांतील आद्य ककारापुढील आकार हा 'ण्वुल् = अक' या लित्-प्रत्ययापूर्वी असल्यामुळें, 'लिति' या सूत्रानें त्या आकारास उदात्तस्वर होतो. हें खरें कीं, वरील उदाहरणांत 'ण्वुल् = अक' या लित्प्रत्यया-पूर्वी 'र्' हें व्यंजन आहे; पण 'हल्स्वरप्राप्तौ व्यञ्जनमविद्यमानवत्'—प. ८१—ही परिभाषा असल्यामुळें, 'र्' ला उदात्त स्वर न होतां, तो विद्यमानच नाहीं असें मानून त्याच्या मागें जो 'आ' हा अच् आहे त्याला उदात्त स्वर होतो. 'कारकः' या उदाहरणांत 'ण्वुल् = वु' या व्यंजनाचे जागीं 'अक' असा आदेश झाला असल्यामुळें व तो आदेश अचाचे ठिकाणीं झाला नसल्यामुळें, येथें 'अचः परस्मिन् पूर्वविधौ' या सूत्राची प्राप्तीच नाहीं व त्यामुळें स्थानिवद्भाव-निषेधाची प्राप्ति नाहीं हें उघड आहे. सारांश 'कारकः' इत्यादि उदाहरणांत स्थानिवद्भावनिषेधाचा आश्रय न करितां 'लिति' हें

सूत्र चरितार्थ झाले असल्यामुळें, स्थानिवद्भावाचा निषेध केल्याशिवाय ते सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाही हे म्हणणे अयोग्य ठरतें आणि म्हणून 'लिति' हे सूत्र स्थानिवद्भावनिषेधाचें ज्ञापक ठरत नसल्यामुळे, प्रकृत सूत्रात जे स्वरविधीचें ग्रहण केले आहे ते व्यर्थ ठरत नाही. प्रकृत सूत्रावरील भाष्यात १.१.५८ 'प्रतिषेधे स्वरदीर्घयलोपेषु लोपाजादेशो न स्थानिवत्' हे वार्तिक पठित करून भाष्यकार म्हणतात– 'प्रतिषेधे स्वरदीर्घयलोपविधिषु लोपाजादेशो न स्थानिवद्भवतीति वक्तव्यम् । स्वर । आकर्षिकः चिकीर्षकः जिहीर्षकः । यो ह्यन्य आदेशः स्थानिवदेवासौ भवति । पञ्चारत्न्यः दशारत्न्यः ।' या भाष्याचा भावार्थ असा आहे की, स्थानिवद्भावाचा निषेध सांगणाऱ्या प्रकृत सूत्रात स्वर, दीर्घ आणि यलोप ही कार्ये करिताना अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होत नाही असे जे म्हटले आहे त्याचा अर्थ असा समजावा की, जर 'लोपरूप अजादेश असेल तरच स्थानिवद्भावाचा निषेध होतो. ज्या ठिकाणी लोपरूप आदेश झाला नसून भावरूप आदेश झाला असेल तेथे स्वरकार्य करतेवेळी आदेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होतोच. उदाहरणार्थ 'पञ्चारत्नि, दशारत्नि, या स्थली द्विगुसमास करून सिद्ध झालेल्या रूपाहून 'जस्' हा प्रथमेच्या बहुवचनाचा प्रत्यय केला असता जरी 'जसि च' सू. २४१ या सूत्रानें अन्त्य इकाला गुणाची प्राप्ति होते तरी, 'जसादिषु छन्दसि वा वचनम्'–सू. ३५८६ वरील वार्तिक–या वार्तिकाने वैदिक प्रयोगात गुणाचा विकल्प सांगितला असल्यामुळें, गुण न होता अन्त्य इकाराचे जागी 'इको यणचि' या सूत्रानें यणादेश होऊन 'पञ्चारत्नि + जस् = पञ्चारत्नि + अस् = पञ्चारत्न्यः' असे वैदिक रूप सिद्ध होतें. या स्थली 'इ' या अचाचे जागी भावरूप यकारादेश झाला असल्यामुळें त्या आदेशाचे ठिकाणी 'अचः परस्मिन्' या सूत्रान्वयें स्थानिवद्भाव होतो आणि त्यामुळें समासातील उत्तरपद इगन्त आहे असे मानतां येत असल्यामुळें, 'इगन्तकालकपाल' सू. ३७६३ या

सूत्रानें पूर्व पदाला प्रकृतिस्वर होतो. सारांश वरील भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, जेथें अचाचे ठिकाणीं भावरूप आदेश झाला असेल तेथें स्वरविधि करतेवेळीं स्थानिवद्भावाचा निषेध होत नाहीं. 'कारकः' या उदाहरणांत अचाचे ठिकाणीं लोपरूप आदेश झाला नसल्यामुळें स्थानिवद्भावनिषेधाची प्राप्तीच होत नाहीं व या स्थलीं 'लिति' हें सूत्र सावकाश व चरितार्थ ठरत असल्यामुळें शंकाकारानें जी शंका वर उपस्थित केली आहे ती अयोग्य ठरते असा शब्दरत्न-कारांच्या म्हणण्याचा आशय आहे. दुसरें असें कीं, प्रकृत सूत्रावरील भाष्यांत 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचीं अनेक प्रयोजनें सांगतेवेळीं भाष्यकार म्हणतात–'द्विर्वचनादीनि च न पठितव्यानि भवन्ति । पूर्वत्रासिद्धेनैव सिद्धानि भवन्ति । किमविशेषेण ? । नेत्याह । वरेयलोपस्वरवर्जम् । वरेयलोपं स्वरं च वर्जयित्वा ।' या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, स्वरविधि करतेवेळीं अजादेशाचें ठिकाणीं स्थानिवद्भावाचा जो प्रकृत सूत्रांत निषेध केला आहे तो करणें आवश्यक होतें. शंकाकाराचें म्हणणें या भाष्याच्या विरुद्ध असल्यामुळें देखील, तें वरोबर मानतां येत नाहीं.)

शब्दरत्न––शिण्ढीति । नन्वत्रानुस्वारस्यादिष्टादचः पूर्वत्वेन स्थानिवत्त्वाप्रवृत्तिः । नचास्मादेव ज्ञापकात्तस्याशास्त्रीयत्वेऽपि स्थानिवत्त्वेन तत्त्वम्, फलाभावात्, तद्घटितसन्निवेशापेक्षस्य ततः पूर्वत्वस्यातिदेशसहस्रेणाप्यतिदेष्टुमशक्यत्वाच्च, "भोभगो" इति सूत्रस्थभाष्यरीत्या तस्य स्थानिभूताल्वृत्तिधर्मत्वेन "अनल्विधौ" इति निषेधाच्च, विशेषणतया ऽलाश्रयणाच्च । भाष्ये "पूर्वत्रासिद्धे" इत्यवष्टभ्य वरे–यलोप–स्वर–भिन्नानां द्विर्वचनादीनां ग्रहणस्यात्र प्रत्याख्यानेन तस्य च णत्वे प्रतिप्रसवेनात्र स्थानिवत्त्वेन परसवर्णाभावस्यैव लाभादिदमुदाहरणं चिन्त्यम् । णत्वग्रहणे च प्रतिप्रसव-वार्तिके लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषा नेत्युपपादयिष्यते । किं च "दीर्घादाचार्याणाम्" इत्युत्तरम् "अनुस्वारस्य ययि" "वा

पदान्तस्य" "तोर्लि" "उदः—स्था" "झयो हो—" "शश्छो ऽटि" इति षट्सूत्रीपाठोत्तरं "झलां जश् झशि" "अभ्यासे चर्च" "खरि च," वाऽवसाने," "अणोऽप्रगृह्यस्य" इति, पञ्चसूत्र्याः पाठ इति भाष्यसंमताष्टाध्यायीपाठपक्षे परसवर्णदृष्ट्या "झलां जश् झशि" इत्यस्य, "झरो झरि" इत्यस्य चासिद्धत्वेन यय्परत्वा-भावात्तदप्राप्तेरिति चेत्, सत्यम्, पादयतेः क्विपि पाद्धसतीत्यादौ "झयो हृ—" इति पूर्वसवर्णे पञ्चमीसमासेन प्राप्तस्थानिवद्भाव-वारणार्थत्वात् हरितशब्दादाचक्षाणण्यन्तात् क्विपि हरिद्धसतीत्यादौ उक्तरीत्या प्राप्तस्य तस्य वारणार्थत्वाच्च, अत्राल्लोपस्यापि तत्प्राप्त्या श्वौ लुप्तमित्यस्य विषय एव न, हरिन्नमतीत्यादौ अनुनासिके तद्व्यावृत्त्यर्थत्वाच्च । "हयवरट्" सूत्रभाष्यरीत्या तत्र सवर्ण-ग्रहणापकर्षेण तस्यापि सवर्णविधित्वादित्यन्यत्र विस्तरः । सूत्रेण स इति । "सग्धिः स्त्री सहभोजनम्" इत्यमरात्सहस्य सादेश इति प्रतीयते । "झलो झलि" इति सिच एव लोप इति पक्षे छान्दसो वर्णलोपो बोध्यः । स्पष्टं चेदं "घि च" इति सूत्रे भाष्ये । लोके तु सग्धिरित्यसाध्वेवेति बोध्यम् ।।

(आतां पूर्वसवर्णविधि व अनुस्वारविधि करतेवेळी अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं याचें दीक्षितांनीं मनोरमेंत 'शिण्ढि' हें जें उदाहरण दिलें आहे त्या उदाहरणासंबंधानें शंकाकार अशी शंका करतो कीं,) अकाराचे जागीं झालेल्या लोपरूप आदेशा-पूर्वी अनुस्वार असल्यामुळें (व तो अनुस्वार अकार हा स्थानी विद्यमान असतांना त्याच्या पूर्वी नसल्यामुळें) 'शिण्ढि' या उदाहर-णात 'अचः परस्मिन्' सू. ५० या सूत्राची प्रवृत्तीच होऊं शकत नाहीं (व त्यामुळे अकारलोपाचे ठिकाणी स्थानिवद्भाव करतांच येत नाहीं.) यावर अशी प्रतिशंका करण्यांत येते की, 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टत्वम्' हा जरी अशास्त्रीय धर्म आहे तरी, 'न पदान्त' या सूत्रांत परसवर्णविधि करतेवेळी स्थानिवद्भावाचा निषेध होणें

सांगितलें असल्यामुळें त्या निषेधरूप सामर्थ्याच्या आधारें त्या अशास्त्रीय धर्माचा नकाराचे जागीं झालेल्या अनुस्वाराचे ठिकाणीं 'स्थानिवदादेशः' सू. ४९ या सूत्रानें अतिदेश करतां येतो व तसा अतिदेश केल्यानें अनुस्वार हा 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टः' आहे असें म्हणतां येतें. पण शंकाकार म्हणतो कीं, हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'स्थानिवदादेशः' या सूत्रानें तशा अशास्त्रीय धर्माचा अतिदेश केल्यानें (व अशा रीतीनें अनुस्वार हा 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्ट' आहे असें स्थानिवद्भावानें मानल्यानें) कोणतेंहि अधिक फल निष्पन्न होत नाहीं. दुसरें असें कीं, 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टम्' हा धर्म स्थानी विद्यमान असतांना त्याच्या पूर्वी असणें अशा पूर्वोत्तरभावरूप स्थितीची अपेक्षा करणारा धर्म असल्यामुळें, जेथें तशी स्थिति नाहीं तेथें हजारदां देखील अतिदेश केल्यानें, तसा धर्म आदेशाचे ठिकाणीं येऊं शकत नाहीं. तिसरें असें कीं, 'भो भगोअघो' ८.३.१७ या सूत्रावरील भाष्यांत जें व्याख्यान केलें आहे त्या व्याख्यानान्वयें 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टत्वम्' हा केवळ स्थानिभूत अलाचे ठिकाणीं राहणारा धर्म असल्यामुळें व 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें, तशा अल्मात्रवृत्ति धर्माचा आदेशाचे ठिकाणीं अतिदेश करतां येत नाहीं. चवथें असें कीं, 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टस्य' यांतील 'अचः = अज्रूपस्य अलः' याचा विशेषणत्वानें—म्हणजे निमित्तरूपानें—आश्रय केला आहे. ('नन्वात्रानुस्वारस्यादिष्टादचः' येथून शंकाग्रंथ सुरू झाला आहे व तो बराच मोठा ग्रंथ असून 'यय्परत्वाभावात्तदप्राप्तेः' येथपर्यंत आहे. या शंकाग्रंथाचे दोन भाग आहेत. प्रथम भाग 'विशेषणतयाऽलाश्रयणाच्च' येथपर्यंत आहे व एवढ्याच भागाचें भाषांतर वर केलें आहे. हा शंकाग्रंथांतील प्रथम भाग नीट ध्यानांत येण्याकरितां 'शिण्ढि' या उदाहरणासंबंधानें दीक्षितांचें काय म्हणणें आहे हें थोडक्यांत येथें पुन्हा सांगणें आवश्यक आहे. 'शिष्' या रुधादिगणांत पठित अस-

लेल्या धातूचें लोटाचें मध्यमपुरुषाचें एकवचन करितांना, 'शिप्' धातूस 'श्नम् = न' हें मित् विकरण लागून 'शि+न+प्+हि' अशी स्थिति झाली असतां, 'हुझल्भ्यो हेर्धिः' सू. २४२५ या सूत्रानें 'हि' चे जागी 'धि' असा आदेश होतो. 'सेर्ह्यपिच्च' सू. २२०१ या सूत्रान्वयें 'हि' हा 'अपित्' असल्यामुळें त्याचे जागीं झालेला 'धि' हा आदेश स्थानिवद्भावानें 'अपित् = ङित्' ठरतो व त्यामुळें 'श्नसोरल्लोपः' सू. २४६९ या सूत्रान्वयें 'न' या विकरणांतील 'अ' चा लोप होतो. अकारलोप झाल्यावर नकारापुढें पकार हा झल् येत असल्यामुळें व अनुस्वारविधि करतेवेळीं अलोपाचे ठिकाणीं, 'न पदान्त' या निषेधक सूत्रान्वयें, स्थानिवद्भाव होऊं शकत नसल्यामुळें, 'नश्चापदान्तस्य झलि' सू. १२३ या सूत्रानें नकाराचे जागीं अनुस्वार होतो. आतां प्रश्न असा उपस्थित होतो कीं, नकाराचे जागीं झालेल्या या अनुस्वाराचा 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' सू. १२४ या सूत्रान्वयें परसवर्ण करतां येतो कीं नाहीं ? 'अ' लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव न मानल्यानेंच, अनुस्वाराचे जागीं परसवर्ण करतां येतो. 'अ' लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव मानल्यास' अनुस्वार व यय्, म्हणजे पकाराचे जागीं 'झलां जश् झशि' सू. ५२ या सूत्रानें झालेला 'ड्' या दोहोंमध्यें अकाराचें व्यवधान होतें असें मानावें लागत असल्यामुळें, अनुस्वाराचा परसवर्ण होऊं शकत नाहीं हें उघड आहे. दीक्षितांनीं या उदाहरणांत 'अचः परस्मिन्' हें सूत्र लागू केलें आहे व त्या सूत्रानें 'अ' लोपाचे ठिकाणीं जी स्थानिवद्भावाची प्राप्ति होते त्या प्राप्तीचें, 'न पदान्त' हें निषेधक सूत्र प्रवृत्त करून, निवारण केलें आहे. शंकाकाराचें असें म्हणणें आहे कीं, प्रकृत उदाहरणांत परसवर्णरूप कार्य कर्तव्य असतां, 'अचः परस्मिन्' हें सूत्र मुळीच लागू पडत नाहीं व त्यामुळें त्या सूत्राचें निषेधक 'न पदान्त' हें सूत्र देखील येथें प्रवृत्त होऊं शकत नाहीं. त्याच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, 'अचः

परस्मिन्' हें सूत्र प्रवृत्त होण्याकरितां, ज्या वर्णाला कार्य करणें आहे तो वर्ण 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्ट' असला पाहिजे. प्रकृत उदाहरणांत स्थानिभूत जो अकार तो विद्यमान असतांना त्याच्यापूर्वी नकार असून अनुस्वार नसल्यामुळें व 'अ' लोप झाल्यावर अनुस्वार प्रादुर्भूत झाला असल्यामुळें, प्रकृत उदाहरण परसवर्णकार्य कर्तव्य असतां 'अचः परस्मिन्' या सूत्राचा विषयच होऊं शकत नाहीं. त्यामुळें येथें अलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भावाची प्राप्तीच होत नाहीं आणि म्हणून अनुस्वाराचे जागीं परसवर्ण होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. म्हणून शंकाकार म्हणतो कीं, परसवर्णविधि करतेवेळीं स्थानिवद्भावाचा निषेध होतो याचें दीक्षितांनीं 'शिण्ढि' हें जें उदाहरण दिलें आहे तें योग्य उदाहरण मानतां येत नाहीं; कारण येथें 'अचः परस्मिन्' या सूत्रान्वयें 'अ' लोपाचे ठिकाणीं स्थानि-वद्भावाची प्राप्ति होत नसल्यामुळें, अनुस्वाराचा आपोआपच परसवर्ण होतो. या शंकाकाराच्या म्हणण्यावर अशी प्रतिशंका करण्यांत येते कीं, 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टत्वम्' हा जो धर्म नकाराचे ठिकाणीं होता त्या धर्माचा, नकाराचे जागीं अनुस्वार झाल्यावर त्या अनुस्वाराचे ठिकाणीं, 'स्थानिवदादेशः' या सूत्रान्वयें, अतिदेश करतां येतो, म्हणजे अनुस्वार देखील 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टः' आहे असें मानतां येते, व असें मानल्यानें 'अचः परस्मिन्' या सूत्राची प्रवृत्ति होऊन 'अ' लोपाचे ठिकाणीं जी स्थानिवद्भावाची प्राप्ति होते त्या प्राप्तीचें निवारण करण्याकरितां 'न पदान्त' हें निषेधक सूत्र प्रवृत्त होऊन परसवर्णविधि करतेवेळी 'अ' लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होऊं शकत नाहीं आणि अशा रीतीनें परसवर्णविधि करतेवेळीं स्थानिवद्भाव होत नाहीं याचें दीक्षितांनीं मनोरमेंत दिलेलें 'शिण्ढि' हें उदाहरण योग्य ठरतें. या प्रतिशंकेवर शंकाकार असें उत्तर देतो कीं, 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टत्वम्' हा शास्त्रीय धर्म नसून अशास्त्रीय धर्म आहे व 'न पदान्त' या निषेधक सूत्रांत

परसवर्णविधीचें ग्रहण केलें असल्यामुळें त्या ग्रहणाच्या सामर्थ्यानें अशा अशास्त्रीय धर्माचा अतिदेश 'स्थानिवदादेशः' या सूत्रानें करतां येतो असें मानलें तरी, तसा अतिदेश केल्यानें कोणतेंहि विशेष फल निष्पन्न होत नाहीं; कारण तसा अतिदेश न करितां देखील, 'अचः परस्मिन्' हें सूत्र येथें प्रवृत्त होत नसल्यामुळें, 'अ' लोपाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होऊं शकत नाहीं व त्यामुळें अनुस्वाराचा परसवर्ण आपोआपच होतो. असें असतां, 'अचः परस्मिन्' या सूत्राची प्रवृत्ति होण्याकरितां, अनुस्वाराचे ठिकाणीं 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टत्वम्' या अशास्त्रीय धर्माचा अतिदेश करणें व असें करून 'अचः परस्मिन्' या सूत्रान्वयें 'अ' लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भावाची प्राप्ति झाल्यावर 'न पदान्त' हें सूत्र प्रवृत्त करून स्थानिवद्भावाचा निषेध करणें, एवढी सर्व खटपट करण्याची गरज काय ? जें आपोआप सिद्ध होतें तें सिद्ध करण्याकरितां एवढा सर्व खटाटोप करण्याची कांहींच गरज नाहीं असें शंकाकाराच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे. आतां हें खरें की, 'न पदान्त' या सूत्रांत परसवर्णविधीचें ग्रहण केलें असल्यामुळें त्या ग्रहणाच्या सामर्थ्यानें प्रकृत स्थलीं अशास्त्रीय धर्माचा अतिदेश करतां येतो असें म्हणतां येऊं शकतें. पण भाष्यकारांनीं जसें परसवर्णग्रहणाचें प्रत्याख्यान केलें आहे तसें केलें म्हणजे, अशास्त्रीय अतिदेश करण्याची गरज राहत नाहीं. येथपर्यन्त शंकाकारानें 'फलाभावात्' हा जो प्रथम हेतु दिला आहे त्याचे विवरण केलें आहे. आतां पुढें शंकाकार आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ 'अतिदेशसहस्त्रेणाप्यतिदेष्टुमशक्यत्वात्' असा दुसरा हेतु देतो. त्याच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टत्वम्' हा धर्म ज्या वर्णाला कार्य करणें आहे तो वर्ण स्थानी विद्यमान असतांना त्याच्या मागें असणें अशा पूर्वोत्तरसन्निवेशाची अपेक्षा बाळगणारा धर्म असल्यामुळें, प्रकृत स्थलीं 'अ' हा स्थानी विद्यमान असतांना ज्या अर्थी त्याच्या मागें अनुस्वार

नसून नकार होता व त्या स्थानीचा लोप झाल्यावर अनुस्वाराची उत्पत्ति झाली त्या अर्थी, त्या अनुस्वाराचे ठिकाणीं कितीहि अतिदेश केले तरी, त्याचे ठिकाणीं 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टत्वम्' हा धर्म कोणत्याहि रीतीनें येऊं शकत नाहीं; कारण 'वचनशतेनाऽपि वस्तुनोऽन्यथाकरणाशक्तेः' हा न्याय असल्यामुळें, कितीहि अतिदेश केले तरी वस्तुस्थिति पालटतां येऊं शकत नाहीं. म्हणून प्रकृत उदाहरणांत 'अ' हा स्थानी विद्यमान असतांना त्याच्या पूर्वी अनुस्वार नसल्यामुळें, त्या उदाहरणास 'अचः परस्मिन्' हें सूत्र मुळींच लागू पडत नाहीं व 'अ' लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होऊंच शकत नाहीं आणि त्यामुळें 'न पदान्त' या निषेधक सूत्राची स्थानिवद्भावाचा निषेध करण्याकरितां प्रवृत्ति करण्याची कांहींच गरज पडत नाहीं व स्थानिवद्भाव होत नसल्यामुळें, अनुस्वाराचा परसवर्ण आपोआपच होतो आणि त्यामुळें देखील परसवर्णविधीचें दीक्षितांनीं मनोरमेंत दिलेलें 'शिण्ढि' हें उदाहरण योग्य ठरत नाहीं. आतां पुढें शंकाकार आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ तिसरा हेतु देतो व तो हेतु हा कीं, 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टत्वम्' हा केवळ अलाचे ठिकाणीं राहणारा धर्म असल्यामुळें तशा अल्मात्रवृत्ति धर्माचा 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें, 'भो भगो' ८·३·१७ या सूत्रावरील भाष्यांत सांगितल्याप्रमाणें नकाराचे जागीं झालेल्या अनुस्वाराचे ठिकाणीं 'स्थानिवदादेशः' या सूत्रान्वयें अतिदेश करतां येत नाहीं. 'भो भगो' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं 'अश्ग्रहणमनर्थकमन्यत्राभावात्' हें वार्तिक पठित करून असें म्हटलें आहे कीं, त्या सूत्रांतील 'अश्' ग्रहण अनर्थक आहे. पण पुढें भाष्यकार म्हणतात कीं, 'अश्' ग्रहण न केल्यास, 'छन्दःसु, पयःसु' इत्यादि स्थलीं 'रोः सुपि' सू. ३३९ या सूत्रान्वयें जो 'रु' या अनल् समुदायाचे जागीं विसर्ग झाला आहे त्याला 'अनल्विधौ' हा प्रतिषेध लागत नसल्यामुळें, तो विसर्ग 'रु'च आहे अशी स्थानिवद्भावानें

वृद्धि केल्यानें त्या विसर्गाचें 'भो भगो' सू. १६७ या सूत्रानें यत्व होण्याची आपत्ति येते. ही आपत्ति टाळण्याकरितां भाष्यकार असें म्हणतात कीं, 'रो रि' या पूर्वसूत्रांतून 'रोः सुपि' या सूत्रांत 'रः' या पदाची अनुवृत्ति करावी व तशी अनुवृत्ति केल्यानें 'रोः रः विसर्जनीयः स्यात् सुपि परे सति' असा 'रोः सुपि' या सूत्राचा अर्थ होत असल्यामुळें विसर्ग हा 'र्' या अल्रूप स्थानीचे जागीं होणारा आदेश ठरतो व 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें 'छन्दःसु, पयःसु' इत्यादि उदाहरणांत विसर्गाचें यत्व होण्याची आपत्ति टळते. त्या भाष्यांत भाष्यकार म्हणतातः–'अश्ग्रहणमनर्थकम् । किं कारणम् ? । अन्यत्राऽभावात् । न ह्यन्यत्र रुरस्त्यन्यदतोऽशः । ननु चायमस्ति–छन्दःसु, पयःस्विति । किं पुनः कारणं सुकारपर एवोदाह्रियते न पुनरयं वृक्षस्तत्र प्लक्षस्तत्रेति ? । अस्त्यत्र विशेषः–विसर्जनीये कृते न भविष्यति । इहापि तर्हि विसर्जनीये कृते न भविष्यति–छन्दःसु पयःस्विति । स्थानिवद्भावात्प्राप्नोति । ननु चेहापि स्थानिवद्भावात्प्राप्नोति–वृक्षस्तत्र प्लक्षस्तत्रेति । अनल्विधौ स्थानिवद्भावः । अथाऽयमल्विधिः स्याच्छक्यमश्ग्रहणमवक्तुम् ? । बाढं शक्यम् । अल्विधिस्तर्हि भविष्यति । कथम् ? । इदमस्ति रो रीति । ततो वक्ष्यामि–खरवसानयोर्विसर्जनीय–रः । ततो रोः सुपि । विसर्जनीयो र इत्येव ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, 'भोभगो' या सूत्रांत जें अश्ग्रहण केलें आहे तें व्यर्थ आहे; कारण अश् पुढें असतानाच 'रु' राहूं शकतो. अश्हून भिन्न–खर्–पुढें असल्यास, 'खरवसानयोर्विसर्जनीयः' सू. ७६ या त्रैपादिक पूर्व सूत्राच्या दृष्टीनें 'भोभगो' हे त्रैपादिक उत्तर सूत्र असिद्ध असल्यामुळें व त्या सूत्रानें होणारें यत्वकार्य पूर्व सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरत असल्यामुळें, यत्व न होतां विसर्गच होऊं शकतो. 'वृक्षस्तत्र, प्लक्षस्तत्र' या उदाहरणांत 'वृक्षस्, प्लक्षस्' यांतील अन्त्य सकाराचे जागीं जरी 'ससजुषो रुः' सू. १६२ या सूत्रानें 'रु' असा आदेश होतो तरी,

'खरवसानयोः' सू. ७६ या सूत्रानें अल्रूप रेफाचे जागीं विसर्ग होत असून 'रु' चे जागीं तो होत नसल्यामुळें, विसर्ग हा रुत्वधर्मविशिष्ट 'रु' आहे असें स्थानिवद्भावानें मानतां येत नाहीं व त्यामुळें 'भोभगो' या सूत्रानें 'रु' चे जागीं जो यकारादेश होणें सांगितलें आहे तो होत नाहीं. परंतु 'छन्दःसु, पयःसु' या उदाहरणांत 'रोः सुपि' सू. ३३१ या सूत्रानें जो विसर्ग होतो तो 'रु' या अनल् समुदायाचे जागीं होत असल्यामुळें, विसर्ग हा 'रु'च आहे असें स्थानिवद्भावानें मानतां येतें; कारण येथें 'अनल्विधौ' हा प्रतिषेध लागू पडत नाहीं. म्हणून या दोन उदाहरणांत विसर्ग हा 'रु'च आहे असें मानल्यास, 'भोभगो' या सूत्रानें त्याचें यत्व होण्याची आपत्ति येते. पण 'रो रि' या पूर्व सूत्रांतून 'रोः सुपि' या उत्तर-सूत्रांत 'रः' या षष्ठ्यन्त पदाची अनुवृत्ति केल्यानें 'रोः रः विसर्जनीयः स्यात् सुपि परे' असा 'रोः सुपि' या सूत्राचा अर्थ होऊन त्या सूत्रानें होणाऱ्या विसर्गाचा देखील रकार हा अल् स्थानी ठरत असल्यामुळें, विसर्ग हा 'रु'च –रुत्वधर्मविशिष्ट– आहे अशी 'अनल्विधौ' या प्रतिषेधान्वयें स्थानिवद्बुद्धि करतां येत नाहीं व त्यामुळें त्या दोन उदाहरणांत देखील विसर्गाचें यत्व होण्याची आपत्ति टळते. या भाष्यावरील उद्योतांत उद्योतकार म्हणतात– 'वृक्षस्तत्रेत्यत्र तु खरवसेति–सू. ७६–रेफस्य विसर्गः । न हि तस्य स्थानिवद्भावेन रुत्वं सुलभम्, स्थानिभूताऽल्धर्मत्वात् । स्थानिभूताल्-धर्माश्रये कार्ये निषेध इति भावः । ...एवञ्च रोः सुपीति सूत्रेऽपि रेफस्यैव स्थानित्वमित्यल्विधित्वात्स्थानिवत्त्वाभाव इति भावः ।' या वरील भाष्यावरून व उद्योतावरून हें स्पष्ट होतें कीं, 'स्थानिव-दादेशः' या सूत्रांत 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें, अल्रूप स्थानीचे ठिकाणीं असणाऱ्या धर्माचा आदेशाचे ठिकाणीं अतिदेश करतां येत नाहीं. म्हणून नकार या अल्रूप स्थानीचे ठिकाणीं 'स्थानिभूतादचः पूर्वत्वेन दृष्टत्वम्' हा जो धर्म होता त्या धर्माचा,

नकाराचे जागी अनुस्वाररूप आदेश झाल्यावर त्या आदेशाचे ठिकाणी, अतिदेश करता येत नाही. म्हणून अनुस्वार हा 'स्थानिभूतादच. पूर्वत्वेन दृष्ट' ठरत नसल्यामुळें, 'शिण्ढि' या उदाहरणात परसवर्ण करते वेळी 'अच. परस्मिन्' हे सूत्र मुळीच प्रवृत्त होऊ शकत नाही व त्यामुळे देखील दीक्षितानी परसवर्णविधि करतेवेळी स्थानिवद्भाव होत नाही याचे 'शिण्ढि' हे जे उदाहरण मनोरमेंत दिले आहे ते योग्य ठरत नाही. आता शकाकार आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ 'विशेपणतया-ऽलाश्रयणाच्च' हा चवथा हेतु देतो. त्याच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, 'स्थानिभूतादच. पूर्वत्वेन दृष्टत्वम्' हा जो धर्म आहे त्याचा 'अच: परस्मिन्' या सूत्रात विशेपणरूपाने–निमित्तरूपाने–आश्रय केला असल्यामुळें, म्हणजे पूर्व वर्णाला कार्य कर्तव्य असता तो वर्ण जर अच्रूप स्थानी विद्यमान असताना त्या स्थानीच्या पूर्वी असेल तरच त्या पूर्व वर्णाला कार्य करता येते अशा प्रकारच्या निमित्त-रूपानें आश्रय केला असल्यामुळें, हा धम अच्रूप अल्निमित्तामुळें होणारा धर्म ठरतो व 'अनल्विधौ' हा प्रनिपेध असल्यामुळें असा अलाश्रयनिमित्तक धम, ज्या वर्णाला कार्य करणे आहे त्या वर्णाचे जागी झालेल्या आदेशाचे ठिकाणी, स्थानिवद्भावाने आणता येऊ शकत नाही. म्हणून अल्रूप अकार हे विशेपणरूप निमित्त पुढे असल्यामुळे नकाराचे ठिकाणी 'स्थानिभूतादच. पूर्वत्वेन दृष्टत्वम्' हा जो धर्म होता त्या अलाश्रयनिमित्तक धर्माचा, अकारलोप झाल्यावर नकाराचे जागी जो अनुस्वार झाला त्या अनुस्वाराचे ठिकाणी, अतिदेश करता येत नाही आणि अशा रीतीने अनुस्वार हा 'स्थानि-भूतादच पूर्वत्वेन दृष्ट' ठरत नसल्यामुळे, त्या अनुस्वाराचा परसवर्ण करतेवेळी 'अच परस्मिन्' हे सूत्र मुळीच लागू पडत नाही व त्यामुळे अकारलोपाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होऊ शकत नसल्यामुळे, म्हणजे अकार हा विद्यमान आहे असे मानता येत नसल्यामुळे, 'अनुस्वारस्य ययि परसवर्ण.' या सूत्राने अनुस्वाराचा आपोआपच

परसवर्ण होऊं शकतो व येथें स्थानिवद्भावाचा निषेध करण्याकरितां 'न पदान्त' हें निषेधक सूत्र प्रवृत्त करण्याची कांहींच गरज पडत नाहीं. म्हणून परसवर्णविधि करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नाहीं याचें दीक्षितांनीं मनोरमेंत दिलेलें 'शिण्ढि' हें उदाहरण अयोग्य ठरतें व तें केवळ अनुस्वारविधीचेंच योग्य उदाहरण ठरतें असें शंकाकाराच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे. येथें शंकाग्रन्थाचा प्रथम भाग संपला. 'शिण्ढि' या उदाहरणांत नकाराचे जागीं झालेल्या अनुस्वाराचा परसवर्ण होऊं शकतो हें गृहीत धरून शंकाकारानें वर सांगितल्याप्रमाणें चार कारणें देऊन दीक्षितांच्या मताचें खण्डन केलें. आतां तो शंकाग्रन्थाच्या द्वितीय भागांत हें सिद्ध करू इच्छितो कीं, 'शिण्ढि' या मनोरमेंत दिलेल्या उदाहरणांत नकाराचे जागीं झालेल्या अनुस्वाराचा परसवर्ण होऊंच शकत नाहीं आणि 'शिंढि' असें अनुस्वारयुक्त रूपच होऊं शकतें.) भाष्यकारांनीं 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्' या वार्तिकाचें अवलंबन करून, म्हणजे असें वार्तिक असणें इष्ट आहे असें मानून व त्याचा स्वीकार करून, 'न पदान्त' या सूत्रांत द्विर्वचनापासून सुरू होणारे जे विधि सांगितले आहेत त्यांपैकीं 'वरे, यलोप' व 'स्वर' हे विधि खेरीज करून इतर विधींचें प्रत्याख्यान केलें आहे. परंतु तें वार्तिक मानल्यास णत्व करतेवेळीं दोष येत असल्यामुळें भाष्यकारांनीं 'तस्य दोषः संयोगादि-लोपलत्वणत्वेषु' असें प्रतिप्रसवात्मक—अपवादाचा अपवाद या स्वरूपाचें—वार्तिक पठित केलें आहे. असें प्रतिप्रसवरूप वार्तिक पठित केलें असल्यामुळें, णत्व करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होतो आणि म्हणून 'शिण्ढि' या उदाहरणांत वास्तविक अनुस्वाराचा परसवर्ण होऊंच शकत नाहीं. त्यामुळें परसवर्णविधीचें 'शिण्ढि' हें जें उदाहरण दीक्षितांनीं मनोरमेंत दिलें आहे तें चिन्त्य आहे, म्हणजे तें आक्षेप घेण्यालायक आहे व तें योग्य उदाहरण ठरत नाहीं. (प्रकृत सूत्रावरील भाष्यांत १·१·५८ भाष्यकारांनीं 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्'—

म्हणजे त्रैपादिक कार्य करणें झाल्यास स्थानिवद्भाव होत नाहीं—हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचीं एकंदर पांच प्रयोजनें सांगितलीं आहेत. त्यांपैकीं पहिल्या चार प्रयोजनांशीं आपणांस येथें कांहीं कर्तव्य नाहीं. 'द्विर्वचनादीनि च वरेयलोपस्वरवर्जम्' हें पांचवें प्रयोजन सांगतांना भाष्यकारांनीं जें व्याख्यान केलें आहे तें पूर्वी दिलेंच आहे. त्या व्याख्यानाचा आशय हा आहे कीं, द्विर्वचन, सवर्ण, अनुस्वार, जश् व चर् हे विधि सांगणारीं सूत्रें त्रैपादिक असल्यामुळें, ते विधि करतेवेळीं, 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्' हें वार्तिक मानल्यानें, स्थानिवद्भाव होऊंच शकत नाहीं. म्हणून प्रकृत सूत्रांत त्या विधीचें ग्रहण करण्याची कांहीच गरज राहत नाहीं. पण पदान्त, वरे, यलोप व स्वर हे चार विधि सापादिक सूत्रांनीं होणारे विधि असल्यामुळें, त्यांना तें वार्तिक लागू पडत नाहीं. त्यामुळें तेवढ्याच चार विधीचें प्रकृत सूत्रांत ग्रहण केल्यानें काम भागूं शकतें. पण 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्' हें वार्तिक मानल्यानें जरी अनेक प्रयोजनें सिद्ध होतात तरी तें वार्तिक मानल्यास, संयोगादिलोप, लत्व व णत्व हे तीन त्रैपादिक विधि करतेवेळी दोष येतो. म्हणून वरील तीन त्रैपादिक कार्यें कर्तव्य असतां, अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव मानणें आवश्यक आहे असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. 'तस्य दोषः संयोगादिलोपलत्वणत्वेषु' हे प्रतिप्रसवरूप वार्तिक पठित करून त्याचें व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात—'तस्यैतस्य लक्षणस्य दोषः संयोगादिलोपलत्वणत्वेषु । संयोगादिलोप । काक्यर्थम् । वास्यर्थम् । स्कोः संयोगाद्योरन्ते च इति लोपः प्राप्नोति । लत्वम् । निगार्यते निगाल्यते । अचि विभाषा इति लत्वं न प्राप्नोति । णत्वम् । माषवपनी, व्रीहिवपनी । प्रातिपदिकान्तस्येति णत्वं प्राप्नोति ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं त्रैपादिक कार्य कर्तव्य असतां अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नाहीं असें मानल्यास, संयोगादिलोप, लत्व व णत्व हीं तीन त्रैपादिक कार्यें करतेवेळीं दोष

येतो. उदाहरणार्थ 'काक्यर्थम्, वास्यर्थम्' या स्थलीं 'काकी, वासी' यांतील अन्त्य ईकारापुढें 'अर्थम्' यांतील अकार हा अच् आल्यामुळें, 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें ईकाराचे जागीं यकारादेश केला असतां, 'क्य्, स्य्' असे जे दोन पदान्त संयोग होतात त्यांतील प्रथम संयोगांत ककार व द्वितीय संयोगांत सकार हा आद्य वर्ण असल्यामुळें 'स्कोः संयोगाद्योरन्ते च' सू. ३८० या सूत्रानें त्यांचा, जर यकारादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव न केला व यकार हा ईकारच आहे असें न मानलें तर, लोप पावतो. पण 'तस्य दोषः' या वार्तिकान्वयें संयोगादिलोपरूप त्रैपादिक कार्य करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत असल्यामुळें व ईकाराचे जागीं झालेला यकार हा ईकारच आहे असें मानावें लागत असल्यामुळें, 'हलोऽनन्तराः संयोगः' सू. ३० या सूत्रानें होणारी संयोगसंज्ञा 'क्य्, स्य्' यांना प्राप्त होत नाहीं; कारण ते 'की, सी' आहेत असें मानावें लागतें व त्यामुळें ककार, सकार यांचा लोप होण्याची आपत्ति टळून 'काक्यर्थम्, वास्यर्थम्' हीं इष्ट रूपें सिद्ध होतात. 'निगाल्यते' हें लत्वाचें उदाहरण आहे. याची प्रक्रिया पूर्वी दिलीच आहे. या उदाहरणांत 'णेरनिटि' सू. २३१३ या सूत्रानें 'णि = इ' चा जो लोप झाला आहे त्या लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव न केल्यास व 'णि = इ' विद्यमान नाहीं असें मानल्यास, 'निगार्' यांतील रकारापुढें अजादि प्रत्यय नसून 'यक्' आहे असें मानावें लागेल व त्यामुळें 'अचि विभाषा' सू. २५४१ या सूत्रानें होणारें वैकल्पिक लत्व होऊं शकणार नाहीं. परंतु 'तस्य दोषः' या वार्तिकान्वयें त्रैपादिक लत्वविधि करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत असल्यामुळें व ज्या 'णि = इ' प्रत्ययाचा लोप झाला आहे तो प्रत्यय कायमच आहे असें मानावें लागत असल्यामुळें आणि अशा रीतीनें 'निगार्' यांतील रकारापुढें 'णि' हा अजादि प्रत्यय आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि करतां येत असल्यामुळें, रकाराचें वैकल्पिक लत्व होऊन 'निगाल्यते'

असें पाक्षिक इष्ट रूप सिद्ध होतें. 'मापवपनी, व्रीहिवपनी' हीं णत्वाचीं उदाहरणें आहेत. 'वप्' धातूहून 'करणाधिकरणयोश्च' सू. ३२९३ या सूत्रानें 'करणे' या अर्थामध्यें ल्युट्प्रत्यय केला असतां, त्या प्रत्ययाचे जागीं 'युवोरनाकौ' सू. १२४७ या सूत्रानें 'अन' असा आदेश होतो व तो प्रत्यय टित् असल्यामुळें 'वपन' या कृदन्त प्रातिपदिकाहून 'टिड्ढाणञ्' सू. ४७० या सूत्रानें ङीप्प्रत्यय झाला असतां 'यस्येति च' सू. ३११ या सूत्रानें 'वपन' यांतील अन्त्य अकाराचा लोप होतो. या ज्या अकाराचा लोप झाला आहे तो अकार कायमच आहे असें स्थानिवद्भावानें न मानल्यास, 'वपन्' असें नकारान्त प्रातिपदिक होईल व त्यामुळें 'प्रातिपदिकान्तनुम्विभक्तिषु च' सू. १०५५ या सूत्रानें त्या नकाराचें णत्व होण्याची आपत्ति येते. पण त्रैपादिक णत्वविधि करतेवेळीं 'तस्य दोपः' या वार्तिकान्वयें अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत असल्यामुळें व अशा रीतीनें 'वपन्' असें नान्त प्रातिपदिक नसून 'वपन' असें अदन्त प्रातिपदिक आहे असें मानावें लागत असल्यामुळें त्या नकाराचें णत्व होण्याची आपत्ति टळते व 'मापवपनी, व्रीहिवपनी' अशीं इष्ट रूपें सिद्ध होतात. सारांश त्रैपादिक णत्वविधि करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होतो असें वरील भाष्यांत स्पष्ट सांगितलें असल्यामुळें, 'शिनप् + हि' या स्थलीं 'श्नसोरल्लोपः' सू. २४६९ या सूत्रानें जो 'न' यांतील अन्त्य अकाराचा लोप झाला आहे त्या अकारलोपाचे ठिकाणी, पूर्वी दिलेल्या प्रक्रियेप्रमाणें नकाराचा अनुस्वार झाल्यावर त्या अनुस्वारापुढें ढकार येत असल्यामुळें 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' सू. १२४ या सूत्रानें त्या अनुस्वाराचें परसवर्णरूप णत्व करतेवेळीं, स्थानिवद्भाव होतो व अशा रीतीनें नकार व ढकार या दोहोंमध्यें अकाराचें व्यवधान आहे असें मानावें लागत असल्यामुळें, अनुस्वाराचा परसवर्ण णकार होऊंच शकत नाहीं व त्यामुळें अनुस्वार जसाचा तसाच कायम राहून 'शिंढि' असेंच अनुस्वारयुक्त रूप

सिद्ध होतें, 'शिण्ढि' असें रूप मुळींच सिद्ध होऊं शकत नाहीं. म्हणून 'शिण्ढि' असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत परसवर्णविधीचें उदाहरण दिलें आहे तें चूक ठरतें असा शंकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. या शंकेवर अशी प्रतिशंका करण्यांत येते कीं, 'तस्य दोषः' या वार्तिकांत जें णत्वविधीचें ग्रहण केलें आहे तें प्रतिपदोक्त णत्वविधीचें—म्हणजे 'रषाभ्यां नो णः' सू. २३५ इत्यादि सूत्रांनीं जेथें नकाराचें साक्षात् णत्व होणें सांगितलें आहे तशाच प्रतिपदोक्त णत्वविधीचें—ग्रहण केलें असून, 'ष्टुना ष्टुः' सू. ११३, 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' सू. १२४ इत्यादि सूत्रांनीं ष्टुत्व व परसवर्णकार्य करतेवेळीं जेथें नकाराचा णकार किंवा अनुस्वाराचा णकार क्वचित् स्थलीं होतो तशा लाक्षणिक णत्वविधीचें ग्रहण केलें नाहीं. 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' हें वास्तविक परसवर्णविधीचें सूत्र आहे. अनुस्वारापुढें टवर्गातील वर्ण आला असतां जरी अनुस्वाराचा परसवर्ण करतेवेळीं त्या सूत्रान्वयें त्याचें णत्व पावतें तरी तो प्रतिपदोक्त परसवर्णविधि असून केवळ लाक्षणिक णत्वविधि आहे व 'लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम्'—परि. ११४—ही परिभाषा असल्यामुळें, 'तस्य दोषः' या वार्तिकांत निर्दिष्ट असलेल्या णत्वविधीनें प्रतिपदोक्त णत्वविधीचेंच ग्रहण होऊं शकतें व 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' या परसवर्णविधायक सूत्रानें होणाऱ्या लाक्षणिक णत्वाचें ग्रहण होऊं शकत नाहीं. म्हणून 'शिण्ढि' या उदाहरणात अनुस्वाराचें परसवर्णरूप लाक्षणिक णत्व करतेवेळीं 'तस्य दोषः' हें वार्तिक मुळींच लागू पडत नाहीं व 'अचः परस्मिन्' या सूत्रानें अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भावाची प्राप्ति होते. परंतु परसवर्णविधि करतेवेळीं 'न पदान्त' या निषेधक सूत्रानें स्थानिवद्भावाचा निषेध होणें सांगितलें असल्यामुळें, अनुस्वाराचा णकाररूप परसवर्ण करतेवेळीं अकारलोपाचे ठिकाणीं तो अकार विद्यमानच आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि करतां येत नाहीं. त्यामुळें अनुस्वाराचे जागीं

असे पाक्षिक इष्ट रूप सिद्ध होते. 'मापवपनी, व्रीहिवपनी' ही णत्वाची उदाहरणे आहेत. 'वप्' धातूहून 'करणाधिकरणयोश्च' सू. ३२९३ या सूत्राने 'करणे' या अर्थामध्ये ल्युट्प्रत्यय केला असता, त्या प्रत्ययाचे जागी 'युवोरनाकौ' सू. १२४७ या सूत्राने 'अन' असा आदेश होतो व तो प्रत्यय टित् असल्यामुळे 'वपन' या कृदन्त प्रातिपदिकाहून 'टिड्ढाणञ्' सू. ४७० या सूत्राने ङीप्प्रत्यय झाला असता 'यस्येति च' सू. ३११ या सूत्राने 'वपन' यातील अन्त्य अकाराचा लोप होतो. या ज्या अकाराचा लोप झाला आहे तो अकार कायमच आहे असे स्थानिवद्भावाने न मानल्यास, 'वपन्' असे नकारान्त प्रातिपदिक होईल व त्यामुळे 'प्रातिपदिकान्तनुम्विभक्तिषु च' सू. १०५५ या सूत्राने त्या नकाराचे णत्व होण्याची आपत्ति येते. पण त्रैपादिक णत्वविधि करतेवेळी 'तस्य दोष' या वार्तिकान्वये अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होत असल्यामुळे व अशा रीतीने 'वपन्' असे नान्त प्रातिपदिक नसून 'वपन' असे अदन्त प्रातिपदिक आहे असे मानावे लागत असल्यामुळे त्या नकाराचे णत्व होण्याची आपत्ति टळते व 'मापवपनी, व्रीहिवपनी' अशी इष्ट रूपे सिद्ध होतात. साराश त्रैपादिक णत्वविधि करतेवेळी अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होतो असे वरील भाष्यात स्पष्ट सांगितले असल्यामुळें, 'शिनष् + हि' या स्थली 'श्नसोरल्लोपः' सू. २४६९ या सूत्राने जो 'न' यातील अन्त्य अकाराचा लोप झाला आहे त्या अकारलोपाचे ठिकाणी, पूर्वी दिलेल्या प्रक्रियेप्रमाणे नकाराचा अनुस्वार झाल्यावर त्या अनुस्वारापुढे ढकार येत असल्यामुळे 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' सू. १२४ या सूत्राने त्या अनुस्वाराचे परसवर्णरूप णत्व करतेवेळी, स्थानिवद्भाव होतो व अशा रीतीने नकार व ढकार या दोहोमध्यें अकाराचें व्यवधान आहे असे मानावे लागत असल्यामुळें, अनुस्वाराचा परसवर्ण णकार होऊच शकत नाही व त्यामुळें अनुस्वार जसाचा तसाच कायम राहून 'शिंढि' असेच अनुस्वारयुक्त रूप

सिद्ध होतें, 'शिण्ढि' असें रूप मुळींच सिद्ध होऊं शकत नाहीं. म्हणून 'शिण्ढि' असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत परसवर्णविधीचें उदाहरण दिलें आहे तें चूक ठरतें असा शंकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. या शंकेवर अशी प्रतिशंका करण्यांत येते कीं, 'तस्य दोषः' या वार्तिकांत जें णत्वविधीचें ग्रहण केलें आहे तें प्रतिपदोक्त णत्वविधीचें–म्हणजे 'रषाभ्यां नो णः' सू. २३५ इत्यादि सूत्रांनीं जेथें नकाराचें साक्षात् णत्व होणें सांगितलें आहे तशाच प्रतिपदोक्त णत्वविधीचें–ग्रहण केलें असून, 'ष्टुना ष्टुः' सू. ११३, 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' सू. १२४ इत्यादि सूत्रांनीं ष्टुत्व व परसवर्णकार्य करतेवेळीं जेथें नकाराचा णकार किंवा अनुस्वाराचा णकार क्वचित् स्थलीं होतो तशा लाक्षणिक णत्वविधीचें ग्रहण केलें नाहीं. 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' हें वास्तविक परसवर्णविधीचें सूत्र आहे. अनुस्वारापुढें टवर्गांतील वर्ण आला असतां जरी अनुस्वाराचा परसवर्ण करतेवेळीं त्या सूत्रान्वयें त्याचें णत्व पावतें तरी तो प्रतिपदोक्त परसवर्णविधि असून केवळ लाक्षणिक णत्वविधि आहे व 'लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम्'–परि. ११४–ही परिभाषा असल्यामुळें, 'तस्य दोषः' या वार्तिकांत निर्दिष्ट असलेल्या णत्वविधीनें प्रतिपदोक्त णत्वविधीचेंच ग्रहण होऊं शकतें व 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' या परसवर्णविधायक सूत्रानें होणाऱ्या लाक्षणिक णत्वाचें ग्रहण होऊं शकत नाहीं. म्हणून 'शिण्ढि' या उदाहरणांत अनुस्वाराचें परसवर्णरूप लाक्षणिक णत्व करतेवेळीं 'तस्य दोषः' हें वार्तिक मुळींच लागू पडत नाहीं व 'अचः परस्मिन्' या सूत्रानें अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भावाची प्राप्ति होते. परंतु परसवर्णविधि करतेवेळीं 'न पदान्त' या निषेधक सूत्रानें स्थानिवद्भावाचा निषेध होणें सांगितलें असल्यामुळें, अनुस्वाराचा णकाररूप परसवर्ण करतेवेळीं अकारलोपाचे ठिकाणीं तो अकार विद्यमानच आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि करतां येत नाहीं. त्यामुळें अनुस्वाराचे जागीं

परसवर्ण णकार होऊन 'शिण्ढि' असें रूप सिद्ध होतें व दीक्षितांनीं तें जें परसवर्णविधीचें उदाहरण दिलें आहे तें योग्य ठरतें. या प्रतिशंकेवर शंकाकार असें उत्तर देतो कीं) 'तस्य दोषः' या प्रतिप्रसवरूप वार्तिकांत जें णत्वविधीचें ग्रहण केलें आहे त्याला लक्षणप्रतिपदोक्त परिभाषा–परि. ११४–मुळींच लागू पडत नाहीं याचें उपपादन पुढें –'अष्टाभ्य औश्' या सूत्रावरील मनोरमेंत–करण्यांत येणार आहे. ('अपदान्तस्य मूर्द्धन्यः' ८·३·५५ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं असा प्रश्न केला आहे कीं, या सूत्रांत 'षः' या पदाचें ग्रहण न करितां 'मूर्द्धन्यः' या पदाचें ग्रहण कां केलें आहे ? या प्रश्नाचें उत्तर देतांना भाष्यकार असें म्हणतात कीं, 'अवश्यं मूर्द्धन्यग्रहणं कर्तव्यम्–इहार्थमुत्तरार्थं च ।…उत्तरार्थम्–रषाभ्यां नो णः समानपद इत्यत्र णग्रहणं न कर्तव्यं भवति । तत्रायमप्यर्थः पदान्तस्य नेति प्रतिषेधो न वक्तव्यो भवति । अपदान्ताभिसम्बद्धं मूर्द्धन्यग्रहणमनुवर्तते ।' या भाष्याचा आशय हा आहे कीं, 'अपदान्तस्य मूर्द्धन्यः' या सूत्रांत 'मूर्द्धन्यः' या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें 'रषाभ्यां नो णः' सू. २३५ या सूत्रांत 'णः' या पदाचें ग्रहण करण्याची व तसेंच 'पदान्तस्य' सू. १९८ हें निषेधक सूत्र असण्याची कांहीं गरज राहत नाहीं; कारण 'अपदान्तस्य मूर्द्धन्यः' या सूत्राची 'रषाभ्यां नः' या उत्तरसूत्रांत अनुवृत्ति करतां येते. या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, भाष्यकारांनीं 'रषाभ्यां नो णः' या सूत्रांतील 'णः' या पदाचें प्रत्याख्यान करून त्या सूत्रांत 'मूर्द्धन्यः' या पदाची अनुवृत्ति केली आहे. या भाष्याचा आधार घेऊनच शंकाकार असें म्हणतो कीं, भाष्यकारांनीं 'रषाभ्यां नो णः' या सूत्रांतील 'णः' या पदाचें प्रत्याख्यान करून 'मूर्द्धन्यः' या पदाची त्या सूत्रांत अनुवृत्ति केली असल्यामुळें, प्रतिपदोक्त णत्वप्रकरण मुळींच राहत नसून सर्व एकच मूर्द्धन्यप्रकरण होतें. म्हणून 'रषाभ्यां नो णः' या सूत्रानें व तसेंच 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' या सूत्रानें णत्व कर्तव्य असतां मूर्द्धन्य

आदेशच होणें सांगितलें आहे असें भाष्यकाररीत्या मानावें लागत असल्यामुळें, 'रषाभ्यां नो णः' या सूत्रानें होणारें णत्व प्रतिपदोक्त आहे व 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' सू. १२४ या सूत्रानें होणारें परसवर्णरूप णत्व लाक्षणिक आहे असें मुळींच मानतां येत नाहीं—म्हणजे दोन्ही सूत्रांनीं होणारें णत्व मूर्द्धन्यप्रकरणान्तर्गत ठरत असल्यामुळें,एक णत्व प्रतिपदोक्त व दुसरें णत्व लाक्षणिक असा त्यांच्यांत भेद करतां येत नाहीं. म्हणून 'तस्य दोषः' या वार्तिकांत निर्दिष्ट असलेलें णत्व लक्षण-प्रतिपदोक्तपरिभाषेचा विषयच होऊं शकत नाहीं. त्यामुळें 'शिण्ढि' या स्थलीं अनुस्वाराचें परसवर्णरूप णत्व करतेवेळीं 'तस्य दोषः' या वार्तिकान्वयें अकारलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत असल्यामुळें व अनुस्वार आणि 'यय्' ढकार या दोहोंमध्यें अकार विद्यमान आहे असें मानावें लागत असल्यामुळें, अनुस्वाराचें परसवर्णरूप णत्व होऊंच शकत नाहीं व 'शिंढि' असेंच अनुस्वारयुक्त रूप सिद्ध होऊं शकतें असा शंकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. येथें हें सांगणें आवश्यक आहे कीं, 'अष्टाभ्य औश्' सू. ३७२ या सूत्रावरील मनोरमेंत दीक्षितांनीं देखील स्पष्ट म्हटलें आहे कीं, 'ष्टुना ष्टुः' सू. ११३ या सूत्रानें होणारें ष्टुत्वरूप णत्व लाक्षणिक आहे व 'रषाभ्यां नो णः' या सूत्रानें होणारें णत्व प्रतिपदोक्त आहे असें मुळींच मानतां येत नाहीं व 'तस्य दोषः' या वार्तिकांत निर्दिष्ट असलेल्या णत्वानें दोन्ही सूत्रांनीं होणाऱ्या णत्वाचें ग्रहण होतें व त्या दोन्ही सूत्रांनीं णत्व करतेवेळीं 'तस्य दोषः' या वार्तिकान्वयें अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होतो. त्या मनोरमेंत दीक्षित म्हणतात—एवञ्च प्रियाष्ट्ण इति हरदत्तोदाहृतं ष्टुत्वं न सम्भवति । न च पूर्वत्रासिद्धीये न स्थानिवदिति निषेधः । तस्य दोष इति सापवादत्वात् । ननु रषाभ्यामिति प्रतिपदोक्तं णत्वं तत्र ग्रहीष्यामः । न तु ष्टुत्वविधिलभ्यमिति चेत् । मैवम् । भाष्यमते तदयोगात् । तथा हि । रषाभ्यामिति सूत्रे अपदान्तस्य मूर्द्धन्यः इति सूत्रमनुवर्त्य

णग्रहणं पदान्तस्य इति निषेधसूत्रं च भाष्ये प्रत्याख्यातम् । न च मूर्द्धन्यशब्देन ष्टुशब्देन वा निर्वर्त्यमाने णकारे वैषम्यं सुवचम् । यथोत्तरं मुनीनां प्रामाण्यमिति स्थानिवद्भाव एवोचितः ।' हें जें दीक्षितांनीं 'ष्टुना ष्टुः' या सूत्रानें होणाऱ्या ष्टुत्वरूप णत्वासंबंधानें म्हटलें आहे तें 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' या सूत्रानें होणाऱ्या परसवर्ण-रूप णत्वास देखील सारखेंच लागूं पडतें. म्हणून या दीक्षितमतान्वयें देखील अनुस्वाराचें परसवर्णरूप णत्व करतेवेळीं 'तस्य दोषः' या वार्तिकान्वयें अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होतोच व त्यामुळें 'शिण्ढि' या उदाहरणांत अनुस्वाराचें णत्व होऊं शकत नाही हें स्पष्ट होतें.) दुसरें असें कीं, अष्टाध्यायीच्या अखेरच्या पादांत 'दीर्घादाचार्याणाम्' हें जें सूत्र पठित आहे त्या सूत्राच्या लगेंच नंतर भाष्यकारांनीं 'अनुस्वारस्य ययि, वा पदान्तस्य, तोर्लि, उदः-स्था, झयो हो, शश्छोऽटि' हीं सहा सूत्रें पठित करून त्यांच्यानंतर 'झलां जश् झशि, अभ्यासे चर्च, खरि च, वाऽवसाने, अणोऽप्रगृह्यस्य' ही पांच सूत्रें पठित केलीं आहेत (आणि अशा रीतीनें अष्टाध्यायींतील सूत्रपाठक्रमांत फरक केला आहे.) या भाष्यसंमत अष्टाध्यायीपाठान्वयें, म्हणजे हा पाठ मानल्यास, या पक्षात 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' या सूत्राच्या दृष्टीनें 'झलां जश् झशि' व 'झरो झरि' हीं दोन्ही सूत्रें असिद्ध ठरत असल्यामुळें, 'शिण्ढि' या उदाहरणांत अनुस्वारापुढें यय्प्रत्याहारान्तर्गत वर्ण येतो असें मानतां येत नाहीं व त्यामुळें या उदाहरणांत अनुस्वाराचा परसवर्ण होण्याची प्राप्तीच होत नाहीं. (अष्टाध्यायीच्या अष्टमाध्यायांतील चवथ्या पादांत ''दीर्घादाचार्याणाम्' या सूत्रानतर 'झलां जश् झशि, अभ्यासे चर्च, खरि च, वाऽवसाने, अणोऽप्रगृह्यस्य, अनुस्वारस्य ययि, वा पदान्तस्य, तोर्लि, उदःस्था, झयो हो, शश्छोऽटि' या क्रमानें पाणिनीनें सूत्रें पठित केलीं आहेत. या पाणिनीयपाठक्रमान्वयें 'झलां जश् झशि' हें सूत्र 'अनुस्वारस्य ययि' या सूत्राच्या मानानें पूर्व सूत्र ठरत असल्यामुळें,

अनुस्वाराचा परसवर्ण करतेवेळीं 'झलां जश् झशि' या पूर्व सूत्रानें झालेलें जश्त्व सिद्ध ठरतें. परंतु वर सांगितल्याप्रमाणें या पाणिनीय-पाठक्रमांत भाष्यकारांनीं जो फरक केला आहे त्या योगानें 'अनु-स्वारस्य ययि' हें सूत्र 'झलां जश् झशि' या सूत्राच्या मानानें त्रैपादिक पूर्व सूत्र ठरतें व त्यामुळें अनुस्वाराचा परसवर्ण करतेवेळीं 'झलां जश् झशि' या सूत्रानें होणारें जश्त्व असिद्ध ठरतें. त्याचा परिणाम हा होतो कीं, 'शिनष् + हि' या स्थलीं सापादिक सूत्रें प्रथम प्रवृत्त करून व नंतर 'नश्चापदान्तस्य झलि' आणि 'ष्टुना ष्टुः' हीं जीं त्रैपादिक सूत्रें 'दीर्घादाचार्याणाम्' या सूत्रापूर्वी पठित आहेत तीं सूत्रें प्रवृत्त करून 'शिंप् + ढि' अशी स्थिति झाली असतां, अनुस्वारा-पुढें डकार हा यय् येत नसून षकार हा शर् येतो. त्यामुळें 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' या सूत्राची येथें प्रवृत्ति होऊं शकत नाहीं व त्यामुळें अनुस्वाराचा परसवर्णरूप णकार होऊं शकत नाहीं. 'झलां जश् झशि' या उत्तर त्रैपादिक सूत्रानें षकाराचे जागीं जरी नंतर डकार होतो तरी, 'अनुस्वारस्य ययि' या पूर्व त्रैपादिक सूत्रानें परसवर्ण करतेवेळीं भाष्यकारांच्या पाठक्रमपक्षांत तो डकार असिद्ध ठरत असल्यामुळें च अनुस्वारापुढें डकार हा यय् नसून षकार हा शर्च आहे असें मानावें लागत असल्यामुळें, अनुस्वाराचा परसवर्ण होऊं शकत नाहीं. तसेंच षकाराचा डकार करून नंतर त्या डकाराचा 'झरो झरि सवर्णे' या त्रैपादिक उत्तर सूत्रानें वैकल्पिक लोप केला तरी 'अनुस्वारस्य ययि' या त्रैपादिक पूर्वसूत्राच्या दृष्टीनें 'झरो झरि' या त्रैपादिक उत्तर सूत्रानें होणारा डकाराचा लोप असिद्ध ठरत असल्यामुळें व पूर्वी सांगितल्याप्रमाणें डकार होणें हें कार्य देखील असिद्ध ठरत असल्यामुळें, अनुस्वारापुढें 'ढि' यांतील ढकार हा यय् आहे असें मानतां येत नाहीं. अनुस्वार व ढकार या दोहोंमध्यें षकाराचें व्यवधान आहे असें भाष्यकारीयपाठक्रमपक्षांत मानणें भाग पडत असल्यामुळें, त्या लोपपक्षांत देखील अनुस्वाराचा

परसवर्णरूप णकार होऊं शकत नाहीं आणि 'शिंढि' असेंच अनुस्वारयुक्त रूप सिद्ध होऊं शकतें असा शंकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. 'नन्वाश्रानुस्वारस्यादिष्टादचः' पासून 'यय्परत्वाभावात्तदप्राप्तेः' पर्यंत शंकाग्रन्थ आहे हें पूर्वीं सांगितलेंच आहे. आतां शब्दरत्नकार म्हणतात कीं, शंकाकारानें वरील शंकाग्रन्थांत जें म्हटलें आहे तें सर्व) यथार्थ आहे, म्हणजे 'शिण्ढि' हें परसवर्णविधीचें उदाहरण ठरत नसून केवळ अनुस्वारविधीचेंच उदाहरण ठरतें. (म्हणून शब्दरत्नकार आतां सवर्णविधीचीं उदाहरणें देतात.) 'पद्' धातूहून णिच् प्रत्यय करून त्या णिजन्ताहून क्विप्प्रत्यय केल्यास 'पाद्धसति' इत्यादि स्थली 'झयो होऽन्यतरस्याम्' सू. ११९ या सूत्रानें पूर्वसवर्ण करतेवेळी, 'अचः परस्मिन् पूर्वविधौ' सू. ५० या सूत्रांतील 'पूर्वविधौ' या पदाचा पञ्चमीसमास केल्यानें,जी स्थानिवद्भावाची प्राप्ति होते तिचें निवारण करण्याकरितां 'न पदान्त' या सूत्रांत सवर्णविधीचें ग्रहण केलें आहे. ('पद् गतौ' या दिवादिगणांतील धातूहून णिच्-प्रत्यय करून नंतर क्विप्प्रत्यय केला असतां, 'पद् + णिच् + क्विप्' अशा स्थितीत 'अत उपधायाः' सू. २२८२ या सूत्रानें उपधावृद्धि होऊन व 'णेरनिटि' सू. २३१३ या सूत्रानें णिच्प्रत्ययाचा लोप होऊन आणि 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें 'क्विप् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन 'पाद्' असें प्रातिपदिक होतें व या प्रातिपदिकाहून 'सु' हा प्रथमेच्या एकवचनाचा प्रत्यय केला असतां, 'हल्ङ्याब्भ्यः' सू. २५२ या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लोप होऊन 'पाद्' असे प्रथमेच्या एकवचनाचें रूप होतें आणि या 'पाद्' शब्दापुढें 'हसति' हा शब्द आला असतां, 'झयो होऽन्यतरस्याम्' या सूत्रानें हकाराचे जागीं विकल्पेंकरून पूर्वसवर्ण होण्याची प्राप्ति आहे. या स्थलीं 'अचः परस्मिन्' या सूत्रांतील 'पूर्वविधौ' या पदाचा 'पूर्वस्य विधौ' असा षष्ठीसमास न करितां 'पूर्वस्मात् विधौ' असा पञ्चमीसमास करून 'पूर्वस्मात्परस्य विधौ कर्तव्ये' असा अर्थ केल्यानें

'ह्' चा पूर्वसवर्ण करतेवेळीं त्या सूत्रानें णिलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भावाची प्राप्ति होते. स्थानिवद्भाव केल्यास 'द्' हा झय् व हकार या दोहोंमध्यें 'णि = इ' चें व्यवधान आहे असें मानावें लागत असल्यामुळें, हकाराचे जागीं पूर्वसवर्णरूप आदेश—धकार—होणार नाहीं. ही आपत्ति टाळण्याकरितां 'न पदान्त' या सूत्रांत सवर्णविधीचें ग्रहण केलें आहे व त्यामुळें णिलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव न होतां 'प्राद्धसति' हा इष्ट प्रयोग सिद्ध होतो. पण या उदाहरणासंबंधानें अशी शंका करण्यांत येते कीं, 'क्वौ लुप्तं न स्थानिवत्' असें वार्तिक असल्यामुळें व प्रकृत स्थलीं क्विप्प्रत्ययाच्या निमित्तामुळें त्याच्या पूर्वी असलेल्या णिच् प्रत्ययाचा 'णेरनिटि' या सूत्रानें लोप झाला असल्यामुळें, त्या वचनान्वयें णिलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं आणि म्हणून प्रकृत उदाहरण त्या निषेधक वार्तिकाचें उदाहरण ठरत असून 'न पदान्त' या सूत्रांतील सवर्णविधीचें उदाहरण ठरत नाहीं व 'न पदान्त' या सूत्रांत सवर्णविधीचें ग्रहण नसलें तरी त्या निषेधक वार्तिकान्वयेंच 'प्राद्धसति' हा इष्ट प्रयोग सिद्ध होऊं शकतो. या शंकेवर हें उत्तर आहे कीं, 'क्वौ लुप्तं न स्थानिवत्' हें असार्वत्रिक—सर्वत्र लागू न पडणारें व अनित्य—वचन आहे. दुसरें असें कीं, प्रकृत सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं, 'नैवं विज्ञायते क्वौ लुप्तं न स्थानिवदिति । कथं तर्हि ? । क्वौ विधिं प्रति न स्थानिवदिति ।' या भाष्याचा अर्थ असा आहे कीं, क्विप्प्रत्ययाच्या निमित्तामुळें झालेल्या लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नाहीं असा त्या निषेधक वार्तिकाचा अर्थ नसून क्विप्प्रत्ययाच्या निमित्तामुळें होणारा विधि कर्तव्य असतां लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नाहीं असा त्या वार्तिकाचा अर्थ आहे. या अर्थान्वयें तें निषेधक वार्तिक प्रकृत उदाहरणांत लागू पडत नाहीं; कारण जरी क्विप्प्रत्ययाच्या निमित्तामुळें णिच्प्रत्ययाचा लोप झाला आहे तरी, त्या क्विप्प्रत्ययाच्या निमित्तामुळें येथें पूर्वसवर्णविधि करणें नाहीं.

म्हणून वरील उदाहरण सवर्णविधीचें उदाहरण ठरतें व 'न पदान्त' या सूत्रांत सवर्णविधि करतेवेळी अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भावाचा निषेध होणें सांगितलें असल्यामुळें, 'णि = इ' लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नाहीं. तरी पण 'क्वौ लुप्तं न स्थानिवत्' या निषेधक वार्तिकाचा क्विप्प्रत्ययाच्या निमित्तामुळें झालेल्या लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं असा अर्थ मानल्यास, जरी तें असार्वत्रिक वचन आहे तरी इष्ट रूपाची सिद्धि होण्याकरितां तें वार्तिक प्रकृत स्थली प्रवृत्त करतां येतें व त्या वार्तिकान्वयेंच णिलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नसल्यामुळें, सवर्णविधि कर्तव्य असतां अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नाहीं याचें तें योग्य उदाहरण ठरत नाहीं असें कोणी म्हटल्यास, शब्दरत्नकार सवर्णविधीचें दुसरें उदाहरण देतात.) 'हरित' शब्दाहून 'तत्करोति तदाचष्टे' या अर्थामध्यें णिच्प्रत्यय करून नंतर त्या णिजन्ताहून क्विप्प्रत्यय केला असतां, 'हरिद्धसति' इत्यादि स्थली वर सांगितल्याप्रमाणें जी स्थानिवद्भावाची प्राप्ति होते तिचें निवारण करण्याकरितां 'न पदान्त' या सूत्रांत सवर्णविधीचें ग्रहण केलें आहे. या द्वितीय उदाहरणांत अकारलोपाचे ठिकाणीं देखील स्थानिवद्भावाची प्राप्ति असल्यामुळें, हें उदाहरण 'क्वौ लुप्तं न स्थानिवत्' या निषेधक वार्तिकाचा विषयच होऊं शकत नाहीं. ('हरित + णिच् + क्विप् + सु + हसति' या स्थली इष्ठवद्भावानें 'टेः' सू. १७८६ या सूत्रानें 'हरित' यांतील टिचा—अन्त्य अकाराचा—लोप होऊन व पूर्व उदाहरणांत सांगितलेल्या प्रक्रियेप्रमाणें 'णिच्, क्विप्, सु' या तिन्ही प्रत्ययांचा लोप होऊन 'हरित्' असें प्रथमेच्या एकवचनाचें रूप होतें. या 'हरित्' शब्दापुढें 'हसति' हा शब्द आला असतां, 'झयो होऽन्यतरस्याम्' सू. ११९ या सूत्रानें हकाराचे जागीं विकल्पेंकरून पूर्वसवर्णरूप आदेश होण्याची प्राप्ति आहे. या उदाहरणांत 'क्वौ लुप्तं न स्थानिवत्' या निषेधक वार्तिकाची, लुप्त अकाराचे ठिकाणीं

स्थानिवद्भाव करतेवेळीं, प्राप्तीच होत नाहीं; कारण येथें क्विप्-प्रत्ययाच्या निमित्तामुळें जरी णिचा लोप झाला आहे तरी त्या निमित्तामुळें 'हरित' यांतील अन्त्य अकाराचा लोप झाला नसून तो लोप णिच्प्रत्ययाच्या निमित्तामुळें झाला आहे. त्या अकारलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव मानल्यास व अशा रीतीनें अकार विद्यमान आहे असें मानल्यास, तकार हा झय् व हकार या दोन वर्णामध्यें अकाराचें व्यवधान आहे असें मानावें लागेल व त्यामुळें हकाराचे जागीं पूर्वसवर्ण होऊं शकणार नाहीं. तो व्हावा म्हणून 'न पदान्त' या सूत्रांत सवर्णविधीचें ग्रहण केलें आहे व अशा रीतीनें तें ग्रहण चरितार्थ ठरतें. शब्दरत्नकारांनीं सवर्णविधीचीं जीं दोन उदाहरणें वर दिलीं आहेत तीं 'अचः परस्मिन् पूर्वविधौ' या सूत्रांतील 'पूर्वविधौ' या पदाचा पञ्चमीसमास मानून दिलीं आहेत. पण तो पञ्चमीसमासपक्ष अनित्य असून षष्ठीसमासपक्ष हाच सिद्धान्तपक्ष भाष्यांत मानला असल्यामुळें, आतां शब्दरत्नकार 'पूर्वविधौ' हा षष्ठीसमास मानून सवर्णविधीचें तिसरें उदाहरण देतात.)

'हरिन्नमति' इत्यादि उदाहरणांत अनुनासिक आदेशाची प्राप्ति झाली असतां (अजादेशाचे ठिकाणीं) स्थानिवद्भाव न व्हावा याकरितां देखील 'न पदान्त' या सूत्रांत सवर्णविधीचें ग्रहण केलें आहे. ('हरित' शब्दाहून, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, 'णिच्, क्विप्, सु' हे प्रत्यय केले असतां त्या तीन्ही प्रत्ययांचा लोप होऊन व तसेंच 'हरित' यांतील अन्त्य अकाराचा 'टेः' सू. १७८६ या सूत्रानें लोप होऊन 'हरित्' असें प्रथमेच्या एकवचनाचें रूप होतें. या शब्दापुढें अनुनासिक वर्णानें सुरू होणारा 'नमति' हा शब्द आला असतां, 'यरोऽनुनासिकेऽनुनासिको वा' सू. ११६ या सूत्रानें तकार या यर्चे जागीं अनुनासिक आदेशाची--नकारादेशाची--प्राप्ति आहे. पण 'टेः' या सूत्रानें 'हरित' यांतील अन्त्य अकाराचा जो लोप झाला आहे त्या लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव मानल्यास व अकार हा

विद्यमानच आहे असे मानल्यास, तकार व नकार या दोहोमध्ये अकाराचे व्यवधान आहे असे मानणे भाग पडत असल्यामुळे, तकाराचे जागी नकार होऊ शकत नाही. परतु सवर्णविधि कर्तव्य असता अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होऊ शकत नाही असे 'न पदान्त' या सूत्रात सागितले असल्यामुळें, अकारलोपाचे ठिकाणी तो अकार विद्यमानच आहे अशी स्थानिवद्भावाने बुद्धि करता येत नाही व त्यामुळे 'हरिन्नमति' हा इष्ट प्रयोग सिद्ध होतो. येथे हे लक्षात ठेवावे की, ज्या तकाराचे जागी अनुनासिक आदेश करणे आहे तो 'स्थानिभूतादच. पूर्वत्वेन दृष्ट' आहे व अशा रीतीनें हे उदाहरण 'पूर्वविधौ' या षष्ठीसमासाचे उदाहरण ठरते या उदाहरणासबधाने कित्येक वैयाकरण अशी शका करतात की, या स्थली वास्तविक 'हरित्' या शब्दाला नकाररूप चरमावयवविधि करणे असल्यामुळें, प्रकृत सूत्रात सवर्णविधीचे ग्रहण नसले तरी, 'पदान्तविधि प्रति न स्थानिवत्' या योगानेच अकारलोपाचे ठिकाणी स्थानिवद्भाव करता येत नाही व अशा रीतीनें हे उदाहरण सवर्ण-विधीचे योग्य उदाहरण मानता येत नाही. या शकेवर भैरवीकारानी 'पदचरमावयवे कर्तव्ये परपदस्थाजादेशो न स्थानिवदिति सिद्धान्ते तस्याप्रवृत्ते.' असे उत्तर दिले आहे. प्रकृत सूत्रावरील भाष्यात १ १ ५८ भाष्यकारानी असे म्हटले आहे की, 'नैव विज्ञायते पदस्यान्तः पदान्त. पदान्तविधि प्रतीति । कथ तर्हि ? । पदेऽन्त पदान्तः पदान्तविधि प्रतीति ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'पदान्तविधि' यातील 'पदान्त' याचा षष्ठीसमास न मानता सप्तमीसमास मानावा व तसा समास मानल्याने, पद पुढे असताना त्याच्या पूर्वी जो पूर्वपदाचा अन्त्य वर्ण आहे त्याला विधि कर्तव्य असता परपदातील अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होत नाही असा अर्थ निष्पन्न होतो व या भाष्याला धरूनच भैरवीकारानी वरील उत्तर दिले आहे. प्रकृत उदाहरणात परपदामध्यें अकारलोपरूप

अजादेश झाला नसून पूर्वपदांत तसा अजादेश झाला आहे, म्हणजे ज्या अकाराचा लोप झाला आहे तो अकार 'नमति' या उत्तर-पदांतील अकार नसून 'हरित' या पूर्व पदांतील अन्त्य अकार आहे. त्यामुळें भाष्यरीत्या हें पदान्तविधीचें उदाहरण ठरत नाहीं व सवर्ण-विधीचें योग्य उदाहरण ठरतें. आतां या उदाहरणासंबंधानें दुसरी अशी शंका करण्यांत येते कीं, 'यरोऽनुनासिके' या सूत्रानें होणारें अनुनासिक कार्य परसवर्णरूप कार्य मानतां येत नाहीं आणि म्हणून हें सवर्णविधीचें उदाहरण ठरत नाहीं. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं,) 'हयवरट्' या (पञ्चम) शिवसूत्रावरील भाष्यानुसार 'यरोऽनुनासिके' या पूर्व सूत्रांत 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' या परसूत्रांतून 'सवर्णः' या पदाचें अपकर्षण केल्यानें 'यरोऽनुनासिके' हें सूत्र देखील सवर्णविधायक सूत्र ठरतें असें इतर स्थलीं—'चतुर्मुखः' या शब्दाची सिद्धि करतेवेळीं—विस्तारपूर्वक सांगितलें आहे. ('स्वर्नयति, प्रातर्नयति' इत्यादि उदाहरणांत रकार या यर् पुढें नकार हा अनुनासिक वर्ण आला असल्यामुळें 'यरोऽनुनासिके सू. ११६ या सूत्रानें त्या रकाराचे जागीं णकार हा अनुनासिक आदेश होण्याची जी आपत्ति येते ती टाळण्याकरितां वार्तिककारानें 'रेफस्य परोपदेशेऽनुनासिकद्विर्वचनपरसवर्णप्रतिषेधः'—म्हणजे 'हय-वरट्' या शिवसूत्रांत रेफ जर यकार व वकार यांच्यानंतर जसा उच्चारला आहे तसाच कायम ठेवल्यास, अनुनासिक, द्वित्व व परसवर्ण या तीन कार्यांचा प्रतिषेध करावा लागेल—असें वार्तिक पठित केलें आहे व त्या वार्तिकाचें व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात—'अनुनासिकस्य । स्वर्नयति प्रातर्नयतीति यरोऽनुनासिकेऽनुना-सिको वा इत्यनुनासिकः प्राप्नोति । द्विर्वचनस्य । भद्रन्हदः मद्रन्हद इति यर इति द्विर्वचनं प्राप्नोति । परसवर्णस्य । कुण्डं रथेन । वनं रथेन । अनुस्वारस्य ययि इति परसवर्णः प्राप्नोति ।' या वार्तिकाचें प्रत्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात—'अनुनासिकपरसवर्ण-

योस्तावत् प्रतिषेधो न वक्तव्यः। रफोष्मणा सवर्णा न सन्ति।' यापुढील भाष्य प्रकृतविषयोपयोगी नसल्यामुळे ते येथे देण्याची आवश्यकता नाही. भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, रकार व णकार हे दोन्ही मूर्द्धन्य असल्यामुळें जरी त्याच्यात स्थानसाम्य आहे तरी, रकार या अन्तःस्थ वर्णाचा 'ईषत्स्पृष्टमन्तःस्थानाम्' या वचनान्वये ईषत्स्पृष्ट आभ्यन्तर प्रयत्न असून णकार या स्पर्शवर्णाचा 'स्पृष्ट प्रयतन स्पर्शानाम्' या वचनान्वये स्पृष्ट आभ्यन्तरप्रयत्न असल्यामुळें व अशा रीतीने या दोन वर्णात आभ्यन्तरप्रयत्नसाम्य नसल्यामुळें, 'तुल्यास्यप्रयत्न सवर्णम्' सू. १० या सूत्रान्वये रकाराचा णकार सवर्ण ठरू शकत नाही व त्यामुळे 'स्वर्नयति, प्रातर्नयति' इत्यादि उदाहरणात रकाराचे जागी परसवर्णरूप णकारादेश होऊ शकत नाही. या भाष्यात 'रेफोष्मणा सवर्णा न सन्ति' असे म्हटले असल्यामुळे त्यावरून हे स्पष्ट होते की, भाष्यकारानी 'यरोऽनुनासिके' या सूत्रात 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' या उत्तरसूत्रातून 'सवर्णः' या पदाचे अपकर्षण केले आहे व 'तस्मादनुनासिकविधौ सवर्णपदापकर्षपर भाष्य रेफोष्मणामिति' असे उद्योतकारानी या वरील प्रत्याख्यानपर भाष्यासबधाने म्हटले आहे त्यामुळे 'यरोऽनुनासिके' हे सवर्णविधायक सूत्र ठरते आणि म्हणून 'हरिन्नमति' हे जें सवर्णविधीचे उदाहरण शब्दरत्नकारानी दिले आहे ते योग्य उदाहरण ठरते. दीक्षितानी 'समाना ग्धि' सग्धि.' असा 'सग्धि' शब्दाचा विग्रह करून 'समान' या शब्दाचे जागी 'समानस्य छन्दसि' सू १०१२ या सूत्राने 'स' असा आदेश झाला आहे असे म्हटले आहे. पण शब्दरत्नकार म्हणतात की,) 'सग्धि' स्त्री सहभोजनम्' असा अमरकोशात निर्देश असल्यामुळें, 'सहस्य स सज्ञायाम्' सू. १००९ या सूत्रान्वयें 'सग्धि' या स्थली 'सह'चे जागी 'स' हा आदेश झाला आहे असे दिसून येते 'झलो झलि' सू. २२८१ या सूत्रानें केवळ 'सिच्' चगान 'स्'ना लोप होतो (व इतर सकाराना लोप

होत नाहीं) असा पक्ष मानल्यास, 'सग्धि:' या उदाहरणांत झालेला सकाराचा लोप छान्दस आहे, म्हणजे वैदिक प्रयोगांत बाहुल्यामुळें झाला आहे, असें समजावें. ('घस् धि' अशी जी मनोरमेंत दिलेल्या प्रक्रियेप्रमाणें स्थिति होते तशा स्थितींत घकारापुढील सकाराचा 'झलो झलि' या सूत्रानें लोप होतो असें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे. पण 'झलो झलि' या सूत्रानें 'सिच् = स्' या सकाराचाच लोप होतो व इतर सकाराचा लोप होत नाहीं असा पक्ष मानल्यास, वरील सकार 'सिच्' चा सकार नसल्यामुळें, त्या सकाराचा 'झलो झलि' या सूत्रानें लोप होऊं शकत नाहीं. म्हणून शब्दरत्नकार म्हणतात कीं, तो पक्ष मानल्यास, वरील वैदिक उदाहरणांत जो सकारलोप झाला आहे तो छान्दस आहे असें मानावें व 'दृष्टानुविधिश्छन्दसि' या वचनान्वयें त्या वर्णाच्या लोपाचें समर्थन करावें. 'धि च' या सूत्रावरील भाष्यांत वर्णलोपाचीं अनेक वैचित्र्यपूर्ण वैदिक उदाहरणें दिलीं आहेत. तो पक्ष न मानल्यास, वरील सकारलोपास 'झलो झलि' हें सूत्र लागू पडतेंच.) 'धि च' सू. ८.२.२५ या सूत्रावरील भाष्यावरून हें स्पष्ट होतें. (त्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं 'धिसकारे सिचो लोपश्चकाद्धीति प्रयोजनम्' हें वार्तिक पठित करून व तें वार्तिक मानल्यास अनेक दोष उद्भवतात असें सांगून त्या वार्तिकाचें प्रत्याख्यान करितांना, 'तस्मात्सिज्ग्रहणं न तत्' —म्हणजे 'धि च' या सूत्रानें केवळ 'सिच्' च्या 'स्' चा लोप होणें सांगितलें नसून कोणत्याहि सकाराचा लोप होणें सांगितलें आहे—असें म्हटलें आहे व त्याच्या लगेंच पुढें भाष्यकार म्हणतात—'छान्दसो वर्णलोपो वा यथेष्कर्तारमध्वरे'. याचा भावार्थ हा आहे कीं, 'धि च' या सूत्रानें 'सिच्' चाच लोप होतो असा पक्ष मानल्यास, 'सग्धि:, बब्धाम्' इत्यादि वैदिक प्रयोगांत सिचाचा सकार नसून देखील जो त्या सकाराचा लोप झाला आहे तो छान्दस आहे असें समजावें. या भाष्याला धरूनच शब्दरत्नांतील वरील पंक्ति लिहिली आहे.)

जरी वेदांत 'सग्धिः' हा प्रयोग साधु आहे तरी लौकिक भाषेंत तसा प्रयोग असाधुच–अशुद्धच–आहे असें समजावें. (कारण 'अद्' धातूपुढें 'क्तिन्' प्रत्यय आला असतां जो 'घस्' आदेश होतो तो 'बहुलं छन्दसि' सू. ३३९८ या सूत्रानें भाषेंत होत नसून वेदांतच होतो. भाषेंत तसा आदेश 'लिटचन्यतरस्याम्' सू. २४२४ व 'लुङ्सनोर्घस्लृ' सू. २४२७ या सूत्रांन्वयें लिट् लकारांत, लुङ लकारांत व सन् प्रत्यय पुढें आला असतांच होऊं शकतो.)

मनोरमा––"संयोगान्तस्य" तदन्तस्येति । अलोऽन्त्यपरिभाषयेति भावः। यद्यपि विशेषणेन तदन्तविधिलाभात् संयोगस्येत्येव सूत्रयितुमुचितम्, तथाऽपि प्रत्येकं संयोगसञ्ज्ञेति पक्षे दृषत्करोतीत्यादौ लोपं वारयितुं संयोगावन्तौ यस्येति द्विवचनान्तेन समासलाभार्थमन्तग्रहणम् । वृत्तौ हि उपसर्जनानामेकत्वसंख्यौत्सर्गिकी, द्वित्वादिकं तु प्रयत्नलभ्यमिति भाष्ये स्थितम् ।।

('संयोगान्तस्य लोपः' सू. ५४ या सूत्राचें 'संयोगान्तं यत्पदं तदन्तस्य लोपः स्यात्' असें कौमुदींत व्याख्यान करितांना) 'तदन्तस्य लोपः' असें जें म्हटलें आहे तें 'अलोऽन्त्यस्य' सू. ४२ या परिभाषेच्या आधारें सिद्ध होतें. विशेषणानें तदन्तविधि होत असल्यामुळें, 'संयोगान्तस्य' या पदाऐवजीं 'संयोगस्य' असेंच पद जरी प्रकृत सूत्रांत घालणें योग्य होतें तरी, संयोगांतील प्रत्येक वर्णास संयोगसंज्ञा होते असा पक्ष मानल्यास 'दृषत्करोति' इत्यादि स्थलीं प्राप्त होणाऱ्या लोपाचें निवारण करण्याकरितां 'संयोगौ अन्तौ यस्य' असा द्विवचनान्त पदांनीं विग्रह करतां यावा या करितां प्रकृत सूत्रांत 'अन्त' या पदाचें ग्रहण केलें आहे. सामासिक शब्दाचा विग्रह करतेवेळी उपसर्जनीभूत पदांचा एकवचनांत प्रयोग करणें हा सामान्य नियम आहे; कांहीं तरी विशेष कारण किंवा विवक्षा असल्याशिवाय तशा उपसर्जनीभूत पदांचा विग्रहवाक्यांत द्विवचनांत किंवा बहुवचनांत प्रयोग करतां येत नाहीं असें भाष्यांत सांगितलें आहे.

('वृद्धिरादैच्' १·१·१ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात— 'प्रत्यवयवं च वाक्यपरिसमाप्तिर्दृश्यते। तद्यथा। देवदत्तयज्ञदत्तविष्णुमित्रा भोज्यन्तामिति। न चोच्यते प्रत्येकमिति, प्रत्येकं च भुजिः परिसमाप्यते। ननु चायमप्यस्ति दृष्टान्तः समुदाये वाक्यपरिसमाप्तिरिति। तद्यथा। गर्गाः शतं दण्ड्यन्तामिति। अर्थिनश्च राजानो हिरण्येन भवन्ति न च प्रत्येकं दण्डयन्ति।' या भाष्याचा अर्थ हा आहे कीं, वाक्यांत जें विधेयरूपानें सांगितलें आहे तें त्या वाक्यांत निर्दिष्ट असलेल्या उद्देश्याच्या प्रत्येक अवयवास लागू पडतें असें अनेक ठिकाणीं दिसून येतें. उदाहरणार्थ 'देवदत्तयज्ञदत्तविष्णुमित्रा भोज्यन्ताम्' असें वाक्य उच्चारलें असतां, 'भोज्यन्ताम्' हें विधेय उद्देश्यांतील प्रत्येक अवयवाला, म्हणजे देवदत्त, यज्ञदत्त, विष्णुमित्र यांना, सारखेंच लागू पडतें व प्रत्येकास भोजन मिळतें. त्या ठिकाणीं 'प्रत्येकम्' हा शब्द उच्चारला नसून देखील भोजनक्रिया प्रत्येकाला लागू पडते. पण कांहीं ठिकाणीं वाक्यांतील विधेय उद्देश्यरूप समुदायालाच लागू पडतें असेंहि दिसून येतें. उदाहरणार्थ 'गर्गाः शतं दण्ड्यन्ताम्' असें वाक्य उच्चारलें असतां, जरी राजेलोकांना सोन्याची फार गरज असते तरी, 'शतम् दण्ड्यन्ताम्' हें विधेय प्रत्येक गर्गाशीं अन्वित न होतां, गर्गाच्या समुदायाशीं अन्वित होतें व प्रत्येक गर्गाकडून शंभर सोन्याचीं नाणीं दण्डरूपानें वसूल केलीं न जातां, त्या सर्वांमिळून एकूण शंभर नाणीं वसूल केलीं जातात. या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, 'प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिः'—परि. ११६—व 'क्वचित्समुदायेऽपि'—परि. ११७—असे दोन्ही प्रकारचे पक्ष व्याकरणशास्त्रांत मानले आहेत. दीक्षित म्हणतात कीं, 'प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिः' हा पक्ष मानल्यास, संयोगांतील प्रत्येक वर्णाला 'हलोऽनन्तराः संयोगः' सू. ३० या सूत्रानें संयोगसंज्ञा प्राप्त होते व त्यामुळें 'दृषत्करोति' या उदाहरणांत 'त्क' या संयोगांतील तकाराला संयोगसंज्ञा होऊन तो तकार 'दृषत्' या

पदाच्या अन्तीं असल्यामुळें, 'संयोगस्य लोप:' असें सूत्र केल्यानें त्या तकाराचा लोप होण्याची आपत्ति येते. 'क्वचित्समुदायेऽपि' या द्वितीय पक्षांत समुदायाला संयोगसंज्ञा होत असल्यामुळें व 'त्क' या पदान्ती नसणाऱ्या समुदायांतील तकाराला ती संज्ञा होऊं शकत नसल्यामुळें, त्या पक्षांत तकारलोपाची आपत्ति येत नाही हे खरें. पण वर सांगितल्याप्रमाणें व्याकरणशास्त्रात दोन्ही पक्ष मानले असल्यामुळें प्रथम पक्षात येणारी आपत्ति टाळणे आवश्यक होतें व म्हणून त्या आपत्तीचें निवारण करण्याकरितां प्रकृत सूत्रांत 'अन्त' या पदाचें ग्रहण केले आहे व त्या शब्दाचें ग्रहण करण्याचें प्रयोजन हे की, 'संयोगौ अन्तौ यस्य' अशा रीतीनें विग्रह करतां यावा. तसा विग्रह केल्याने 'दृपत्' या पदाच्या अन्ती 'त्' व 'क्' हे दोन संयोग नसून तकार हा एकच संयोग असल्यामुळे, त्या तकाराचा, प्रथम पक्ष मानला असतां, जी लोप होण्याची आपत्ति येत होती ती टळते. पण येथे अशी शंका करण्यांत येते की, 'संयोगस्य लोप:' एवढेच सूत्र जरी केले असते तरी, हे सूत्र पदाधिकारात पठित असल्यामुळे व या सूत्रात 'पदस्य' या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळे, 'संयोगस्य' हे पद 'पदस्य' या पदाचे विशेषण होऊन 'संयोगस्य' *या विशेषणाचा 'येन विधिस्तदन्तस्य'* सू. २६, *म्हणजे* 'विशेषण तदन्तस्य संज्ञा स्यात्', या सूत्रान्वये 'संयोगान्तस्य' असा अर्थ झालाच असता व त्या पदाचा 'संयोगौ अन्तौ यस्य' असा विग्रह केल्याने प्रथम पक्षात उत्पन्न होणारी वर दाखविलेली आपत्ति टाळता आली असती आणि म्हणून प्रकृत सूत्रातील 'अन्त' या पदाचे ग्रहण व्यर्थ ठरते. या शंकेवर दीक्षित असे उत्तर देतात की, 'संयोगस्य लोप:' असे सूत्र केले असते तर, जरी 'संयोगस्य' या पदाचा वर सांगितल्याप्रमाणे 'संयोगान्तस्य' असा अर्थ झाला असता तरी, त्या सूत्रात 'संयोगस्य' असे एकवचनान्त पद पठित केलें असल्यामुळें 'संयोगस्य = संयोगान्तस्य' या पदाचा 'संयोगौ अन्तौ

यस्य' असा द्विवचनान्त पदांनीं विग्रह करतां आला नसता; कारण भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं, विग्रह करतेवेळीं विग्रहवाक्यांतील उपसर्जनीभूत पदांचा एकवचनांत प्रयोग करणें असा सामान्य नियम असल्यामुळें कांहीं तरी विशेष कारण किंवा विवक्षा असल्याशिवाय त्या उपसर्जनीभूत पदांचा द्विवचनांत किंवा बहुवचनांत प्रयोग करतां येत नाहीं. सारांश प्रकृत स्थलीं 'संयोगस्य लोपः' असें सूत्र केलें असतां त्या सूत्रांत 'संयोगस्य' या पदाचा एकवचनान्त निर्देश होत असल्यामुळें, त्या पदाचा 'संयोगान्तस्य' असा अर्थ केल्यानें देखील, बहुव्रीहिसमासांत 'संयोग' व 'अन्त' हीं दोन्ही पदें उपसर्जनीभूत असून अन्यपदार्थ प्रधान असल्यामुळें, त्या उपसर्जनीभूत पदांचा विग्रहवाक्यांत, कांहीं विशेष कारण उपलब्ध नसल्यामुळें, वरील भाष्यमतान्वयें द्विवचनांत प्रयोग करतां आला नसता. परंतु 'संयोगान्तस्य लोपः' अशा प्रकारचें सूत्र पाणिनीनें पठित केलें असल्यामुळें त्यांतील 'अन्त' हा शब्द चरितार्थ ठरण्याकरितां 'संयोगौ अन्तौ यस्य' असा विग्रहवाक्यांत द्विवचनान्त प्रयोग करतां येतो; कारण तसा प्रयोग करण्याकरितां प्रकृत सूत्रांतील 'अन्त' या पदाचें ग्रहण हें विशेष कारण उपलब्ध आहे. तसा विग्रह न केल्यास, 'अन्त' या पदाचें ग्रहण व्यर्थ ठरूं पाहतें. सारांश 'संयोगौ अन्तौ यस्य' असा विग्रह व्हावा याकरितां प्रकृत सूत्रांत 'अन्त' या पदाचें ग्रहण केलें आहे व अशा रीतीनें तें ग्रहण चरितार्थ ठरतें व प्रथम पक्ष मानला असतां त्या पक्षांत उत्पन्न होणारी आपत्ति वर सांगितल्याप्रमाणें सहज टाळतां येते असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे. 'हलोऽनन्तराः संयोगः' १·१·७ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात 'यदप्युच्यते इह च दृषत्करोति, समित्करोतीति संयोगान्तस्य लोपः प्रसज्येतेति, नैवं विज्ञायते संयोगोऽन्तो यस्य तदिदं संयोगान्तं संयोगान्तस्येति । कथं तर्हि ? । संयोगावन्तावस्य तदिदं संयोगान्तं संयोगान्तस्येति ।' या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं,

भाष्यकारांनीं ‘संयोगान्तस्य’ या पदाचा ‘संयोगौ अन्तौ यस्य’ असाच विग्रह केला आहे व या भाष्याला धरूनच दीक्षितांनीं वरील मनोरमेंत तसा विग्रह केला आहे.)

शब्दरत्न--विशेषणेन = पदस्येत्यधिकारप्राप्तविशेषणेन संयोगस्येत्यनेन । एकत्वसंख्येति । अभेदैकत्व संख्येति तदर्थः । संख्यासामान्याभाव इति यावत् । विग्रहे एक वचनं तु औत्सर्गिकं सुबन्तत्वसम्पत्तिमात्रफलकमिति समर्थसूत्रे भाष्ये स्पष्टम् । भाष्ये स्थितमिति । संयोगसञ्ज्ञासूत्रस्थे इत्यर्थः । एवं च प्रत्येकं संयोगसञ्ज्ञापक्षस्यानन्तरा इति सूत्राक्षर स्वारस्यविरोधेन, फलाभावेन चासङ्गतत्वमिति तत्रैव भाष्ये ध्वनिततया ऽत्रत्यमन्तग्रहणं व्यर्थमेव, न तु फलान्तरेऽभिनिवेशः कार्य इति भावः । यत्तु संयोगेति लुप्तषष्ठीकम्, तच्च पदस्येति चान्तविशेषणम्, संयोगान्तस्य सतः पदान्तस्येत्यर्थमन्तग्रहणमिति । तन्न, तादृशलक्ष्याभावात् । अत एव “व्रश्चसोः” इति सूत्रे “द्विशकारको निर्देशः” इति भाष्ये उक्तम् । त्वद्रीत्या संयोगान्तलोपस्य दुर्वारत्वेन शकारद्वयाभावात्तदसंगतिः स्पष्टैव ।।

‘विशेषणेन तदन्तविधिलाभात्’ असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा अर्थ असा आहे कीं, ‘संयोगान्तस्य लोपः’ हें सूत्र पदाधिकारांत पठित असल्यामुळें (त्या सूत्रांतून ‘अन्त’ हा शब्द गाळला तरी बाकी राहिलेलें) ‘संयोगस्य’ हें पद त्या सूत्रांत अनुवृत्त असलेल्या ‘पदस्य’ या पदाचें विशेषण होऊन त्या पदाचा (‘येन विधिस्तदन्तस्य’ सू. २६ या सूत्रान्वयें) ‘संयोगान्तस्य’ असा अर्थ होऊं शकतोच. (याचें विवरण मनोरमेंत केलेंच आहे व असें केल्यानें कोणते दोष उत्पन्न होतात हें देखील तेथें सांगितलेंच आहे.) ‘वृत्तौ हि उपसर्जनानामेकत्वसंख्यौत्सर्गिकी’ असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यांतील ‘एकत्वसंख्या’ या पदाचा अभेदैकत्वसंख्या, म्हणजे संख्यासामान्याभाव, असा अर्थ आहे. (‘समर्थः पदविधिः’ २.१.१ या

सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात–'संख्याविशेषो भवति वाक्ये–राज्ञः पुरुषः, राज्ञोः पुरुषः, राज्ञां पुरुष इति। समासे न भवति–राजपुरुषः इति। अस्ति कारणं येनैतदेवं भवति। किं कारणम्?। योऽसौ विशेषवाची शब्दस्तदसांनिधयात्।' या भाष्याचें व्याख्यान करितांना कैयटानें असें म्हटलें आहे कीं, 'वाक्ये उपसर्जनपदानि विभक्त्यर्थाभिधायित्वात्संख्याविशेषयुक्तं स्वार्थं प्रतिपादयन्ति। समासे त्वन्तर्भूतस्वार्थं प्रधानार्थमभिदधतीत्यभेदैकत्वसंख्यामवगमयन्ति। संख्याविशेषाणामविभागेनावस्थानमभेदैकत्वसंख्या। यथोक्तम्–यथौपधिरसाः सर्वे मधुन्याहितशक्तयः। अविभागेन वर्तन्ते तां संख्यां तादृशीं विदुः। अथवा परित्यक्तविशेषं संख्यासामान्यमभेदैकत्वसंख्या।...तदसान्निध्यादिति। लुका विभक्तेर्निवर्तितत्वादित्यर्थः।' या वरील प्रदीपाचें विवरण करितांना उद्योतकार म्हणतात–'विभक्त्यभावेन संख्याविशेषाणां तत्तद्रूपेणाऽप्रतीतेः संख्यात्वेन सर्वसंख्यानां भानं मधुनि सर्वरसानां रसत्वेन भानवदिति भावः। तदाह–यथौषधीति। अथ वेति। अत्र पक्षे संख्यात्वेन सामान्यं भासते, न तु विशेषा इति पूर्वस्माद्विशेषः।' या भाष्यावरून व कैयटानें आणि उद्योतकारानें त्या भाष्याचें जें विवरण केलें आहे त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, वाक्यांत जरी प्रत्येक पदानें संख्येचा स्पष्ट बोध होतो तरी त्या वाक्याचा सामासिक शब्द केला असतां, उपसर्जनीभूत पदांपुढें असणाऱ्या संख्याद्योतक अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययांचा 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें लुक् होत असल्यामुळें, सामासिक शब्दांतील उपसर्जनीभूत पदांनीं संख्याविशेषाचा–म्हणजे एकत्व, द्वित्व, बहुत्व अशा प्रकारच्या विशेष संख्येचा–बोध होत नसून जसें मधाचे ठिकाणी सर्व रसांचें अभेदरूपानें भान होतें त्याचप्रमाणें त्यांचे ठिकाणीं सर्व संख्यांचें अभेदरूपानें किंवा सामान्यरूपानें भान होतें व यालाच 'अभेदैकत्व-संख्या' असें म्हणतात.) सामासिक शब्दाचा विग्रह करतेवेळीं त्यांत

उपसर्जनीभूत असलेल्या पदांना एकत्वसंख्याबोधक प्रत्यय लावणें हा सामान्य नियम आहे असें जें म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, त्या उपसर्जभूत पदांना पदसंज्ञा व्हावी असें 'समर्थः पदविधिः' २.१.१ या सूत्रावरील भाष्यावरून स्पष्ट होतें. (विग्रहवाक्य पदांचा उपयोग करूनच तयार होतें व त्या विग्रहवाक्यांत उपसर्जनीभूत असलेल्या पदांना विभक्तिप्रत्यय लावल्याशिवाय 'सुप्तिङन्तं पदम्' सू. २९ या सूत्रानें प्राप्त होणारी पदसंज्ञा त्यांना होऊं शकत नाहीं. म्हणून त्यांना पदसंज्ञा प्राप्त व्हावी एवढ्याकरितांच त्यांना सामान्यतः एकत्वसंख्याबोधक प्रत्यय लावला जातो, संख्याविशेषाचा बोध होण्या-करितां त्यांना तसा प्रत्यय लावला जात नसतो, आणि म्हणूनच जेथें संख्याविशेषाचा बोध इतर रीतीनें झालेला नसतो तशा ठिकाणीं विग्रहवाक्यांतील उपसर्जनीभूत पदांचा एकवचनांत प्रयोग करणें हा सामान्य नियम आहे. परंतु 'द्विपुत्रः, चतुर्मुखः, महाबाहुः' इत्यादि स्थलीं सामासिक शब्दांत असलेल्या शब्दांनीं संख्याविशेषाचा बोध होत असल्यामुळें, अशा ठिकाणीं विग्रहवाक्यांत उपसर्जनीभूत असलेल्या पदांचा द्विवचनांत किंवा बहुवचनांत इष्ट प्रयोग करतां येतो. तसेंच जेथें प्रकरणादिकांवरून संख्याविशेषाचा बोध होत असेल तशा ठिकाणीं देखील विग्रहवाक्यांत उपसर्जनीभूत असलेल्या पदांना इष्टसंख्याद्योतक प्रत्यय लावतां येतो. पण जेथें असा बोध होण्यास कोणतेंहि साधन उपलब्ध नाहीं तेथें विग्रहवाक्यांत उपसर्जनीभूत असलेल्या पदांचा एकवचनांत प्रयोग करणें हा सामान्य नियम आहे व ही एकत्वसंख्या अशी आहे की, हिच्यांत सर्व संख्यांचा अन्तर्भाव होत असतो आणि म्हणूनच तशा एकत्वसंख्यावाचक विभक्तिप्रत्ययाचा उपसर्जनीभूत पदांचे ठिकाणी सुबन्तत्व संपादन करण्याकरितां उपयोग केला जातो असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.)

'द्वित्वादिकं तु प्रयत्नलभ्यमिति भाष्ये स्थितम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यांतील 'भाष्य' या शब्दानें 'हलोऽनन्तराः संयोगः'

१·१·७ या संयोगसंज्ञेचें विधान करणाऱ्या या सूत्रावरील भाष्य असें समजावें. सारांश संयोगांतील प्रत्येक हलाला—व्यञ्जनाला—संयोगसंज्ञा होते असा पक्ष मानल्यास, 'हलोऽनन्तराः संयोगः' या सूत्रांतील 'अनन्तराः' या पदाच्या अर्थाशीं विरोध येत असल्यामुळें व संयोगांतील प्रत्येक हलाला संयोगसंज्ञा होते असें मानल्यानें कोणतेंहि फल निष्पन्न होत नसल्यामुळें आणि म्हणून तो पक्ष स्वीकारार्ह नाहीं असें त्या भाष्यावरूनच ध्वनित होत असल्यामुळें, 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रांतील 'अन्त' या शब्दाचें ग्रहण व्यर्थच ठरतें व त्या शब्दाचें ग्रहण चरितार्थ ठरावें याकरितां इतर प्रयोजनें शोधण्याची खटपट करण्यांत कांहींच अर्थ नाहीं असा दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. (भाष्यकारांनीं 'प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिः' हा न्याय प्रथम सांगून त्या न्यायान्वयें संयोगांतील प्रत्येक हलाला संयोगसंज्ञा होते असें जरी म्हटलें आहे तरी तें एकदेशिभाष्य आहे; कारण लगेंच पुढें 'क्वचित्समुदायेऽपि' हा उलट न्याय सांगून व तो न्याय मानला असतां, वार्तिककारानें जे दोष दाखविले होते त्या सर्व दोषांचें निराकरण करून हल् समुदायालाच संयोगसंज्ञा होते व त्या समुदायांतील प्रत्येक हलाला संयोगसंज्ञा होत नाहीं हा पक्ष भाष्यकारांनीं सिद्धान्तरूपानें सांगितला आहे व हा पक्ष मानल्यानेंच 'हलोऽनन्तराः' या सूत्रांतील 'न विद्यते अन्तरा येषां ते = अनन्तराः' या पदाचें ग्रहण चरितार्थ ठरून त्या पदाचें स्वारस्य कायम राहतें; कारण मध्यें कांहीं असणें याकरितां एकाहून अधिक असणें आवश्यक आहे व दोन किंवा दोहोंहून अधिक हल् एकत्र आल्यासच 'अनन्तराः' हा शब्द सार्थक ठरूं शकतो. आणि म्हणूनच त्या सूत्रावरील भाष्यांत 'द्वयोश्चैवान्तरा कश्चिद्विद्यते वा न वा'—म्हणजे मध्यें असणें किंवा नसणें हें दोघांवरच अवलंबून असतें—असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे व लगेंच पुढें 'एवमपि बहूनामेव प्राप्नोति' असेंहि म्हटलें आहे. त्या भाष्यांत 'आनन्तर्यवचनं किमर्थमिति चेदेकप्रतिषेधार्थम्' हें

वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात–'एकस्य हल: संयोगसंज्ञा मा भदिति ।' या भाष्यावरून हे स्पष्ट होते की संयोगातील प्रत्येक हलाला संयोगसंज्ञा होत नसून ती समुदायालाच होते व हे स्पष्ट व्हावे याकरिताच 'हलोऽनन्तरा.' या सूत्रात 'अनन्तरा.'–म्हणजे ज्याच्यामध्ये कोणताहि विजातीय वर्ण नाही असा हलाचा समुदाय–हा शब्द घातला आहे.) प्रकाशकाराचे असे म्हणणे आहे की, प्रकृत सूत्रातील 'संयोग' हे लुप्तषष्ठीक पद आहे, म्हणजे 'संयोगस्य' असा त्या पदाचा अर्थ आहे व ते लुप्तषष्ठीक पद आणि तसेच त्या सूत्रात अनुवृत्त होत असलेले 'पदस्य' हे पद 'अन्तस्य' या पदाची विशेषणे आहेत (व 'येन विधिस्तदन्तस्य' सू. २६ या सूत्रान्वयें त्याचा 'संयोगान्तस्य' व 'पदान्तस्य' असा अर्थ होत असल्यामुळे) 'संयोगान्तस्य सत: पदान्तस्य' असा त्या सूत्राचा अर्थ व्हावा याकरिता त्या सूत्रात 'अन्तस्य' या पदाचे ग्रहण केले आहे. (त्यामुळें प्रकृत सूत्रातील 'अन्तस्य' या पदाचे ग्रहण व्यर्थ ठरत नसून सप्रयोजनक–सार्थक–ठरते) पण हे म्हणणे बरोबर नाही; कारण हा अर्थ मानला असताच सिद्ध होणारे असे कोणतेहि इष्ट रूपाचे उदाहरण उपलब्ध नाही. म्हणूनच, म्हणजे प्रकाशकारानी प्रकृत सूत्राचा जो अर्थ केला आहे तो बरोबर नसल्यामळेंच, 'श्वसोरेत्' सू. २४७१ या सूत्रात 'अभ्यासलोपश्श्च' असा द्विशकारयुक्त निर्देश मानावा असे ('अलोऽन्त्यात्पूर्व उपधा' सू. १·१ ६५ या सूत्रावरील) भाष्यात म्हटले आहे. प्रकाशकारानी प्रकृत सूत्राचा वरप्रमाणे जो अर्थ केला आहे तो बरोबर मानल्यास, या सूत्राने द्वितीय संयोगान्त शकाराचा लोप टाळता येणे अशक्य आहे व त्यामुळे 'लोपश्श्च' या स्थली दोन शकार दिसू शकणार नाहीत आणि भाष्यकाराचे म्हणणे असङ्गत–चूक–ठरण्याची आपत्ति येते हे अगदी उघड आहे. (दीक्षितानी 'संयोगान्तस्य' हे 'पदस्य' या अनुवृत्त पदाचे विशेषण

मानून 'अलोऽन्त्यस्य' सू. ४२ या परिभाषेच्या सहायानें प्रकृत सूत्राचा कौमुदींत दिलेला अर्थ केला आहे. या अर्थान्वयें असें कोणतें इष्ट रूप सिद्ध होऊं शकत नाहीं कीं जें प्रकाशकारांनीं केलेल्या वरील अर्थान्वयेंच सिद्ध होऊं शकतें? तसें एक देखील उदाहरण देतां येणें शक्य नसल्यामुळें व दीक्षितांनीं केलेल्या अर्थान्वयें सर्व इष्ट रूपांची सिद्धि होऊं शकत असल्यामुळें, प्रकाशकारांनीं प्रकृत सूत्राचा भिन्न तऱ्हेचा अर्थ करण्यांत जी बरीच खटपट व ओढाताण केली आहे ती व्यर्थ ठरते. एवढेंच नव्हें तर त्यांनीं केलेला अर्थ बरोबर मानल्यास, 'अभ्यासलोपश्श्च' असा जो भाष्यांत द्विशकारक निर्देश केला आहे त्याशीं विरोध येतो व तो निर्देश चूक ठरण्याची आपत्ति येते; कारण त्यांचें म्हणणें बरोबर मानल्यास, प्रकृत सूत्रांतून असा अर्थ निष्पन्न होतो कीं, जो हल् संयोगाच्या अन्तीं असून पदाच्या अन्तीं आहे त्याचा लोप होतो व तो संयोग पदाच्या अन्तीं असला पाहिजे याची कांहीं आवश्यकता नाहीं. पण दीक्षितांनीं केलेल्या अर्थान्वयें ज्या पदाच्या अन्तीं संयोग आहे तशाच पदांतील संयोगांत असणाऱ्या अन्त्य हलाचा लोप होतो असा या दोन अर्थांमध्यें फरक होतो. म्हणूनच शब्दरत्नकार म्हणतात कीं, प्रकाशकारांनीं केलेला अर्थ बरोबर मानल्यास, भाष्यकारांनीं 'घ्वसोरेत्' या सूत्रांत जो द्विशकारक निर्देश मानला आहे तो चूक ठरण्याची आपत्ति येते. 'अलोऽन्त्यात्पूर्व उपधा' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात— 'अथवा शिल्लोपः करिष्यते स शित्सर्वस्येति सर्वादेशो भविष्यति। स तर्हि शकारः कर्तव्यः। न कर्तव्यः। क्रियते न्यास एव। द्विशकारको निर्देशः। घ्वसोरेद्धावभ्यासलोपश्श्चेति।' या भाष्याचा अर्थ असा आहे कीं, 'दा' धातूचें द्विर्वचन केलें असतां 'घ्वसोरेत्' या सूत्रानें 'दा' या अभ्यासांतील अन्त्य आकाराचा 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषान्वयें लोप होण्याची जी आपत्ति येते ती टाळण्याकरितां 'लोपः' या प्रथमान्त पदानें निर्दिष्ट असलेल्या आदेशाला इत्संज्ञक

शकार जोडावा. असे केल्याने तो लोपरूप आदेश शित् ठरत असल्यामुळे, 'अनेकाल्शित्सर्वस्य' सू. ४५ या सूत्रान्वये सपूर्ण अभ्यासाचा लोप होण्यात काही अडचण येत नाही. साराश भाष्यकारानी 'घ्वसोरेत्' या सूत्रात 'अभ्यासलोपश्श्च' असा द्विशकारक निर्देश मानला आहे. या निर्देशात 'अभ्यासलोपस्' व 'श्' अशी दोन भिन्न पदे आहेत व पूर्व पदातील अन्त्य सकाराचा 'स्तोः श्चुना श्चुः' सू. १११ या सूत्राने शकार झाला आहे. या स्थली प्रथम पदाच्या अन्ती सयोग नसून, सकाराचे जागी झालेला शकार हा 'श्श्' या सयोगातील एकच हल् आहे. त्याच्या पुढे जो द्वितीय शकार आहे तो त्या पूर्व पदाचा अवयव नसून उत्तर पदच आहे. दोन शकार मिळून सयोग होतो व या सयोगातील अन्त्य द्वितीय शकार व्यपदेशिवद्भावानें उत्तर पदाच्या अन्ती आहे असे मानता येते व प्रकाशकारानी केलेला अर्थ बरोबर मानल्यास, त्या द्वितीय सयोगान्त शकाराचा प्रकृत सूत्राने लोप पावतो. पण भाष्यकारानी द्वितीय शकाराचा लोप न करिता वरील निर्देशात दोन्ही शकार कायम ठेवले आहेत व 'द्विशकारको निर्देश.' असे स्पष्ट म्हटले आहे. प्रकाशकारानी जसा अर्थ केला आहे तसा अर्थ भाष्यकाराना अभिप्रेत असता तर त्यानी द्वितीय शकाराचा लोप केला असता व 'लुप्तशकारको निर्देश' असे म्हटले असते. साराश प्रकाशकारानी केलेला अर्थ वरील भाष्याच्या विरुद्ध ठरत असल्यामुळे तो अर्थ बरोबर मानता येत नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.)

**मनोरमा—"यण–" इति वाचनिकम् । यद्वा वाच्यो व्याख्येयः । व्याख्या च द्वेधा—"झलो झलि" इत्यतो झलग्रहणमपकृष्य झल एव लोपो विधीयते इति, अन्तरङ्गे लोपे कर्तव्ये बहिरङ्गस्य यणोऽसिद्धत्वमिति वा । न च षाष्ठी असिद्धपरिभाषा त्रिपादीस्थत्वेनासिद्धमन्तरङ्गं लोपं न पश्यतीति वाच्यम्, कार्यकालपक्षाभ्युपगमात् ।**

न च "नाजानन्तर्ये बहिष्ट्वप्रक्लृप्तिः" इति निषेधः, तस्यानित्यत्वात्, उत्तरकालप्रवृत्ते लोपे अजानन्तर्याभावाच्च। तथा च वार्तिकम्–"संयोगान्तस्य लोपे यणः प्रतिषेधः," "न वा झलो लोपाद्," "बहिरङ्गलक्षणत्वाद्वा" इति। इह यथोद्देशपक्षे आद्यं वार्तिकद्वयम्, तृतीयं तु कार्यकालपक्षे इति विवेकः। यत्त्वाहुः—वार्तिककृतो वचनं, प्रत्याख्यानप्रकारद्वयं तु भाष्यकृत इति, तन्निर्मूलम्, मतभेदे प्रमाणाभावात्। यदप्याहुः—काव्यं, कलत्रं, शाल्वं, चाचक्षाणः काव्, कलत्, शाल्, अदभ्रयतेरधव्, इति, तदपि न, पक्षत्रये ऽपि संयोगान्तलोपस्य दुर्लभत्वात्। आद्यपक्षद्वयैकरूप्यार्थं पूर्वं पूर्वमन्तरङ्गं परं परं बहिरङ्गमित्यल्लोपणिलोपयोरसिद्धत्वस्य सुवचत्वात्। अत एव कातन्त्रपरिशिष्टे शुक्लयतेः क्विपि शुक्ल् इत्युदाहृतम्। वान्तयोः क्विपि ऊठो दुर्वारत्वात्। न च स्थानिवत्त्वम्, क्वौ विधिं प्रति तन्निषेधात्, क्विचि "लोपो व्योः–" इति लोपस्य प्रसङ्गाच्च। गिरिवेश्मयतेस्तु क्विपि यणः प्रतिषेधार्थं वचनारम्भपक्षे गिरिवेडित्युचितम्। प्रत्याख्यानपक्षे तु मान्तमेवेति दिक्।

'संयोगान्तस्य लोपः' सू. ५४ या सूत्रावरील कौमुदींत 'यणः प्रतिषेधो वाच्यः' हें जें वार्तिक पठित केलें आहे तें स्वतंत्र वार्तिक मानावें अथवा त्या वार्तिकांतील 'वाच्यः' या पदाचा 'व्याख्येयः' असा अर्थ करावा. 'वाच्यः' या पदाचा 'व्याख्येयः' असा अर्थ केल्यास, 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्राचें दोन प्रकारानें व्याख्यान करतां येतें. व्याख्यानाचा एक प्रकार असा कीं, 'झलो झलि' या उत्तर सूत्रांतून 'संयोगान्तस्य लोपः' या प्रकृत पूर्व सूत्रांत 'झलः' या पदाचें अपकर्षण करावें. तसें केल्यानें 'संयोगान्तस्य झलो लोपः' असें प्रकृत सूत्र होऊन त्या सूत्राचा असा अर्थ होतो कीं, संयोगान्त पदाच्या अन्तीं झल् असला तरच त्याचा लोप करावा. व्याख्यानाचा दुसरा प्रकार असा कीं, अन्तरङ्ग लोपकार्य करतेवेळीं बहिरङ्ग यण् असिद्ध ठरत असल्यामुळें, यणाचा लोप होऊं शकत नाहीं. षष्ठाध्यायांत

पठित असलेल्या (व 'वाह ऊठ्' सू. ३२९ या सापादिक सूत्राने ज्ञापित होणाऱ्या) 'असिद्ध बहिरङ्गमन्तरङ्गे'–प. ५०–या सापादिक परिभाषेला 'सयोगान्तस्य लोप.' या त्रैपादिक सूत्राने होणारा असिद्ध अन्तरङ्ग लोप दिसू शकत नाही अशी कोणी शंका केल्यास, ती शका बरोबर नाही; कारण येथें कार्यकालपक्षाचा स्वीकार केला आहे. ('यण: प्रतिषेधो वाच्य:' हे स्वतंत्र वार्तिक मानावे हा एक पक्ष आहे. दुसरा पक्ष हा की, वार्तिककारानें हे स्वतंत्र वार्तिक केले नसून एवढेंच सांगितले आहे की, 'सयोगान्तस्य लोपः' या सूत्राचे अशा रीतीनें व्याख्यान करावे की, जेणेकरून सयोगान्त पदाच्या अन्ती असणाऱ्या यणाचा लोप होणे टळेल. या व्याख्यानाचे वर सांगितल्या-प्रमाणे दोन प्रकार आहेत. प्रथम प्रकार हा की, प्रकृत सूत्रात 'झलो झलि' या उत्तरसूत्रातून 'झलः' या पञ्चम्यन्त पदाचे अपकर्षण करावे व षष्ठीत त्या पदाचा विपरिणाम करावा. तसे केल्याने सयोगान्त पदाच्या अन्ती असलेल्या झलाचा लोप होतो असा प्रकृत सूत्राचा अर्थ होऊन, यण् झल् नसल्यामुळें सयोगान्त यणाचा लोप होण्याची आपत्ति आपोआपच टळते. व्याख्यानाचा दुसरा प्रकार असा की, सयोगान्त यणाचा लोप होणे हे कार्य निर्निमित्तक, म्हणजे पुढें असणाऱ्या कोणत्याहि निमित्तामुळें न होणारे, असल्यामुळे, ते अन्तरङ्ग ठरून त्याच्या मानाने पुढें असणाऱ्या अच्‌रूप निमित्तामुळें 'इको यणचि' सू. ४७ या सूत्राने होणारे यण्कार्य बहिरङ्ग ठरते व 'अन्तरङ्गे कर्तव्ये जात तत्कालप्राप्तिक च बहिरङ्गमसिद्धम्' या अर्थाच्या वाचक 'असिद्ध बहिरङ्गमन्तरङ्गे'–परि. ५०–या परि-भाषान्वयें सयोगान्तलोपरूप अन्तरङ्ग कार्य करतेवेळी पूर्वी झालेले बहिरङ्ग यण्कार्य असिद्ध ठरते, म्हणजे यणादेश झालाच नाही असे मानणे भाग पडते, व तसे मानल्यानें सयोगान्त यणाचा लोप होण्याची आपत्ति आपोआपच टळते. आता येथें एकाकार अशी शका करतो की, 'असिद्ध बहिरङ्गमन्तरङ्गे' ही परिभाषा अष्टाध्यायीच्या

षष्ठाध्यायांत पठित असलेल्या 'वाह ऊठ्' या सापादिक सूत्रानें झालेल्या होणारी असल्यामुळें व अशा रीतीनें ती तत्सूत्रदेशस्थ ठरत असल्यामुळें, 'संयोगान्तस्य लोपः' या त्रैपादिक सूत्रानें होणारें लोपरूप कार्य तिला दिसत नाहीं; कारण सापादिकशास्त्रदृष्ट्या त्रिपादीचा अभाव आहे, म्हणजे त्रिपादी नाहींच, असें भाष्यांत 'पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ या सूत्राच्या आधारें ठिकठिकाणीं म्हटलें आहे व त्यामुळें संयोगान्तलोप करतेवेळीं ही सापादिक परिभाषा त्रिपादींत उपस्थित होऊं शकत नाहीं आणि त्यामुळें संयोगान्त यण् बहिरङ्ग असून देखील त्याचा लोप टाळतां येणें शक्य नाहीं. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात कीं, 'कार्यकालं संज्ञापरिभाषम्'– परि. ३–म्हणजे विधायक सूत्रानें कार्य करतेवेळीं, मग तें कार्य सापादिक सूत्रानें होणारें असो किंवा त्रैपादिक सूत्रानें होणारें असो, संज्ञासूत्रें व परिभाषा त्या विधायक सूत्राच्या प्रदेशांत उपस्थित होतात–अशी कार्यकालपक्षाची व्याख्या असल्यामुळें व तो पक्ष देखील भाष्यकारांनीं मानला असल्यामुळें, प्रकृत स्थलीं इष्ट रूपांची सिद्धि होण्याकरितां यथोद्देशपक्ष न मानतां कार्यकालपक्षाचा स्वीकार केल्यास, त्रैपादिक संयोगान्तयण्लोपरूप अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं ही परिभाषा सापादिक असून देखील त्रिपादींत उपस्थित होण्यांत कांहीं प्रत्यवाय येत नाहीं व त्या परिभाषेच्या सहायानें यणादेश असिद्ध, म्हणजे झालाच नाहीं असें, ठरून त्याचा लोप होणें आपोआपच टळतें; कारण जर यण्च नाहीं तर त्याचा लोप कसा होऊं शकणार ? यथोद्देशपक्षांत संज्ञासूत्रें व परिभाषा जेथें पठित आहेत तो प्रदेश सोडून विधायकसूत्रप्रदेशांत जात नसल्यामुळें, 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या सापादिक परिभाषेला 'पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ या सूत्रान्वयें असिद्ध ठरत असलेल्या त्रैपादिक शास्त्रानें होणारें कार्य दिसूं शकत नाहीं; कारण सपादसप्ताध्यायीच्या दृष्टीनें त्रिपादीचा अभाव आहे, म्हणजे त्रिपादी विद्यमानच नाहीं, असें भाष्यांत म्हटलें आहे व

त्यामुळें संयोगान्त यण् बहिरङ्ग असून देखील त्याचा लोप होण्याची आपत्ति येते. ही आपत्ति टाळण्याकरितांच दीक्षितांनीं प्रकृत स्थलीं यथोद्देशपक्षाचा आश्रय न करितां कार्यकालपक्षाचा आश्रय केला आहे. हे दोन्ही पक्ष भाष्यांत सांगितले आहेत व जेथें ज्या पक्षाचा आश्रय केल्यानें इष्ट रूपांची सिद्धि होऊं शकते तेथें त्या पक्षाचाच आश्रय करणें उचित आहे; कारण इष्ट रूपांची सिद्धि होणें हाच व्याकरणशास्त्राचा व परिभाषांचा मुख्य हेतु आहे. म्हणून दीक्षित म्हणतात कीं, प्रकृत स्थलीं कार्यकालपक्षाचा आश्रय केल्यानें संयोगान्त यणाचा लोप होण्याची आपत्ति सहज टाळतां येत असल्यामुळें, तोच पक्ष इष्टरूपसिद्धि होण्याकरितां स्वीकारावा.) 'नाजानन्तर्ये बहिष्ट्वप्रक्लृप्तिः'–परि. ५१–ही निषेधक परिभाषा असल्यामुळें यणादेश बहिरङ्ग व असिद्ध ठरत नाहीं असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ती परिभाषा अनित्य आहे. दुसरें असें कीं, ('सुव्युपास्यः' इत्यादि स्थलीं) यणादेशरूप बहिरङ्ग कार्य झाल्यावर प्राप्त होणारें उत्तरकालिक यण्लोपरूप अन्तरङ्गकार्य अचाला होणारें नसल्यामुळें व तसेंच तें कोणत्याहि परनिमित्तामुळें होणारें कार्य नसल्यामुळें, ती परिभाषा ('सुव्युपास्यः' इत्यादि उदाहरणांना) मुळींच लागू पडत नाहीं. ('असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषेची 'नाजानन्तर्ये' ही निषेधक परिभाषा आहे व या निषेधक परिभाषेचा थोडक्यांत असा अर्थ आहे कीं, अचाला कोणत्याहि लगेंच पुढें असणाऱ्या निमित्तामुळें प्राप्त होणारें अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं पूर्वी झालेलें बहिरङ्ग कार्य बहिरङ्ग व असिद्ध ठरत नाहीं. 'सुधी+उपास्यः' या स्थलीं 'सुधी' यांतील अन्त्य ईकाराचे जागीं 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें यणादेश होऊन 'सुध्य्+उपास्यः' अशी स्थिति झाल्यावरच, म्हणजे यणादेशरूप बहिरङ्गकार्य प्रथम झाल्यावरच, 'सुध्य्' या संयोगान्त पदांतील यकारलोपाची प्राप्ति होते. यकारलोपरूप कार्य करणें हें जरी अन्तरङ्ग कार्य आहे व

त्याच्या मानानें यणादेश हें बहिरङ्ग कार्य आहे तरी, संयोगान्त-यण्लोपरूप अन्तरङ्ग कार्य कोणत्याहि पर निमित्तानें अचाला होणारें नसल्यामुळें, 'नाजानन्तर्ये' ही परिभाषा 'सुध्युपास्यः' इत्यादि उदाहरणांना लागू पडत नाहीं असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे व ते असेंहि म्हणतात कीं, ती परिभाषा अनित्य असल्यामुळें, ती प्रकृत स्थलीं लागू पडते असें मानलें तरी, इष्ट रूपांची सिद्धि होण्याकरितां तशा अनित्य परिभाषेचा आश्रय करतां येत नाहीं. या परिभाषेचें विस्तृत विवेचन परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषांतरांत पान २२०–२३२ मध्यें केलें आहे व ती परिभाषा अनित्य कां मानली आहे याचीं कारणें देखील त्या विवरणांत दिलीं आहेत. तें विवरण वाचल्यास वरील मनोरमेचा अर्थ स्पष्टपणें ध्यानांत येईल.) 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्राचें व्याख्यान करण्याचे वर जे दोन प्रकार सांगितले आहेत त्यांचाच अनुवाद करणारीं पुढील तीन वार्तिकें आहेत. (१) 'संयोगान्तस्य लोपे यणः प्रतिषेधः'–म्हणजे 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें लोप करतेवेळीं संयोगाच्या अन्तीं यण् असल्यास त्याचा लोप करूं नये. (२) 'न वा, झलो लोपात्'–म्हणजे अथवा हें वार्तिक मानण्याची कांहींच गरज नाहीं; कारण त्या सूत्रानें संयोगान्त 'झल्'चाच लोप होण्याचें विधान केलें आहे. (३) 'बहिरङ्ग-लक्षणाद्वा'–म्हणजे यणादेशकार्य बहिरङ्ग असून लोपरूपकार्य अन्तरङ्ग असल्यामुळें लोप पावतच नाहीं (व त्यामुळें देखील 'संयोगान्तस्य लोपे यणः प्रतिषेधः' हें वार्तिक अनावश्यक ठरतें.) पहिलीं दोन वार्तिकें यथोद्देशपक्षास लागू पडणारीं असून तृतीय वार्तिक कार्यकाल-पक्षांत लागू पडणारें आहे असा या तीन वार्तिकांत भेद आहे हें लक्षांत ठेवावें. (याचें विवरण पूर्वीं केलेंच आहे.) प्रकाशकारांचें असें म्हणणें आहे कीं, वर दिलेल्या तीन वचनांपैकीं प्रथम वचन वार्तिक-कारानें केलेलें वार्तिक असून, पुढील दोन वचनें वास्तविक वार्तिकें नव्हत व वार्तिककारानें पठित केलेल्या वरील वार्तिकाचें प्रत्याख्यान

करण्याकरिता भाष्यकारानी ही दोन वचनें हेतुरूपानें सांगितली आहेत. पण प्रकाशकारानी हे जे म्हटले आहे त्याला कोणताहि आधार नाही व अशा रीतीने या तीन वचनामध्ये भेद करण्यास काहीच प्रमाण नाही. (जर प्रथम वचनच वार्तिक असते व पुढील दोन वचनें भाष्यकारानी त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान करण्याकरिता स्वत हेतुरूपाने सांगितली असती तर त्यानी भाष्य वेगळ्या रीतीने लिहिले असते. याचे अधिक विवरण शब्दरत्नात करण्यात येईल.) प्रकाशकार असेहि म्हणतात की, 'काव्य, कलत्र, शाल्व, अदभ्र' या शब्दाहून 'तत्करोति तदाचष्टे' या अर्थामध्ये णिच् प्रत्यय केल्याने 'काव्, कलत्, शाल्, अधव्' अशी रूपें होतात. पण हे म्हणणे देखील बरोबर नाही, कारण वरील तीन पक्षापैकी कोणताहि पक्ष स्वीकारला तरी, सयोगान्त यणाचा लोप होऊ शकत नाही. पहिल्या दोन पक्षात जशी रूपें सिद्ध होतात तशीच रूपे तृतीय पक्षात सिद्ध व्हावी याकरिता येथे पूर्वपूर्वकार्य अन्तरङ्ग व उत्तरोत्तर कार्य बहिरङ्ग मानल्याने अकारलोप व णिलोप असिद्ध ठरतात हे म्हणणे सयुक्तिक ठरते. ('प्रातिपदिकाद्धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च' या गणसूत्रान्वये पूर्वी सांगितलेल्या हरदत्तादिकाच्या 'सुबन्तात् णिच्' या मताप्रमाणे 'काव्यम्, कलत्रम्, शाल्वम्, अदभ्रम्' या द्वितीयान्त शब्दाहून 'तत्करोति तदाचष्टे' या अर्थामध्ये णिच्प्रत्यय करून नतर क्विप्-प्रत्यय केला असता, 'अम्' या अन्तर्वर्ति द्वितीयाविभक्तिप्रत्याचा 'सुपो धातुप्रातिपदिकयो·' सू. ६५० या सूत्रानें लुक् झाल्यावर त्या चार अदन्त शब्दापुढें णिच्प्रत्यय येत असल्यामुळें 'णौ इष्ठवत्' या अतिदेशान्वये त्या चार शब्दातील टिचा—अन्त्य अकाराचा—'टे.' सू. १७८६ या सूत्रानें लोप होऊन व 'णेरनिटि' सू २३१३ या सूत्राने णिच्प्रत्ययाचा आणि 'वेरपृक्तस्य' सू ३७५ या सूत्राने 'क्विप् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन 'काव्य्, कलत्र्, शाल्व्, अदभ्र्' अशी रूपें होतात. 'अम्' या विभक्तिप्रत्ययाच्या योगानें

प्राप्त झालेली पदसंज्ञा त्या प्रत्ययाचा लुक् झाल्यावर देखील 'प्रत्यय-लोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ या सूत्रान्वयें कायम राहत असल्यामुळें, वरील चार शब्दांच्या एकदेशविकृत रूपांना देखील 'एकदेशविकृत-मनन्यवत्'–परि. ३७–या न्यायान्वयें पदसंज्ञा होते. या चारहि एकदेशविकृत पदांच्या अन्तीं संयोग असून त्या संयोगांतील अन्त्यवर्ण यण् आहे, म्हणजे 'काव्य्' या पदाच्या अन्तीं यकार, 'कलत्र्, अदभ्र्' या पदांच्या अन्तीं रकार व 'शाल्व्' या पदाच्या अन्तीं वकार हा यण् आहे. हा यण् पदाच्या अन्तीं असलेल्या संयोगाच्या अन्तीं असल्यामुळें, 'संयोगान्तस्य लोपः' या प्रकृत सूत्रान्वयें त्या यणाचा लोप पावला आहे. हें खरें कीं, 'यणः प्रतिषेधो वाच्यः' असें वार्तिक-कारानें प्रकृत सूत्रावर निषेधक वार्तिक पठित केलें आहे व त्या वार्तिकान्वयें संयोगान्त यणाचा लोप होऊं शकत नाहीं. पण भाष्य-कारांनीं त्या वार्तिकाचें प्रत्याख्यान केलें आहे व त्याचें प्रत्याख्यान करतेवेळीं जे दोन हेतु दिले आहेत त्यांपैकीं 'बहिरङ्गलक्षणाद्वा' हा एक हेतु आहे. हा जो हेतु भाष्यकारांनीं दिला आहे त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, संयोगान्त यण् बहिरङ्ग असल्यास, म्हणजे पुढें असलेल्या अच्रूप निमित्तामुळें 'इको यणचि' या सूत्रानें झालेला असल्यास, तो 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे'–परि. ५०–या परिभाषान्वयें निर्निमित्तक संयोगान्त लोपाच्या मानानें बहिरङ्ग ठरत असल्यामुळें असिद्ध ठरतो व अशा असिद्ध यणाचा लोप होऊं शकत नाहीं. पण जेथें संयोगान्त यण् स्वतःसिद्ध असून पुढें असणाऱ्या निमित्तामुळें झालेला नाहीं तशा स्वतःसिद्ध यणाचा लोप, 'यणः प्रतिषेधो वाच्यः' या वरील वार्तिकाचें भाष्यकारांनीं प्रत्याख्यान केलें असल्यामुळें, प्रकृत सूत्रान्वयें होऊं शकतो. वरील चार उदा-हरणांत संयोगान्त यण् स्वतःसिद्ध असून बहिरङ्ग व असिद्ध नसल्या-मुळें, त्या यणाचा लोप होण्यांत भाष्यकारांचें वचन आड येत नाहीं असा प्रकाशकारांच्या म्हणण्याचा आशय दिसतो. दुर्दैवानें प्रकाशटीका

येथें उपलब्ध नाहीं व प्रकाशकारांनीं वरील चार उदाहरणांसंबंधानें आपल्या टीकेंत काय म्हटलें आहे हें कळण्यास कांहीं मार्ग नाहीं व टीकाकारांनीं देखील शब्दरत्नावरील टीकेंत त्यांचा–प्रकाशकारांचा–आशय स्पष्ट केला नाहीं. तथापि प्रकाशकारांच्या म्हणण्याची सङ्गति लावण्याकरितां त्यांचा वर सांगितल्याप्रमाणें आशय असावा असें वाटतें. या वरील चार उदाहरणांसंबंधानें दीक्षितांचें असें म्हणणें आहे कीं, 'यणः प्रतिषेधो वाच्यः' हें वार्तिक मानल्यास, या प्रथम पक्षांत प्रकाशकारांनीं दिलेल्या वरील चारहि उदाहरणांत संयोगान्त यण् असल्यामुळें त्याचा लोप होऊं शकत नाहीं. वार्तिककारानें वरील वार्तिक पठित करून पुढें असें म्हटलें आहे कीं, तें वार्तिक पठित करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं व असें सांगतांना वार्तिककारानें लगेंच पुढें दोन स्वतंत्र वार्तिकें पठित केलीं आहेत. तीं वार्तिकें भाष्यकारांचें हेतुरूपानें प्रगट केलेलें मत नसून स्वतंत्र वार्तिकें असल्यामुळें व भाष्यकारांनीं त्यांचें प्रत्याख्यान केलें नसल्यामुळें, तीं प्रमाणभूत मानणें भाग आहे. म्हणून 'न वा, संयोगान्तस्य झलो लोपात्' हें द्वितीय वार्तिक मानल्यास, या द्वितीय पक्षांत देखील, वरील चारहि उदाहरणांत संयोगान्त यण् असून झल् नसल्यामुळें, त्याचा लोप होऊं शकत नाहीं. आतां राहिला तृतीय पक्ष, म्हणजे, 'बहिरङ्गलक्षणाद्वा' हा अखेरचा पक्ष. वरील चारहि उदाहरणांत संयोगान्त यण् बहिरङ्ग नसून स्वतःसिद्ध आहे हें वर सांगितलेंच आहे. मग या तृतीय पक्षांत तशा स्वतःसिद्ध संयोगान्त यणाचा लोप कां होऊं नये ? या प्रश्नाचें दीक्षित असें उत्तर देतात कीं, वार्तिकारम्भपक्षांत जशा प्रकारचीं रूपें सिद्ध होतात तशाच प्रकारचीं रूपें वार्तिकप्रत्याख्यानपक्षांत देखील सिद्ध होत असलीं तरच प्रत्याख्यान योग्य ठरतें असा सिद्धान्त असल्यामुळें व वार्तिकारम्भपक्षांत संयोगान्त यणाचा लोप होऊं शकत नसल्यामुळें, वरील सिद्धान्तान्वयें वार्तिकप्रत्याख्यानपक्षांत देखील संयोगान्त यणाचा लोप होऊं शकत नाहीं असेंच मानलें पाहिजे.

द्वितीय पक्षांत संयोगान्त झलाचाच लोप होऊं शकतो व संयोगान्त यणाचा लोप होऊं शकत नाहीं हें वर सांगितलेंच आहे व हा द्वितीय पक्ष प्रत्याख्यानपक्षाचा एक प्रकार असून तृतीय पक्ष हा दुसरा प्रकार आहे व द्वितीय पक्षांत प्रथम पक्षांत सिद्ध होणारीं रूपेंच सिद्ध होतात. म्हणून तृतीय पक्षांत देखील तशींच रूपें सिद्ध झालीं पाहिजेत व तशीं रूपें सिद्ध होण्याकरितां 'पूर्वपूर्वस्थानिकमन्तरङ्गमुत्तरोत्तर-स्थानिकं वहिरङ्गम्' या न्यायाचा आश्रय केल्यानें प्रथम दोन पक्षांत सिद्ध होणारीं रूपें तृतीय पक्षांत देखील सिद्ध होऊं शकतात. तीं कशीं सिद्ध होऊं शकतात हें पुढील प्रक्रियेवरून ध्यानांत येईल. 'काव्य + अम् + णिच् + क्विप्' या स्थलीं, पूर्वी सांगितल्याप्रमाणें 'अम्' या अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा लुक् होऊन 'काव्य + णिच् + क्विप्' अशी स्थिति झाली असतां, 'काव्य' यांतील अन्त्य अकाराचा व 'णि = इ' चा आणि 'क्विप् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन 'काव्य्' अशी स्थिति होते. येथें ज्या यकाररूप यणाचा लोप करणें आहे तो सर्वांत प्रथम स्थानी असून ज्या टिरूप अकाराचा लोप झाला आहे तो द्वितीय स्थानी आहे व 'णिच् = इ' हा तृतीय स्थानी आहे. म्हणून 'पूर्वपूर्वस्थानिकमन्तरङ्गम्' या वरील न्यायान्वयें यकारलोप सर्वांत अन्तरङ्ग ठरतो व त्याच्या मानानें अकारलोप वहिरङ्ग व अकारलोपाच्या मानानें णिलोप वहिरङ्ग ठरतो व 'असिद्धं वहिरङ्ग-मन्तरङ्गे'—प. ५०—या परिभाषान्वयें यकारलोप करतेवेळीं वहिरङ्ग अकारलोप व णिलोप असिद्ध ठरत असल्यामुळें, म्हणजे अकाराचा व 'णि = इ' चा लोप झालाच नाहीं असें मानावें लागत असल्यामुळें, यकार हा पदांतील संयोगाच्या अन्तीं आहे असें मुळींच मानतां येत नाहीं; कारण वर सांगितल्याप्रमाणें त्या यकारापुढें ज्या 'अ' व 'इ' चा लोप झाला आहे ते विद्यमान आहेत असें मानावें लागतें. असें मानलें असतां, तृतीय पक्षांत देखील संयोगान्त यणाच्या लोपाची आपत्ति टळते. हीच वर दिलेली प्रक्रिया प्रकाशकारांनीं दिलेल्या

बाकी तीन उदाहरणांना देखील लागू पडते व पहिल्या दोन पक्षांत जशीं रूपें सिद्ध होतात तशींच रूपें तृतीय पक्षांत देखील सिद्ध होऊं शकतात असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे.) संयोगान्त यणाचा लोप होत नाहीं म्हणूनच, 'शुक्ल' या प्रातिपदिकाहून (पूर्वी सांगितल्याप्रमाणें 'तत्करोति तदाचष्टे' या अर्थामध्यें) णिच् व क्विप् प्रत्यय केला असतां 'शुक्ल्' असें रूप सिद्ध होतें असें कातन्त्रपरिशिष्टांत म्हटलें आहे. ('शुक्ल्' या उदाहरणांत पदाच्या अन्तीं 'क्ल्' हा जो संयोग आहे त्याचा अन्त्य वर्ण लकार हा स्वतः-सिद्ध यण् आहे व संयोगान्त यणाचा लोप होऊं शकला असता तर, 'शुक्ल्' असें रूप न होतां 'शुक्' असें रूप सिद्ध होतें असें वरील ग्रन्थांत म्हटलें असतें असा दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) दुसरें असें कीं, 'काव्' व 'शाल्व्' या दोन वकारान्त शब्दांना 'क्विप्' प्रत्ययाच्या निमित्तानें प्राप्त होणारा 'ऊठ्' टाळणें अशक्य आहे. 'ऊठ्'चें निवारण करण्याकरितां येथें ('अचः परस्मिन्' सू. ५० या सूत्रानें अकारलोपाचे व णिलोपाचे ठिकाणीं) स्थानिवद्भाव करतां येत नाहीं; कारण 'क्वौ विधि प्रति न स्थानिवत्' असें स्थानिवद्भावाचें निषेधक वचन आहे. 'काव्य' शब्दाहून (क्विप्प्रत्यय न करितां) 'विच्' प्रत्यय केल्यास, 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें वकारलोप होण्याची आपत्ति येते. ('काव्य + अम् + णिच् + क्विप्' या स्थलीं वर सांगितल्याप्रमाणें 'काव्य्' असें रूप झाल्यावर 'यणः प्रतिषेधो वाच्यः' हें वार्तिक असल्यामुळें, वास्तविक संयोगान्त यकाराचा लोप होऊंच शकत नाहीं. 'क्विप् = व्' हा वलादि प्रत्यय पुढें असल्यामुळें, 'लोपो व्योर्वलि' या सूत्रानें यकाराचा लोप केला तरी 'काव्' असें रूप सिद्ध होऊं शकत नाहीं; कारण क्विप् हा कित्प्रत्यय पुढें असल्यामुळें 'च्छ्वोः शूठ्' सू. २५६१ या सूत्रानें 'काव्' यांतील अन्त्य वकाराचे जागीं 'ऊठ्' आदेश होऊन 'का + ऊ' अशी स्थिति झाली असतां, 'एत्येधत्यूठ्सु' सू. ७३ या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊन 'कौ'

असें रूप होईल. त्याचप्रमाणें 'शाल्व + अम् + णिच् + क्विप्' या स्थलीं 'शाल्व्' असें रूप झाल्यावर, 'च्छ्वोः शूठ्' हें परसूत्र 'लोपो व्योर्वलि' या पूर्व सूत्राचें बाधक सूत्र असल्यामुळें व 'संयोगान्तस्य लोपः' हें त्रैपादिक सूत्र त्या सापादिक शास्त्राच्या दृष्टीनें 'पूर्वत्रा-सिद्धम्' सू. १२ या वचनान्वयें असिद्ध असल्यामुळें, 'च्छ्वोः शूठ्' हें सूत्र प्रथम प्रवृत्त होऊन 'शाल्व्' यांतील अन्त्य वकाराचे जागीं 'ऊठ् = ऊ' झाला असतां, 'शाल् + ऊ = शालू' असें रूप होईल व 'शाल्' असें रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. 'काव्य, शाल्व' या दोन स्थलीं 'टेः' सू १७८६ या सूत्रानें जो अन्त्य अकाराचा लोप झाला आहे व तसेंच 'णेरनिटि' सू. २३१३ या सूत्रानें जो 'णि = इ' प्रत्ययाचा लोप झाला आहे त्या दोन्ही लोपरूप अजादेशांचे ठिकाणीं 'अचः परस्मिन्' सू. ५० या सूत्रानें स्थानिवद्‌बुद्धि केल्यानें वकाराच्या व क्विप्प्रत्ययाच्या मध्यें 'अ' व 'णि = इ' यांचें व्यवधान आहे असें मानावें लागत असल्यामुळें वकाराचे जागीं 'ऊठ्' पावत नाहीं, पण संयोगान्तलोपरूप त्रैपादिक कार्य करतेवेळीं 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्' या वार्तिकान्वयें अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नसल्यामुळें 'काव्य्' व 'शाल्व्' यांतील संयोगान्त यणाचा प्रकृत सूत्रानें लोप होऊन 'काव्' व 'शाल्' अशीं रूपें सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं असें प्रकाशकारांचें म्हणणें असल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'क्वौ विधिं प्रति न स्थानिवत्'—म्हणजे क्विप्रत्ययाच्या निमित्तानें होणारें कांहीं कार्य करणें झाल्यास, अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नाहीं—असें स्थानिवद्भाव-निषेधक वचन असल्यामुळें व वरील दोन्ही उदाहरणांत क्विप् या कित् प्रत्ययाच्या निमित्तानें प्रथम प्राप्त झालेलें 'च्छ्वोः शूठ्' या सूत्रानें सापादिक ऊठ्कार्य करणें असल्यामुळें, अकारलोपाचे व णिलोपाचे ठिकाणीं ते विद्यमानच आहेत अशी स्थानिवद्भावानें बुद्धि करतां येत नाहीं व त्यामुळें 'ऊठ्' टाळतां येणें अशक्य आहे आणि

'ऊठ्' केल्यास, 'कौ' व 'शालू' अशीं वर सांगितल्याप्रमाणें रूपें सिद्ध होतील व 'काव्' व 'शाल्' अशीं रूपें मुळींच सिद्ध होऊं शकणार नाहींत. आतां 'काव्य' व 'शाल्व' यांच्या द्वितीयान्तांहून णिच्प्रत्यय केल्यावर नंतर क्विप्प्रत्यय न करितां 'विच्' प्रत्यय केल्यास, 'शाल्व + अम् + णिच् + विच् = शाल्व + विच्' अशी, 'अम्' या विभक्तिप्रत्ययाचा लुक्, 'अ' या टिचा व णिच्प्रत्ययाचा लोप होऊन, स्थिति झाली असतां, 'शाल्व्' यांतील अन्त्य वकारापुढें 'विच्' प्रत्ययांतील वकार हा वल् आला असल्यामुळें, 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें त्या अन्त्य वकाराचा लोप पावतो. 'न पदान्त' या सूत्रांत वकारलोप करतेवेळीं स्थानिवद्भावाचा निषेध केला नसल्यामुळें, अकारलोपाचे व 'णि = इ' लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येतो व त्यामुळें 'शाल्व्' व 'विच्' या दोहोंमध्यें 'अ' व 'णि = इ' यांचें व्यवधान आहे असें मानावें लागत असल्यामुळें वकाराचा लोप होऊं शकत नाहीं व 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें 'विच् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप झाल्यावर देखील, 'यणः प्रतिषेधो वाच्यः' हें वार्तिक असल्यामुळें, त्या वकाराचा 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें लोप होऊं शकत नाहीं. 'काव्य + अम् + णिच् + विच्' या स्थलीं वर सांगितल्याप्रमाणें 'काव्य् + विच्' अशी स्थिति झाली असतां, 'काव्य्' यांतील अन्त्य यकारापुढें विच्-प्रत्ययांतील वकार हा वल् आला असल्यामुळें, 'लोपो व्योर्वलि' या सूत्रानें त्या अन्त्य यकाराचा लोप पावला आहे. यकारलोप करतेवेळीं 'न पदान्त' हें स्थानिवद्भावनिषेधक सूत्र लागू पडत असल्यामुळें, अकारलोपाचे व णिलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं आणि त्यामुळें यकाराचा लोप केल्यानें 'काव्' असें रूप होतें. पण हा यकारलोप 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें होत नसून 'लोपो व्योर्वलि' या सूत्रानें होतो. म्हणून 'काव्' हें संयोगान्तलोपाचें उदाहरण न ठरतां 'लोपो व्योर्वलि' या सूत्रानें होणाऱ्या वकार-

लोपाचें उदाहरण ठरतें आणि तें जें उदाहरण प्रकाशकारांनीं संयोगान्तलोपाचें उदाहरण मानलें आहे तसें तें मानणें चूक ठरतें. येथें हें लक्षांत ठेवावें कीं, वरील दोन उदाहरणांत क्विप्प्रत्यय न करितां 'विच्' प्रत्यय केला असल्यामुळें व तो 'विच्' प्रत्यय कित् नसल्यामुळें, अन्त्य वकाराचे जागीं 'ऊठ्' ची प्राप्ति होत नाहीं.) 'गिरिवेश्मन्' या शब्दाहून णिच् व नंतर क्विप्प्रत्यय केला असतां, संयोगान्त यणाचा लोप न व्हावा याकरितां 'यणः प्रतिषेधो वाच्यः' हें वार्तिक केलें आहे असा वार्तिकारंभपक्ष मानला तर, 'गिरिवेड्' असेंच रूप होणें योग्य आहे. पण त्या वार्तिकाचें प्रत्याख्यान केलें आहे असा पक्ष मानला तर, त्या वार्तिकप्रत्याख्यानपक्षांत 'गिरिवेश्म्' असें मकारान्तच रूप सिद्ध होऊं शकतें. (गिरिवेश्मन् + अम् + णिच् + क्विप्' या स्थलीं 'अम्' चा लुक् केल्यावर इष्ठवद्भावानें 'गिरिवेश्मन्' यांतील 'अन्' या 'टि' चा 'टेः' सू. १७८६ या सूत्रानें लोप होऊन व पूर्वी सांगितल्याप्रमाणें णिच् व क्विप्प्रत्ययांचा लोप होऊन 'गिरिवेश्म्' असें रूप होतें. 'यणः प्रतिषेधो वाच्यः' हें वार्तिक मानल्यास, येथें पदान्त संयोगाच्या अन्तीं असलेला मकार यण् नसल्यामुळें 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें त्या संयोगान्त मकाराचा लोप होऊन 'गिरिवेश्' असें रूप होतें व 'व्रश्चभ्रस्ज' सू. २९४ या सूत्रानें पदान्तीं असलेल्या शकाराचा षकार होऊन व 'झलां जशोऽन्ते' सू. ८४ या सूत्रानें त्या षकाराचा डकार होऊन 'गिरिवेड्' असें रूप सिद्ध होतें. पण वार्तिकप्रत्याख्यानपक्ष मानला व संयोगान्त झलाचाच लोप होतो असें मानलें तर, 'गिरिवेश्म्' यांतील सयोगान्त मकार झल् नसल्यामुळें त्याचा लोप न होतां 'गिरिवेश्म्' असें मकारान्तच रूप होऊं शकतें.)

शब्दरत्न—अपकृष्येति । तच्च षष्ठ्या विपरिणम्य वाक्यभेदेन सम्बध्यते । तेन पूर्ववाक्यस्य क्वचिदझल्यपि प्रवृत्तिः । उत्तरवाक्येन च तस्य क्वाचित्कत्वं ज्ञाप्यते । तेन च नातिप्रसङ्गः । ध्वनितं चेदम्

"अमो मश्" इत्यत्र भाष्ये । तत्र हि मद्वयात्मकमादेशं विधाय शित्त्वं प्रत्याख्यातम् । एकस्य मस्य संयोगान्तलोप इति च कैयटेन व्याख्यातम् । अनित्यत्वादिति । तत्र च ज्ञापकं "केऽणः" इति निर्देशः । 'क इ अणः' इति स्थिते लक्ष्यगतपरत्वमाश्रित्य प्राप्त इकारस्य यण् असिद्धपरिभाषया तत्र व्यावर्त्यते। "अन्तरङ्गं बलीयः" इति परिभाषान्तरं नास्त्येवेति भावः । वस्तुतः "ओमाङोश्च" इत्याङ्ग्रहणादनित्यमिदम् । तद्धि 'शिव आ इहि' इति स्थिते परमपि सवर्णदीर्घं बाधित्वा धातूपसर्गकार्यत्वेनान्तरङ्गत्वादाद्गुणे वृद्धि-बाधनार्थम् । उदाहरणं तु अक्षद्यूरिति । अन्यथा अन्तरङ्गे यण्यूठसिद्धः स्यात् । मतभेद इति । न वेति वाशब्दस्वारस्येन वचनारम्भवादिन एव प्रत्याख्यानप्रकारो, भाष्यकृत्तु 'तर्हि वक्तव्यं न वक्तव्यम्' इत्यादिशब्दैरेव प्रत्याचष्टे, इति सर्वं वार्तिककृत एवेति भावः ।

'झलो झलि' या उत्तर सूत्रांतून 'संयोगान्तस्य लोपः' या पूर्व सूत्रांत 'झलः' या पञ्चम्यन्त पदाचें अपकर्षण करून व त्या पदाचा षष्ठींत विपरिणाम करून तें पद प्रकृत सूत्रांत वाक्यभेदानें संबद्ध होतें– म्हणजे प्रकृत सूत्र प्रथम वाक्य होऊन 'झलः' हें पद वेगळें द्वितीय वाक्य होतें व या द्वितीय वाक्यांत प्रथम वाक्याची अनुवृत्ति होऊन व अशा रीतीनें द्वितीय वाक्य प्रथम वाक्याशी संबद्ध होऊन 'संयोगान्तस्य झलो लोपः' असें द्वितीय वाक्य होतें. अशीं दोन वाक्यें केल्यानें 'संयोगान्तस्य लोपः' हें पूर्व वाक्य क्वचित् स्थलीं संयोगाच्या अन्तीं झल् नसून देखील तशा झल्भिन्न वर्णाचा लोप करण्यास प्रवृत्त होऊं शकतें. तें पूर्व वाक्य क्वचित् स्थली लागू पडतें हें 'झलः' या उत्तर वाक्यावरून ज्ञापित होतें. असें मानल्यानें ('सुध्युपास्यः' इत्यादि स्थलीं) अतिप्रसङ्गरूप दोष येत नाहीं, म्हणजे यकारलोप होण्याची आपत्ति टळते. 'अमो मश्' ७.१.४० या सूत्रावरील भाष्यांत हें ध्वनित केलें आहे. त्या भाष्यांत भाष्यकारांनीं 'मश्'चे जागीं

'म्म्' अशा आदेशाचें विधान करून शित्वाचें प्रत्याख्यान केलें आहे व त्या भाष्याच्या वृत्तींत कैयटानें असें म्हटलें आहे कीं, 'म्म्' यांतील एक, म्हणजे अन्त्य, मकाराचा 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें लोप झाला आहे. (पूर्व सूत्रांतून उत्तर सूत्रांत एखादें पद आणल्यास त्याला अनुवृत्ति म्हणतात व उत्तर सूत्रांतून पूर्व सूत्रांत एखादें पद नेल्यास त्याला अपकर्षण म्हणतात आणि हाच अनुवृत्ति व अपकर्षण या दोहोंत फरक आहे हें लक्षांत ठेवावें. 'झलो झलि' हें उत्तर सूत्र असून 'संयोगान्तस्य लोपः' हें पूर्व सूत्र आहे. या पूर्व सूत्रांत 'झलो झलि' या उत्तर सूत्रांतून 'झलः' हें पद नेलें असल्यामुळें त्याचें अपकर्षण केलें आहे असें म्हटलें आहे. 'झलो झलि' या सूत्रांतील 'झलः' हें पञ्चम्यन्त पद आहे व त्याचा 'झलः परस्य' असा अर्थ आहे. 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रांत 'झलः' या पदाचें अपकर्षण करून तें पद विभक्तिविपरिणामानें षष्ठ्यन्त करावें व प्रकृत सूत्राचीं 'संयोगान्तस्य लोपः' व 'झलः' अशीं योगविभागानें दोन भिन्न वाक्यें करावीं. द्वितीय वाक्यांत प्रथम वाक्याची अनुवृत्ति करावी व तसें केल्यानें 'संयोगान्तस्य झलो लोपः' असें तें द्वितीय वाक्य होतें. हें खरें कीं, 'संयोगान्तस्य लोपः' या प्रथम वाक्यानें संयोगान्त झलाचा व तसेंच संयोगान्त झलभिन्न वर्णाचा देखील लोप पावतो व त्यामुळें द्वितीय वाक्य निरर्थक ठरूं पाहतें. परंतु 'संयोगान्तस्य झलो लोपः' हें द्वितीय वाक्य योगविभाग करून मुद्दाम तयार केलें असल्यामुळें, तें वाक्य निरर्थक न ठरावें व दोन्ही वाक्यांची उपपत्ति लागावी याकरितां प्रथम वाक्याचा संकुचित अर्थ करणें आवश्यक आहे व तो असा कीं, क्वचित् स्थलीं इष्ट रूपांची सिद्धि करण्याकरितां संयोगान्त झल्भिन्न वर्णाचा, तो झल्भिन्न वर्ण यण् नसल्यास, लोप करावा. संयोगान्त यणाचा लोप केल्यास इष्ट रूपें सिद्ध न होतां अनिष्ट रूपें सिद्ध होण्याची आपत्ति येईल व 'योगविभागादिष्टसिद्धिः'—परि. १२३—या न्यायांन्वयें योगविभाग इष्ट रूपांची सिद्धि

होण्याकरितांच केला जात असल्यामुळें, प्रकृत स्थलीं योगविभागानें तयार केलेल्या दोन वाक्यांचा अशा रीतीनें अर्थ केला पाहिजे कीं, जेणेंकरून सर्व इष्ट रूपांची सिद्धि होईल. 'संयोगान्तस्य झलः एव लोपः स्यात् न तु झल्भिन्नस्य' असा द्वितीय वाक्याचा नियामक अर्थ केल्यास, जो झल्भिन्न वर्ण यण् नाहीं तशा झल्भिन्न वर्णाचा केव्हांहि लोप होऊं शकणार नाहीं व 'अमो मश्' ७·१·४० या सूत्रावरील भाष्याशीं विरोध येईल; कारण त्या भाष्यांत भाष्यकारांनीं संयोगान्त मकार झल् नसून देखील त्याचा लोप केला आहे. त्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतातः—'किमर्थः शकारः ? । शकारः सर्वादेशार्थः । शित्सर्वस्येति सर्वादेशो यथा स्यात् । अक्रियमाणे हि शकारेऽलोन्त्यस्य विधयो भवन्तीत्यन्त्यस्य प्रसज्येत ।……एवं तर्हि । द्विमकारको निर्देशः । द्विमकारको निर्देशः करिष्यते' व या भाष्यावर टीका करितांना कैयटानें 'अमो म्मेति करिष्यते, भिन्नजातीय-वर्णद्वयोच्चारणे प्रयत्नस्य गौरवं भवति, समानजातीयवर्णद्वये तु लाघवात् । तत्रैकस्य मकारस्य संयोगान्तलोपः करिष्यते'। असें म्हटलें आहे. या वरील भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, 'अमो मश्' या सूत्रांत 'मश्' चे जागीं 'म्म्' पठित करावा असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे व तो आदेश अनेकाल् असल्यामुळें, 'अनेकाल्शित्सर्वस्य' सू. ४५ या सूत्रानें सर्वादेश होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं असें भाष्यकारांच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे. पण तसा द्विमकारक आदेश केल्यानें संयोगान्त मकाराचें श्रवण होण्याची आपत्ति येईल अशी कोणी शंका केल्यास त्या शंकेवर कैयटानें असें उत्तर दिलें आहे कीं, भाष्यकारांच्या म्हणण्याचा असा आशय आहे कीं, द्विमकारक आदेश केला तरी संयोगान्त मकाराचा 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें लोप होऊन संयोगान्त मकाराचें श्रवण होण्याची आपत्ति येत नाहीं. यावरून हें स्पष्ट होतें कीं, संयोगान्त मकार झल् नसून देखील भाष्यकारानीं त्याचा प्रकृत सूत्रानें लोप केला आहे आणि या

भाष्याच्या आधारेंच दीक्षितांनीं देखील 'यूयवयौ जसि' सू. ३८८ या सूत्रावरील कौमुदींत सांगितल्याप्रमाणें 'ङे प्रथमयोरम्' सू. ३८२ या सूत्रांत 'अम्' चे जागीं 'अम्म्' असा आदेश मानावा हें सुचवून असें म्हटलें आहे कीं, 'ङे प्रथमयोरमित्यत्र मकारान्तरं प्रश्लिष्य अम् मान्त एवावशिष्यते, न तु विक्रियते' आणि या स्थलीं देखील त्यांनीं संयोगान्त मकाराचा प्रकृत सूत्रानें लोप होतो असें मानलें आहे. सारांश वरील भाष्य सुसंगत ठरण्याकरितां व सर्व इष्टरूपांची सिद्धि होण्याकरितां द्वितीय वाक्य नियामक न मानतां सामान्य वाक्य मानावें व प्रथम वाक्य क्वचित् स्थलीं यण् नसणाऱ्या झल्भिन्न वर्णाचा लोप करण्याकरितां प्रवृत्त होणारें अशा प्रकारचें क्वाचित्क वाक्य मानावें. तसें मानल्यानें संयोगान्त यणाचा लोप होण्याची आपत्ति टळते व सर्व स्थलीं संयोगान्त झलाचा व क्वचित् स्थलीं, म्हणजे जेथें संयोगान्त यण् नाहीं अशा स्थलीं, संयोगान्त झल्भिन्न वर्णाचा देखील लोप होऊन सर्व इष्ट रूपांची सिद्धि होऊं शकते आणि वार्तिकारम्भपक्षांत जीं रूपें सिद्ध होतात तशींच रूपें वार्तिकप्रत्याख्यानपक्षांत देखील सिद्ध होऊं शकतात असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) दीक्षितांनीं मनोरमेंत 'नाजानन्तर्ये'–परि. ५१–ही परिभाषा अनित्य आहे असें जें म्हटलें आहे त्याला 'केऽणः' सू. ८३४ या सूत्रांतील निर्देश ज्ञापक आहे. (वाक्यसंस्कारपक्षांत) 'क + इ + अणः' अशा स्थितींत परलक्ष्याला प्रथम कार्य करावें. या पक्षाचा आश्रय केल्यानें इकाराचे जागीं जो यणादेश प्राप्त होतो तो 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे'–परि. ५०–या परिभाषान्वयें असिद्ध ठरून निवृत्त होतो. (वाक्यसंस्कारपक्षांत उत्तरोत्तर कार्य प्रथम करून नंतर पूर्व पूर्व कार्य करावें असा नियम मानल्यानें 'क + इ + अणः' या स्थलीं 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें यणादेशरूप उत्तर कार्य प्राप्त झालें असल्यामुळें वरील नियमान्वयें तें कार्य प्रथम केल्यास, 'क + यणः' अशी स्थिति होऊन

'आद्गुणः' सू. ६९ या सूत्रानें होणाऱ्या पूर्व कार्याची प्राप्तीच होत नाहीं व 'नाजानन्तर्ये' ही परिभाषा नित्य मानल्यास, 'इ' या अचाला पूर्व निमित्तामुळें 'आद्गुणः' या सूत्रानें प्राप्त झालेलें गुणरूप अन्तरङ्ग पूर्व कार्य करतेवेळीं 'अ' या अच्रूप परनिमित्तामुळें होणारा बहिरङ्ग यणादेश बहिरङ्ग व असिद्ध ठरणार नाही. त्यामुळें गुणरूप एकादेश न होण्याची आपत्ति येईल व 'केऽणः' हा पाणिनीय निर्देश चूक आहे असें मानावें लागेल. पण पाणिनीय निर्देश केव्हांहि चूक मानतां येत नाहीं व त्या निर्देशाची संगति लावण्याकरितां 'नाजानन्तर्ये' ही परिभाषा अनित्य आहे असें मानणें आवश्यक आहे. ती परिभाषा अनित्य मानल्यानें व तिच्या अनित्यत्वामुळें तिची प्रकृत स्थलीं उपस्थिति न केल्यानें परोपस्थितनिमित्तक–पलीकडे असणाऱ्या निमित्तामुळें होणारा–बहिरङ्ग यणादेश सिद्ध न ठरतां 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषान्वयें असिद्ध ठरून पूर्वोपस्थित-निमित्तक–पूर्वी असलेल्या निमित्तामुळें होणारें–गुणैकादेशरूप अन्त-रङ्गकार्य होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं, व तें कार्य करतेवेळी त्या बहिरङ्ग यणादेशरूप उत्तर कार्याची निवृत्ति होऊन व 'एङः पदान्तादति' सू. ८६ या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन 'केऽणः' हा निर्देश सिद्ध होतो व योग्य ठरतो आणि अशा रीतीनें तो निर्देश, वर सांगितल्याप्रमाणें, 'नाजानन्तर्ये' या परिभाषेच्या अनित्यत्वाचा ज्ञापक ठरतो. येथें शंकाकार अशी शंका करतो कीं, 'केऽणः' या स्थलीं पूर्व निमित्तानें प्राप्त होणारें गुणैकादेशरूप कार्य अन्तरङ्ग असून त्याच्या मानानें परनिमित्तानें प्राप्त होणारें यणादेशरूप कार्य बहिरङ्ग असल्यामुळें, जरी तें बहि-रङ्गकार्य पर आहे तरी, 'बहिरङ्गादन्तरङ्गं बलीयः' या परिभाषा-न्वयें बहिरङ्ग यणादेशकार्य पूर्वी करतांच येत नाहीं व गुणैकादेशरूप अन्तरङ्ग कार्य पूर्व कार्य असून देखील तेंच अन्तरङ्गत्वामुळें प्रथम केलें पाहिजे आणि तें प्रथम केल्यास यणादेशाची प्राप्तीच होत नाहीं

व त्यामुळें 'केऽण:' हा निर्देश 'नाजानन्तर्ये' या परिभाषेचा विषयच होऊं शकत नाहीं. म्हणून तो निर्देश 'नाजानन्तर्ये' या परिभाषेच्या अनित्यत्वाचा ज्ञापक आहे असें मुळींच मानतां येत नाहीं. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं,) 'बहिरङ्गादन्तरङ्गं बलीय:' अशी वेगळी परिभाषाच नाहीं. ('पूर्वपरनित्यान्तरङ्गापवादाना-मुत्तरोत्तरं बलीय:'–परि. ३८–व 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे'–परि. ५०–अशा वास्तविक परिभाषा असून 'बहिरङ्गादन्तरङ्गं बलीय:'–म्हणजे बहिरङ्गकार्याच्या मानानें अन्तरङ्गकार्य बलवत्तर ठरतें–अशी परिभाषाच नाहीं; कारण तशी परिभाषा भाष्यांत कोठेंहि पठित नाहीं व भाष्यकारांनीं तशा परिभाषेचा कोठेंहि उपयोग केला नाहीं. म्हणून ती परिभाषा मानतां येत नाहीं आणि वाक्यसंस्कारपक्षांत उत्तरोत्तर कार्य प्रथम करून नंतर पूर्व पूर्व कार्य करावें असा नियम असल्यामुळें, 'क+इ+अण:' या स्थलीं यणादेशरूप परकार्य बहिरङ्ग असून देखील तें प्रथम करणें भाग आहे. तें कार्य प्रथम केल्यावर गुणैकादेशरूप पूर्व अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषान्वयें जर पूर्वी झालेलें यणादेशरूप बहिरङ्गकार्य असिद्ध–म्हणजे झालेंच नाही असें–मानतां आलें तरच् त्या बहिरङ्कार्याची निवृत्ति करून अन्तरङ्गकार्य करतां येतें; पण 'क+इ+अण:' या स्थलीं जें गुणैकादेशरूप पूर्व अन्तरङ्गकार्य करणें आहे तें 'क' यांतील अन्त्य अकारापुढें असलेल्या 'इ' या अचाला प्राप्त होणारें कार्य असल्यामुळें व असें अचाला अन्तरङ्गकार्य करतेवेळीं पूर्वी झालेलें बहिरङ्गकार्य बहिरङ्ग व असिद्ध ठरत नाहीं या अर्थाची 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परि-भाषेची निषेधक 'नाजानन्तर्ये' ही परिभाषा असल्यामुळें, पूर्वी झालेलें यणादेशरूप बहिरङ्गकार्य बहिरङ्ग व असिद्ध मानतां येत नाहीं व तें कार्य सिद्ध मानल्यास त्याची निवृत्ति करतां येऊं शकत नसल्यामुळें, गुणैकादेशरूप अन्तरङ्ग कार्य होऊं शकत नाहीं आणि

'केऽणः' हा पाणिनीय निर्देश चूक ठरण्याची आपत्ति येते. ती निषेधक परिभाषा जर अनित्य मानली व 'केऽणः' या पाणिनीय इष्ट प्रयोगाची सिद्धि करण्याकरितां तिच्या अनित्यत्वामुळें तिची प्रवृत्ति न केली तरच पूर्वी झालेलें यणादेशरूप बहिरङ्ग कार्य गुणैकादेशरूप अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषान्वयें असिद्ध म्हणजे झालेंच नाहीं असें मानतां येतें व त्यामुळें यणादेशरूप बहिरङ्गकार्याची निवृत्ति केल्यानें अन्तरङ्ग गुणैकादेश होऊन 'केऽणः' हा पाणिनीय निर्देश योग्य ठरूं शकतो हें वर सांगितलेंच आहे. म्हणून 'बहिरङ्गादन्तरङ्गं बलीयः' ही काल्पनिक परिभाषा मानून शंकाकारानें जें म्हटलें आहे कीं 'केऽणः' हा निर्देश 'नाजानन्तर्ये' या परिभाषेचा विषयच होऊं शकत नाहीं तें त्याचें म्हणणें वरील विवरणान्वयें चूक ठरतें असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. पण 'नाजानन्तर्ये' ही परिभाषा अनित्य मानल्याशिवाय जरी वाक्यसंस्कारपक्षांत 'केऽणः' हा पाणिनीय निर्देश चूक ठरण्याची आपत्ति येते तरी पदसंस्कारपक्ष मानल्यास, ती आपत्ति सहज टळूं शकते व त्या पक्षांत 'नाजानन्तर्ये' ही परिभाषा अनित्य न मानली तरी त्या पाणिनीय निर्देशाची संगति लावतां येते; कारण 'किम्+ङि = किम्+इ' या स्थलीं 'किमः कः' सू. ३४२ या सूत्रानें 'किम्'चे जागीं 'क' असा आदेश करुन व नंतर 'आद्गुणः' सू. ६९ या सूत्रानें गुणरूप एकादेश करून 'के' हें सप्तम्यन्त पद सिद्ध होऊं शकतेंच व त्या सिद्ध पदापुढें 'अणः' या उत्तर सिद्ध पदांतील अकार आला असल्यामुळें, 'एङः पदान्तादति' सू. ८६ या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन 'केऽणः' हा निर्देश पदसंस्कारपक्षांत योग्य ठरतो. म्हणून तो निर्देश 'नाजानन्तर्ये' या परिभाषेच्या अनित्यत्वाचा ज्ञापक आहे असें मानतां येत नाहीं अशी कोणी शंका केल्यास ती शंका यथार्थ ठरते आणि ती अरुचि मनांत धरूनच आतां शब्दरत्नकार पुढील पंक्तींत त्या निषेधक

मुळें 'शिव+एहि' या स्थलीं 'शिव' यांतील अन्त्य अकारापुढें 'एहि' यांतील 'आङ' हा उपसर्ग असल्यामुळें, म्हणजे 'आङ=आ' व 'इहि' यांतील इकार या दोन स्थानींचे जागीं झालेला 'ए' हा एकादेश 'अन्तादिवच्च' सू. ७५ या सूत्रान्वयें पूर्वान्तवद्भावानें 'आङ' आहे असें मानतां येत असल्यामुळें, 'शिवैहि' असें अनिष्ट रूप न होतां, 'शिवेहि' असा, पररूप एकादेश होऊन, इष्ट प्रयोग सिद्ध होतो व अशा रीतीनें 'ओमाङोश्च' या सूत्रांतील 'आङ' ग्रहण चरितार्थ ठरतें. पण अशा रीतीनें जरी तें आङग्रहण चरितार्थ ठरत असलें तरी त्या योगानें 'नाजानन्तर्ये' या परिभाषेचें अनित्यत्व कसें ज्ञापित होतें हें शब्दरत्नकारांनीं स्पष्टपणें सांगितलें नाहीं. त्यांचा आशय स्पष्ट करण्याकरितां भैरवीकारांनीं असें म्हटलें आहे कीं, 'यदि नाजानन्तर्यपरिभाषा नित्या स्यात्तदाऽनयाऽन्तरङ्गस्य गुणस्याप्रवृत्तिसम्पादने कृते परत्वात्सवर्णदीर्घे गुणेन लक्ष्यस्य सिद्धावाङ्ग्रहणवैयर्थ्यं स्पष्टमेवेति ।' याचा भावार्थ हा आहे कीं, जर 'नाजानन्तर्ये' ही परिभाषा नित्य असती तर 'अकः सवर्णे दीर्घः' या पर सूत्रानें प्राप्त होणारें सवर्णदीर्घरूप बहिरङ्ग कार्य केल्यावर 'आद्‌गुणः' या पूर्व सूत्रानें प्राप्त होणारें गुणैकादेशरूप अन्तरङ्ग कार्य नंतर करतेवेळी तें कार्य 'अ' याच्या पुढें असलेल्या 'इ' या अचाला प्राप्त होणारें कार्य असल्यामुळें पूर्वी झालेलें सवर्णदीर्घरूप बहिरङ्ग कार्य त्या परिभाषान्वयें बहिरङ्ग व असिद्ध न ठरतां सिद्ध ठरलेंच असतें व त्यामुळें 'शिव+आ+इहि=शिवा+इहि=शिवेहि' असा इष्ट प्रयोग सिद्ध होऊं शकलाच असता व 'ओमाङोश्च' या सूत्रांत 'आङ' या पदाचें ग्रहण करण्याची कांहींच गरज नव्हती आणि तें ग्रहण व्यर्थ ठरूं पाहतें. 'नाजानन्तर्ये' ही परिभाषा अनित्य मानली तरच तें ग्रहण चरितार्थ ठरतें; कारण त्या परिभाषेच्या अनित्यत्वामुळें ती परिभाषा वरील उदाहरणांत प्रवृत्त न केल्यानें अन्तरङ्ग गुणैकादेशकार्य प्रथम होऊन व नंतर वृद्धिरूप एकादेश

होऊन 'शिव + आ + इहि = शिव + एहि = शिवैहि' असा जो अनिष्ट प्रयोग होण्याची आपत्ति येत होती तिचें निवारण व्हावें व वृद्धिरूप एकादेश न होतां 'ओमाङोश्च' सू. ८० या सूत्रानें 'ए' असा पररूप एकादेश होऊन 'शिवेहि' असा इष्ट प्रयोग सिद्ध व्हावा याकरितां तें आङ्ग्रहण केलें आहे आणि अशा रीतीनें तें आङ्ग्रहण चरितार्थ ठरून 'नाजानन्तर्ये' या परिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक ठरतें.)

'नाजानन्तर्ये' या परिभाषेचें 'अक्षद्यूः' हें उदाहरण आहे. ही परिभाषा मुळींच न मानल्यास, अन्तरङ्ग यणादेशकार्य करतेवेळीं पूर्वी झालेलें बहिरङ्ग ऊठ्कार्य असिद्ध ठरेल (व त्यामुळें यणादेश होणार नाहीं. 'अक्षैः दीव्यतीति अक्षद्यूः = अक्ष + भिस् + दिव् + क्विप् + सु' अशा स्थितींत 'सुपोधातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें 'भिस्' प्रत्ययाचा लुक् केला असतां, पुढें असलेल्या क्विप् या कित् प्रत्ययाच्या निमित्तामुळें 'च्छ्वोः शूठ्' सू. २५६१ या उत्तर सूत्रानें वकाराचे जागीं 'ऊठ् = ऊ' या आदेशाची प्राप्ति आहे व तें ऊठ्कार्य केल्यावर 'अक्ष + दि + ऊ + क्विप् + सु' अशी स्थिति झाली असतां, 'इको यणचि' सू. ४७ या पूर्व सूत्रानें यणादेशाची प्राप्ति होते. पूर्वी असलेल्या 'ऊ' या निमित्तामुळें होणारें यणादेशकार्य अन्तरङ्ग असून त्याच्या मानानें पलीकडे असलेल्या क्विप् या प्रत्ययाच्या निमित्तामुळें पूर्वी झालेलें ऊठ्कार्य 'पूर्वोपस्थितनिमित्तकमन्तरङ्गं परोपस्थित-निमित्तकं बहिरङ्गम्' या न्यायान्वयें बहिरङ्ग आहे व 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषान्वयें तें ऊठ्कार्य असिद्ध मानल्यास, म्हणजे ऊठ् झालाच नाहीं व वकारच कायम आहे असें मानल्यास, यणादेश होऊं शकत नाहीं व 'अक्षद्यूः' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकत नाहीं. 'नाजानन्तर्ये' ही परिभाषा मानल्यानेंच तें रूप सिद्ध होऊं शकतें. या उदाहरणांत 'ऊठ् = ऊ' हा अच् पुढें असल्यामुळें त्या निमित्ताच्या योगानें त्याच्या लगेंच मागें असलेल्या 'इ' या अचाला, म्हणजे त्याचे जागीं, यणादेश करतेवेळीं पूर्वी झालेलें बहिरङ्ग ऊठ्कार्य 'नाजान-

न्तर्ये' या परिभाषान्वयें बहिरङ्ग व असिद्ध ठरत नसल्यामुळे यणादेश होऊन 'अक्षद्यू:' असे इष्ट रूप सिद्ध होते. साराश हे रूप व अशीच इतर इष्ट रूपे सिद्ध होण्याकरिता 'नाजानन्तर्ये' ही निषेधक परिभाषा जरी अनित्य आहे तरी ती मानणे आवश्यक आहे आणि म्हणूनच 'विप्रतिषेधे परं कार्यम्' १·४ २ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'यद्यसिद्ध बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षणे इत्युच्यते—अक्षद्यू. हिरण्यद्यू — असिद्धत्वाद्बहिरङ्गलक्षणस्योठोऽन्तरङ्गलक्षणो यणादेशो न प्राप्नोति। नैष दोष । असिद्ध बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षणे इत्युक्त्वा ततो वक्ष्यामि—नाजानन्तर्ये बहिष्ट्वप्रक्लृप्तिरिति।' असे म्हटले आहे. या भाष्याचा अर्थ वरील विवरणावरून स्पष्ट होत असल्यामुळे पुन्हा त्याचा अर्थ येथे देण्याची काही गरज नाही. या भाष्यावरून हे स्पष्ट होते की, 'अक्षद्यू, हिरण्यद्यू' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होण्याकरिता भाष्यकारानी 'असिद्ध बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषेची ही निषेधक परिभाषा मुद्दाम पठित केली आहे व ती अनित्य मानली असल्यामुळे जेथे ती प्रवृत्त केल्यास अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येते तेथे तिच्या अनित्यत्वामुळे ती प्रवृत्त न करिता, जेथे ती प्रवृत्त केल्याशिवाय इष्ट रूपाची सिद्धि होत नाही तेथेच ती प्रवृत्त करून इष्ट रूपे सिद्ध करावी. साराश 'अक्षद्यू.' इत्यादि रूपाच्या सिद्धिकरिता ती परिभाषा अनित्य असून देखील मानणे भाग आहे. 'मतभेदे प्रमाणाभावात्' असे जे मनोरमेत म्हटले आहे त्याचे कारण हे की, 'न वा झलो लोपात्' या प्रत्याख्यानपर वचनात 'वा' हा शब्द घातला असल्यामुळें त्या शब्दाच्या प्रयोगसामर्थ्यावरून हे स्पष्ट होते की, ज्यानें 'सयोगान्तस्य लोपे यण प्रतिषेध.' हे वार्तिक आरभिले—पठित केले—आहे त्यानेंच 'न वा झलो लोपात्' हे पक्षान्तर सागून त्या प्रथम वचनाचे प्रत्याख्यान केले आहे. 'तर्हि वक्तव्यम्? । न वक्तव्यम्' अशा तऱ्हेच्या वचनानीच भाष्यकार नेहमी प्रत्याख्यान करीत असतात. म्हणून वर सागितलेली तीन्ही वचनें वार्तिककाराने पठित केलेली

वार्तिकें आहेत हेंच मानणें योग्य आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे.

शब्दरत्न—काविद्यादि । संयोगान्तलोपादिति भावः । ननु पूर्वपूर्वस्थानिकमन्तरङ्गमित्यर्थो न भाष्यसम्मतः, किं तु पूर्वपूर्वनिमित्तकमित्येव । किं च प्रातिपदिकाद् णिजुत्पत्तेरेव भाष्यसंमततया बहिर्भूतसुब्निमित्तकसंयोगान्तलोपोऽपि बहिरङ्ग इत्यरुचेराह—वान्तयोरिति । काव्ये यलोपे स्थानिवत्त्वनिषेधात् "लोपो व्योः" इति कृते वान्तत्वमिति ऊठ् दुर्वारः, अन्त्ये च स्वत एवेति तत्र वलोपं बाधित्वोठ् दुर्वार इत्यर्थः । विचीति । काव्यशब्दे इति शेषः, यलोपे स्थानिवत्त्वनिषेधात् । एवं च प्राचीनोक्तं संयोगान्तलोपोदाहरणत्वमयुक्तमिति भावः । शाल्वे तु अल्लोपादेः स्थानिवत्त्वान्न तत्प्रसक्तिरिति बोध्यम् । मान्तमेवेति । अस्य प्राप्नोतीति शेषः । तस्मात्तत्पक्षेऽपि वाक्यभेदेन व्याख्याय गिरिवेडित्येव । अन्यथाऽऽरम्भप्रत्याख्यानयोः फलभेदः स्यादिति भावः । दिगिति । दिगर्थस्तु संयोगान्तलोप-संयोगादिलोपविषयकतयाऽऽरब्धस्य "यणः प्रतिषेध–" इति वचनस्य संयोगान्तलोपविषयकस्य "झलो लोपात्" इति प्रत्याख्यानम् । अत एव तत्र "संयोगान्तलोपो झलो लोपः" इति भाष्ये व्याख्या कृता । "बहिरङ्गलक्षणत्वाद्वा" इत्यस्य तु बहिरङ्गो यणादेशोऽन्तरङ्गो लोप इति व्याख्यानेन, वार्तिकस्वारस्येन चेदृशानां लक्ष्याणामनभिधानमेव । वस्तुतस्तृतीयं वार्तिकं विसर्जनीयसूत्रभाष्ये कार्यकालपक्षमुपक्रम्य "अयुक्तोऽयं परिहारो नवा बहिरङ्गलक्षणत्वाद्वा" इत्यनेन दूषितमित्यलम् ।

'काव्' इत्यादि मनोरमेंत सांगितलेलीं जीं चार रूपें प्रकाशकारांनीं आपल्या टीकेंत दिलीं आहेत तीं प्रकृत सूत्रान्वयें संयोगान्त यणाचा लोप करून त्यांनीं सिद्ध केलीं आहेत असा दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. येथें अशी शंका करण्यांत येते कीं, 'पूर्व पूर्वमन्तरङ्गं परं परं बहिरङ्गम् = पूर्वपूर्वस्थानिकमन्तरङ्गं परपरस्थानिकं

वहिरङ्गम्' असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे तो पक्ष भाष्यकारांना संमत नसून, 'पूर्वपूर्वनिमित्तकमन्तरङ्गम्, परपरनिमित्तकं वहिरङ्गम्' हाच पक्ष त्यांना संमत आहे. दुसरें असें कीं, प्रातिपदिकाहूनच णिच् प्रत्यय होतो हा पक्ष भाष्यकारांस संमत असल्यामुळें, पुढें असणाऱ्या विभक्तिप्रत्ययाच्या निमित्तामुळें (होणारी पदसंज्ञा व त्या पदसंज्ञेच्या निमित्तामुळें) होणारा संयोगान्त लोप देखील वहिरङ्ग ठरतो (आणि त्यामुळें दीक्षितांचें म्हणणें वरोवर मानतां येत नाहीं. आणि ही शंका यथार्थ मानून) आणि ही अरुचि मनांत धरूनच दीक्षितांनीं 'वान्तयोः क्विपि ऊठो दुर्वारत्वात्' ही पंक्ति पुढें लिहिली आहे. ('पूर्वपूर्वस्थानिकमन्तरङ्गं परपरस्थानिकं वहिरङ्गम्' हा पक्ष भाष्यकारांस मान्य नसून 'पूर्वपूर्वनिमित्तकमन्तरङ्गं परपरनिमित्तकं वहिरङ्गम्' हाच पक्ष भाष्यकारांस मान्य आहे असें जें वर शंकाकारानें म्हटलें आहे त्याला 'प्रकृत्यैकाच्' ६·४·१६३ या सूत्रावरील भाष्य प्रमाण आहे. त्या सूत्राचीं जीं प्रयोजनें वार्तिककारानें सांगितलीं आहेत त्यांपैकीं 'विन्मतोस्तु लुगर्थम्' हें एक प्रयोजन आहे व त्याचा अर्थ हा आहे कीं 'इष्ठ' किंवा 'ईयस्' प्रत्यय पुढें असतां 'विन्मतोर्लुक्' सू. २०२० या सूत्रानें 'विन्' अथवा 'मतुप्' प्रत्ययाचा लुक् झाल्यावर एकाच् अङ्गाच्या 'टि'चा 'टेः' सू. १७८६ या सूत्रानें लोप न व्हावा याकरितां 'प्रकृत्यैकाच्' सू. २०१० हें सूत्र पाणिनीनें केलें आहे. या प्रयोजनाचें खण्डन करितांना भाष्यकार म्हणतात–'इदं तावदयं प्रष्टव्यः, यदि तर्हि विन्मतोर्लुङ्गोच्येत किमिह स्यादिति ? । टिलोप इत्याह । टिलोपश्चेन्नाऽप्राप्ते टिलोपे विन्मतोर्लुगारभ्यते स वाधको भविष्यति यदप्युच्यतेऽसति । खल्वपि सम्भवे वाधन भवति ···। सत्यपि सम्भवे वाधनं भवति । तद्यथा, दधि ब्राह्मणेभ्यो दीयतां तक्रं कौण्डिन्यायेति सत्यपि सम्भवे दधिदानस्य तक्रदान निवर्तकं भवति । एवमिहापि सत्यपि सम्भवे विन्मतोर्लुक् टिलोपं वाधिष्यते ।' या भाष्याचा भावार्थ नीट कळण्या-

करितां आपण 'स्रजिष्ठः' हें उदाहरण घेऊं. 'स्रज्' या शब्दाहून 'अस्मायामेधास्रजो विनिः' सू. १९२८ या सूत्रानें 'विन्' प्रत्यय करून 'स्रग्विन्' असें रूप सिद्ध झाल्यावर त्याहून 'अतिशायने तमविष्ठनौ' सू. २००१ या सूत्रानें 'अयमेषामतिशयेन स्रग्वी' या अर्थामध्यें 'इष्ठन्' प्रत्यय केला असतां 'स्रज् + विन् + इष्ठ' अशी स्थिति होते व 'विन्मतोर्लुक्' हें सूत्र 'टेः' सू. १७८६ या सूत्राचें बाधक सूत्र असल्यामुळें तें सूत्र प्रथम प्रवृत्त होऊन विन्प्रत्ययाचा लुक् झाल्यावर 'स्रज् + इष्ठ' अशी स्थिति झाली असतां, 'स्रज्' यांतील 'अज्' या 'टि'चा जो लोप पावतो त्याचें निवारण व्हावें व टिलोप होऊं नये याकरितां 'प्रकृत्यैकाच्' हें सूत्र केलें आहे व तें सूत्र असल्यामुळें, 'स्रज्' या एकाच् अङ्गाच्या टिचा लोप न होतां तें अङ्ग जसेचें तसेंच कायम राहतें व त्यामुळें 'स्रजिष्ठः' हें इष्ट रूप सिद्ध होतें असें वार्तिककाराचें म्हणणें आहे. यावर भाष्यकार असें म्हणतात कीं, टिलोपबाधनार्थ 'प्रकृत्यैकाच्' हें सूत्र असणें आवश्यक आहे असें जें वार्तिककाराचें म्हणणें आहे तें बरोबर नाहीं; कारण 'विन्मतोर्लुक्' हें सूत्र 'येन नाप्राप्ते–परि. ५८–या न्यायान्वयें टिलोपाचें बाधक सूत्र होत असल्यामुळें, जसें तें विन्प्रत्ययांतील टिलोपाचें बाधक ठरतें तसेंच तें 'सत्यपि सम्भवे बाधनं भवति' या न्यायान्वयें पुढें प्राप्त होणाऱ्या सर्व टिलोपांचें बाधक सूत्र ठरतें व त्यामुळें 'स्रज्' यांतील 'टि'चा लोप होऊं शकत नाहीं. 'पूर्वपूर्वस्थानिकमन्तरङ्गं परपरस्थानिकं बहिरङ्गम्' हा पक्ष जर भाष्यकारांस मान्य असता तर भाष्यकारांनीं असें म्हटलें असतें कीं, 'स्रज् + विन् + इष्ठ' या स्थलीं 'विन्' या परस्थानीचा जो लुक् झाला आहे तो, 'स्रज्' या पूर्वस्थानीच्या 'टि'चा 'टेः' या सूत्रानें लोप करतेवेळीं, बहिरङ्ग ठरतो व 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषान्वयें तो लुक् असिद्ध ठरत असल्यामुळें व झालाच नाहीं असें मानतां येत असल्यामुळें आणि अशा रीतीनें 'स्रज्' व

'इष्ठ' या दोहोंमध्यें 'विन्'चें व्यवधान आहे असें मानणें भाग पडत असल्यामुळें, 'स्रज्' यांतील 'टि' चा लोप होऊं शकत नाहीं. पण असें न म्हणतां भाष्यकारांनीं 'विन्मतोर्लुक्' या बाधक सूत्रानें जो टिलोपाचा बाध झाला आहे तो पुढें प्राप्त होणाऱ्या सर्व टिलोपांचा बाधक होतो असा जातिपक्ष स्वीकारून टिलोपाचें निवारण केलें आहे. यावरून हें स्पष्ट होतें कीं 'पूर्वपूर्वस्थानिकमन्तरङ्गम्' हा पक्ष भाष्यकारांस मान्य नव्हता, आणि या भाष्याचा आधार घेऊनच शब्दरत्नांत दिलेली शंका उपस्थित केली आहे. हा विषय परिभाषेन्दुशेखरांत 'पूर्वपूर्वस्थानिकमन्तरङ्गम्' या पक्षाचें खण्डन करतेवेळीं नागेशांनीं विस्तृत रीतीनें सांगितला आहे व परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषान्तरांत या विषयाचें पान २११–१२ मध्यें विवेचन केलें आहे आणि तें विवेचन वाचल्यास हा विषय नीट ध्यानांत येईल. 'पूर्वपूर्वनिमित्तकमन्तरङ्गम्' हा सिद्धान्त पक्ष मानल्यानें मनोरमेंत दिलेल्या 'काव्' इत्यादि चार उदाहरणांचें खण्डन करितांना दीक्षितांनीं जीं कारणें दिलीं आहेत तीं कारणें अशीं खुळीं ठरतात हें या विवेचनांत पुढें लौकरच सांगण्यांत येईल. दुसरें असें कीं, 'प्रातिपदिकाद्धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च' हें गणसूत्र असल्यामुळें व या गणसूत्रान्वयें प्रातिपदिकाहून णिच् प्रत्यय होणें स्पष्टपणें सांगितलें असल्यामुळें, 'सुबन्तात् णिच्' हा हरदत्तादिकांचा पक्ष मानून दीक्षितांनीं 'काव्' इत्यादि चार उदाहरणांचें जें खण्डन केलें आहे तें बरोबर मानतां येत नाहीं. 'काव्य + अम् + णिच् + क्विप्' असें 'काव्य' याचें प्रक्रियावाक्य होत नसून 'काव्य + णिच् + क्विप्' असेंच वास्तविक प्रक्रियावाक्य होतें. अशा स्थितींत णिच्प्रत्ययाच्या निमित्तामुळें 'काव्य' यांतील अन्त्य अकाराचा 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें व णिच् प्रत्ययाचा 'णेरनिटि' सू. २३१३ या सूत्रानें व क्विप् = व् या अपृक्त प्रत्ययाचा 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें लोप झाल्यावर 'काव्' असें जें रूप होतें तें पदसंज्ञक

नसल्यामुळें, 'संयोगान्तस्य पदस्य लोपः' या प्रकृत सूत्राची प्रवृत्तीच होऊं शकत नाहीं. 'काव्य + णिच् + क्विप्' याहून 'सु' प्रत्यय केला तरच, जरी त्या 'सु' प्रत्ययाचा 'हल्ङ्याब्भ्यः' सू. २५२ या सूत्रानें लोप होतो तरी, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ या सूत्रान्वयें 'काव्य्' याला पदसंज्ञा होते आणि त्यानंतरच 'संयोगान्तस्य लोपः' या प्रकृत सूत्राची प्राप्ति होते. पण 'काव्य + णिच् + क्विप् + सु' या स्थितींत 'काव्य्' याला जी पदसंज्ञा होते ती सर्वांत पलीकडे असणाऱ्या 'सु' या प्रत्ययाच्या निमित्तामुळें प्राप्त होते आणि म्हणून अलोपाच्या व णिलोपाच्या मानानें ती पदसंज्ञा वहिरङ्ग ठरते; कारण अलोपाचें निमित्त जो णिच्प्रत्यय व णिलोपाचें निमित्त जो क्विप्प्रत्यय हीं दोन्हीं निमित्तें 'सु' प्रत्ययाच्या पूर्वी आहेत. म्हणून 'पूर्वपूर्वनिमित्तकमन्तरङ्गं परपरनिमित्तकं वहिरङ्गम्' या न्यायान्वयें अकारलोप व णिलोप हे पदसंज्ञारूप कार्याच्या मानानें व ती पदसंज्ञा प्राप्त झाली असतां तिच्यामुळें प्राप्त होणाऱ्या संयोगान्तलोपरूप कार्याच्या मानानें अन्तरङ्ग ठरतात. त्यामुळें 'काव्य्' यांत संयोगान्त असणाऱ्या यकाराचा लोप करतेवेळीं अकारलोप व णिलोप हे अन्तरङ्ग ठरत असून वहिरङ्ग ठरत नसल्यामुळें असिद्ध मानतां येत नाहींत– म्हणजे अकार व 'णि = इ' विद्यमान आहेत असें मानतां येत नाहीं आणि म्हणून 'अलोपणिलोपयोरसिद्धत्वस्य सुवचत्वात्' असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे तें वरोवर मानतां येत नाहीं असा वरील शंकेचा भावार्थ आहे. दीक्षितांनीं 'सुवन्तात् णिच्' हा पक्ष मानून 'काव्' इत्यादि चार उदाहरणांचें खण्डण केलें होतें. पण तो पक्ष पाणिनीस किंवा भाष्यकारांस मान्य नसल्यामुळें व त्यांच्या मतें प्रातिपदिकाहूनच णिच् होत असल्यामुळें दीक्षितांनीं केलेलें खण्डन अयोग्य ठरतें हें उघड आहे. सारांश वरील शंका यथार्थ आहे हें लक्षांत घेऊनच दीक्षितांनीं 'वान्तयोः क्विपि ऊठो दुर्वारत्वात्' ही पंक्ति पुढें मनोरमेंत दिली आहे असा शब्दरत्नकारांच्या

म्हणण्याचा तात्पर्यार्थ आहे.) मनोरमेंत 'वान्तयोः क्विपि ऊठो दुर्वारत्वात्' असें जें म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'काव्य' (या शब्दाहून णिच् व क्विप् केला असतां 'काव्य्' असें रूप झाल्यावर) येथें, यकारलोप करतेवेळीं ('न पदान्त' या सूत्रानें) स्थानिवद्भावाचा निषेध केला असल्यामुळें, (अकारलोपाचे व णिलोपाचे ठिकाणीं) स्थानिवद्भाव करतां येत नाहीं. म्हणून 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें यकारलोप केल्यास 'काव्' असें वान्त रूप होतें व त्यामुळें ('काव्' यांतील वकारापुढें 'क्विप् = व्' हा कित् प्रत्यय आला असल्यामुळें) 'च्छ्वोः शूठ्' सू. २५६१ या सूत्रानें होणारें ऊठ्कार्य टाळणें अशक्य आहे. ('काव्य्' असें रूप झाल्यावर त्यांतील अन्त्य यकाराचा 'संयोगान्तस्य लोपः' या प्रकृत सूत्रानें लोप होऊं शकत नाहीं; कारण तें त्रैपादिक शास्त्र 'लोपो व्योर्वलि' या सापादिक शास्त्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरत असल्यामुळें व 'काव्य्' यांतील यकारापुढें 'क्विप् = व्' हा वलादि प्रत्यय आला असल्यामुळें 'लोपो व्योर्वलि' हें सापादिक सूत्र प्रवृत्त होतें व त्या सूत्रानेंच 'काव्य्' यांतील अन्त्य यकाराचा लोप होऊन 'काव्' असें वान्त रूप होतें. हा यकारलोप सापादिक शास्त्रानें झाला असल्यामुळें तो 'च्छ्वोः शूठ्' या सापादिक सूत्रानें वकाराचे जागीं ऊठ् आदेश करतेवेळीं असिद्ध ठरत नाहीं आणि म्हणून ऊठ्कार्य टाळणें अशक्य आहे व ऊठ् केल्यास 'काव्' असें रूप न होतां 'कौ' असें रूप होईल हें पूर्वी सांगितलेंच आहे.) 'शाल्व' हा शब्द (अकारलोप व णिलोप केल्यावर) स्वतःच वान्त होत असल्यामुळें (आणि 'लोपो व्योर्वलि' या सूत्राचें 'च्छ्वोः शूठ्' हें बाधक सूत्र असल्यामुळें) वकारलोपाचा बाध होऊन वकाराचे जागीं ऊठ् होणें हें कार्य टाळतां येणें अशक्य आहे (व 'ऊठ्' केल्यास 'शाल्' असें रूप सिद्ध न होतां 'शालू' असें रूप सिद्ध होईल हें वर सांगितलेंच आहे. सारांश 'काव्' व 'शाल्' अशीं जीं प्रकाशकारांनीं 'संयोगान्तस्य लोपः' या त्रैपादिक सूत्राची प्रवृत्ति करून रूपें सिद्ध

केलीं आहेत तशीं रूपें मुळींच सिद्ध होऊं शकत नाहींत असा शब्दरत्न-कारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'विचि लोपो व्यो: इति लोपस्य प्रसङ्गाच्च' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें 'काव्य' या शब्दा-संबंधानें म्हटलें आहे (व त्याचा अर्थ हा आहे कीं, 'काव्य' शब्दाहून णिच् प्रत्यय केल्यावर त्या णिजन्त शब्दाहून 'क्विप्' प्रत्यय न करितां 'विच्' प्रत्यय केल्यास, 'लोपो व्योर्वलि' या सूत्रानें 'काव्य्' यांतील अन्त्य यकाराचा लोप होण्याचा प्रसङ्ग येतो आणि असें म्हणण्याचें कारण हें आहे कीं,) यकारलोप करतेवेळीं ('न पदान्त' या सूत्रानें) स्थानिवद्भाव होण्याचा निषेध सांगितला आहे आणि अशा रीतीनें जरी प्रकाशकारांनीं सांगितलेलें 'काव्' असें रूप सिद्ध होतें (व विच् हा प्रत्यय कित् नसल्यामळें वकाराचे जागीं 'ऊठ्' होण्याची आपत्ति टळते) तरी, तें जें रूप प्रकाशकारांनीं 'संयोगान्तस्य लोप:' या सूत्रानें होणाऱ्या यकारलोपाचें उदाहरण मानलें आहे तसें तें मानणें अयोग्य ठरतें असा दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. (कारण 'काव्य्' या स्थलीं जो यकारलोप होतो तो 'संयोगान्तस्य लोप:' या त्रैपादिक सूत्रानें होत नसून 'विच्' हा वलादिप्रत्यय पुढें आला असल्यामुळें 'लोपो व्योर्वलि' या सापादिक सूत्रानें त्या यकाराचा लोप होतो आणि म्हणून 'काव्' हें उदाहरण 'लोपो व्योर्वलि' या सूत्रानें होणाऱ्या यकारलोपाचें उदाहरण ठरतें.) 'शाल्व' (या शब्दाहून णिच् प्रत्यय केल्यावर नंतर विच् प्रत्यय केल्यास, वकारलोप करतेवेळीं 'न पदान्त' या सूत्रानें स्थानिवद्भावाचा निषेध होत नसल्यामुळें व) येथें अकारलोप व णिलोप यांचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत असल्यामुळें वकारलोपाची प्राप्तीच होत नाहीं; (कारण 'शाल्व्' यांतील अन्त्य वकार व 'विच्' हा वलादि प्रत्यय या दोहोंमध्यें अकार व 'णि = इ' या दोहोंचें व्यवधान आहे असें स्थानिवद्भावानें मानावें लागत असल्यामुळें 'लोपो व्योर्वलि' या सूत्राची प्रवृत्तीच होऊं शकत नाहीं आणि त्यामुळें 'शाल्' असें रूप

न होतां 'शाल्व्' असेंच रूप होऊं शकतें.) 'मान्तमेव' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यापुढें 'प्राप्नोति' हें पद अध्याहृत आहे, म्हणजे 'मान्तमेव प्राप्नोति' अशी ती पंक्ति समजावी. (आरम्भ-पक्षांत जसें रूप सिद्ध होतें तसेंच रूप प्रत्याख्यानपक्षांत देखील सिद्ध झालें पाहिजे व आरम्भपक्षांत व प्रत्याख्यानपक्षांत भिन्न रूपें सिद्ध झाल्यास प्रत्याख्यान योग्य ठरत नाहीं असा सिद्धान्त असल्यामुळें, जसें वार्तिकारम्भपक्षांत 'गिरिवेड्' असें रूप सिद्ध होतें त्याचप्रमाणें) वार्तिकप्रत्याख्यानपक्षांत देखील वाक्यभेदानें व्याख्यान केलें असतां 'गिरिवेड्' असेंच रूप सिद्ध होतें, तसें न मानल्यास, आरंभपक्षांत व प्रत्याख्यानपक्षांत फलभेद होईल. म्हणजे भिन्न रूपें होण्याची आपत्ति येईल. (दीक्षितांनीं वार्तिकारम्भपक्षांत 'गिरिवेड्' असें रूप होतें व वार्तिकप्रत्याख्यानपक्षांत 'गिरिवेश्म्' असें रूप होतें असें मनोरमेंत म्हटलें आहे. पण शब्दरत्नकार म्हणतात कीं, दोन्ही पक्षांत सारखींच रूपें झालीं पाहिजेत असा सिद्धान्त असल्यामुळें, जसें वार्तिकारम्भ-पक्षांत 'गिरिवेड्' असें रूप सिद्ध होतें तसेंच वार्तिकप्रत्याख्यानपक्षांत देखील तेंच रूप सिद्ध झालें पाहिजे व भिन्न रूप सिद्ध होतां कामा नये, आणि प्रत्याख्यानपक्षांत तसें रूप सहज सिद्ध करतां येतें; कारण त्या पक्षांत 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रांत उत्तर सूत्रांतून 'झलः' या पदाचें अपकर्षण केल्यानें व 'संयोगान्तस्य लोपः' आणि 'संयोगा-न्तस्य झलो लोपः' अशीं दोन भिन्न वाक्यें तयार केल्यानें आणि 'संयोगान्तस्य लोपः' या प्रथम वाक्याचा 'संयोगान्तस्य अझलोऽपि क्वचिल्लोपः' असा अर्थ केल्यानें, 'गिरिवेश्म्' यांतील संयोगान्त मकार जरी झल् नाहीं तरी त्याचा प्रथम वाक्यान्वये लोप करतां येतो व अशा रीतीनें मकाराचा लोप केल्यानें मनोरमेंत सांगितलेल्या प्रक्रियेप्रमाणें 'गिरिवेड्' असें रूप वार्तिक-प्रत्याख्यानपक्षांत देखील सिद्ध होऊं शकतें असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) 'मान्तमेवेति दिक्' या मनोरमेंतील

पंक्तींत जो 'दिक्' शब्द घातला आहे त्याचा अर्थ असा आहे कीं, 'संयोगान्तस्य लोपः' सू. ५४ व 'स्कोः संयोगाद्योः' सू. ३८० या सूत्रांनीं अनुक्रमें होणाऱ्या संयोगान्तलोपास व संयोगादिलोपास सारखेंच लागू पडण्याकरितां 'यणः प्रतिषेधो वाच्यः' हें वार्तिक वार्तिककारानें केलें आहे व 'न वा झलो लोपात्' या वचनानें त्या वार्तिकाचें जें प्रत्याख्यान केलें आहे तें प्रत्याख्यान 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें होणाऱ्या संयोगान्त लोपालाच लागू पडणारें आहे (व 'स्कोः संयोगाद्योः' या सूत्रानें होणाऱ्या संयोगादि लोपास तें प्रत्याख्यान लागू पडत नाहीं.) म्हणूनच भाष्यकारांनीं ठिकठिकाणीं भाष्यांत 'झलो लोपात्' या वचनाचें 'संयोगान्तस्य झलो लोपः' असें व्याख्यान केलें आहे. ('यणः प्रतिषेधो वाच्यः' हें वार्तिक 'स्कोः संयोगाद्योः' या सूत्रास देखील लागू पडत असल्यामुळें त्या सूत्राचा 'यणन्तसयोगाद्योः सकारककारयोर्लोपो न' असा अर्थ होतो व त्यामुळेंच 'वाक्यर्थम्, वास्यर्थम्' या स्थलीं 'क्य्, स्य्' या यणन्त संयोगांच्या आद्य ककाराचा व सकाराचा लोप होत नाहीं. त्या वार्तिकाचें जें प्रत्याख्यान केलें आहे तें जर 'स्कोः संयोगाद्योः' या सूत्रानें होणाऱ्या संयोगादि लोपास लागू पडलें असतें तर भाष्यकारांनीं 'संयोगान्तस्य झलो लोपः' एवढेच शब्द व्याख्यान करितांना उच्चारले नसते व 'झलन्तसंयोगाद्योः स्कोर्लोपः' असे शब्द देखील उच्चारले असते. सारांश त्या वार्तिकाचें समूळ प्रत्याख्यान केलें नसून 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रापुरतेंच अंशतः प्रत्याख्यान केलें आहे आणि म्हणून तें वार्तिक मानणें हाच पक्ष अधिक श्रेयस्कर ठरतो असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'बहिरङ्गलक्षणत्वाद्वा' या वार्तिकाचें व्याख्यान करितांना भाष्यकारांनीं 'बहिरङ्गो यणादेशोऽन्तरङ्गो लोपः,' म्हणजे यणादेश बहिरङ्ग असून लोप अन्तरङ्ग आहे, असें म्हटलें असल्यामुळें व त्या वार्तिकांत वार्तिककारानें 'बहिरङ्गलक्षणत्वात्' हा शब्द घातला असल्यामुळें त्या

शब्दाच्या स्वारस्याने–सामर्थ्याने–हे स्पष्ट होते की, ज्या उदाहरणात संयोगान्त यण् बहिरङ्ग नसून स्वतःसिद्ध आहे अशा प्रकारची प्रकाशकारानी अकृत्रिम संयोगान्त यणाचा लोप होऊन सिद्ध झालेली जी रूपे दिली आहेत तशी रूपे भाषेत कोठेहि आढळत नाहीत (प्रकृत सूत्रावरील भाष्यात 'बहिरङ्गलक्षणत्वाद्वा' हे जे द्वितीय प्रत्याख्यानपर वार्तिक पठित केले आहे त्याचे व्याख्यान करिताना भाष्यकारानी 'अथ वा बहिरङ्गो यणादेशोऽन्तरङ्गो लोप' असे म्हटले आहे या भाष्यात 'बहिरङ्गो यणादेश' हे शब्द घातले असल्यामुळे व वार्तिककाराने वार्तिक पठित करिताना 'बहिरङ्गलक्षणत्वात्' या शब्दाचा उपयोग केला असल्यामुळे त्या शब्दप्रयोगावरून हे स्पष्ट होते की, जेथे पूर्व पदाच्या अन्ती इक् असून उत्तर पदाचा आद्य वर्ण असवर्ण अच् असल्यामुळे 'इको यणचि' सू ४७ या सूत्राने पदद्वयाश्रित यणादेशरूप कार्य झाले आहे व अशा प्रकारचा बहिरङ्ग यण् पदान्ती असणाऱ्या संयोगाचा अन्त्य वर्ण आहे तशा यणाचा लोप न व्हावा याकरिताच वार्तिककाराने 'संयोगान्तलोपे यण प्रतिषेधो वाच्य' हे वार्तिक प्रथम पठित करून त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान करतेवेळी 'न वा झलो लोपात्' हे वार्तिक प्रथम पठित करून नंतर 'बहिरङ्गलक्षणत्वाद्वा' हे द्वितीय वार्तिक पठित केले आहे त्यामुळेच 'दधि + अत्र = दध्य् + अत्र, मधु + अत्र = मध्व् + अत्र, सुधी + उपास्य = सुध्य् + उपास्य' इत्यादि स्थली पदद्वयाश्रित बहिरङ्ग यणादेश पूर्व पदाच्या अन्ती असणाऱ्या संयोगाचा अन्त्य वर्ण असल्यामुळे तशा बहिरङ्ग यणाचा लोप होत नाही मग असे जर आहे तर जेथे पदद्वयाश्रित यण्कार्य झाले नाही व त्यामुळे संयोगान्त यण् बहिरङ्ग ठरत नाही तेथे तशा बहिरङ्ग नसलेल्या स्वतःसिद्ध अकृत्रिम संयोगान्त यणाचा लोप होण्यात वास्तविक काही प्रत्यवाय येऊ नये असे कोणी म्हटल्यास त्यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, असा अकृत्रिम यण् पदान्ती असणाऱ्या संयोगाच्या अन्ती असणारी रूपे भाषेत कोठेहि

आढळत नाहींत. तशीं रूपें जर वास्तविक भाषेंत आढळत असतीं तर वार्तिककारानें 'वहिरङ्गलक्षणत्वाद्वा' असें प्रत्याख्यानपर वार्तिक पठित न करितां भिन्न शब्दांचा उपयोग करून तें वार्तिक अशा रीतीनें पठित केलें असतें कीं, जेणेंकरून पदान्तीं असलेल्या संयोगाच्या शेवटीं असलेल्या अकृत्रिम यणाचा देखील लोप होऊं नये. पण भाषेंत तशीं रूपें आढळत नसल्यामुळें वार्तिककाराला तसें करण्याची कांहीं गरज वाटली नाहीं हें उघड होतें. आणि म्हणूनच प्रकृत सूत्रावरील उद्योतांत नागेश म्हणतातः—'यद्यपि यण्विधौ न पदद्वयमुपात्तं तथापि एतल्लक्ष्ये पदद्वयाश्रयो यणिति भावः। अत्र वहिरङ्गलक्षणत्वादिति वार्तिकस्वारस्यात्, वहिरङ्गो यणादेश इति भाष्याच्च यणादेशव्यतिरिक्तसंयोगान्तलोपप्राप्तिविषययण्घटितप्रयोगाऽनभिधानं वोध्यम्। अन्यथाऽन्तरङ्गलक्षणत्वादन्तरङ्गो लोप इत्येव वदेत्। एवं च काव्य्, कलत्र् इत्यादि चिन्त्यमेवेति दिक्।') वास्तविक भाष्यकारांनीं 'खरवसानयोर्विसर्जनीयः' सू. ८-३-१५ या सूत्रावरील भाष्यांत कार्यकालपक्षाचा उपक्रम करून 'अयुक्तोऽयं परिहारो न वा वहिरङ्गलक्षणत्वाद्वा'— म्हणजे 'विसर्जनीयोऽनुत्तरपदे' या वार्तिकाचें,'वहिरङ्गलक्षणत्वाद्वा' हें वार्तिक पठित करून, जें प्रत्याख्यान केलें आहे तें अयोग्य आहे— असें म्हटलें असल्यामुळें, प्रकृत स्थलीं पठित केलेलें तृतीय वार्तिक दूषित ठरतें. या विषयासंबंधानें एवढें पुरें. ('खरवसानयोः' या सूत्रावर वार्तिककारानें 'विसर्जनीयोऽनुत्तरपदे' हें वार्तिक पठित केलें आहे व त्या वार्तिकाचें व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात—'विसर्जनीयोऽनुत्तरपदे इति वक्तव्यम्। इह मा भूत्—नार्कुटो नार्पत्य इति.' पण लगेंच पुढें या वार्तिकाचें प्रत्याख्यानपर 'न वा वहिरङ्गलक्षणत्वात्' हें द्वितीय वार्तिक वार्तिककारानें पठित केलें आहे व त्याचें व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात— 'न वा वक्तव्यम्। किं कारणम्?। वहिरङ्गलक्षणत्वात्। वहिरङ्गो रेफोऽन्तरङ्गो विसर्जनीयः। असिद्धं वहिरङ्गमन्तरङ्गे।' पण लगेंच पुढें भाष्यकार म्हणतात—'नैष युक्तः

परिहारः। अन्तरङ्गं बहिरङ्गमिति प्रतिद्वन्द्वभाविनावेतौ पक्षौ,सत्यन्तरङ्गे बहिरङ्गं, सति च बहिरङ्गेऽन्तरङ्गं भवति । न चात्रान्तरङ्गबहिरङ्गयोर्युगपत्समवस्थानमस्ति । किं कारणम् ? । असिद्धत्वात् । कथमसिद्धत्वम् ?। पूर्वत्रासिद्धमिति ।' या सूत्रावरील भाष्याचा भावार्थ नीट ध्यानांत येण्याकरितां आपण भाष्यांत दिलेलें 'नापत्यः' हें उदाहरण घेऊं. 'दित्यादित्य' सू. १०७६ या सूत्रानें, 'नृपति' या शब्दांत 'पति' हें उत्तरपद असल्यामुळें, त्या शब्दाहून 'ण्य = य' प्रत्यय केल्यावर 'तद्धितेष्वचामादेः' सू. १०७५ या सूत्रानें 'नृपति' यांतील 'ऋ' या आद्य अचाची वृद्धि होऊन व 'यस्येति च' सू ३११ या सूत्रानें 'पति' यांतील अन्त्य इकाराचा लोप होऊन 'नार्+पत्+य' अशी स्थिति झाली असतां, 'नार्' यांतील रकारापुढें 'पत्' यांतील पकार हा खर् आला असल्यामुळें त्या रेफाचे जागीं 'खरवसानयोः' सू ७६ या सूत्रानें विसर्ग होण्याची प्राप्ति होते. तसा विसर्ग न व्हावा व रेफ जसाचा तसाच कायम राहावा याकरितां वार्तिककारानें प्रथम 'उत्तरपदे सति यो रेफो निष्पन्नस्तन्निमित्तकस्तस्य विसर्जनीयो न भवति' या अर्थाचें बोधक 'विसर्जनीयोऽनुत्तरपदे' हें वार्तिक पठित केलें. पण लगेंच पुढें त्या वार्तिकाचें प्रत्याख्यान करणारें 'न वा बहिरङ्गलक्षणत्वात्' हें द्वितीय वार्तिक वार्तिककारानें पठित केलें. वार्तिककाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, ज्या रेफाचा विसर्ग करणें आहे तो रेफ पलीकडे असलेल्या 'ण्य' प्रत्ययाच्या निमित्तामुळें झाला असून रेफाचा विसर्ग होणें याचें निमित्त पकार हा खर् पूर्वी असल्यामुळें, 'पूर्वोपस्थितनिमित्तकमन्तरङ्गं परोपस्थितनिमित्तकं बहिरङ्गम्' या न्यायान्वयें रेफ बहिरङ्ग ठरतो व रेफाचा विसर्ग होणें हें कार्य त्याच्या मानानें अन्तरङ्ग ठरतें आणि 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे'–परि. ५०–ही परिभाषा असल्यामुळें, विसर्गरूप अन्तरङ्गकार्य करतेवेळीं बहिरङ्गरेफ असिद्ध ठरतो व रेफ झालाच नाहीं असें मानावें लागत असल्यामुळें विसर्गाची प्राप्तीच होत नाहीं आणि

म्हणून 'विसर्जनीयोऽनुत्तरपदे' हें वार्तिक पठित करण्याची कांहीं गरज नाहीं. यावर भाष्यकार असें म्हणतात कीं, वार्तिककारानें 'बहिरङ्गलक्षणत्वात्' हें वार्तिक पठित करून 'विसर्जनीयोऽनुत्तरपदे' या प्रथम वार्तिकाचें जें प्रत्याख्यान केलें आहे तें बरोबर नाहीं; कारण अन्तरङ्ग व बहिरङ्ग हे दोन परस्परविरुद्ध शब्द परस्पर-सापेक्ष आहेत. जेथें एकामेकाच्या दृष्टीनें विद्यमान असलेल्या दोन कार्यांपैकीं एक कार्य अन्तरङ्ग व त्याच्या मानानें दुसरें कार्य बहिरङ्ग मानतां येतें तशाच ठिकाणी अन्तरङ्ग व बहिरङ्ग या प्रतिद्वन्द्वि शब्दांचा उपयोग करतां येतो. पण जेथें एक सूत्र दुसऱ्या सूत्राच्या दृष्टीनें 'पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ या वचनान्वयें असिद्ध ठरतें तेथें असिद्ध सूत्रानें झालेलें कार्य सिद्ध सूत्रानें होणाऱ्या कार्याला दृष्टिगोचर होत नसल्यामुळें, दोन कार्यांची युगपत् विद्यमानता आहे असें मुळीच मानतां येत नाहीं व त्यामुळें एक कार्य अन्तरङ्ग व दुसरें बहिरङ्ग असें म्हणतां येत नाहीं. म्हणून 'तद्धितेष्वचामादेः' या सापादिक सूत्रानें वृद्धिकार्य होऊन 'ऋ' चें 'आर्' असें रेफान्त रूप झाल्यावर त्या सूत्रानें झालेल्या कार्याला 'खरवसानयोः' या त्रैपादिक सूत्रानें प्राप्त होणारें असिद्ध विसर्गरूप कार्य दिसत नसल्यामुळें व अशा रीतीनें दोन कार्यें विद्यमान नसून एकच वृद्धिरूप कार्य विद्यमान आहे व विसर्गरूप द्वितीय कार्याची विद्यमानता नाहीं असें मानावें लागत असल्यामुळें, सापादिक सिद्ध वृद्धिरूप कार्य बहिरङ्ग व त्याला दृष्टिगोचर नसणारें असिद्ध विसर्गरूप कार्य अन्तरङ्ग आहे असें मुळींच मानतां येत नाहीं. त्यामुळें वृद्धिकार्य झाल्यावर प्राप्त होणारें विसर्गरूप कार्य बंद करतां येत नाहीं. येथें 'असिद्धं बहिरङ्ग-मन्तरङ्गे' ही परिभाषा प्रवृत्त होऊं शकत नाहीं; कारण 'वाह ऊठ्' या सापादिक सूत्रानें ज्ञापित होणारी व तद्देशस्थ मानली जाणारी ती परिभाषा सापादिक असल्यामुळें व तिच्या दृष्टीनें त्रिपादी अविद्यमान व असिद्ध असल्यामुळें, ती परिभाषा त्रैपादिक कार्य

करतेवेळी त्रिपादीत उपस्थित होऊ शकत नाही व सापादिक बहिरङ्ग कार्याला असिद्ध ठरवू शकत नाही. तसे न मानल्यास, साक्षात् पठित असलेल्या 'पूर्वत्रासिद्धम्' या सूत्रान्वये सापादिक शास्त्राच्या दृष्टीने असिद्ध असलेले अन्तरङ्ग त्रैपादिक शास्त्र 'असिद्ध बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषान्वये सिद्ध ठरून त्याच्या दृष्टीने सापादिक बहिरङ्ग शास्त्र असिद्ध ठरण्याची आपत्ति येईल. ही आपत्ति टाळण्याकरिता हे मानणे आवश्यक आहे की, ती परिभाषा यथोद्देशपक्षात जशी त्रिपादीत उपस्थित होऊ शकत नाही तशीच ती कार्यकालपक्षात देखील त्रिपादीत उपस्थित होऊ शकत नाही तसे मानले असता, 'नार्पत्यः' या उदाहरणात सापादिक वृद्धिकार्य होऊन उत्पन्न झालेला रेफ त्रैपादिक विसर्गकार्य करतेवेळी असिद्ध ठरत नसल्यामुळे, त्या रेफाचे जागी विसर्ग होण्याची आपत्ति येते ती टाळण्याकरिता 'विसर्जनीयोऽनुत्तरपदे' हे वार्तिक असणे आवश्यक आहे व त्रिपादीत कार्यकालपक्षात देखील उपस्थित न होणाऱ्या 'असिद्ध बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषेच्या आधारावर त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान करणे अयोग्य असून, 'बहिरङ्गलक्षणत्वाद्वा' या द्वितीय वार्तिकाचेच प्रत्याख्यान करणे योग्य आहे असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. आता शब्दरत्नकार म्हणतात की, 'नार्पत्य.' या वरील भाष्यात दिलेल्या उदाहरणात रेफाचा विसर्ग करणे आणि प्रकृत स्थली मयोगान्त यणाचा लोप करणे ही दोन्ही कार्ये सारख्याच प्रकारची आहेत, कारण प्रकृत स्थली देखील मयोगान्त यण् सापादिक शास्त्राने उत्पन्न होत असून त्रैपादिक शास्त्राने त्याच्या लोपाची प्राप्ति होते व यण्कार्याच्या मानाने जरी लोपकार्य अन्तरङ्ग आहे तरी, ते त्रैपादिक लोपरूप कार्य करतेवेळी 'असिद्ध बहिरङ्गमन्तरङ्गे' ही सापादिक परिभाषा यथोद्देशपक्षात व तसेच कार्यकालपक्षात त्रिपादीत उपस्थित होत नसल्यामुळे, पूर्वी झालेले सापादिक यण्कार्य असिद्ध ठरत नाही.

त्यामुळें संयोगान्त यणाचा लोप होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टाळण्याकरितां वार्तिककारानें 'यणः प्रतिषेधो वाच्यः' हें जें वार्तिक पठित केलें आहे व त्या वार्तिकाचें प्रत्याख्यान करणारें 'न वा झलो लोपः' हें जें द्वितीय वार्तिक लगेंच पुढें पठित केलें आहे त्या दोन वार्तिकांपैकीं कोणतेंहि एक वार्तिक असणें आवश्यक आहे; कारण या दोन्ही वार्तिकांचा, पूर्वी सांगितल्याप्रमाणें द्वितीय वार्तिकाचीं दोन भिन्न वाक्यें तयार केल्यानें, अखेरीस सारखाच अर्थ निष्पन्न होतो व त्या पहिल्या दोन वार्तिकांचा एकच अर्थ होणें इष्ट देखील आहे; नाहीं तर प्रथमवार्तिकारम्भपक्षांत व द्वितीय वार्तिकानें त्याचें जें प्रत्याख्यान केलें आहे त्या प्रत्याख्यानपक्षांत भिन्न प्रकारचीं रूपें सिद्ध होण्याची आपत्ति येईल व 'न वा झलो लोपात्' हें प्रत्याख्यानपर वार्तिक अयोग्य ठरेल. 'बहिरङ्गलक्षणत्वाद्वा' या तृतीय वार्तिकानें पहिल्या दोन्ही वार्तिकांचें प्रत्याख्यान केल्यास व तें तृतीय वार्तिकच मानल्यास, वर सांगितल्याप्रमाणें संयोगान्त यणाचा लोप कार्यकाल-पक्षांत देखील टाळतां येणें अशक्य आहे. म्हणून 'खरवसानयोः' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं जें प्रतिपादन केलें आहे त्या प्रतिपादनाच्या आधारें 'बहिरङ्गलक्षणत्वाद्वा' या तृतीय वार्तिकाचेंच प्रत्याख्यान करणें योग्य आहे. तसें केलें म्हणजे, 'इह यथोद्देशपक्षे आद्यं वार्तिकद्वयम्, तृतीयं तु कार्यकालपक्षे इति विवेकः' असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे तें अयोग्य ठरतें असा शब्दरत्न-कारांच्या म्हणण्याचा आशय आहे. सारांश तृतीय वार्तिकाचें प्रत्या-ख्यान करून पहिलीं दोन वार्तिकेंच भाष्यकारांनीं मानलीं असल्यामुळें, त्या वार्तिकान्वयें संयोगान्त यण् स्वतः सिद्ध—अकृत्रिम—असला तरी त्याचा लोप होऊं शकत नाहीं आणि म्हणून प्रकाशकारांनीं संयोगान्त लोपाचीं 'काव्, शाल्' इत्यादि जीं उदाहरणें दिलीं आहेत तीं सर्वथैव चूक ठरतात हें उघड आहे. वर आलेल्या सर्व विषयांचें विस्तृत विवेचन परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषान्तरांत पान १९०–९४

मध्ये केले आहे व ते अवश्य वाचावे. ते वाचल्याने वरील विषय उत्तम रीतीने ध्यानात येईल.)

मनोरमा—इति पक्ष इति । पक्षद्वयस्यापि भाष्ये स्थितत्वादिति भावः। चत्वारि रूपाणीति । यत्तु वदन्ति–धकारयकारोभयद्वित्वे, उभयोः पुनर्द्वित्वे, लोपविकल्पे ऽन्यतरद्वित्वे च नव रूपाणि । तथा हि–एकधं त्रिधा, एकयं द्वियं त्रियं च । एवं द्विधं त्रिधं च त्रिधेति । न चान्तरङ्गे द्वित्वे बहिरङ्गस्य यणोऽसिद्धत्वम्, 'त्रैपादिकेऽन्तरङ्गे बहिरङ्गपरिभाषा न प्रवर्तते' इति विसर्जनीयसूत्रे भाष्यकैयटयोर्व्यवस्थापितत्वादिति । अत्रेदं वक्तव्यम्–पुनर्द्वित्वमशुद्धम्, एकस्यां व्यक्तौ एकं लक्षणं सकृदेव प्रवर्त्तत इति "एकः पूर्वपरयोः" इति सूत्रे भाष्ये सिद्धान्तितत्वात् । अन्यथा द्वित्वानामानन्त्यापत्तेः । न च "झरो झरि" इति, "हलो यमाम्–" इति च लोपेन निर्वाहः, लोपस्य वैकल्पिकत्वात् । कथमन्यथा त्रिधं त्रियं चेति भवदुक्तिः सङ्गच्छते । किं चैवं सति "सर्वस्य द्वे" इति द्वित्वमपि पुनः पुनः प्रवर्तेत । अत एव "लिटि धातोः–" इति सूत्रे ऽनभ्यासग्रहणं भाष्ये प्रत्याख्यातम् । सन्नन्ताद्यङन्ताद्वा णिचि चङि द्वित्वाभावार्थं तदिति तु कैयटादिभिरुक्तम् । तस्मादिह त्यज वा पञ्चमादीनि रूपाणि, स्वीकुरु वा रूपानन्त्यमिति नवत्वोक्तिरसंगतैव । सकारद्वित्वेनाष्टौ विसर्गद्वित्वेन षोडशेति त्वन्यदेतत् ।

('संयोगान्तस्य लोप' सू. ५४ या सूत्रावरील कौमुदीत दीक्षितानी 'यणो मयो द्वे वाच्ये' हे वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना 'मय इति पञ्चमी यण इति षष्ठी इति पक्षे यकारस्यापि द्वित्वम्' असे म्हटले आहे. त्या पक्तीत) 'इति पक्षे' असे जें म्हटले आहे त्याचे कारण हे की, भाष्यकारानी दोन्ही पक्ष सांगितले आहेत. ('अनचि च' ८–४–४७ या सूत्रावरील भाष्यात 'द्विर्वचने यणो मयः' हे वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात–'द्विर्वचने यणो मय इति

वक्तव्यम् । किमुदाहरणम् ? । यदि यण इति पञ्चमी मय इति षष्ठी उल्क्का वल्म्मीकमित्युदाहरणम् । अथ मय इति पञ्चमी यण इति षष्ठी दध्य्यत्र मध्व्वत्रेत्युदाहरणम् ।' या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, 'यण इति पञ्चमी मय इति षष्ठी' व 'मय इति पञ्चमी यण इति षष्ठी' हे दोन्ही पक्ष भाष्यकारांनीं मानले आहेत आणि म्हणूनच दीक्षितांनीं 'पक्षद्वयस्यापि भाष्ये स्थितत्वात्' असें मनोरमेंत म्हटलें आहे. 'सुध्य्+उपास्यः' या स्थलीं 'ध्' या मय्प्रत्याहारान्तर्गत वर्णापुढें 'य्' हा यण् असल्यामुळें, 'यणो मयो द्वे वाच्ये' या वार्तिकांतील 'मयः' ही पञ्चमी व 'यणः' ही षष्ठी मानून 'मयः परस्य यणो द्वे वा स्तः' असा त्या वार्तिकाचा अर्थ केल्यानें त्या वार्तिकान्वयें यकाराचें व 'अनचि च' सू. ४८ या सूत्रानें धकाराचें द्वित्व केल्यास 'द्धिधं द्वियम्'–ज्यांत दोन धकार व दोन यकार आहेत–असें एक रूप होतें. वरील वार्तिकांत व 'अनचि च' या सूत्रांत 'यरोऽनुनासिके' या पूर्व सूत्रांतून 'वा' या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळें व अशा रीतीनें त्या वार्तिकानें व 'अनचि च' या सूत्रानें होणारें द्वित्व वैकल्पिक ठरत असल्यामुळें, धकार व यकार या दोहोंचेंहि द्वित्व न केल्यास, 'एकधमेकयम्'–ज्यांत एक धकार व एक यकार आहे–असें द्वितीय रूप होतें. वर सांगितल्याप्रमाणें हीं दोन्ही द्वित्व कार्यें वैकल्पिक असल्यामुळें धकाराचें द्वित्व केलें व यकाराचें द्वित्व न केलें तर 'द्विधमेकयम्'–ज्यांत दोन धकार असून एक यकार आहे–असें तृतीय रूप होतें व त्याचप्रमाणें धकाराचें द्वित्व न करितां यकाराचेंच द्वित्व केल्यास 'एकधं द्वियम्'–ज्यांत एक धकार असून दोन यकार आहेत–असें चतुर्थ रूप होतें, व अशा रीतीनें) चार रूपें होतात असें त्या सूत्रावरील कौमुदींत सांगितलें आहे. प्रकाशकारांचें असें म्हणणें आहे कीं, वरील उदाहरणांत धकार व यकार या दोहोंचेंहि द्वित्व करून पुन्हा त्यांचें द्वित्व केल्यास व लोप विकल्पानें होणारा असल्या-

मुळें लोप केल्यास आणि धकार व यकार या दोहोंमधून एकाचेंच द्वित्व केल्यास, नव रूपें सिद्ध होतात. ती अशी की, ज्यांत एकच धकार आहे अशी तीन रूपें; त्यांपैकी एकांत एक यकार, दुसऱ्यात दोन यकार व तिसऱ्यांत तीन यकार राहतील. याचप्रमाणे दोन धकार असलेली तीन व तीन धकार असलेली तीन रूपें होतील. (शब्दरत्नाचे व्याख्यान करिताना ही नव रूपे सांगण्यात येतील.) द्वित्वकार्य अन्तरङ्ग असून यणादेशकार्य बहिरङ्ग असल्यामुळे यणादेश असिद्ध ठरतो असें कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही, कारण त्रैपादिक अन्तरङ्गकार्य करतेवेळी बहिरङ्गपरिभाषा-परि. ५० — त्रिपादीत प्रवृत्त होत नाही असा भाष्यकार व कैयट यानी 'खरवसानयोर्विसर्जनीयः' ८–३–१५ या सूत्रावरील भाष्यात व प्रदीपात सिद्धान्त सांगितला आहे. (शंकाकाराचे असे म्हणणे आहे की, द्वित्वकार्य पुढे असणाऱ्या निमित्ताने होणारे कार्य नसून, यण्कार्य हे पुढे असणाऱ्या अच्रूप निमित्तामुळे 'इको यणचि' सू. ४७ या सूत्राने होणारे कार्य असल्यामुळे, द्वित्वकार्याच्या मानाने यण्कार्य बहिरङ्ग ठरते व 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे'—परि. ५०—या परिभाषान्वये ते असिद्ध ठरत असल्यामुळे यण्कार्य झालेच नाही व 'सुधी + उपास्य.' अशीच स्थिति आहे असे, अन्तरङ्ग द्वित्वकार्य करतेवेळी, मानणे भाग आहे. तसे मानल्यानें 'ध्' या यर्पुढे 'इ' हा अच् आहे असे मानावे लागत असल्यामुळे व 'अनचि' हा प्रतिषेध असल्यामुळे, धकाराचे द्वित्व होऊ शकत नाही व तसेच इकाराचे जागी यकार झालाच नाही व इकारच विद्यमान आहे असे मानावे लागत असल्यामुळे, यकाराचेहि द्वित्व होऊ शकत नाही व 'सुध्युपास्यः' असे एकच रूप सिद्ध होऊ शकते. या शंकेवर प्रकाशकार असे उत्तर देतात की, जरी यण्कार्य द्वित्वकार्याच्या मानानें बहिरङ्ग असले तरी, यण्कार्य सापादिक सूत्रानें होणारे कार्य असून द्वित्वकार्य त्रैपादिक सूत्राने होणारे कार्य आहे व 'पूर्वत्रासिद्धम्' या वचनान्वये त्या

सापादिक यण्कार्याला त्रैपादिक द्वित्वकार्य दिसतच नाहीं. त्यामुळें यण्कार्य हें एकच कार्य विद्यमान आहे व असिद्ध त्रैपादिक द्वित्व-कार्याची विद्यमानता नाहीं व अशा रीतीनें दोन कार्याचें समवस्थान नाहीं असें मानावें लागत असल्यामुळें व अन्तरङ्ग, बहिरङ्ग हे शब्द परस्पर सापेक्ष शब्द असल्यामुळें, सापादिक सिद्ध यण्कार्य बहिरङ्ग व त्रैपादिक असिद्ध द्वित्वकार्य अन्तरङ्ग असें मुळींच मानतां येत नाहीं. दुसरें असें कीं, 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' ही सापादिक परिभाषा असून तिच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध–अविद्यमान–असल्या-मुळें, त्रैपादिक द्वित्वकार्य करतेवेळीं ती परिभाषा त्रिपादींत उपस्थित होत नाहीं. म्हणून त्रैपादिक द्वित्वकार्य कर्तव्य असतां, पूर्वी झालेलें सापादिक यण्कार्य असिद्ध ठरत नसल्यामुळें, धकाराचें व यकाराचें द्वित्व होण्यांत कांहीं प्रत्यवाय येत नाहीं. या आपल्या म्हणण्याचें समर्थन करण्याकरितां प्रकाशकार 'खरवसानयोः' या सूत्रावरील भाष्याचें व त्या भाष्यावरील कैयटप्रदीपाचें प्रमाण देतात. तें भाष्य मागील सूत्रावरील शब्दरत्नाचें विवरण करितांना दिलेंच आहे व त्या भाष्यावरील प्रदीपांत कैयटानें 'अन्तरङ्गे बुद्ध्यापेक्षिते तदपेक्षया बहिरङ्गं भवति, बहिरङ्गे चाऽपेक्षिते तदपेक्षयाऽन्तरङ्गं भवति, अन्तरङ्गव्यपदेशं लभत इत्यर्थः । न चात्रेति । अत्र विषयेऽन्तरङ्गबहिरङ्गयोर्युगपदेकस्यां बुद्धावपेक्षित परस्परमवस्थानं नास्ति, पूर्वस्यां परिभाषायां परस्य विसर्जनीयस्याऽसिद्धत्वादन्तरङ्गाऽभावाद्रेफस्य तदपेक्षबहिरङ्गत्वाऽ-भावाद्बहिरङ्गपरिभाषानुपस्थानात्प्राप्नोत्येव विसर्जनीयः ।' असें स्पष्ट-पणें म्हटलें आहे व तसेंच उद्योतकारांनीं देखील 'एवञ्च कार्यकाले यथोद्देशे च त्रिपाद्यां बहिरङ्गासिद्धत्वाऽप्रवृत्तिरिति भाष्याल्लभ्यते । वस्तुतः प्रत्यक्षत्वेन बलवता पूर्वत्रासिद्धमित्यनेनानुमानिकया असिद्ध-परिभाषाया बाध एवोचितः ।' असें म्हटलें आहे. यावरून हें सिद्ध होतें कीं, सापादिक बहिरङ्गपरिभाषा–परि. ५०–त्रिपादींत उपस्थित होत नाहीं व त्यामुळें अन्तरङ्ग त्रैपादिक कार्य करतेवेळीं पूर्वी

झालेलें वहिरङ्ग सापादिक कार्य असिद्ध ठरत नाहीं. म्हणून धकाराचें व यकाराचें द्वित्व करतेवेळीं यणादेश असिद्ध ठरत नसल्यामुळें, त्यांचें द्वित्व होऊं शकतें असा प्रकाशकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. पण 'अनचि च' या सूत्रानें यर्चें द्वित्व केल्यावर व 'यणो मयो द्वे' या वार्तिकानें यण्चें द्वित्व केल्यावर पुन्हा त्या सूत्रानें व वार्तिकानें त्याच यर्चें व यण्चें अनुक्रमें द्वित्व करतां येतें असें जें वरील पंक्तींत प्रकाशकारांनीं म्हटलें आहे व तसेंच वहिरङ्गपरिभाषा–परि. ५०–त्रिपादींत उपस्थित होऊं शकत नाहीं असें जें त्यांनीं म्हटलें आहे त्यावर दीक्षित आक्षेप घेतात.) प्रकाशकारांनीं जें वर म्हटलें आहे त्यावर आमचें असें म्हणणें आहे कीं, (एकदां धकाराचें 'अनचि च' या सूत्रानें व यकाराचें 'यणो मयो द्वे वाच्ये' या वार्तिकानें द्वित्व केल्यावर, त्याच सूत्रानें व त्याच वार्तिकानें) पुन्हा त्यांचें द्वित्व करतां येतें हें म्हणणें अशुद्ध–चूक–आहे; कारण 'एकः पूर्वपरयोः' ६–१–८४ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं 'एकस्यां व्यक्तौ एकं लक्षणं सकृदेव प्रवर्तते'–म्हणजे एका लक्ष्याचे ठिकाणीं एक सूत्र एकदांच प्रवृत्त होत असतें–असा सिद्धान्त स्थापित केला आहे. हा सिद्धान्त न मानल्यास अनन्त वेळ द्वित्व होण्याची आपत्ति येईल (व अनन्त रूपें सिद्ध होतील.) 'झरो झरि' सू. ७१ व 'हलो यमां यमि लोपः' सू. ६० या सूत्रांनीं पूर्व वर्णाचा लोप होणें सांगितलें असल्यामुळें, अनन्त रूपें होण्याची आपत्ति टळते हें म्हणणें वरोवर नाहीं; कारण त्या सूत्रांनीं होणारा लोप (नित्य होणारा नसून) विकल्पानें होणारा आहे. जर वरील दोन सूत्रांनीं होणारा पूर्व वर्णाचा लोप (त्या दोन सूत्रांत 'झयो होऽन्यतरस्याम्' या पूर्व सूत्रांतून 'अन्यतरस्याम्' या पदाची अनुवृत्ति न करून) वैकल्पिक न मानला तर, त्रिधकारयुक्त व त्रियकारयुक्त रूपें सिद्ध होतात असें जें प्रकाशकारांनीं म्हटलें आहे तें त्यांचें म्हणणें कसें योग्य ठरूं शकेल ? (कारण 'सुध्ध्य्य्य् + उपास्यः' या स्थलीं प्रथम धकार

या हल्पुढें द्वितीय धकार हा झर् असून त्यापुढें तृतीय धकार हा झर् असल्यामुळें, 'झरो झरि' या सूत्रानें होणारा लोप नित्य मानल्यास, द्वितीय धकाराचा अवश्य लोप होईल व त्रिधकारयुक्त रूप मुळींच सिद्ध होऊं शकणार नाहीं. तसेंच धकार या हल्पुढें प्रथम यकार हा यम् असून त्यापुढें द्वितीय यकार हा यम् असल्यामुळें, 'हलो यमाम्' या सूत्रानें होणारा लोप नित्य मानल्यास, त्या प्रथम यकाराचा अवश्य लोप होईल व द्वितीय यकाराचा देखील लोप होईल आणि त्यामुळें त्रियकारयुक्त रूप केव्हांहि सिद्ध होऊं शकणार नाहीं. त्या सूत्रांनीं होणारा लोप वैकल्पिक मानल्यासच तशीं रूपें सिद्ध होण्याचा संभव आहे. परंतु पुनर्द्वित्व होऊं शकत नसल्यामुळें तशीं रूपें सिद्ध होऊं शकत नाहींत.) दुसरें असें कीं, 'एकस्यां व्यक्तौ एकं लक्षणं सकृदेव प्रवर्तते'—म्हणजेच 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः'—हा न्याय न मानला तर, 'सर्वस्य द्वे' सू. १९३९ या सूत्रानें होणारें द्वित्व देखील पुन्हा पुन्हा होण्याची आपत्ति येईल. वरील न्याय मानला असल्यामुळेंच, 'लिटि धातोरनभ्यासस्य' सू. २१७७ या सूत्रांतील 'अनभ्यासस्य' या पदाचें भाष्यकारांनीं प्रत्याख्यान केलें आहे. त्या सूत्रांत पाणिनीनें 'अनभ्यासस्य' या पदाचें ग्रहण अशाकरितां केलें आहे कीं, सन्नन्ताहून किंवा यङन्ताहून णिच् केल्यावर नंतर 'चङ' केल्यास द्वित्व होऊं नये असें कैयटादिकांनीं म्हटलें आहे. (कोणत्याहि धातूहून 'सन्' किंवा 'यङ' प्रत्यय केला असतां, 'सन्यङोः' सू. २३९५ या सूत्रानें सन्नन्त व यङन्त धातूच्या प्रथम एकाचाचें द्वित्व होतेंच. पुन्हा तशा सन्नन्त किंवा यङन्त धातूहून णिच् प्रत्यय करून तशा णिजन्त धातूचें लुङाचें रूप करणें झाल्यास 'णिश्रिद्रुस्रुभ्यः कर्तरि चङ' सू. २३१२ या सूत्रानें 'च्लि'चे जागीं 'चङ' असा आदेश होऊन 'चङि' सू. २३१५ या सूत्रानें तशा णिजन्त धातूच्या प्रथम एकाचाचें पुन्हा द्वित्व पावतें. पण त्या एकाचाचें एकदां पूर्वी द्वित्व झालेलें असल्या-

मुळें, 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' या न्यायान्वयें पुन्हा त्याचें द्वित्व होऊं शकत नाहीं व असा न्याय असल्यामुळेंच 'लिटि धातोरनभ्यासस्य' ६–१–८ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं 'अभ्यासप्रतिषेधानर्थक्यं च' हें वार्तिक पठित करून त्या सूत्रांतील 'अनभ्यासस्य' या पदाचें प्रत्याख्यान केलें आहे व त्या भाष्यावरील प्रदीपांत कैयटानें 'जुगुप्सिषते लोलूयिषत इत्यादौ सकृत्प्रवृत्त्या लक्षणस्य चरितार्थत्वात्पुनः प्रवृत्त्यभावादुत्तरार्थोऽप्यभ्यासप्रतिषेधो न कर्तव्यः । चङीत्येदर्थस्तु कर्तव्यः एव । यदा सन्यङन्ताण्णिचि कृते चङ भवति अजुगुप्सदलोलूयदिति; तदा द्विर्वचनं मा भूदिति चिन्त्यमेतत् ।' असें म्हटलें आहे. सारांश भाष्यकारांनीं वरील न्याय मानला असल्यामुळें, 'अनचि च' या सूत्रानें किंवा 'यणो मयो द्वे वाच्ये' या वार्तिकानें ज्या वर्णाचें एकदां द्वित्व केलें आहे त्या वर्णाचें पुन्हा तेंच सूत्र किंवा वार्तिक प्रवृत्त करून पुनर्द्वित्व करता येत नाहीं आणि म्हणून त्रिधकारयुक्त किंवा त्रियकारयुक्त रूप सिद्ध होऊंच शकत नाहीं व कौमुदींत सांगितल्याप्रमाणें चारच रूपें सिद्ध होऊं शकतात. म्हणून दीक्षित प्रकाशकारांना म्हणतात कीं,) प्रथम चार रूपें सोडून बाकीच्या पुढील पांच रूपांचा त्याग करा किंवा अनन्त रूपें सिद्ध होऊं शकतात असा (असमंजस) पक्ष स्वीकारा. सारांश नव रूपें सिद्ध होतात हें म्हणणें अयोग्यच ठरतें. 'उपास्यः' यांतील सकाराचें द्वित्व केल्यास आठ रूपें व तसेंच विसर्गाचें ('अनचि च' या सूत्रानें) द्वित्व केल्यास सोळा रूपें सिद्ध होऊं शकतात ही गोष्ट वेगळी. (सकाराचें व विसर्गाचें द्वित्व पूर्वी केलें नसल्यामुळें 'अनचि च' सू. ४८ या सूत्रानें त्यांचें द्वित्व करतेवेळी 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय आड येऊं शकत नाही; कारण त्या सूत्रानें ज्या धकाराचें पूर्वी द्वित्व केलें गेलें आहे त्याहून ही भिन्न लक्ष्यें आहेत. अयोगवाहांमध्यें विसर्ग अन्तर्भूत असल्यामुळें व 'हयवरट्' या शिवसूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं अकारापुढें व

शर्मध्यें अयोगवाहांचा पाठ मानला असल्यामुळें, विसर्ग देखील यर् ठरतो व प्रकृत स्थलीं विसर्ग हा 'अ' या अचापुढें असून त्यापुढें अच् नसल्यामुळें 'अनचि च' या सूत्रानें जसें 'आ' या अचापुढें असलेल्या सकार या यर्चें वैकल्पिक द्वित्व करतां येतें तसेंच विसर्गाचें देखील वैकल्पिक द्वित्व करतां येतें आणि त्यामुळें 'उपास्स्यः:' असें द्विसकारयुक्त व विसर्गद्वययुक्त रूप देखील सिद्ध होऊं शकतें. 'सुध्युपास्यः' याचीं कौमुदींत जीं चार रूपें दिलीं आहेत त्यांतील सकाराचें व विसर्गाचें विकल्पेंकरून द्वित्व केलें असतां, प्रत्येक रूपाचीं चार रूपें होऊन चार रूपांचीं एकंदर सोळा रूपें होऊं शकतात असें दीक्षितांचें म्हणणें आहे.)

मनोरमा---यदप्युक्तं त्रैपादिकेऽन्तरङ्गे इत्यादि। तदपि न, 'नार्कुटः' 'नार्पत्यः' इत्यत्र विसर्गवारणाय वृद्धेरसिद्धत्वस्य तत्रैव भाष्ये स्पष्टत्वात्, "संयोगान्तलोपे यणः प्रतिषेधः" इत्यस्य बहिरङ्गत्वेन प्रत्याख्याततत्वात्, स्वयमपि तथैवानूदितत्वाच्च। तस्मादिह यथोद्देशपक्षो ग्राह्यो बहिरङ्गपरिभाषाया अप्रवृत्तये। तथा च भाष्ये--मयः परस्य यणो द्वित्वे दध्यत्रेत्युदाहृतम्। न चैवमपि "इकोऽसवर्णे--" इति शाकलेन रूपान्तरमस्त्विति वाच्यम्, समासे तन्निषेधात्। न च नित्यसमास एव तन्निषेध इति वाच्यम्, भाष्ये नित्यग्रहणस्य प्रत्याख्यातत्वात्। यथोत्तरं मुनिनां प्रामाण्यात्। नन्विह यणेव दुर्लभः, सुधीशब्दस्य ध्यायतेः संप्रसारणेन निष्पन्नत्वेन "संप्रसारणाच्च" इति पूर्वरूपापत्तेरिति, चेन्न, "संप्रसारणपूर्वत्वे समानाङ्गग्रहणम्" इति वार्तिकोक्तेः, संप्रसारणस्थानिकस्यातथात्वाच्च। न चैवमपि "न भूसुधियोः" इति, यण्निषेधः शङ्क्यः, आङ्गत्वेन प्रत्यये परत एव तस्य प्रवृत्तेः, अनन्तरस्येति न्यायेन "एरनेकाचः--" इति, "ओस्सुपि" इति च सूत्रद्वयेन प्राप्तस्यैव निषेधाच्च। धात्रंश इति। अत्र रेफस्य द्वित्वं न, द्वित्वप्रकरणे रहाभ्यामिति साक्षाच्छ्रुतेन निमित्तभावेन रेफस्य कार्यित्वबाधात्।

'सुध्युपास्यः' इत्यादौ तु स्थानित्वेन निमित्तत्वमिकः "तस्मादित्युत्तरस्य" इत्यादिनिर्देशाज्ज्ञापकान्न बाध्यत इति कैयटः। तकारस्य तु भवत्येवेत्युक्तम्। तच्च वा, इत्यतोऽत्र रूपद्वयम्। लाकृतिरिति त्वेकमेव ॥

'त्रैपादिकेऽन्तरङ्गे बहिरङ्गपरिभाषा न प्रवर्तते' असें जे प्रकाशकारांचें म्हणणें आहे तें देखील बरोबर नाहीं, कारण 'नार्कुटः, नार्पत्यः' या स्थलीं विसर्गाचें वारण करण्याकरितां बहिरङ्ग वृद्धिकार्य असिद्ध ठरतें असें ( ज्या भाष्याचा, म्हणजे 'खरवसानयोर्विसर्जनीयः सू. ८-३-१५ या सूत्रावरील भाष्याचा, प्रकाशकारांनीं आपल्या मताच्या समर्थनार्थ आधार दिला आहे) त्या भाष्यांतच स्पष्टपणें सांगितलें आहे. ( तें भाष्य पूर्वी दिलेंच आहे व त्या भाष्यांत 'बहिरङ्गो रेफोऽन्तरङ्गो विसर्जनीयः। असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' असें भाष्यकारानीं स्पष्ट म्हटलें आहे.) तसेंच 'संयोगान्तलोपे यणः प्रतिषेधः' या पूर्वपठित वार्तिकाचें 'न वा बहिरङ्गलक्षणत्वात्' असें पुढें वेगळें वार्तिक पठित करून वार्तिककारानें प्रत्याख्यान केलें आहे व प्रकाशकारांनीं देखील त्याच म्हणण्याचा आपल्या ग्रंथांत अनुवाद केला आहे. ('असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' ही परिभाषा त्रैपादिक अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं त्रिपादींत यथोद्देशपक्षांत किंवा कार्यकालपक्षांत प्रवृत्त होत नाहीं असें जें प्रकाशकारांचें म्हणणें आहे त्याचें खण्डन करण्याकरितां व कार्यकालपक्षांत ती परिभाषा त्रिपादींत प्रवृत्त होते हें सिद्ध करण्याकरितां दीक्षितांनीं वरील पंक्ति लिहिली आहे. ते म्हणतात कीं, 'नार्पत्यः' या स्थलीं मागें सांगितलेल्या प्रक्रियान्वयें पूर्वी झालेलें सापादिक बहिरङ्ग वृद्धिकार्य, विसर्गरूप त्रैपादिक अन्तरङ्गकार्य करतेवेळीं 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषान्वयें असिद्ध, म्हणजे झालेंच नाहीं असें, मानलें तरच रकाराचा विसर्ग होण्याची आपत्ति टळते. त्रैपादिक सूत्रानें अन्तरङ्गकार्य करतेवेळीं बहिरङ्गपरिभाषा–परि. ५०– त्रिपादींत प्रवृत्त होत नाही असें मान-

मानल्यास, म्हणजे तो झालाच नाही व 'सुधी' यांतील अन्त्य ईकार विद्यमानच आहे असें मानल्यास, धकारापुढें यकार नसून ईकारच आहे असें मानावें लागेल व 'अनचि च' या सूत्रांत 'अनचि' हा निषेध असल्यामुळे धकाराचें द्वित्व होणार नाही व यकार विद्यमान नाहीं असे मानल्याने यकाराचे देखील द्वित्व होणार नाही. ही आपत्ति टाळण्याकरितां व इष्ट द्विधकारयुक्त व द्वियकारयुक्त रूपें सिद्ध होण्याकरितां कार्यकालपक्षाचा आश्रय न करितां यथोद्देशपक्षाचाच आश्रय करणें योग्य आहे असें दीक्षितांचें म्हणणें आहे; कारण यथोद्देशपक्षांत बहिरङ्ग परिभाषा त्रिपादीत उपस्थित होत नसल्या-मुळें, त्रैपादिक अन्तरङ्ग द्वित्वकार्य करतेवेळी बहिरङ्ग यणादेश असिद्ध ठरत नाही व त्यामुळें धकाराचे व यकाराचे द्वित्व होण्यात काही अडचण येत नाही आणि इष्ट रूपांची सिद्धि करतां येते.) यथोद्देशपक्षाचा आश्रय करूनच भाष्यकारांनी मय्पुढे असलेल्या यणाच्या द्वित्वाचें 'दध्यत्र' हे उदाहरण दिलें आहे. ('अनचि च' ८.४.४७ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनी 'द्विर्वचने यणो मयः' हे वार्तिक पठित करून 'अथ मय इति पञ्चमी यण इति षष्ठी दध्यत्र मध्व्वत्रेत्युदाहरणम्' एवढेंच म्हटलें आहे. त्या भाष्यांत भाष्यकारांनी *यथोद्देशपक्षाचा किंवा कार्यकालपक्षाचा मुळीच उल्लेख केला नाही* व कार्यकालपक्षात द्वित्व होऊं शकत नाही आणि यथोद्देशपक्षांतच द्वित्व होऊ शकते असेहि मुळीच म्हटलें नाही. तथापि दीक्षितांच्या मतें कार्यकालपक्षात बहिरङ्गपरिभाषा त्रिपादीत प्रवृत्त होऊन यणादेश असिद्ध ठरत असल्यामुळे आणि त्यामुळें अन्तरङ्ग द्वित्वकार्य होणे शक्य नसल्यामुळें ते असे म्हणतात की, भाष्यकारांनी वरील भाष्यांत जीं दोन द्वित्वाची उदाहरणे दिली आहेत ती यथोद्देशपक्ष मानूनच दिली आहेत.) 'इकोऽसवर्णे शाकल्यस्य ह्रस्वश्च' सू. ९१ या सूत्रान्वये एक अधिक वेगळें रूप देखील होऊ शकते असे कोणी म्हटल्यास, तें म्हणणे बरोबर नाही; कारण त्या सूत्राने होणाऱ्या कार्याचा

'न समासे'—सू. ९१ वरील वार्तिक—या वार्तिकानें निषेध केला आहे. नित्यसमासांतच त्या सूत्रानें होणाऱ्या कार्यांना निषेध होतो हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण भाष्यकारांनीं त्या वार्तिकांतील 'नित्य' या शब्दाचें प्रत्याख्यान केलें आहे आणि 'यथोत्तरं मुनीनां प्रामाण्यम्' या वचनान्वयें भाष्यकारांचें म्हणणें वार्तिककाराच्या म्हणण्यापेक्षां जास्त प्रमाणभूत ठरतें. (शंकाकाराचें असें म्हणणें आहे कीं, 'सुध्युपास्यः' याचीं कौमुदींत दीक्षितांनीं जीं चार रूपें सिद्ध करून दाखविलीं आहेत त्याखेरीज 'इकोऽसवर्णे' या सूत्रान्वयें वैकल्पिक प्रकृतिभाव व ह्रस्व केल्यानें 'सुधि उपास्यः' असें पांचवें रूप देखील सिद्ध होऊं शकतें; कारण 'सुधी' यांतील अन्त्य ईकार या इक्पुढें 'उ' हा असवर्ण अच् आहे. पण ही शंका बरोबर नाहीं असें दीक्षित म्हणतात; कारण समासांतील दोन पदांना सन्धि करतेवेळीं वरील सूत्र, 'न समासे' हा निषेध असल्यामुळें, लागू पडत नाहीं व त्यामुळें शंकाकारानें दिलेलें पांचवें रूप सिद्ध होऊं शकत नाहीं. 'न समासे' हा निषेध नित्यसमासालाच लागू पडतो व इतर समासांना लागू पडत नाहीं हें म्हणणें देखील बरोबर नाहीं. हें खरें कीं, 'इकोऽसवर्णे' ६.१.१२७ या सूत्रावर 'सिन्नित्यसमासयोः शाकलप्रतिषेधः' असें वार्तिक वार्तिककारानें पठित केलें आहे व त्या सूत्रावरील भाष्यांत कैयटानें नित्यसमासाची 'नित्याधिकारविहितः समासो नित्यसमासः। यो वा विग्रहाभावादस्वपदविग्रहत्वान्नित्यः समासः सोऽपि नित्यसमासः।' अशी व्याख्या दिली आहे. पण भाष्यकारांनीं त्या वार्तिकांतील 'नित्य' या शब्दाचें प्रत्याख्यान केलें आहे व असें म्हटलें आहे कीं, 'नित्यग्रहणेन नार्थः। सित्समासयोः शाकलं न भवतीत्येव। इदमपि सिद्धं भवति—वाप्यामश्वो वाप्यश्वः। नद्यामातिर्नद्यातिः।' भाष्यकारांच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, 'वाप्यामश्वः, नद्यामातिः' या वाक्यांतील दोन शब्दांचा समास करणें हें 'विभाषा' सू. ६६५ या सूत्रान्वयें वैकल्पिक असल्यामुळें त्या दोन शब्दांचा

समास केल्यास तो नित्यसमास ठरत नाहीं व वरील वार्तिकांत 'नित्य' हा शब्द कायम ठेवल्यास, वरील समासांतील दोन पदांचा सन्धि करतेवेळीं वैकल्पिक प्रकृतिभाव व ऱ्हस्व होण्याची व 'वापि अश्वः, नदि आतिः' अशीं अनिष्ट रूपें सिद्ध होण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति टाळण्याकरितां वरील वार्तिकांतील 'नित्य' या शब्दाचें प्रत्याख्यान करणें आवश्यक आहे व तसें केल्यानें वर दर्शविलेलीं अनिष्ट रूपें सिद्ध होऊं शकत नाहींत. हें भाष्यकारांचें म्हणणें वार्तिककाराच्या म्हणण्यापेक्षां, 'यथोत्तरं मुनीनां प्रामाण्यम्' या सिद्धान्तान्वयें, अधिक प्रमाण मानलें पाहिजे व त्यामुळें 'सुधि उपास्यः' असें पांचवें रूप मुळींच सिद्ध होऊं शकत नाहीं असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे.) आतां येथें अशी शंका करण्यांत येते कीं, 'सुध्युपास्यः' या स्थलीं यणादेश होऊं शकतच नाहीं; कारण 'ध्यै' धातूचें संप्रसारण होऊन 'सुधी' हा शब्द सिद्ध झालेला असल्यामुळें, 'सम्प्रसारणाच्च' सू. ३३० या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होण्याची आपत्ति येते, म्हणजे प्राप्ति होते. पण ही शंका बरोबर नाहीं; कारण 'सम्प्रसारणपूर्वत्वे समानाङ्गग्रहणम्' असें वार्तिक आहे आणि दुसरें असें कीं, संप्रसारण व त्याच्यापुढील अच् या दोहोंचे जागीं झालेला पूर्वरूप एकादेश ('हलः' सू. २५५९ या सूत्रानें दीर्घ झाल्यावर) संप्रसारणसंज्ञक होत नाहीं. ('ध्यायतेः सम्प्रसारणं च'—सू. ३१५८ वरील वार्तिक—या वार्तिकानें 'ध्यै' धातूहून क्विप्प्रत्यय होऊन व तो प्रत्यय अशित् असल्यामुळें 'आदेच उपदेशेऽशिति' सू. २३७० या सूत्रानें 'ध्यै' यांतील 'ऐ' चा 'आ' होऊन आणि त्या धातूंतील यकाराचें संप्रसारण होऊन, म्हणजे 'इग्यणः सम्प्रसारणम्' सू. ३२८ या सूत्रानें यकाराचे जागीं इकार होऊन, 'ध्या = धि + आ' असें रूप झाल्यावर 'सम्प्रसारणाच्च' या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन 'धि' असें रूप सिद्ध झालें असतां, त्या रूपांत धकार या हल्पुढें 'इ' हें संप्रसारण असल्यामुळें 'हलः' या सूत्रानें संप्रसारण दीर्घ होऊन 'धी' असा

शब्द सिद्ध होतो. या शब्दापुढें 'उपास्यः' हा शब्द आला असतां 'धी' यांतील पूर्वरूप एकादेश होऊन दीर्घ झालेल्या 'ई' या संप्रसारणापुढें 'उ' हा अच् असल्यामुळें, 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें यणादेश व 'सम्प्रसारणाच्च' या सूत्रानें पूर्वरूप एकादेश पावला आहे. 'इको यणचि' या सूत्राच्या मानानें 'सम्प्रसारणाच्च' हें परसूत्र आहे व 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू. १७५ या वचनान्वयें पूर्वरूप एकादेशच झाला पाहिजे व यणादेश होऊं शकत नाहीं अशी शंकाकाराची शंका आहे. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात कीं, 'सम्प्रसारणाच्च' ६.१.१०८ या सूत्रावर 'सम्प्रसारणात्परपूर्वत्वे समानाङ्गग्रहणमसमानाङ्गप्रतिषेधार्थम्' असें वार्तिक पठित केलें आहे. त्या वार्तिकांतील 'समान' या शब्दाचा 'एक' असा अर्थ असून त्या वार्तिकाचा असा अर्थ आहे कीं, संप्रसारण व त्यापुढील अच् हे दोन्ही एकाच अङ्गांत असल्यास, 'सम्प्रसारणाच्च' या सूत्रानें होणारा पूर्वरूप एकादेश होऊं शकतो. सम्प्रसारण एका अङ्गांत व त्या पुढील अच् भिन्न अङ्गांत असल्यास पूर्वरूप एकादेश होऊं शकत नाहीं. 'सुध्युपास्य' या स्थलीं समास झाल्यावर त्या समस्त–सामासिक–शब्दास जरी एकच अङ्ग आहे असें म्हणतां येतें तरी, वार्तिकांतील 'समानाङ्ग' या शब्दाचा 'अङ्गाघटित अङ्ग', म्हणजे एका अङ्गांत नसणारें दुसरें अङ्ग, असा अर्थ आहे व 'सुध्युपास्यः' या स्थलीं वास्तविक 'सुधी' व 'उपास्य' हीं दोन भिन्न अङ्गें असल्यामुळें, 'सुध्युपास्य' हें समानाङ्ग ठरत नाहीं आणि या स्थलीं 'सुधी' यांतील अन्त्य ईकार संप्रसारणसंज्ञक मानला तरी, संम्प्रसारण पूर्व अङ्गांत असून त्यापुढील 'उ' हा अच् त्याच अङ्गांत नसून 'उपास्य' या पुढील भिन्न अङ्गांत असल्यामुळें, 'सम्प्रसारणाच्च' हें सूत्र वरील वार्तिकान्वयें प्रकृत स्थलीं लागू पडत नाहीं व पूर्वरूप एकादेश न होतां यणादेश होऊन 'सुध्युपास्यः' असें इष्ट रूप सिद्ध होतें. वरील वार्तिकाचें, 'सिद्धमसम्प्रसारणात्' हें दुसरें वार्तिक पठित करून, भाष्यकारांनीं प्रत्याख्यान केलें

असल्यामुळे, दीक्षित पुढे असे म्हणतात की, 'इग्यणः सम्प्रसारणम्' सू ३२८ या सूत्रान्वये यण्चे जागी होणाऱ्या इक्लाच सम्प्रसारणसंज्ञा होणे मागितले आहे. सम्प्रसारण व त्यापुढील अच् या दोहोंचे जागी 'सम्प्रसारणाच्च' या सूत्राने जो पूर्वरूप एकादेश होतो त्याला देखील सम्प्रसारणसंज्ञा होते असे पाणिनीय शास्त्रात कोठेहि सांगितले नाही. तथापि 'सम्प्रसारणाच्च' या सूत्राने झालेला पूर्वरूप एकादेश सम्प्रसारणसंज्ञक न मानल्यास, 'हलः' सू. २५५९ हे सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. त्या सूत्राचा 'अङ्गावयवात् हल परं यत्सम्प्रसारणं तदन्ताङ्गस्य दीर्घः स्यात्' असा अर्थ आहे. 'ह्वेञ् स्पर्धायां शब्दे च' या यजादिगणात पठित असलेल्या धातूहून 'क्त = त' हा कित्प्रत्यय केला असता, 'वचिस्वपियजादीनां किति' सू. २४०९ या सूत्राने त्या धातूतील वकाराचे 'उ' असे सम्प्रसारण होऊन 'हु + ए + त' अशी स्थिति होते. अशा स्थितीत जर हकार या हल्पुढे असलेल्या 'उ' या सम्प्रसारणास 'हलः' या सूत्राने होणारे दीर्घकार्य केले तर 'हू + ए + त = ह्वेत' असे अनिष्ट रूप होईल व 'हूत' असे इष्ट रूप होणार नाही ते इष्ट रूप सिद्ध होण्याकरिता 'सम्प्रसारणाच्च' या सूत्रानें झालेला पूर्वरूप एकादेश देखील सम्प्रसारणसंज्ञक होतो असे मानणे आवश्यक आहे व तसे मानल्यानेच 'हलः' हे सूत्र चरितार्थ ठरून 'हु + ए + त = हुत = हूत' असे इष्ट रूप सिद्ध होऊ शकते. पण 'हलः' या सूत्राच्या आरम्भसामर्थ्याने जरी 'सम्प्रसारणाच्च' या सूत्रानें झालेला पूर्वरूप एकादेश सम्प्रसारणसंज्ञक ठरतो तरी, 'हलः' या सूत्रानें दीर्घकार्य केल्यावर तशा दीर्घाला सम्प्रसारणसंज्ञक मानण्यास काहीच प्रमाण नाही. म्हणून 'ध्यै + क्विप् = ध्या + क्विप् = धि + आ + क्विप्' अशी पूर्वी सांगितलेल्या प्रक्रियेप्रमाणे स्थिति झाली असता 'धि' यातील इकार जसा सम्प्रसारणसंज्ञक ठरतो तसाच पूर्वरूप एकादेश केल्यावर च 'धि + क्विप्' अशी स्थिति झाल्यावर

या पूर्वरूप एकादेशांतील 'इ' हा देखील जरी 'हलः' या सूत्राच्या आरंभसामर्थ्यानें संप्रसारणसंज्ञक ठरतो तरी, तो त्या सूत्रानें दीर्घ होऊन 'धी + क्विप् = धी + ०' अशी स्थिति झाली असतां 'धी' यांतील अन्त्य ईकार संप्रसारणसंज्ञक ठरत नसल्यामुळें, 'सुधी + उपास्यः' या स्थलीं संप्रसारणापुढें अच् आहे असें मुळींच मानतां येत नाहीं आणि त्यामुळें 'सम्प्रसारणाच्च' या सूत्राची या स्थलीं प्रवृत्तीच होऊं शकत नाहीं व 'इको यणचि' हें सूत्र प्रवृत्त होऊन 'सुध्युपास्यः' असें इष्ट रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. म्हणून शंकाकाराची वरील शंका व्यर्थ ठरते असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे. 'सम्प्रसारणाच्च' ६.१.१०८ या सूत्रावर पठित केलेलें जें वार्तिक दीक्षितांनीं मनोरमेंत दिलें आहे त्याचें प्रत्याख्यान करितांना त्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात:–'सिद्धमसम्प्रसारणात् । सिद्धमेतत् । कथम् ? । असम्प्रसारणात् । कथमसम्प्रसारणम् ?।... अन्योऽयं सम्प्रसारणाऽसम्प्रसारणयोः स्थाने एक आदिश्यते ।...यदि तर्हि नेदं सम्प्रसारणं हूत इति दीर्घत्वं न प्राप्नोति । दीर्घत्वं च वचनप्रामाण्यात् । अनवकाशं दीर्घत्वं, तद्वचनप्रामाण्याद्भविष्यति ।' या भाष्याला धरूनच वरील विवरण केलें असल्यामुळें त्या विवरणाच्या सहायानें या भाष्याचा अर्थ ध्यानांत सहज येऊं शकतो आणि म्हणून या भाष्याचा अर्थ देण्याची गरज वाटत नाहीं.) पण असें जरी आहे तरी, 'न भूसुधियोः' सू. २७३ हें यण्कार्यनिषेधक सूत्र असल्यामुळें (व 'सुधी + उपास्यः' या स्थलीं 'सुधी' यापुढें 'उ' हा अच् असल्यामुळें येथें) यणादेशाची प्राप्तीच होत नाहीं असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें देखील बरोबर नाहीं; कारण तें सूत्र अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें 'सुधी' या अङ्गापुढें विभक्तिप्रत्यय आला असतांच, तें निषेधक सूत्र लागू पडतें. दुसरें असें कीं, 'अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वा'–परि. ६२–या न्यायान्वयें तें निषेधक सूत्र 'एरनेकाचः' सू. २७२ व 'ओः सुपि' सू. २८१ या दोन पूर्व-

सूत्रांनी प्राप्त होणाऱ्या कार्यांचेच निषेधक ठरते. (फार पूर्वी पठित असलेल्या 'इको यणचि' या सूत्राने होणाऱ्या कार्याचे ते सूत्र निषेधक ठरत नाही आणि म्हणून 'सुध्युपास्य.' या स्थली तेनिषेधक सूत्र लागू पडत नसल्यामुळे, 'इको यणचि' या सूत्राने यणादेश होण्यात काही प्रत्यवाय येत नाही. दुसरे असे की, 'सुधी' या शब्दापुढें अजादि विभक्तिप्रत्यय नसून भिन्न पदातील उकार त्यापुढे आहे व 'न भूसुधियोः' या सूत्राचा 'एतयोर्यण् न स्यात् अचि सुपि' असा अर्थ आहे आणि तसा त्या सूत्राचा अर्थ होण्याचे कारण हे आहे की, ते सूत्र अङ्गाधिकारात पठित असल्यामुळे व अङ्गसंज्ञा होण्याकरिता 'यस्मात् प्रत्ययविधिः' सू. ९९ या सूत्रान्वये पुढे विभक्तिप्रत्यय असणे आवश्यक असल्यामुळे, ते निषेधक सूत्र अजादि 'सुप्' प्रत्यय पुढे असल्यास प्रवृत्त होऊ शकते व प्रकृत स्थली अजादि 'सुप्' प्रत्यय 'सुधी' यापुढें नसल्यामुळे, ते सूत्र प्रकृत उदाहरणात मुळीच प्रवृत्त होऊ शकत नाही व 'इयङ' आदेश न होता यणादेश होतो ) 'धात्रंश' या उदाहरणात रेफाचे–रकाराचे–द्वित्व होत नाही; कारण द्वित्वप्रकरणात पठित असलेल्या 'अचो रहाभ्या द्वे' सू. ५९ या सूत्रातील 'रहाभ्याम्' या पदात रकार हा निमित्तरूपानें साक्षात् पठित केला असल्यामुळे, तो द्वित्वाचा कार्यी होऊ शकत नाही व त्याचे ठिकाणी द्वित्वकार्याचा बाध होतो. ('अचो रहाभ्या द्वे' या सूत्राने अचापुढे असलेल्या रकारापुढे किंवा हकारापुढे यर् आल्यास त्या यर्चे विकल्पेकरून द्वित्व होणे सांगितले आहे. या सूत्राने यर्चे पाक्षिक द्वित्व होण्यास दोन निमित्तांची आवश्यकता आहे—– १. यरामागें रकार किंवा हकार असणे व २. त्या रकाराच्या किंवा हकाराच्या मागें अच् असणे. सारांश वरील सूत्रात रकार व हकार निमित्तरूपाने साक्षात् पठित केले असल्यामुळें, रकार हा द्वित्वाचा कार्यी होऊ शकत नाही असे 'हयवरट्' या शिवसूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी सांगितले आहे. त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात—

'द्विर्वचनेऽपि नेमौ रहौ कार्यिणौ द्विर्वचनस्य। किं तर्हि?। निमित्तमिमौ रहौ द्विर्वचनस्य। तद्यथा। ब्राह्मणा भोज्यन्तां माठरकौण्डिन्यौ परिवेविष्टामिति नेदानीं तौ भुञ्जाते।' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, सर्व ब्राह्मणांना जेवावयास घाला असें सामान्य वाक्य उच्चारलें असतां, माठर व कौण्डिन्य हे ब्राह्मण असल्यामुळें त्यांना जरी ब्राह्मणांच्या पंक्तींत भोजनास बसण्याची प्राप्ति होते तरी, त्यांनीं पंक्तींत वाढावें असें विशेष वाक्य उच्चारलें असल्यामुळें, 'सामान्यस्य विशेषं बाधकं भवति' या न्यायान्वयें तें विशेष वाक्य सामान्य वाक्याचें बाधक ठरून त्या दोघांना ब्राह्मणांच्या पंक्तींत जसें जेवण मिळत नाहीं त्याचप्रमाणें यराचें द्वित्व करावें असें जरी सामान्य विधान केलें आहे व रेफ यर्प्रत्याहारांत अन्तर्भूत असल्यामुळें त्याला द्विर्वचनाची प्राप्ति होते तरी, तो द्वित्वाचें निमित्त या विशेष रूपानें वरील सूत्रांत साक्षात् पठित केलेला असल्यामुळें, तें विशेष विधान सामान्य विधानाचें बाधक ठरतें व रेफ द्वित्वाचा कार्यी होऊं शकत नाहीं, म्हणजे त्याचें द्वित्व होऊं शकत नाहीं, आणि यालाच 'सत्यपि सम्भवे बाधनं भवति' किंवा माठरपरिवेषण न्याय म्हणतात. या विषयासंबंधानें दीक्षितांनीं शब्दकौस्तुभांत सुंदर रीतीनें व्याख्यान केलें आहे. ते म्हणतात:—'रेफस्य विशेषतः श्रुतेन द्वित्वं प्रति निमित्तत्वेन सामान्यतः श्रुतं कार्यित्वं बाध्यते। यथा ब्राह्मणा भोज्यन्तां माठरकौण्डिन्यौ परिवेविष्टामिति विशेषतः श्रुतेन परिवेषणेन माठरकौण्डिन्ययोः सामान्यतः प्राप्तं भोजनं बाध्यते तद्वत्। यद्यपीह लक्ष्यव्यक्तिभेदेनोभयं सम्भवति तथापि सत्यपि सम्भवे सामान्यतः प्राप्तं विशेषप्राप्तेन बाध्यते इत्यभ्युपगमान्न दोषः। एवं चाऽचोरहाभ्यामिति सूत्रे यर इति रेफभिन्नपरमेवेति स्थिते अनचि चेत्यत्रापि तथैव, अर्थाधिकाराश्रयणात्। तेन हर्यनुभव इत्यादावपि रेफस्य न द्वित्वम्।' यावरून हें स्पष्ट होतें कीं, 'अचो रहाभ्यां द्वे' या सूत्रानें जसें रेफाचें द्वित्व होत नाहीं त्याचप्रमाणें त्याच द्वित्वप्रकरणांत पठित

असलेल्या 'अनचि च' या सूत्राने देखील त्याचे द्वित्व होत नाही.) 'इको यणचि' या सूत्रात 'इक्' हा जरी स्थानिरूपाने पठित आहे तरी 'तस्मादित्युत्तरस्य' इत्यादि पाणिनीय निर्देश असल्यामुळे, त्या ज्ञापकाच्या आधारे इक्‌चे स्थानित्व त्याच्या निमित्तत्वाचा बाध करीत नाही व त्यामुळे 'सुध्युपास्यः' इत्यादि रूपे सिद्ध होतात असे कैयटाने म्हटले आहे. (शकाकाराचे असे म्हणणे आहे की, रेफ हा साक्षात् निमित्तरूपाने पठित असल्यामुळे भाष्यकारांनी सांगितल्याप्रमाणे जसे त्याचे निमित्तत्व त्याच्या द्वित्वकार्यित्वाचे बाधक ठरते व त्याचे द्वित्व होऊ शकत नाही. तसेच 'इको यणचि' या सूत्रात 'इक्' हा स्थानिरूपाने साक्षात् पठित असल्यामुळे, त्याच्या स्थानित्वाने त्याच्या निमित्तत्वाचा बाध होतो, म्हणजे तो यणादेशाचे निमित्त ठरू शकत नाही असे मानणे व त्या सूत्रातील 'अचि' या पदाचा 'इग्भिन्ने असवर्णे अचि' असा संकुचित अर्थ करणे आवश्यक आहे. तसा अर्थ केल्याने 'दध्यत्र, मध्वत्र' इत्यादि स्थली इक्‌पुढे इग्भिन्न असवर्ण अच् असल्यामुळे यणादेश होऊन ते सूत्र चरितार्थ ठरते. पण 'सुध्युपास्यः' या स्थली 'ई' या इक्‌पुढे 'उ' हा इक्‌च असल्यामुळे यणादेश होऊ शकत नाही व त्यामुळे धकारापुढे यकार येऊ शकत नसल्यामुळें, धकाराच्या व यकाराच्या द्वित्वाची प्राप्तीच होत नाही. या शकेवर कैयटाच्या वचनाचा आधार घेऊन दीक्षित असे उत्तर देतात की, 'तस्मादित्युत्तरस्य' सू. ४१ व 'दित्य...पत्युत्तरपदाण्ण्य.' सू. १०७७ इत्यादि पाणिनीय निर्देशावरून हे ज्ञापित होते की, इक्‌चे स्थानित्व त्याच्या निमित्तत्वाचा बाध करीत नाही. तसा बाध होणे इष्ट असते तर, 'इ' या इक्‌पुढे वरील निर्देशात 'उ' हा इक् असल्यामुळें पाणिनीनें इकाराचे जागी यकारादेश केला नसता. 'हयवरट्' या शिवसूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत कैयटाने 'दध्युदकादौ तु स्थानित्वेन निमित्तत्वमिकस्तस्मादित्युत्तरस्येत्यादेर्ज्ञापकान्न बाध्यते ।' असे म्हटले आहे व तसेच शब्दकौस्तुभात दीक्षितांनी

'नन्वेवं दध्युदकादौ यण् न स्याद्विशेषतः श्रुतेन स्थानित्वेनेकां निमित्तत्वस्य बाधादिति चेन्न, तत्र लक्ष्यानुरोधेन व्यक्तिपक्षाश्रयणात् । व्यक्तिपक्षे हि प्रतिलक्ष्यमसकृल्लक्षणं प्रवर्तते। यद्वा प्रतिलक्ष्यं भिन्नानां सर्वेषां लक्षणानां तन्त्रेणोच्चारणमिकोयणचीति । ततश्चेकामपि तात्पर्यतो निमित्तत्वप्रतिपादनाददोषः।' असें म्हटलें आहे.) 'धात्रंशः' या उदाहरणांत तकाराचें ('अनचि च' सू. ४८ या सूत्रानें) वैकल्पिक द्वित्व होऊं शकतेंच. ('धातृ+अंशः=धात्र्+अंशः' या स्थलीं 'आ' या अचापुढें तकार हा यर् असल्यामुळें व त्यापुढें अच् नसल्यामुळें, 'अनचि च' या सूत्रानें तकाराचें द्वित्व होऊं शकतेंच) व त्या सूत्रानें होणारें द्वित्व वैकल्पिक असल्यामुळें ('धात्रंशः' व 'धात्त्रंशः' अशीं) दोन पाक्षिक रूपें सिद्ध होतात. 'लाकृतिः' या स्थलीं मात्र एकच रूप सिद्ध होतें (कारण 'लृ+आकृतिः=ल्+आकृतिः' या स्थलीं 'ल्' हा यर् अचापुढें नसल्यामुळें व त्याच्या पुढें 'आ' हा अच् असल्यामुळें आणि 'अनचि च' या सूत्रांत 'अनचि' हा निषेध असल्यामुळें, त्या सूत्रानें लकाराचें द्वित्व होऊं शकत नाहीं.)

शब्दरत्न--उभयद्वित्वेति । द्विधं द्वियमेकम् । पुनर्द्वित्वे त्रिधं त्रियम् । अन्यतरेति । एकधं द्वियं त्रियं च, एकयं द्विधं त्रिधं च, द्वयोरपि द्वित्वे अन्यतरस्य पुनर्द्वित्वे द्विधं त्रियम्, त्रिधं द्वियं च, अनुभयद्वित्वे एकधमेकयम् । लोपविकल्पान्यतरद्वित्वयोः समफलता, सम्भवमात्रेण तु तदुक्तिः । एकः पूर्वपरयोरिति । तत्र हि यथा--'अनयोः पूलयोः कटं कुरु' इत्यादौ एकवाक्यतयैव बोधादेकत्व-विवक्षणेनोभयसम्बन्ध्येककटकरणप्रतीतिस्तथा आदचिपूर्वपरयोर्गुण इत्यादावपि द्वन्द्वनिर्देशाद्विधेयगतसंख्याविवक्षणाच्चोभयोः स्थाने एक एवादेशो भविष्यतीत्येकग्रहणं प्रत्याख्याय शङ्कितम्--शास्त्राधिकारिणः पुरुषान्प्रति प्रवृत्तं संस्कारकं तत्तच्छास्त्रं प्रतिपुरुषमेकवाक्यतया सकृदेवार्थबोधकं, यथाऽऽधानेनाग्नीन्संस्कुर्यादित्यर्थकं "वसन्ते ब्राह्मणोऽग्नीनादधीत" इति वाक्यं प्रतिब्राह्मणं सकृदेवार्थबोधकं सकृदेव

स्वविषये प्रवर्तकं च । अत एव पुनः पुनर्नाधानादिसंस्कारः, तथा व्याकरणशास्त्रस्य "अवर्णादचि पूर्वपरयोर्गुणो भवति, गुणवान् शब्दश्च साधुर्भवति, स च प्रयोक्तव्यः" इत्येतावत्पर्यन्तं व्यापारात्तत्संस्कृतस्यैकस्य खट्वेन्द्रस्य प्रयोगेण शास्त्रार्थस्य करणान्मालेन्द्रादिप्रयोगो न स्यात् । अतस्तत्तल्लक्ष्यविषयवाक्योपप्लवेन वाक्यभेदोऽवश्यं वाच्यः । तद्वत्पूर्वपरविषये ऽपि स्यादिति तत्रैकग्रहणमावश्यकमिति । तत्र गुणो भवतीत्याद्यंशो लक्ष्यसंस्कारफलक एव यथाऽऽधानमग्निसंस्कारकं, शास्त्रतात्पर्यविषयप्रयोगविधिश्च पुरुषसंस्कारक एवेति तदाशयः । ततः सिद्धान्तितम्—यथा नित्यनैमित्तिककाम्यविधीनां तदकरणजन्यप्रत्यवायपरिहाराय फलाय च वाक्यभेदेन तत्तद्विषयकशास्त्रोपप्लवात् पुनः प्रवर्तकत्वम् । तथा समाप्यसाधुप्रयोगे प्रत्यवायश्रवणान्नित्यसमत्वं प्रयोगविधेः । "एकः शब्दः सम्यग् ज्ञातः शास्त्रान्वितः सुष्ठु प्रयुक्तः स्वर्गे लोके च कामधुग्भवति" इत्यनेन काम्यत्वं चेति तत्तद्विषयानन्तवाक्योपप्लवेन भवत्येव मालेन्द्रादिप्रयोग इति । एवं प्रयोगविध्यंशस्य नित्यकाम्यत्वव्यवस्थापनेन गुणविध्यंशस्य शुद्धसंस्कारार्थत्वमेवोक्तम् । एवं च तस्याधानादिवदेवाग्निस्थानीयलक्ष्येषु सर्वेषु प्रवृत्तावपि एकाग्नाविवैकलक्ष्ये नावृत्तिरिति पूर्वपरयोर्निर्देशद्वयप्रसक्तिरिति तत्तात्पर्यम् । एवं च स्पष्टमेव पूर्वपक्षसिद्धान्तयोरयं न्यायः संस्कारकविधिविषये सिद्धान्तित इति भावः । "संप्रसारणाच्च" इति सूत्रे भाष्ये ऽपि स्फुटोऽयम् ।

('धकारयकारोभयद्वित्वे, उभयोः पुनर्द्वित्वे, लोपविकल्पेऽन्यतरद्वित्वे च, नव रूपाणि' असें जें प्रकाशकारांनीं म्हटलें आहे त्यांतील प्रत्येक पदाचें आतां शब्दरत्नकार व्याख्यान करितात व नव रूपें कशीं व कोणतीं प्रकाशकारांच्या मतें होतात हें सांगतात. 'सुधी+उपास्यः' या स्थलीं 'सुधी' यांतील अन्त्य ईकाराचे जागीं 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें यकारादेश केल्यावर 'सुध्य्' अशी स्थिति झाली असतां, 'अनचि च' या सूत्रानें व 'यणो मयो द्वे वाच्ये' या

वार्तिकानें अनुक्रमें) 'उभयद्वित्वे' म्हणजे धकार व यकार या दोहोंचेंहि द्वित्व केलें असतां, ज्यांत दोन धकार व दोन यकार आहेत असें 'सुध्ध्य्य्' हें प्रथम रूप होतें. 'पुनर्द्वित्वे,' म्हणजे त्याच धकाराचें व यकाराचें पुन्हा द्वित्व केलें असतां, ज्यांत तीन धकार व तीन यकार आहेत असें 'सुध्ध्ध्य्य्य्' हें द्वितीय रूप होतें. (पूर्वी सांगितल्या-प्रमाणें वरील सूत्रानें व वार्तिकानें होणारें द्वित्व वैकल्पिक असल्यामुळें) 'अन्यतरद्वित्वे', म्हणजे धकार व यकार या दोहोंतून एकाचेंच—यकाराचेंच—द्वित्व केल्यास, ज्यांत एक धकार व दोन यकार आहेत असें 'सुध्य्य्' हें तृतीय रूप होतें, (व त्या यकाराचें पुन्हा द्वित्व केल्यास) ज्यांत एक धकार व तीन यकार आहेत असें 'सुध्य्य्य्' हें चवथें रूप होतें. (यकाराचें द्वित्व न करितां धकाराचेंच द्वित्व केल्यास) ज्यांत एक यकार व दोन धकार आहेत असें 'सुध्ध्य्' हें पांचवें रूप होतें, (व त्या धकाराचें पुन्हा द्वित्व केल्यास) ज्यांत एक यकार व तीन धकार आहेत असें 'सुध्ध्ध्य्' हें सहावें रूप होतें. (पुनर्द्वित्व करणें हें देखील प्रकाशकारांच्या मतें वैकल्पिक असल्यामुळें) धकार व यकार या दोहोंचेंहि प्रथम द्वित्व करून नंतर त्या दोहोंपैकीं एकाचेंच—यकाराचेंच—पुनर्द्वित्व केल्यास, ज्यांत दोन धकार व तीन यकार आहेत असें 'सुध्ध्य्य्य्' हें सातवें रूप होतें. (यकाराचें पुनर्द्वित्व न करितां धकाराचेंच पुनर्द्वित्व केल्यास,) ज्यात तीन धकार व दोन यकार आहेत असें 'सुध्ध्ध्य्य्' हें आठवें रूप सिद्ध होतें. (द्वित्वकार्य वैकल्पिक असल्यामुळें) धकार व यकार या दोहोंचेंहि द्वित्व मुळींच न केल्यास, ज्यांत एक धकार व यकार आहे असें 'सुध्य्' हें नववें रूप होतें. (प्रकाशकारांच्या वरील पंक्तींतील इतर सर्व पदांचें शब्दरत्नकारांनीं व्याख्यान केलें असून 'लोपविकल्पे' या पदाचें कां व्याख्यान केलें नाहीं व लोपविकल्पामुळें कोणत्या फलाची सिद्धि होते हें कां सांगितलें नाहीं याचें कारण ते पुढील पंक्तींत देतात.) लोपविकल्प व अन्यतरद्वित्व या दोहोंचें फल सारखेंच आहे,

म्हणजे धकार व यकार या दोहोचे द्वित्व केल्यावर, लोप वैकल्पिक असल्यामुळे एका धकाराचा किंवा एका यकाराचा लोप केल्याने जी रूपे सिद्ध होतात तीच रूपें धकार व यकार यापैकी एकाचे द्वित्व केल्यानें सिद्ध होतात (दोहोचेहि द्वित्व केल्याने 'सुध्‌ध्‌य्‌य्‌' असे रूप झाले असता, या रूपातील दोन धकारातून किंवा दोन यकारातून प्रथम धकाराचा किंवा यकाराचा अनुक्रमे 'झरो झरि' सू ७१ व 'हलो यमा यमि लोप 'सू ६० या सूत्रानी विकल्पेकरून लोप केल्यास, 'सुध्‌य्‌य्‌' व 'सुध्‌ध्‌य्‌' अशी रूपे होतात, आणि धकाराचे किंवा यकाराचे द्वित्व केल्याने देखील हीच दोन रूपे सिद्ध होतात साराश लोपविकल्प व अन्यतरद्वित्व या दोहोचेहि फल वर सागितल्याप्रमाणे एकच आहे असे शब्दरत्नकाराचे म्हणणे आहे आणि म्हणूनच त्यानी 'लोपविकल्पे' या पदाचे स्वतन्त्र व्याख्यान केले नाही मग असे आहे तर प्रकाशकारानी वरील पक्तीत 'लोपविकल्पे' व 'अन्यतरद्वित्वे' ही दोन्ही पदे का घातली व 'अन्यतरद्वित्वे' एवढेच पद का घातले नाही याचे कारण शब्दरत्नकार पुढील पक्तीत सागतात ) लोपविकल्प व अन्यतरद्वित्व या दोन्ही कार्यांची प्राप्ति सभवत असल्यामुळें, प्रकाशकाराच्या वरील पक्तीत ('अन्यतरद्वित्वे' एवढेच पद न घालता) 'लोपविकल्पे, अन्यतरद्वित्वे' ही दोन्ही पदें घातली आहेत ('झरो झरि' व 'हलो यमा यमि लोप ' या सूत्रानी होणारा लोप वैकल्पिक असल्यामुळे व त्या सूत्रान्वयें लोपाची प्राप्ति सभवत असल्यामुळें, वरील पक्तीत प्रकाशकारानी 'लोपविकल्पे' हा शब्द घातला आहे तसेच 'अनचि च' या सूत्रानें व 'यणो मयो द्वे वाच्ये' या वार्तिकाने होणारे द्वित्व वैकल्पिक असल्यामुळें त्या द्वित्वकार्याची देखील प्राप्ति सभवते. म्हणून वरील पक्तीत 'अन्यतरद्वित्वे' हे पद देखील प्रकाशकारानी घातले आहे. तथापि दोहोचेहि फल एकच आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे 'पुनर्द्वित्वमशुद्धम्' हे म्हणणे सिद्ध करण्याकरिता 'एक. पूर्वपरयो ' सू ६ १.८४ या सूत्रावरील ज्या भाष्याचा

आधार दीक्षितांनीं मनोरमेंत दिला आहे) त्या भाष्यांत, 'अनयोः पूल्योः कटं कुरु'—या दोन पेंड्यांची चटई कर—इत्यादि स्थलीं एकवाक्यतेनेंच पदांच्या अर्थाचा बोध होत असल्यामुळें, 'कटम्' यांतील एकवचन विवक्षित होऊन दोन्ही पेंड्यांची मिळून एक चटई कर असा ज्याप्रमाणें त्या वाक्याच्या अर्थाचा बोध होतो त्याचप्रमाणें 'अ'वर्णापुढें अच् आला असतां, पूर्व 'अ'वर्ण व पर अच् या दोहोंचे जागीं गुणादेश होतो असें विधान करणाऱ्या 'आद्गुणः' सू. ६९ इत्यादि सूत्रांत ('एकः पूर्वपरयोः' या अधिकारसूत्रांतून अनुवृत्त होणारा) 'पूर्वपरयोः' हा द्वन्द्वनिर्देश असल्यामुळें 'गुणः' या विधेयांशांतील एकवचन विवक्षित होतें व त्यामुळें पूर्व 'अ'वर्ण व पर अच् या दोहोंचेहि जागीं मिळून एकच आदेश होऊं शकतो आणि म्हणून 'एकः पूर्वपरयोः' या सूत्रांत 'एकः' हें पद असण्याची कांहीं गरज नाहीं असें सांगून, भाष्यकारांनीं 'एकः' या पदाचें प्रत्याख्यान केल्यावर पुढें त्यांनीं अशी शंका केली आहे कीं, शास्त्राधिकारी पुरुषांना उद्देशून सांगितलेलें प्रत्येक संस्कारविधायक शास्त्र प्रत्येक अधिकारी पुरुषाला एकदांच एकवाक्यरूपानें त्या शास्त्राच्या अर्थाचा बोध करून देतें; उदाहरणार्थ आधानानें अग्नि-संस्कार करावा या अर्थाचें प्रतिपादन करणारें 'वसन्ते ब्राह्मणोऽग्नीनादधीत' हें वाक्य प्रत्येक ब्राह्मणाला एकच वेळ अर्थबोध करून देणारें व एकच वेळ अग्न्याधान करण्याकरितां प्रवृत्त करविणारें आहे. असें तें वाक्य असल्यामुळेंच अग्न्याधानादि संस्कार पुन्हा पुन्हा केले जात नाहींत, म्हणजे तसें संस्कारक कर्म एकदांच केलें जातें. त्याच-प्रमाणें 'अ'वर्णापुढें अच् आला असतां पूर्व व पर या दोहोंचे ठिकाणी गुणादेश होतो व अशा गुणादेशानें युक्त शब्द साधु ठरतो आणि तशा शब्दाचा प्रयोग करावा येथपर्यंत 'आद्गुणः' या व्याकरण-शास्त्रांतील सूत्राचा व्यापार होत असल्यामुळें, म्हणजे अशा प्रकारें विधान करणारें तें सूत्र ठरत असल्यामळें, त्या सूत्रानें 'खट्वेन्द्रः'

असा गुणादेश करून प्रयोग केल्यानें तें सूत्र त्या पुरुषापुरतें तसा एक प्रयोग केल्यानें चरितार्थ ठरतें व त्यामुळें, 'मालेन्द्र:' इत्यादि प्रयोग त्या पुरुषाला 'आद्गुण:' या सूत्राचा उपयोग करून पुढे करतां येणार नाहीत अशी आपत्ति येऊं पाहते. म्हणून ती आपत्ति टाळण्याकरिता त्या पुरुषाने 'आद्गुण:' या सूत्राच्या कक्षेत येणाऱ्या प्रत्येक लक्ष्याला गुणरूप संस्कार करतेवेळी ते सूत्र प्रत्येक वेळ उच्चारणें भाग आहे व अशा रीतीने (पुरुष एकच असून देखील त्याला) प्रत्येक लक्ष्य सिद्ध करण्याकरितां वाक्यभेद करणे –अनेक वाक्यें करणे– आवश्यक आहे. पण अशा रीतीने प्रत्येक लक्ष्याचे ठिकाणी संस्कार करण्याकरितां व तें लक्ष्य सिद्ध करण्याकरितां एकच सूत्र पुन्हा पुन्हा उच्चारून जसा वाक्यभेद करावा लागतो त्याचप्रमाणें 'पूर्वपरयो:' या स्थली देखील एका लक्ष्यांतील 'पूर्व' व 'पर' या दोन भिन्न स्थानीचे ठिकाणी संस्कार करण्याकरितां वाक्यभेद करण्याची, म्हणजे दोन्ही स्थानीचे ठिकाणी मिळून एक गुणादेश न करितां प्रत्येक स्थानीचे ठिकाणी गुणादेश करण्याची, आपत्ति येऊं पाहते. ती आपत्ति टाळण्याकरिता 'एक: पूर्वपरयो:' या सूत्रात 'एक:' या पदाचे ग्रहण आवश्यक आहे असें भाष्यकारांनी म्हटलें आहे. ज्याप्रमाणे अग्न्याधान अग्नीचे संस्कार करणारें कर्म आहे, म्हणजे अग्नीचे ठिकाणी अपूर्वत्व उत्पन्न करून देणारे व त्याचे ठिकाणी होम करण्याची पात्रता आणून देणारें संस्कारक कर्म आहे, त्याचप्रमाणें 'आद्गुण:' इत्यादि सूत्रातील 'गुणो भवति' इत्यादि विधेयांश लक्ष्याचे ठिकाणी संस्कार करून देणारा, म्हणजे इष्ट रूप सिद्ध करून देणारा, संस्कारविधि आहे. पण (संस्कार-विधीची जरी एकदाच एकवाक्यरूपाने प्रवृत्ति होते तरी) त्या संस्काराचा तात्पर्यविषय–हेतु–जो प्रयोगविधि आहे तो कर्त्याचे ठिकाणी संस्कार उत्पन्न करून देणारा आहेच म्हणजे अग्नीचे ठिकाणी अपूर्वत्व व होमपात्रता उत्पन्न करून देण्याकरिता अग्न्याधानरूप संस्कारक कर्म जरी एकदाच केले जाते तरी त्याचा मुख्य हेतु हाच असतो की तने

अग्निसंस्कारक कर्म करणाऱ्या पुरुषाला पुढें दररोज होम व वेळोवेळीं त्या अग्नींत पुढें अनेक पुण्यजनक यज्ञयागादि प्रयोग विधि करून ऐहिक व पारलौकिक सुखप्राप्त्यर्थ पुण्यसंचय करतां यावा, असा वरील भाष्याचा आशय आहे. त्यानंतर भाष्यकारांनीं असा सिद्धांत सांगितला आहे कीं, ज्याप्रमाणें नित्य व नैमित्तिक कर्म न केल्यानें प्रत्यवायरूप दोष उत्पन्न होत असल्यामुळें तो दोष टाळण्याकरितां आणि तसेंच नैमित्तिक व काम्य कर्म फलजनक असल्यामुळें त्या कर्मापासून उत्पन्न होणारें फल प्राप्त करून घेण्याकरितां नित्य-नैमित्तिककाम्यकर्मविधायक शास्त्रवचनांचे ठिकाणीं वाक्यभेद करून, तें तें कर्म पुन्हा पुन्हा करतेवेळीं त्या त्या शास्त्रवचनांचा उच्चार करून तीं तीं कर्मे करण्यांत जशी पुरुषाची प्रवृत्ति केली जाते त्याच-प्रमाणें शब्दाचा अशुद्ध प्रयोग केल्यानें प्रत्यवायरूप दोष येत असल्यामुळें, शुद्धशब्दप्रयोगविधि नित्यकर्मासारखा ठरतो. तसेंच व्याकरणशास्त्रानें संस्कार करून शुद्ध झालेल्या शब्दाचा ज्ञानपूर्वक प्रयोग केल्यास तसा एक देखील शुद्ध प्रयोग इहलोकीं व स्वर्गलोकीं इच्छित फल देतो असें श्रुतिवचन असल्यामुळें, शुद्धशब्दप्रयोगविधि हा काम्यकर्मासारखा देखील ठरतो. अशा रीतीनें शुद्ध शब्दप्रयोग करणें नित्य व तसेंच काम्य कर्म ठरत असल्यामुळें, तसा शुद्ध शब्द-प्रयोग सिद्ध करण्याकरितां व्याकरणशास्त्रांत जीं अनेक सूत्रें पठित केलीं आहेत त्यांचा प्रत्येक शुद्ध शब्दप्रयोग करतेवेळीं प्रत्येक वेळीं उच्चार केल्यानें 'मालेन्द्रः' इत्यादि शुद्ध शब्दप्रयोग सिद्ध होऊं शकतातच. अशा रीतीनें प्रयोगविधि हा नित्य व काम्यकर्मासारखा आहे असा भाष्यकारांनीं सिद्धान्त स्थापित केला असल्यामुळें, ('आद्गुणः' या सूत्रानें सांगितलेला) गुणविधि हा शुद्ध रूप सिद्ध करून देणारा संस्कारक विधीच आहे हें सिद्ध होतें. म्हणून अनेक अग्नींचे ठिकाणीं जरी भिन्न भिन्न आधानसंस्कार होतात तरी ज्याप्रमाणें एक अग्नीचे ठिकाणीं एकच आधानसंस्कार होतो त्याच-

प्रमाणे जरी अनेक लक्ष्याची सिद्धि करण्याकरिता, म्हणजे 'मालेन्द्रः, उपेन्द्रः, रमेशः' इत्यादि रूपाची सिद्धि करण्याकरिता, 'आद्गुणः' हे सूत्र त्या सर्व लक्ष्याचे ठिकाणी प्रवृत्त होते तरी, एका लक्ष्याचे ठिकाणी ते एकदाच प्रवृत्त होते व पुन्हा प्रवृत्त होत नाही. म्हणून पूर्व व पर स्थानी याचे ठिकाणी दोन आदेश होण्याची आपत्ति येत नाही असे वरील भाष्याचे तात्पर्य आहे. साराश वरील भाष्यात पूर्वपक्ष उपस्थित करून पुढे जो सिद्धान्तपक्ष सागितला आहे त्यावरून हा सिद्धान्त निष्पन्न होतो की, 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय सस्कारक विधीच्या विषयात लागू पडणारा न्याय आहे. 'सम्प्रसारणाच्च' ६·१·१०८ या सूत्रावरील भाष्यात देखील हा सिद्धान्त विशद केला आहे. ('अनचि च' या सूत्राने एखाद्या वर्णाचे द्वित्व केल्यावर त्याच सूत्राने त्याच वर्णाचे पुन्हा द्वित्व करणे हे 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' या भाष्यसिद्धान्ताच्या विरुद्ध आहे असे दीक्षितानी मनोरमेत म्हटले आहे व त्यानी आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ 'एकः पूर्वपरयोः' या सूत्रावरील भाष्याचा आधार देऊन असे म्हटले आहे की, त्या भाष्यात भाष्यकारानी 'एकस्या व्यक्तौ एक लक्षण सकृदेव प्रवर्तते' असा सिद्धान्त स्थापित केला आहे. वास्तविक त्या भाष्यात हा न्याय कोठेहि स्पष्टपणे सागितलेला आढळत नाही. म्हणून त्या भाष्यावरून वरील न्याय कसा सिद्ध होतो हे स्पष्ट करण्याकरिता शब्दरत्नकारानी 'तत्र हि यथा' येथपासून 'सिद्धान्तिन इति भाव ' येथपर्यंत ग्रन्थ लिहिला आहे. हा विषय बराच कठीण व पारिभाषिक असून शब्दरत्नकारानी तो अवघड भाषेत सागितला असल्यामुळे, वाचकाच्या लक्षात येण्याकरिता त्या विषयाचे सरळ भाषेत विवरण करणे जरूर आहे. हा विषय पूर्णपणें ध्यानात येण्याकरिता 'एकः पूर्वपरयोः' ६·१·८४ या सूत्रावरील भाष्य काळजीपूर्वक वाचून त्याचा अर्थ नीट समजून घेतला पाहिजे. ते भाष्य बरेच विस्तृत असल्यामुळे ग्रन्थविस्तारभयास्तव त्या सपूर्ण

भाष्याचा उतारा येथे देतां येत नाही. तथापि त्या भाष्याचा सारांश व त्यांतील निष्कर्ष उतारे पुढे देण्यांत येतील व त्या योगानें वरील न्याय त्या भाष्यांतून कसा निघतो हें वाचकांच्या ध्यानांत येईल. त्या भाष्यांत भाष्यकारांनीं असा प्रश्न केला आहे कीं, 'एकः पूर्वपरयोः' या अधिकार सूत्रांत 'एकः' हें पद कां घातलें आहे व त्या प्रश्नाचें उत्तर देतांना त्यांनीं 'एकवचनं पृथगादेशप्रतिषेधार्थम्' हे वार्तिक पठित करून 'एकवचनं क्रियते । किं प्रयोजनम्? । पृथगादेशप्रतिषेधार्थम् । एक आदेशो यथा स्यात् पृथगादेशो मा भूदिति' असें म्हटलें आहे. या भाष्याचा अर्थ हा आहे कीं 'माला+इन्द्रः' इत्यादि स्थलीं 'आ' व 'इ' या दोन भिन्न स्थानींचे जागीं दोन आदेश न व्हावे व त्या दोहोंचे जागीं मिळून एकच आदेश व्हावा याकरितां त्या सूत्रांत 'एकः' हें पद घातलें आहे. पुढें वार्तिककारानें वरील वार्तिकाचें प्रत्याख्यान करून 'न वा, द्रव्यवत्कर्मचोदनायां द्वयोरेकस्याऽभिनिर्वृत्तेः' हे द्वितीय वार्तिक पठित केलें आहे. त्या वार्तिकाचें व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात– 'तद्यथा द्रव्येषु कर्मचोदनायां द्वयोरेकस्याऽभिनिर्वृत्तिर्भवति–अनयोः पूलयोः कटं कुरु, अनयोर्मृत्पिण्डयोर्घटं कुर्विति । न चोच्यते एकमिति, एकं चासौ करोति । किं पुनः कारणम् द्रव्येषु कर्मचोदनायां द्वयोरेकस्याऽभिनिर्वृत्तिर्भवति ? । तच्चैकवाक्यभावात् । एकवाक्यभावात् द्रव्येषु कर्मचोदनायां द्वयोरेकस्याऽभिनिर्वृत्तिर्भवति । आतश्चैकवाक्यभावात् व्याकरणेऽपि ह्यन्यत्र द्वयोः स्थानिनोरेक आदेशो भवति ।' या भाष्याचा आशय हा आहे कीं, कितीहि गांवढळ मनुष्याला एक वाक्य उच्चारून असें सांगितलें कीं, तूं या दोन पेंढ्यांची चटई कर किंवा मातीच्या या दोन पेंडाचा घट कर तर, जरी त्याला स्पष्ट शब्दांत असें सांगितलें जात नाहीं कीं, तूं एकच चटई किंवा एकच घट कर तरी तो एकच चटई किंवा एकच घट बनवितो. यावरून असा सिद्धान्त निघतो कीं वाक्यांतील उद्देश्याचें वचन विवक्षित राहत नसून विधेयाचेंच वचन विवक्षित असतें आणि म्हणूनच 'ग्रहं सम्मार्ष्टि' या वाक्यांतील

'ग्रहम्' या उद्देश्याचा जरी एकवचनात प्रयोग केला आहे तरी, त्याचे वचन विवक्षित नसल्यामुळें, 'सर्वे ग्रहाः—सोमरसपात्राणि—सम्मार्जनीयाः' असा वाक्यार्थ होतो. पण 'पूलयोः कट कुरु' किंवा 'मृत्पिण्डयोर्घटं कुरु' या वाक्यात जरी उद्देश्याचा द्विवचनात प्रयोग केला आहे तरी 'कटं कुरु, घटं कुरु' हे विधेय असल्यामुळे 'कटम्, घटम्' यातील एकवचन विवक्षित होते व त्यामुळे 'एकं कट कुरु, एक घट कुरु' असाच वाक्यार्थबोध होतो. हा न्याय 'एकः पूर्वपरयोः' या अधिकारात पठित असलेल्या 'आद्गुणः, वृद्धिरेचि' इत्यादि सूत्राना लावल्यास त्या सूत्रात 'गुण', वृद्धि' ही विधेये असल्यामुळे त्याचे एकवचन विवक्षित होते व त्यामुळे वरील अधिकारसूत्रात 'एकः' हे पद नसले तरी, 'पूर्वपरयोः एको गुणादेशो भवति, पूर्वपरयोरेको वृद्धिरूप आदेशो भवति' असाच वाक्यार्थ निष्पन्न होतो व त्याचें कारण हे की, एकच वाक्य उच्चारून व त्या वाक्यात विधेयाचा एकवचनात प्रयोग करून उपदेश केला आहे. पण भाष्यकार पुढे अशी शका करतात की असे जर मानले तर, 'रदाभ्या निष्ठातो नः पूर्वस्य च द.' सू. ३०१६, 'उभौ साभ्यासस्य' सू. २६०६ इत्यादि सूत्रात एकच वाक्य उच्चारून दोन स्थानीचे जागी आदेश होणे सागितले असल्यामुळे व विधेयाचा एकवचनातच निर्देश केला असल्यामुळें त्या वरील सूत्रात निर्दिष्ट असलेल्या दोन्ही स्थानीचे जागी मिळून एकच आदेश होण्याची व अनिष्ट रूपे होण्याची आपत्ति येते या शकेचे निरसन करिताना भाष्यकार असे उत्तर देतात की, 'रदाभ्या निष्ठातो न.' या सूत्रात एक वाक्य नसून ते वाक्य व 'पूर्वस्य च दः' अशी दोन वाक्यें आहेत व त्यामुळें वरील न्याय त्या सूत्रास लागू पडत नाही आणि निष्ठातकाराचे जागी व त्याच्या पूर्वी असलेल्या दकाराचे जागी दोन भिन्न नकारादेश होण्यात काही अडचण येत नाही व 'छिन्न', भिन्न.' इत्यादि रूपें सिद्ध होतात. तसेच 'उभौ साभ्यासस्य' या सूत्रात 'उभौ' या शब्दाच्या ग्रहण-

सामर्थ्यामुळें, जें दोन स्थानी नकार आहेत त्यांचे जागीं दोन भिन्न णकारादेश होतात व 'प्राणिणत्' असें रूप सिद्ध होतें. सारांश जेथें एकाच वाक्यानें विधेयांश एकवचनांत उच्चारून उपदेश केला आहे तेथें विधेयगत संख्या विवक्षित असते व त्यामुळें दोन भिन्न स्थानींचे जागीं दोन आदेश न होतां, दोहोंचे जागीं मिळून एक आदेश होऊं शकतो आणि म्हणून 'एकः पूर्वपरयोः' या सूत्रांत 'एकः' या पदाचें ग्रहण करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं असा एकंदरींत भाष्यकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. यानंतर भाष्यकार 'तत्रावयवे शास्त्रार्थसम्प्रत्ययो यथा लोके'—म्हणजे शास्त्राची प्रवृत्ति एकाच व्यक्तीचे किंवा लक्ष्याचे ठिकाणीं होत असते—असें वार्तिक पठित करितात. पण हें वार्तिक मानल्यास, 'आद्गुणः' इत्यादि सूत्रांनीं एकाच लक्ष्याची सिद्धि होईल व त्या सूत्राच्या कक्षेंत येणाऱ्या इतर लक्ष्यांची सिद्धि होऊं शकणार नाहीं. म्हणून तें वार्तिक मानतां येत नाहीं असें सांगून भाष्यकारांनीं त्या वार्तिकाच्या विरुद्ध अर्थाचें 'सिद्धं तु धर्मोपदेशनेऽनवयवविज्ञानाद्यथा लौकिकवैदिकेषु'—म्हणजे धर्माचा उपदेश करणाऱ्या शास्त्रांत समुदायान्तर्भूत प्रत्येक व्यक्तीचे किंवा लक्ष्याचे ठिकाणीं शास्त्राची प्रवृत्ति होते व व्याकरणशास्त्र हें धर्मोपदेश करणारेंच शास्त्र आहे—असें दुसरें वार्तिक पठित केलें आहे. पण हें द्वितीय वार्तिक मानल्यास, दोन भिन्न व्यक्तींचे, म्हणजे 'रमा + ईशः' या स्थलीं 'आ' व 'ई' या दोन स्थानींचे, जागीं 'आद्गुणः' या सूत्रानें दोन आदेश होण्याची आपत्ति येऊं पाहते. म्हणून भाष्यकारांनीं वरील दोन्ही वार्तिकांचें प्रत्याख्यान करून असें म्हटलें आहे कीं, 'उभयथेह लोके दृश्यतेऽवयवेनाऽपि शास्त्रार्थसम्प्रत्ययोऽनवयवेनाऽपि । कथं पुनरिदमुभयं लभ्यम् ? । लभ्यमित्याह । कथम् ? । इह तावद्वसन्ते ब्राह्मणोऽग्नीनादधीतेत्यग्न्याधानं यज्ञमुखप्रतिपत्त्यर्थम् । सकृदाधाय कृतःशास्त्रार्थः, प्रतिपन्नं यज्ञमुखमिति कृत्वा पुनः प्रवृत्तिर्न भवति । अतोऽत्रावयवेन शास्त्रार्थः सम्प्रतीयते ।

तथा गर्भाष्टमे ब्राह्मण उपनेय इत्युपनयनं संस्कारार्थम् । सकृच्चासावुपनीतः संस्कृतो भवत्यतोऽत्राप्यवयवेन शास्त्रार्थः सम्प्रतीयते । …इहेदानीं ब्राह्मणो न हन्तव्यः, सुरा न पेयेति, ब्राह्मणवधे सुरापाने च महान्दोष उक्तः । स ब्राह्मणवधमात्रे सुरापानमात्रे च प्रसक्तः । अतोऽत्रानवयवेन शास्त्रार्थः सम्प्रतीयते ।… तथा वसन्ते ब्राह्मणोऽग्निष्टोमादिभिः क्रतुभिर्यजेतेति, इज्यायाः किञ्चित्प्रयोजनमुक्तम् । किम् ? । स्वर्गे लोकेऽप्सरस एन जाया भूत्वोपशेरते इति । तच्च द्वितीयस्यास्तृतीयस्याश्चेज्यायाः फलं भवितुमर्हति । अतोऽत्राप्यनवयेन शास्त्रार्थः सम्प्रतीयते । तथा शब्दस्यापि ज्ञाने प्रयोगे प्रयोजनमुक्तम् । किम् ? । एकः शब्दः सम्यग्ज्ञातः शास्त्रान्वितः सुप्रयुक्तः स्वर्गे लोके कामधुग्भवतीति । यद्येकः शब्दः सम्यग्ज्ञातः शास्त्रान्वितः सुप्रयुक्तः स्वर्गे लोके कामधुग्भवति किमर्थं द्वितीयस्तृतीयश्च प्रयुज्यते ? । न वै कामाना तृप्तिरस्ति ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की शास्त्र एकाच व्यक्तीचे किंवा लक्ष्याचे ठिकाणी प्रवृत्त होते हे म्हणणें बरोबर आहे व तसेच शास्त्र अनेक व्यक्तीचे किंवा लक्ष्याचे ठिकाणी युगपत् प्रवृत्त होते हे म्हणणे देखील बरोबर आहे. शास्त्र केव्हा केव्हा एकच व्यक्तीचे ठिकाणी व केव्हा केव्हा अनेक व्यक्तीचे ठिकाणी प्रवृत्त होत असते. उदाहरणार्थ वसन्त ऋतूत ब्राह्मणानें अग्न्याधान करावे हे सागणाऱ्या शास्त्रानें एकदा अग्न्याधान केल्यानें ते शास्त्र चरितार्थ होत असल्यामुळें पुन्हा त्याच अग्नीचे ठिकाणी त्या शास्त्राची प्रवृत्ति होत नाही. तसेच आठवे वर्षी ब्राह्मणाचे उपनयन करावे हे सागणाऱ्या शास्त्राने एकदा उपनयनसंस्कार केल्यावर ते शास्त्र चरितार्थ ठरून पुन्हा त्या शास्त्राची त्याच पुरुषाचे ठिकाणी प्रवृत्ति होत नाही. येथे हे लक्षात ठेवावे की, अग्न्याधान व उपनयन ही दोन्ही संस्कारक कर्मे आहेत. अग्न्याधानरूप संस्कारक कर्म करण्याचे प्रयोजन हे आहे की, अग्नि सिद्ध होऊन त्या अग्नीत पुढें यागादि कर्में करता यावीत. तसेच उपनयन या संस्कारक कर्माचे प्रयोजन हे

आहे कीं, वेदाध्ययन व धर्मानुष्ठानादि कर्मे करण्याचा अधिकार प्राप्त व्हावा. परंतु जीं कर्मे संस्कारक नसून नित्य नैमित्तिक किंवा काम्य कर्मे आहेत तशीं कर्मे करावयास शास्त्राची एकाच व्यक्तीचे ठिकाणीं अनेकदां प्रवृत्ति होते. उदाहरणार्थ वसन्त ऋतूंत अग्निष्टोमादि याग करावे हें सांगणारें शास्त्र एका व्यक्तीचे ठिकाणीं अनेकदां प्रवृत्त होतें, म्हणजे प्रत्येक वसन्त ऋतूंत त्या शास्त्रान्वयें अधिकारी पुरुषाला अग्निष्टोमादि याग करतां येतात; कारण याग केल्यानें स्वर्ग लोकाची प्राप्ति होत असून अप्सरा याग करणाऱ्या पुरुषाशीं रममाण होतात. एक याग करण्यानें जर हें फल निष्पन्न होतें तर अनेक याग केल्यानें अधिकाधिक फल लाभेल हें उघड आहे. हें जें वर उदाहरण दिलें आहे तें काम्य कर्माचें उदाहरण आहे. कर्में तीन प्रकारचीं असतात—नित्य, नैमित्तिक व काम्य. जें कर्म केल्यानें चित्तशुद्धिखेरीज दुसरें कोणतेंहि फल उत्पन्न होत नाहीं पण जें न केल्यानें प्रत्यवायरूप दोष येतो, म्हणजे पाप घडतें, त्याला नित्य कर्म म्हणतात. 'यावज्जीवमग्निहोत्रं जुहोति, अहरहः सन्ध्यामुपासीत' इत्यादि नित्य कर्माचीं उदाहरणें आहेत. जें कर्म केल्यानें फलविशेष उत्पन्न होत असून न केल्यानें प्रत्यवायरूप दोष उत्पन्न होतो त्याला नैमित्तिक कर्म म्हणतात. 'यस्याहिताग्नेरग्निर्गृहान्दहेत् सोऽग्नये क्षामवते पुरोडाशमष्टाकपालं निर्वपेत्, राहूपरागे स्नायात्' हीं नैमित्तिक कर्माचीं उदाहरणें होत. जें कर्म न केल्यानें प्रत्यवायरूप दोष येत नसून तें केल्यानें फलविशेषाची प्राप्ति होते त्याला काम्य कर्म म्हणतात. 'सौर्यं चरुं निर्वपेद् ब्रह्मवर्चस्कामः, उद्भिदा यजेत पशुकामः ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत' इत्यादि काम्य कर्माचीं उदाहरणें होत. हीं तीन्ही प्रकारचीं कर्में सांगणारीं शास्त्रें एकाच व्यक्तीचे ठिकाणीं अनेकदां प्रवृत्त होतात. तसेंच निषेधक शास्त्रांची देखील एकाच व्यक्तीचे ठिकाणीं प्रवृत्ति होत नसून व्यक्तिसमुदायाचे ठिकाणीं प्रवृत्ति होत असते. उदाहरणार्थ

ब्राह्मणाचा वध करूं नये किंवा सुरापान करूं नये असें विधान करणारीं निषेधक शास्त्रें एक ब्राम्हणाला न मारल्यानें किंवा एक प्रकारची सुरा न प्याल्यानें चरितार्थ होत नसून कोणत्याहि ब्राह्मणाचें हनन करूं नये किंवा कोणत्याहि प्रकारची सुरा पिऊं नये अशा प्रकारचा निषेध करणारीं शास्त्रें आहेत. त्याचप्रमाणें 'आद्‌गुणः' इत्यादि शास्त्रें जशीं संस्कारक शास्त्रें आहेत तशींच तीं प्रयोगविधि म्हणजे शुद्ध प्रयोग सिद्ध करून देणारीं शास्त्रें, देखील आहेत. 'आद्‌गुणः' या सूत्रानें 'रमा+ईशः' या स्थलीं गुणरूप संस्कार करतेवेळीं तें शास्त्र एकदांच प्रवृत्त होतें व त्यामुळें दोन स्थानींचे जागीं दोन आदेश न होतां दोन्हीचे जागीं मिळून एकच आदेश होतो. पण भाषेंत शुद्ध प्रयोग करणें हें नित्य व तसेंच काम्य कर्मासारखें कर्म आहे; कारण 'साधुभिर्भाषेत, न म्लेच्छितवै, नापभाषितवै' इत्यादि वेदवाक्यां-वरून हें सिद्ध होतें कीं, अशुद्ध शब्दप्रयोग केला असतां प्रत्यवायरूप दोष येतो व पाप घडतें. म्हणून तें नित्यकर्म ठरतें. तसेंच 'एकःशब्दः सम्यग्ज्ञातः शास्त्रान्वितः सुप्रयुक्तः स्वर्गे लोके कामधुग्भवति' असें श्रुतिवचन असल्यामुळें, शुद्ध शब्दप्रयोग करणें हें काम्य कर्म देखील ठरतें व एक शुद्ध शब्दप्रयोग केल्यानें जर हें फळ मिळतें तर अनेक शुद्ध शब्दप्रयोग केल्यानें अधिकाधिक फल प्राप्त होऊं शकतें हें उघड आहे, आणि 'मनोरथानां न समाप्तिरस्ति। वर्षायुतेनापि तथाऽब्दलक्षैः' व 'निस्स्वो वष्टि शतं शती दशशतं लक्षं सहस्रा-धिपः' इत्यादि वचनांत सांगितल्याप्रमाणें, मनुष्याच्या सुखप्राप्तीच्या वासना केव्हांहि तृप्त होणाऱ्या नसल्यामुळें, अधिकाधिक पुण्यफल प्राप्त करून घेण्याची त्याचे ठिकाणीं सतत इच्छा असणें हें साहजिक आहे. या वरील भाष्यावरून हा निष्कर्ष निघतो कीं, संस्कारकशास्त्र एका लक्ष्याचे ठिकाणीं संस्कार करून देण्याकरितां एकदांच प्रवृत्त होतें व त्या शास्त्रानें त्या लक्ष्याचे ठिकाणीं एकदां संस्कार केल्यावर पुन्हा तें शास्त्र त्याच लक्ष्याचे ठिकाणीं संस्कार करून देण्याकरितां

प्रवृत्त होत नाहीं. पण संस्कारक शास्त्र कांहीं तरी प्रयोजनाकरितांच म्हणजे प्रयोगविधीकरितांच, केलें जात असल्यामुळें त्या प्रयोजनाच्या सिद्धीकरितां तें शास्त्र शुद्ध शब्दप्रयोग करतेवेळीं इतर लक्ष्यांचे ठिकाणीं प्रवृत्त होतें आणि वर सांगितल्याप्रमाणें शुद्ध शब्दप्रयोग करणें हें नित्य व काम्य कर्म असल्यामुळें, शुद्ध शब्दप्रयोग करतेवेळीं त्या शास्त्राची जरी एका लक्ष्याचे ठिकाणीं एकदांच प्रवृत्ति होते तरी भिन्न लक्ष्यांची सिद्धि करण्याकरितां त्या सर्व लक्ष्यांचे ठिकाणीं प्रवृत्ति होते असा संस्कारविधि व प्रयोगविधि यांच्यांत फरक आहे. म्हणून 'रमा + ईशः' या लक्ष्याचे ठिकाणीं गुणरूप संस्कार करतेवेळीं 'आद्‌गुणः' हें शास्त्र एकदांच प्रवृत्त होतें व त्यामळें 'आ' व 'ई' या दोन्ही स्थानींचे जागीं मिळून एकच गुणादेश होतो. परंतु 'खट्‌वेन्द्रः, मालेन्द्रः, उपेन्द्रः' इत्यादि शुद्ध शब्दप्रयोग करतेवेळीं तें शास्त्र प्रत्येक लक्ष्याचे ठिकाणीं प्रवृत्त होतें. 'सम्प्रसारणाच्च' ६.१.१०८ या सूत्रावरील भाष्यांत देखील भाष्यकारांनीं 'कार्यकृतत्वाद्वा' या वार्तिकाचें प्रत्याख्यान करतेवेळीं हाच सिद्धान्त सांगितला आहे. त्या भाष्यांत भाष्यकार म्हणतात–'अथ वा सकृत् कृतं पूर्वत्वमिति कृत्वा पुनर्न भविष्यति । तद्यथा वसन्ते ब्राह्मणोऽग्नीनादधीतेति सकृदाधाय कृतः शास्त्रार्थ इति कृत्वा पुनः प्रवृत्तिर्न भवति । विषम उपन्यासः । युक्तं यत्तस्यैव पुनः प्रवृत्तिर्न भवति । यत्तु तदाश्रयं प्राप्नोति न तच्छक्यं बाधितुम् । तद्यथा वसन्ते ब्राह्मणोऽग्निष्टोमादिभिः क्रतुभिर्यजेतेत्यग्न्याधाननिमित्तं वसन्ते वसन्ते इज्यते ।' सारांश संस्कारक विधि एका लक्ष्याचे ठिकाणीं एकदांच केला जातो असा वरील दोन्ही भाष्यांत सिद्धान्त सांगितला असल्यामुळें, दीक्षितांनीं मनोरमेंत 'एकस्यां व्यक्तौ एकं लक्षणं सकृदेव प्रवर्तते' असें म्हटलें आहे आणि असा सिद्धान्त असल्यामुळें, 'सुध्य् + उपास्यः' या स्थलीं 'अनचि च' या सूत्रानें धकाराचें व 'यणो मयो द्वे वाच्ये' या वार्तिकानें यकाराचें एकदां द्वित्वरूप संस्कारक कर्म केल्यावर पुन्हा

त्याच धकाराचें व यकाराचें द्वित्व करण्याकरितां त्याच शास्त्रांची प्रवृत्ति होऊं शकत नाहीं आणि म्हणून 'पुनर्द्वित्वमशुद्धम्' असें दीक्षितांनीं म्हटलें आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.)

शब्दरत्न---वैकल्पिकत्वादिति । एवं च पक्षे द्वित्वानामानन्त्यापत्त्या परिनिष्ठितत्वाभावापत्तिः । न च त्वदुक्तरीत्या ऽऽनन्त्यापत्ति-प्रयुक्तमपरिनिष्ठितत्वमसकृत्प्रवृत्तौ बाधकमिति लभ्यते । तच्च नात्र-द्वित्वस्य वैकल्पिकत्वेन यावच्छक्तिद्वित्वसहितप्रयोगस्य परिनिष्ठितत्व-संभवात् । अप्रवृत्तनित्यविध्युद्देश्यतावच्छेदकानाक्रान्तत्वं हि परि-निष्ठितत्वमिति वाच्यम्, आनन्त्यापत्तेरित्यस्य चतुष्पञ्चादिधकारय-काराणामापत्त्या त्रिधमित्यादित्वदुक्तमर्यादाभङ्गापत्तेरित्यर्थात् । तद् ध्वनयन्वक्ष्यति---नवत्वोक्तिरसङ्गतैवेति । आनन्त्यापत्तिरेव तन्न्याय-बीजमिति तु न युक्तम्, उदवोढामित्यादौ 'उद् अवह् स् ताम्' इत्यवस्थायां सिज्लोपादेरसिद्धत्वात्सिचि वृद्धावोकारे "लक्ष्ये लक्षणस्य" इति न्यायेन पुनर्वृद्धिर्नेति "सिचि वृद्धिः-" इति सूत्रस्थभाष्यविरोधात् । आनन्त्यापत्तेस्तत्राभावात् एतद्भाष्यप्रामाण्येन विकारकृतभेदेन न लक्ष्यभेदाश्रयणम् । "समः सुटि" इति सूत्रं चास्यां मानम् । अन्यथा "समो वा लोपम्-" इत्यनेनान्त्यलोपे पुनर्द्वित्वेन त्रिसकारस्यापि सिद्धचैतद्वैयर्थ्यं स्पष्टमेव । "इरयोरे" इति सूत्रे इरयोरिति द्विवचनं तु स्वविधेयस्य स्वस्मिन्नुद्देश्यत्वाप्राप्त्या तत्प्राप्तये इति न तदस्यां मानम् । न च तत्र "सहिवहोरोत्-" इति तपरत्वसामर्थ्याद् न वृद्धिरिति वाच्यम्, अशाद्वत्वात् अतत्का-लव्यावृत्तेरेव तेन शब्दमर्यादया लाभात् । एतेन सुद्ध्युपास्ये पूर्वधस्य द्वित्वे जश्त्वे लक्ष्यभेदात्पुनर्द्वित्वमित्यपास्तम्, पूर्वमकारस्येदानीमोकार-स्येति लक्ष्यभेदस्योदवोढामित्यादावपि सत्त्वेनोक्तभाष्यविरोधात् । विकारान्यानुपूर्व्यैक्येन लक्ष्यैक्यं तु ममाप्यस्त्येवेति दिक् । इति द्वित्वमपीति । एतेनाष्टमिकवर्णद्वित्वं स्याने द्वित्वमिति लक्ष्यभेदोऽ-

स्तीति परास्तम्, पदद्वित्वस्याप्यावृत्त्यापत्तेः । वस्तुतस्तत्पाठद्वित्ववन्न स्थानेद्विर्वचनमित्यन्यत्र निरूपितम् प्रत्याख्यातमिति । "अनभ्यास–प्रतिषेधोऽनर्थकश्छन्दसि वावचनात् नोनूयतेर्नोनावेत्यादौ न दोषः" इति भाष्यम् । "एकस्यैकाचो द्वित्वे कृते एकाज्व्यपदेशो हेतोरचो द्विरुक्तत्वाद्, अनेन न्यायेनाचः पुनः पुनर्द्वित्वाप्राप्तौ अवयवान्तरस्यैकाच्त्वाभावेन तदप्रवृत्तौ तद् व्यर्थम्" इति च तदाशयः कैयटेनोक्तः । कैयटादिभिरिति अत्रारुचिबीजं तु भाष्यप्रामाण्येन तेषामनभिधानम् । "स्तौतिण्योः–" इति सूत्रस्थः सोषुप्यतेः सन् 'सोषुपिषत' इति भाष्यप्रयोगोऽपि छान्दस इत्याहुः । रूपानन्त्यमिति । रूपाधिक्यमित्यर्थः । तदाह नवत्वोक्तिरसङ्गतेवेति । सकारद्वित्वे इति । अच्परयत्वावच्छिन्नं ह्यस्य लक्ष्यम्, तत्रैकस्मिन् धकारे प्रवृत्तावपि तादृशे सकारे लक्ष्यभेदात्पुनः प्रवृत्तिर्भवत्येवेति भावः । एवं संप्रसारणादिविधौ यण्त्वावच्छिन्नमुद्देश्यमिति लक्ष्यभेदाद्याव-दुद्देश्यं पुनः प्रवृत्तिर्भवत्येवेति न "न संप्रसारणे" इत्यादे-र्वैयर्थ्यमिति बोध्यम् ।

'लोपस्य वैकल्पिकत्वात्', म्हणजे लोप वैकल्पिक असल्यामुळें लोप न केल्यास, असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, त्या वैकल्पिकलोपपक्षांत लोप न केल्यानें अनन्त वेळ द्वित्व होण्याची आपत्ति येत असल्यामुळें परिनिष्ठित रूपें सिद्ध न होण्याची आपत्ति येते. यावर (प्रकाशकारमतानुयायी खण्डनकारादि) वैयाकरण अशी शंका करतात कीं, लोप वैकल्पिक असल्यामुळें लोप न केल्यास अनन्त रूपें सिद्ध होण्याची व परिनिष्ठित रूपांची सिद्धि न होण्याची जी आपत्ति येते ती टाळण्याकरितांच एका सूत्राची एकाच लक्ष्याचे ठिकाणीं अनेकदां प्रवृत्ति करण्यांत बाध येतो, म्हणजे 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय आनन्त्यापत्तिरूप दोष येऊं नये व परि-निष्ठित रूपांची सिद्धि व्हावी याकरितांच मानला आहे, असें दीक्षितांचें मत दिसतें. पण प्रकृत स्थलीं ('सुध्युपास्यः' या उदाहरणांत वैकल्पिक

लोप न करितां धकार व यकार यांचें अनेकदां द्वित्व केलें तरी ज्या आपत्तीच्या निवारणार्थ वरील न्याय मानला आहे) ती आपत्ति येत नाहीं; कारण ('अनचि च' या सूत्रानें व 'यणो मयो द्वे वाच्ये' या वार्तिकानें होणारें) द्वित्व वैकल्पिक असल्यामुळें यावच्छक्ति द्वित्व केल्यावर जीं अनेक धकार व अनेक यकार यांनीं युक्त रूपें सिद्ध होतात तीं रूपें परिनिष्ठित रूपें मानलीं जावूं शकतात. एखाद्या रूपाची सिद्धि करण्याकरितां ज्या ज्या नित्यकार्यविधायक सूत्रांची प्रवृत्ति होणें आवश्यक आहे तीं सर्व सूत्रें प्रवृत्त केल्यावर इतर कोणतेंहि नित्यकार्यविधायक सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं तशा रूपाला 'परिनिष्ठित' रूप म्हणतात. ('न च त्वदुक्तरीत्या' येथपासून 'परिहिनिष्ठितत्वम्' येथपर्यंत शंकाग्रन्थ आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं) ही शंका बरोबर नाहीं; कारण दीक्षितांनीं मनोरमेंत जो आनन्त्यापत्तिरूप दोष दिला आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, (द्वित्व वैकल्पिक असल्यामुळें यावच्छक्ति अनेकदां द्वित्व केल्यास व लोप वैकल्पिक असल्यामुळें लोप न केल्यास) चार पांच किंवा अधिक धकार व यकार ज्यांत आहेत अशीं रूपें होण्याची आपत्ति येत असल्यामुळें 'त्रिधमित्यादि,' म्हणजे त्रिधकारत्रियकार-युक्त रूपांपर्यंत, जी प्रकाशकारांनीं मर्यादा घालून दिली आहे त्या मर्यादेचा भङ्ग होण्याची आपत्ति येते व हेंच ध्वनित करण्याच्या हेतूनें 'भवक्तोक्तिरसङ्गतैव' असें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे. (दीक्षितानीं जो आनन्त्यापत्तिरूप दोष दिला आहे त्या दोषाचें निरसन करण्याकरिता प्रकाशकारांचे अनुयायी खण्डनकारादि वैयाकरण असें म्हणतात की, ज्याप्रमाणें 'हलो यमां यमि लोपः' सू. ६० व 'झरो झरि सवर्णे' सू. ७१ या सूत्रांनीं लोप करणें वैकल्पिक आहे त्याचप्रमाणें 'अनचि च' सू. ४८ या सूत्रानें व तसेंच 'यणो मयो द्वे वाच्ये' या वार्तिकानें द्वित्व करणें देखील वैकल्पिक आहे. शास्त्रांत अनन्त कालपर्यंत द्वित्त केलें पाहिजे असें

कोठेंहि सांगितलें नसल्यामुळें व एवढ्यापेक्षां कमीदां द्वित्व करूं नये अशी मर्यादा देखील कोठेंहि घालून दिली नसल्यामुळें, द्वित्व करणें किंवा न करणें आणि तें कितीदां करणें हें कर्त्याच्या इच्छेवर अवलंबून आहे व कर्त्यानें इच्छेनुसार दोनदांच द्वित्व केल्यावर देखील 'अनचि च' हें सूत्र व 'यणो मयो द्वे वाच्ये' हें वार्तिक चरितार्थ ठरतेंच व पुन्हा द्वित्व करणें हें कर्त्याच्या मर्जीवर अवलंबून असल्यामुळें, 'सुध्ध्युपास्यः' या स्थलीं धकाराचें व यकाराचें दोनदां द्वित्व केल्यावर जीं रूपें सिद्ध होतात त्यांचे ठिकाणीं कोणतेंहि नित्यकार्यविधायक सूत्र प्रवृत्त होण्याची आकांक्षा उरत नसल्यामुळें, तशा रूपांना परिनिष्ठित रूपें म्हणण्यांत कोणताहि प्रत्यवाय येत नाहीं. परिनिष्ठित रूपाची व्याख्या अशी आहे कीं, एखादें रूप सिद्ध करण्याकरितां ज्या ज्या नित्यकार्य विधायक सूत्रांची प्रवृत्ति करणें आवश्यक आहे तीं सूत्रें प्रवृत्त केल्यावर इतर नित्यकार्य विधायक सूत्रें प्रवृत्त होऊं शकत नाहींत त्याला परिनिष्ठित रूप म्हणतात. 'सुधी+उपास्यः' या स्थलीं 'इको यणचि' सू. ४७ हें नित्यकार्य विधायक सूत्र प्रवृत्त करून 'सुध्युपास्यः' असें जें रूप होतें तें सिद्ध केल्यावर इतर कोणतेंहि नित्यकार्य विधायक सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं आणि म्हणून त्या रूपाला 'परिनिष्ठित' असें वरील व्याख्यान्वयें म्हणतां येतें. 'अनचि च' हें सूत्र व तसेंच 'यणो मयो द्वे वाच्ये' हें वार्तिक नित्यकार्य विधायक नसल्यामुळें त्या वैकल्पिक शास्त्रांची प्रवृत्ति करणें किंवा न करणें व प्रवृत्ति केल्यास कितीदां करणें हें केवळ कर्त्याच्या इच्छेवर अवलंबून आहे आणि म्हणून प्रकाशकारांनीं धकाराचें व यकाराचें दोनदां द्वित्व करून जीं रूपें सिद्ध केलीं आहेत त्यांचे ठिकाणीं कोणतेंहि नित्यकार्य-विधायक सूत्र प्रवृत्त करणें बाकी राहिलें नसल्यामुळें, वरील व्याख्यान्वयें तीं परिनिष्ठित रूपें ठरतात व तीं परिनिष्ठित रूपें नव्हत असें म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं असा खण्डनकारादिकांच्या म्हणण्याचा तात्पर्यार्थ आहे. यावर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं,

एकाच लक्ष्याचे एकाच शास्त्राने दोनदा द्वित्व करणे हे 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्ति.' या न्यायाच्या विरुद्ध आहे व तो न्याय न मानल्यास अनन्त द्वित्वे होऊन अनन्त रूपें सिद्ध होण्याची आपत्ति येईल असे जे दीक्षितानी मनोरमेत म्हटले आहे त्याचा वास्तविक भावार्थ हा आहे की, यावच्छक्ति स्वेच्छेनुसार द्वित्व करून जी रूपे होतात त्याचे ठिकाणी जरी खण्डनकारानी म्हटल्याप्रमाणे अपरिनिष्ठितत्वरूप दोष येत नसला तरी, 'सुध्युपास्य.' या स्थली जरी प्रकाशकारानी स्वेच्छेनुसार एकदाच पुनर्द्वित्व करून ते थांबले तरी, इतर कोणी आपल्या इच्छेनुसार चारदा द्वित्व करील, कोणी दहादा द्वित्व करील व कोणी वीसदा द्वित्व करील व अशा रीतीनें प्रत्येकाने इच्छेनुसार यावच्छक्ति द्वित्व करून सिद्ध केलेल्या रूपाची सख्या भिन्न ठरेल व इतकीच मोजकी रूपे सिद्ध होऊ शकतात असे म्हणता येणे अशक्य आहे. म्हणून 'सुध्युपास्य.' या स्थली त्रिधकारत्रियकारयुक्त रूपापर्यंत रूपे सिद्ध होतात अशी जी प्रकाशकारानी मर्यादा घालून दिली आहे व एकदर नवच रूपें सिद्ध होतात असे जे त्यानी म्हटले आहे ते म्हणणे असङ्गत ठरते असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे आणि म्हणूनच त्यानी 'नवोक्तिरसङ्गतैव' असे मनोरमेत अखेरीस म्हटले आहे. 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्ति.' हा न्याय मानल्याने एका लक्ष्याचे एकदा एका शास्त्रानें द्वित्व केल्यावर पुन्हा त्याच लक्ष्याचे त्याच शास्त्रानें द्वित्व होऊ शकत नसल्यामुळे, मोजकी कौमुदीत दिलेली चारच रूपें सिद्ध होऊ शकतात व प्रकाशकाराचे मत मानल्यास जो दोष येतो तो दोष येत नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) अनन्त रूपे होण्याची आपत्ति येणे हेच 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्ति' या न्यायाचे बीज आहे, म्हणजे आनन्त्यापत्तिरूप दोष न यावा याकरिता तो न्याय मानला आहे, हे म्हणणे बरोबर नाही, ते म्हणणे बरोबर मानल्यास, 'उदवोढाम्' इत्यादि उदाहरणात 'उद् + अ + वह् + सिच् + ताम्'

अशा स्थितींत ('झलो झलि' सू. २२८१ या त्रैपादिक सूत्रानें होणारा) 'सिच्' चा लोप इत्यादि असिद्ध ठरत असल्यामुळें, त्या सिच् प्रत्ययाच्या निमित्तामुळें प्रथम वृद्धि होऊन आकार झाल्यावर त्या आकाराचा ओकार झाला असतां, त्या ओकारास जी पुन्हा सिच् प्रत्ययाच्या निमित्तामुळें वृद्धि पावते ती 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय असल्यामुळें होत नाहीं असें जें 'सिचि वृद्धिः' सू. ७.२.१ या सूत्रावरील भाष्यांत म्हटलें आहे त्या भाष्याशीं विरोध येतो; कारण त्या उदाहरणांत अनन्त रूपें होण्याची आपत्ति मुळींच उद्भवत नाहीं. ('उद् + अ + वह् + सिच् + ताम्' या स्थलीं 'वदव्रज' सू. २२६७ या सूत्रानें 'वह्' यांतील अकाराची वृद्धि होऊन 'वाह्' असें रूप झाल्यावर व 'झलो झलि' सू. २२८१ या सूत्रानें 'सिच्' चा लोप झाल्यावर 'हो ढः' सू. ३२४ या सूत्रानें 'वाह्' यांतील हकाराचा ढकार होऊन व 'झषस्तथोर्धः' सू. २२८० या सूत्रानें 'ताम्' या प्रत्ययांतील तकाराचा धकार होऊन व 'ष्टुना ष्टुः' सू. ११३ या सूत्रानें त्या धकाराचा ढकार होऊन आणि 'ढो ढे लोपः' सू. २३३५ या सूत्रानें पूर्व ढकाराचा लोप होऊन 'उद् + अ + वा + ढाम्' अशी स्थिति झाली असतां, 'ढलोपे सहिवहोः अवर्णस्य ओत्स्यात्' हें विधान करणाऱ्या 'सहिवहोरोदवर्णस्य' सू. २३५७ या सापादिक सूत्रानें 'वा' यांतील 'आ' चे जागीं 'ओ' होऊन 'उद् + वो + ढाम्' अशी स्थिति होते. येथें सिचाचा लोप 'झलो झलि' या त्रैपादिक सूत्रानें झाला असल्यामुळें, 'पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ या शास्त्रान्वयें तो लोप 'वदव्रज' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरतो व त्यामुळें 'सिच्' कायमच आहे असें मानावें लागत असल्यामुळें आणि तसेंच ढत्व, ढलोप हे देखील त्रैपादिक सूत्रांनीं झालेले असल्यामुळें ते देखील 'वदव्रज' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरत असल्यामुळें, 'वदव्रज' या सूत्रानें पुन्हा 'ओ' या अचाला वृद्धि पावते. ही वृद्धि

केल्यास 'उदवौढाम्' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. पण 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय असल्यामुळें अकारस्थानिक ओकाराची पुन्हा वृद्धि न होतां 'उदवोढाम्' असें इष्ट रूप सिद्ध होतें. येथें एकच अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येत असून व अनन्त रूपें होण्याची आपत्ति मुळीच येत नसून देखील, भाष्यकारांनी 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय लावला आहे. या भाष्यावरून हे स्पष्ट होतें की, जेथें अनन्त रूपें होण्याची आपत्ति येते तेथेंच हा न्याय लागू पडतो हे म्हणणे चूक ठरते असा शब्दरत्न-काराच्या म्हणण्याचा आशय आहे. वास्तविक 'सिचि वृद्धिः परस्मै-पदेषु' या सूत्रावरील भाष्यांत 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' या न्यायाचा भाष्यकारांनी कोठेहि स्पष्ट उल्लेख केला नाही. त्या भाष्यांत भाष्यकारांनी 'सिचि वृद्धावोकारप्रतिषेधः, ओकाराद्वृद्धिवि-प्रतिषेधेन, ओकाराद्वृद्धिविप्रतिषेधेनेति चेदोत्वाऽभावः' ही तीन वार्तिके पठित करून त्या वार्तिकांचें व्याख्यान करितांना असे म्हटले आहे :- 'सिचि वृद्धावोकारस्य प्रतिषेधो वक्तव्यः। उदवोढाम् ।...स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः? । न वक्तव्यः...वृद्धिर्भविष्यति विप्रति-षेधेन...ओकाराद्वृद्धिविप्रतिषेधेनेति चेदोत्वस्याऽभावः...नैष दोषः। उक्त तत्र वर्णग्रहणस्य प्रयोजनं, वृद्धावपि कृतायामोत्वं यथा स्यात् ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'सहिवहोः' या सूत्रानें 'वह्' यातील अकाराचे जागी प्रथम ओकार केल्याने ओकाराला जी सिच्प्रत्ययाच्या निमित्तामुळे 'वदव्रज' या सूत्राने वृद्धि पावते तिचा–प्रतिषेध केला पाहिजे. पण तसा प्रतिषेध करण्याची काही गरज नाही; कारण 'वदव्रज' हे सूत्र 'सहिवहोः' या सूत्राच्या मानाने परसूत्र असल्यामुळें 'विप्रतिषेधे परं कार्यम्' या वचनान्वये वृद्धिकार्य प्रथम होऊन 'वह्' यांतील अकाराची 'आ' अशी वृद्धि केल्यावर त्या 'आ' चे जागी 'ओ' असा आदेश होऊन 'उदवोढाम्' हे रूप सिद्ध होऊ शकते. पण 'सहिवहोः' या सूत्रात 'ओत्' यातील तकारापुढे 'अवर्णस्य' यातील

'अ' हा पठित असल्यामुळें व 'तपरस्तत्कालस्य' सू. १५ या सूत्रांतील 'तपरः' या पदाचा 'तात्परः तपरः' असा देखील विग्रह होत असल्यामुळें, तपर 'अ' नें आकाराचें ग्रहण होऊं शकत नाहीं व 'आ' चे जागीं 'ओ' असा आदेश होऊं शकत नाहीं आणि त्यामुळें 'उदवोढाम्' हें रूप सिद्ध होणें शक्य नाहीं. पण हा दोष येऊं शकत नाहीं; कारण 'सहिवहोः' ६·३·११२ या सूत्रावरील भाष्यांत त्या सूत्राचें व्याख्यान करितांना 'अवर्णस्य' या पदांतील 'वर्ण' या शब्दाच्या ग्रहणाचें प्रयोजन हें सांगितलेंच आहे कीं, 'वह्' यांतील अकाराची 'आ' अशी प्रथम वृद्धि केल्यावर त्या आकाराचे जागीं देखील ओकार व्हावा याकरितां त्या सूत्रांत 'वर्ण' या शब्दाचें ग्रहण केलें आहे व त्या शब्दाच्या ग्रहणसामर्थ्यानें अकारानें आकाराचें देखील ग्रहण होतें व आकाराचे जागीं ओकारादेश होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. पण अशा रीतीनें आकाराचे जागीं ओकारादेश केल्यावर ओकाराला जी पुन्हा सिच्प्रत्ययाच्या निमित्तामुळें वृद्धि पावते तिचें 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' या न्यायान्वयें निवारण होतें असें त्या भाष्यांत भाष्यकारांनीं स्पष्टपणें म्हटलें नाहीं व त्या न्यायाचा उल्लेखहि केला नाहीं. तथापि 'उक्तं तत्र' हें भाष्यांतील प्रतीक घेऊन कैयटानें 'ओदस्येत्युच्यमाने तादपि परस्तपर इत्यकारस्य तपरत्वाद्भिन्नकालस्य ग्रहणं न स्यादिति तस्यापि ग्रहणार्थं वर्णग्रहणं कृतमिति तत्सामर्थ्यात्कृतायामपि वृद्धावोत्त्वं प्रवर्तते । प्रवृत्तत्वाच्च लक्षणस्य पुनर्वृद्धेः प्रवृत्तिर्न भवति ।' या कैयटवृत्तीवरून हें स्पष्ट होतें कीं, भाष्यकारांच्या म्हणण्याचा आशय हाच आहे कीं, ज्या अकाराची वृद्धि होऊन आकार झाल्यावर पुढें ओकार झाला आहे तो ओकार अकारस्थानिक असल्यामुळें व अकाराची एकदां वृद्धि झालेली असल्यामुळें, पुन्हा त्या अकारस्थानिक ओकाराची, 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय असल्यामुळें, वृद्धि होऊं शकत नाहीं व त्यामुळें 'उदवोढाम्' हें रूप सिद्ध होतें. म्हणून आनन्त्या-

पत्तिरूप दोष जेथे येतो तेथेच 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय प्रवृत्त होऊ शकतो हे म्हणणे वरील भाष्याच्या विरुद्ध ठरते हे उघड आहे ) या भाष्यावरून हे देखील सिद्ध होते की, आदेश झाल्याने लक्ष्याच्या मूळ स्वरूपात फरक झाला असला तरी तशा फरकामुळे ते भिन्न लक्ष्य ठरत नाही. (शकाकाराची शका अशी आहे की, 'उदवोढाम्' या स्थली पूर्वी जी 'वदव्रज' या सूत्रानें वृद्धि झाली होती ती 'वह्' यातील अकारास झाली होती व आकाराचे जागी ओकारादेश केल्यावर पुढे त्याच सूत्राने जी वृद्धि पावते ती ओकाराला पावते. म्हणून प्रथम लक्ष्य अकार असून द्वितीय लक्ष्य ओकार असल्यामुळे व अशा रीतीने लक्ष्यात फरक झाला असल्यामुळे, 'वदव्रज' हे सूत्र पुन्हा प्रवृत्त होऊन 'ओ' या भिन्न लक्ष्याची वृद्धि करतेवेळी, 'लक्ष्ये लक्षणस्य' हा न्याय आड येत नाही. या शकेवर उत्तर हे आहे की, लक्ष्याचे जागी आदेश केल्याने जरी लक्ष्याच्या स्वरूपात फरक पडतो तरी त्या फरकामुळे लक्ष्य भिन्न होत नाही व लक्ष्य तेच आहे असे मानावे लागते. असे जर नसते तर अकाराची एकदा वृद्धि होऊन त्याचे जागी आकार झाल्यावर व नतर त्या आकाराचे जागी ओकार झाल्यावर त्या ओकाराची, पुन्हा वृद्धि होऊ शकत नाही असे भाष्यकारानी म्हटले नसते. पण तसे भाष्यकारानी म्हटले असल्यामुळे हे स्पष्ट होते की, आदेशरूप विकाराने जरी लक्ष्याच्या मूळ स्वरूपात फरक पडतो तरी त्या फरकामुळे ते लक्ष्य भिन्न ठरत नाही ) 'सम. सुटि' सू १३५ हे सूत्र 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्ति ' या न्यायाचे ज्ञापक आहे. तो न्याय न मानल्यास, 'समो वा लोपमेके' या भाष्यवचनान्वये 'सम्' यातील अन्त्य मकाराचा लोप होऊन (एकसकारयुक्त रूप सिद्ध झाल्यावर व नतर 'अनचि च' या सूत्रानें द्विसकारयुक्त रूप सिद्ध झाल्यावर) पुन्हा तेच सूत्र प्रवृत्त केल्यानें त्रिसकारयुक्त रूप सिद्ध होऊ शकत असल्यामुळे, 'सम सुटि' हे सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते.

('सम्' या उपसर्गपूर्वक 'कृ' धातूहून 'ण्वुल्तृचौ' सू. २८९५ या सूत्रानें तृच्प्रत्यय केला असतां, 'सम्परिभ्यां करोतौ भूषणे' सू. २५५० या सूत्रानें 'कृ' धातूला 'सुट् = स्' आगम होऊन व 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू. २१६८ या सूत्रानें गुण होऊन 'सम् + कृ + तृच् = सम् + स्कर्ता' अशी स्थिति होते. अशा स्थितींत 'समो वा लोपमेके' या भाष्यवचनानुसार 'सम्' यांतील अन्त्य मकाराचा 'अलोऽन्त्यस्य' सू. ४२ या परिभाषेच्या सहायानें लोप होतो. हा लोप 'रु' प्रकरणांत सांगितला असल्यामुळें, या ठिकाणीं 'अत्रानुनासिकः पूर्वस्य तु वा' सू. १३६ व 'अनुनासिकात्परोऽनुस्वारः' सू. १३७ हीं दोन्हीं सूत्रें प्रवृत्त होऊन 'संस्कर्ता' व 'सँस्कर्ता' अशीं एक सकारयुक्त पाक्षिक रूपें सिद्ध होतात. हीं रूपें सिद्ध झाल्यावर 'अनचि च' या सूत्रानें सकाराचें द्वित्व केलें असतां 'संस्स्कर्ता' व 'सँस्स्कर्ता' अशीं द्विसकारयुक्त पाक्षिक रूपें सिद्ध केल्यावर पुन्हा तेंच सूत्र प्रवृत्त केल्यानें त्रिसकारयुक्त पाक्षिक रूपें सिद्ध होऊं शकतातच. मग द्विसकारयुक्त रूपें सिद्ध करण्याकरितां पाणिनीनें 'समो रुः स्यात् सुटि' या अर्थाचें 'समः सुटि' हें सूत्र कां केलें? या प्रश्नाचें उत्तर हेंच आहे कीं, 'अनचि च' या सूत्रानें एकदां सकाराचें द्वित्व केल्यावर 'लक्ष्ये लक्षणस्य' या न्यायान्वयें तें सूत्र पुन्हा त्या सकाराचें द्वित्व करण्याकरितां प्रवृत्त होऊं शकलें नसतें व त्रिसकारयुक्त इष्ट रूप सिद्ध होऊं शकलें नसतें. म्हणून द्विसकारयुक्त रूप सिद्ध करण्याकरितां पाणिनीला 'समो मकारस्य रुः स्यात् सुटि' या अर्थाचें 'समः सुटि' हें सूत्र मुद्दाम करावें लागलें. तें सूत्र प्रवृत्त करून मकाराचा 'रु' केल्यावर 'खरवसानयोः' सू. ७६ या सूत्रानें रेफाचा विसर्ग होऊन व 'विसर्जनीयस्य सः' सू. १३८ या सूत्रानें विसर्गाचा सकार होऊन द्विसकारयुक्त रूप स्वतंत्र रीतीनें सिद्ध झाल्यावर 'अनचि च' हें सूत्र प्रवृत्त केल्यानें त्रिसकारयुक्त रूप सिद्ध होतें आणि अशा रीतीनें 'समः सुटि' हें सूत्र 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' या न्यायाचें

ज्ञापक ठरतें.) 'इरयो रे' सू. ३५४७ या सूत्रांतील 'इरयोः' हा द्विवचनाचा प्रयोग 'लक्ष्ये लक्षणस्य' या न्यायाचा ज्ञापक मानतां येत नाहीं; कारण त्या सूत्रांत तो द्विवचनाचा प्रयोग एवढ्याचकरितां केला आहे कीं सूत्रांत जें विधेयरूपानें सांगितलें आहे तें त्याच सूत्रांत उद्देश्य होऊं शकत नसल्यामुळें, तें उद्देश्य व्हावें. (कित्येक वैयाकरणांचें असें म्हणणें आहे कीं, 'इरयो रे' या सूत्रांतील 'इरयोः' हा द्विवचनाचा प्रयोग 'लक्ष्ये लक्षणस्य' या न्यायाचा ज्ञापक ठरतो. ते असें म्हणतात कीं, 'दधा + झ' अशा स्थितींत 'झ'चे जागीं 'लिटस्तझयोरेशिरेच्' सू. २२४१ या सूत्रानें 'इरे' असा आदेश होऊन 'दधा + इरे' अशी स्थिति झाली असतां, 'इरयो रे' या सूत्रानें वैदिक रूप सिद्ध करतेवेळीं 'इरे' याचे जागीं 'रे' असा आदेश होतो. 'रे' हा आदेश आर्धधातुक वलादि प्रत्यय ठरत असल्यामुळें त्याला 'आर्धधातुकस्येड्वलादेः' सू. २१८४ या सूत्रानें इडागम होऊन पुन्हा त्या 'रे' आदेशाचें 'इरे' असें रूप झालें असतां, 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय असल्यामुळें 'इरयो रे' हें सूत्र पुन्हा प्रवृत्त होऊं शकणार नाहीं व त्यामुळें इडागमसहित 'रे = इरे'या आदेशाचे जागीं 'रे' हा आदेश होऊं शकणार नाहीं. तो आदेश जसा 'झ'चे जागीं झालेल्या 'इरे' या आदेशाचे जागीं होतो त्याचप्रमाणें 'इरे' चे जागीं 'रे' असा आदेश होऊन त्याला इडागम केल्यावर त्याचें 'इरे' असें जें रूप होतें त्याचे जागीं देखील 'रे' असा आदेश व्हावा व 'आतो लोप इटि च' सू. २३७२ या सूत्रानें 'दधा' यांतील अन्त्य आकाराचा लोप झाल्यावर 'दध् + इरे = दध् + रे = दध्रे' असें इष्ट वैदिक रूप सिद्ध व्हावें याकरितां 'इरयो रे' या सूत्रांत 'इरे' याच्या षष्ठीचा 'इरयोः' असा द्विवचनान्त प्रयोग केला आहे व तसा द्विवचनान्त प्रयोग वरील सूत्रांत केला असल्यामुळें त्या निर्देशाच्या सामर्थ्यानें दोन्ही प्रकारच्या 'इरे' चे जागीं 'रे' असा आदेश, तेंच सूत्र दोनदां प्रवृत्त केल्यानें,

होतो व अशा रीतीनें तो प्रयोग चरितार्थ ठरून 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' या न्यायाचा ज्ञापक ठरतो. हें त्या वैयाकरणांचें म्हणणें सयुक्तिक दिसतें. परंतु शब्दरत्नकार म्हणतात कीं, तें म्हणणें बरोबर नाहीं. 'इरयो रे' या सूत्रांत 'इरयोः' हें उद्देश्य असून 'रे' हें विधेय आहे. 'इरे' चे जागीं 'इरयो रे' या सूत्रानें 'रे' असा आदेश झाल्यावर जरी त्याला वर सांगितल्याप्रमाणें इडागम होतो तरी 'यदागमाः'—परि. ११—या परिभाषान्वयें इडागमसहित 'रे' हा 'रे' च आहे असें मानतां येतें. तसें मानल्यानें 'रे इत्यस्य रे' असा सूत्रार्थ होतो व अशा रीतीनें या सूत्रांत उद्देश्य व विधेय एकच असल्यामुळें 'रे' चे जागीं 'रे' असा आदेश होण्याचें विधान करणें चूक ठरण्याची आपत्ति येते; कारण वाक्यांत उद्देश्य व विधेय भिन्न राहत असून दोन्ही एकच राहत नाहींत आणि म्हणूनच 'घटो घटः' इत्यादि प्रयोगांवरून कोणताहि अर्थबोध होत नसल्यामुळें, तसे प्रयोग 'उक्तार्थानामप्रयोगः' या न्यायान्वयें अशुद्ध मानले आहेत. परंतु उद्देश्य व विधेय एकच राहूं शकत नाहींत हा जो नियम आहे त्या नियमाचा प्रकृत स्थलीं भङ्ग व्हावा व विधेयाचे ठिकाणीं उद्देश्यता यावी व सूत्र अर्थरहित व अशुद्ध न ठरतां त्याचा इडागमसहित 'रे' चे जागीं 'रे' असा आदेश करावा असा अर्थ निष्पन्न व्हावा एवढया-करितांच त्या सूत्रांत 'इरयोः' असा द्विवचनाचा प्रयोग केला आहे आणि अशा रीतीनें तो प्रयोग चरितार्थ ठरत असल्यामुळें, 'लक्ष्ये लक्षणस्य' या न्यायाचा तो ज्ञापक आहे असें मानतां येत नाहीं.)

'सहिवहोरोदवर्णस्य' या सूत्रांत ओकार तपर केला असल्यामुळें तपरकरणसामर्थ्यामुळें 'ओ' ची वृद्धि पावतच नाहीं असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण तपरकरणामुळें वृद्धि होऊं शकत नाहीं असा शाब्दबोध—अर्थ—'ओत्' या तपर शब्दाचा होऊं शकत नाहीं. 'ओ' हा तपर केला असल्यामुळें त्या तपरकरणाचा अर्थ एवढाच होतो कीं, भिन्नकालिक वर्णाचा आदेश होऊं शकत नाहीं.

(शकाकाराची शका अशी आहे की, 'सह्विहोरोत्' या सूत्रात 'ओ' हा तपर केला असल्यामुळे त्या तपरकरणाचे फल हे आहे की, अवर्णाचे जागी जो ओकारादेश होतो तो ओकाररूपानेच राहावा आणि त्यामुळे ओकाराची वृद्धि पावतच नाही आणि म्हणून 'उदवोढाम्' हे रूप 'लक्ष्ये लक्षगस्य' या न्यायाचे ज्ञापक ठरत नाही. या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, तपरकरणाचे शकाकाराने सागितल्याप्रमाणे फल नसून त्याचा एवढाच अर्थ होतो की, भिन्नकालिक आदेश न होता, 'तपरस्तत्कालस्य' सू. १५ या सूत्रान्वये तत्कालिकच आदेश व्हावा तपरकरणामुळें वृद्धि होत नाही असा तपरकरणाचा अर्थ केव्हाहि होऊ शकत नाही आणि म्हणून 'उदवोढाम्' या उदाहरणात आकाराचे जागी ओकारादेश झाल्यावर त्या ओकाराला वृद्धि पावतेच. पण तो ओकार अकारस्थानिक असल्यामुळें व अकाराची पूर्वी वृद्धि झाली असल्यामुळे आणि 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्ति' हा न्याय असल्यामुळे त्या ओकाराची पुन्हा वृद्धि होत नाही आणि अशा रीतीनें 'उदवोढाम्' हे 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्ति' या न्यायाचे योग्य उदाहरण ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'विकारकृतभेदेनन लक्ष्यभेदाश्रयणम्' असा सिद्धान्त असल्यामुळे, 'सुद्ध्युपास्य' या उदाहरणात धकाराचे द्वित्व करून पूर्व धकाराचे जश्त्व–दकार–केल्यावर भिन्न लक्ष्य होते व त्यामुळें दकाराचे पुन्हा द्वित्व करता येते असे जें कित्येक वैयाकरण म्हणतात ते त्याचे म्हणणे चूक ठरते, कारण ते म्हणणे बरोबर मानल्यास, 'उदवोढाम्' या उदाहरणात प्रथम अकारास वृद्धि पावली असून नतर ओकारास वृद्धि पावली असल्यामुळें लक्ष्यभेद (शकाकाराच्या तऱ्हेने) होत असून देखील भाष्यकाराने ('अ' व 'ओ' ही भिन्न लक्ष्ये न मानता दोन्ही) एकच लक्ष्य मानून ओकाराची पुन्हा वृद्धि होऊ शकत नाही असे ज्या वरील भाष्यात म्हटले आहे त्या भाष्याशी विरोध येतो ('सुध्य्' या स्थली 'अनचि च' या सूत्राने धकाराचे द्वित्व केल्यावर नतर प्रथम

धकाराचा 'झलां जश् झशि' सू. ५२ या सूत्रानें जो दकार होतो त्या दकाररूप आदेशामुळें लक्ष्यामध्यें होणारा फरक 'विकारकृतो भेदो न' या न्यायान्वयें वगळला असतां) वर्णानुपूर्वी सारखीच ठरत असल्या-मुळें, आमच्या मतें देखील (ज्याचें पुनर्द्वित्व करणें आहे तें लक्ष्य-दकार–भिन्न न ठरतां, ज्याचें–धकाराचें–पूर्वी द्वित्व केलें आहे) तेंच तें लक्ष्य ठरतें, म्हणजे जश्त्वानें जरी धकाराचा दकार झाला आहे तरी तो दकार धकारच ठरतो व अशा रीतीनें लक्ष्यांमध्यें भेद होत नाहीं. ('सुधी+उपास्यः' या स्थलीं 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें यणादेश केल्यावर 'सुध्य्+उपास्यः' अशी स्थिति झाली असतां, 'अनचि च' या सूत्रानें जेव्हां धकाराचें द्वित्व केलें जातें तेव्हां तो मूळ धकार प्रथम राहत असून द्वित्वानें उत्पन्न झालेला द्वितीय धकार, 'आगन्तूनामन्ते सन्निवेशः' या न्यायान्वयें, त्याच्यापुढें येऊन बसतो हें, पुढील विवरण नीट ध्यानांत येण्याकरितां, लक्षांत असूं द्यावें. आतां शंकाकार अशी शंका करतो कीं, 'सुध्य्' यांतील धका-राचें 'अनचि च' सू. ४८ या सूत्रानें द्वित्व केल्यावर 'झलां जश् झशि' सू. ५२ या सूत्रानें पूर्व धकाराचा जो दकार होतो तो धकाराहून भिन्न असल्यामुळें त्या दकाराचें 'अनचि च' या सूत्रानें द्वित्व करतेवेळीं 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय आड येऊं शकत नाहीं व त्यामुळें दकाराचें द्वित्व करतां येतें आणि 'सुध्युपास्यः' या स्थलीं दीक्षितांनीं सांगितल्याप्रमाणें चारच रूपें न होतां अधिक रूपें होऊं शकतात. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, 'विकारकृतो लक्ष्यभेदो न' असा सिद्धान्त असल्यामुळें, वरील शंका अयोग्य ठरते; कारण जरी पूर्व धकाराचा जश्त्वानें दकार होतो तरी वरील सिद्धान्तान्वयें दकार हा भिन्न लक्ष्य ठरत नसून तो धकारच आहे असें मानावें लागतें व त्या पूर्व धकाराचें एकदां द्वित्व केलेलें असल्यामुळें व 'लक्ष्ये लक्ष-णस्य' हा न्याय असल्यामुळें, त्या दकाररूप धकाराचें पुन्हा द्वित्व करतां येत नाहीं. तसें न मानल्यास, 'सिचि वृद्धिः परस्मैपदेषु' या

या सूत्रावरील भाष्याशीं विरोध येतो; कारण 'उदवोढाम्' या उदाहरणांत अकाराची वृद्धि होऊन जो आकार होतो त्याचे जागीं ओकारादेश केल्यावर 'ओ' हा 'अ' हून भिन्न आहे तरी त्या अकार-स्थानिक ओकाराची पुन्हा वृद्धि होऊं शकत नाहीं असें त्या भाष्यांत म्हटलें आहे आणि म्हणून जश्त्वानें झालेला धकाराचा दकार धकारा-हून भिन्न आहे असें मुळींच मानतां येत नाहीं आणि त्यामुळें दकाराचें पुन्हा द्वित्व होऊं शकत नाहीं. हें खरें कीं, जश्त्व करण्यापूर्वी 'सुध्ध्य्' अशी स्थिति राहत असून जश्त्व केल्यावर 'सुद्ध्य्' अशी स्थिति होते व त्यामुळें वर्णानुपूर्वींत फरक दिसून येतो. पण 'विकारकृतो लक्ष्यभेदो न' या न्यायान्वयें, जश्त्वरूप विकारा-मुळें जो वर्णानुपूर्वींत फरक झाला आहे त्याकडे दुर्लक्ष केल्यास व धकाराचे जागीं जो दकार झाला आहे तो धकारच आहे असें मानल्यास, वर्णानुपूर्वींत फरक झाला आहे असें म्हणतां येत नाहीं व त्यामुळें ज्या दकाराचें द्वित्व करणें आहे तो ज्याचें पूर्वीं द्वित्व केलें आहे तो मूळचा प्रथम धकारच आहे असें मानावें लागत असल्यामुळें, पुन्हा त्या दकाररूप धकाराचें 'लक्ष्ये लक्षणस्य' या न्यायान्वयें द्वित्व करतां येत नाहीं असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. वास्तविक पाहिलें असतां, 'सुध्ध्य्' या स्थलीं प्रथम धकाराचें जश्त्व केल्यावर लक्ष्यांमध्यें फरक पडत नाहीं हें इतर रीतीनें देखील सिद्ध करतां येतें. 'अनचि च' हें त्रैपादिक पूर्व सूत्र असून 'झलां जश् झशि' हें त्रैपादिक परसूत्र असल्यामुळें, 'पूर्वत्रा-सिद्धम्' या वचनान्वयें 'अनचि च' या सूत्रानें द्वित्व करतेवेळीं त्या सूत्राच्या दृष्टीनें जश्त्व असिद्ध ठरतें व अशा रीतीनें जश्त्वानें झालेला दकार धकारच आहे असें मानावें लागत असल्यामुळें लक्ष्यभेद होतच नाहीं व त्यामुळें 'लक्ष्ये लक्षणस्य' या न्यायान्वयें दकाराचें पुन्हा द्वित्व करतां येत नाहीं. 'पूर्वत्रासिद्धीयमद्वित्वे'–परि. १२६–ही परिभाषा असल्यामुळें द्वित्वाच्या विषयांत 'पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ हें

वचन लागू पडत नाहीं व त्यामुळें उत्तर त्रैपादिक सूत्रानें झालेलें जश्त्व 'अनचि च' या पूर्व त्रैपादिक सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरत नाहीं असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें देखील बरोबर नाहीं; कारण 'यत्र च सिद्धत्वासिद्धत्वयोः फले विशेषस्तत्रैवेयम्' असें त्या परिभाषे-संबंधानें परिभाषेन्दुशेखरांत स्पष्ट सांगितलें आहे व त्यामुळें ती परिभाषा येथें लागू पडत नाहीं. या विषयाचें विस्तृत विवरण परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषांतरांत पान ५३२-३३ मध्यें केलें आहे व तें वाचल्यास हा विषय नीट ध्यानांत येईल.) 'किं चैवं सति सर्वस्य द्वे इति द्वित्वमपि पुनः पुनः प्रवर्तेत' असें मनोरमेंत म्हटलें असल्यामुळें जे कोणी वैयाकरण म्हणतात कीं, अष्टमाध्यायांत सांगितलेलें वर्णद्वित्व स्थानीचे जागीं होणारें द्वित्व असल्यामुळें लक्ष्यांत फरक पडतो तें त्यांचें म्हणणें चूक ठरतें; त्यांचें म्हणणें बरोबर मानल्यास, 'सर्वस्य द्वे' सू. २१३९ या अष्टमाध्यायांत पठित असलेल्या सूत्रानें होणारें पदद्वित्व देखील पुन्हा पुन्हा होण्याची आपत्ति येईल. वास्तविक षष्ठाध्यायांत पठित असलेल्या ('एकाचो द्वे प्रथमस्य' सू. २१७५ व 'अजादेर्द्वितीयस्य' सू. २१७६ इत्यादि) सूत्रांनीं होणारें द्वित्व जसें स्थानेद्वित्व नाहीं तसेंच अष्टमाध्यायांतील सूत्रांनीं होणारें द्वित्व—वर्णद्वित्व व पदद्वित्व—हें देखील स्थानेद्वित्व नाहीं हें इतर ग्रन्थांत सांगितलें आहे. ('एकाचो द्वे प्रथमस्य' या सूत्रांतील 'एकाचः' ही स्थानषष्ठी मानल्यास, त्या सूत्रानें होणारें द्वित्व स्थानेद्वित्व ठरतें. परंतु त्या सूत्रांत 'द्वे' या पदापुढें 'उच्चारणे' हें पद अध्याहृत केल्यास, 'एकाचः' ही कर्मणि षष्ठी ठरून 'प्रथमस्य एकाचः द्वे उच्चारणे भवतः' असा सूत्रार्थ होतो व त्या योगानें 'द्विः प्रयोगो द्विर्वचनम्' हा पक्ष सिद्ध होतो. हा द्वितीय पक्ष भाष्यकारांनीं सिद्धान्त-पक्ष मानला आहे आणि म्हणूनच त्यांनीं भाष्यांत ठिकठिकाणीं 'द्विः प्रयोगो द्विर्वचनं षाष्ठम्' असें म्हटलें आहे. शब्दरत्नकार हाच सिद्धान्त अष्टमाध्यायांत सांगितलेल्या वर्णद्वित्वाचे व पदद्वित्वाचे

ठिकाणीं लावतात व म्हणतात कीं, आष्टमिक वर्णद्वित्व व पदद्वित्व पाष्ठद्वित्वासारखेंच असल्यामुळें हीं सर्व प्रकारचीं द्वित्वें स्थानेद्वित्व–स्थानीचे जागीं होणारें द्वित्व–नसून, उच्चारणद्वित्वेंच आहेत. म्हणून वर्णद्वित्व करतेवेळीं तोच वर्ण दोनदां उच्चारला जात असल्यामुळें, लक्ष्यांत फरक होत नाहीं आणि त्यामुळें 'अनचि च' इत्यादि सूत्रांनीं एखाद्या वर्णाचें एकदां द्वित्व केल्यावर पुन्हा त्याच सूत्रानें त्याच वर्णाचें, 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय असल्यामुळें, द्वित्व करतां येत नाहीं; तसें न मानल्यास पदद्वित्व देखील पुन्हा पुन्हा होण्याची आपत्ति येईल असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'अनभ्यासग्रहणं भाष्ये प्रत्याख्यातम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यांतील 'भाष्ये' हा शब्द 'अनभ्यासप्रतिषेधोऽनर्थकश्छन्दसि वा वचनात् नोनूयतेर्नोनावेत्यादी न दोषः' या भाष्यास उद्देशून वापरला आहे. या भाष्याचें व्याख्यान करितांना कैयटानें असें म्हटलें आहे कीं या भाष्याचा असा आशय आहे कीं, धातूंतील एका एकाचाचें द्वित्व केल्यावर एकाच् हा शब्द लागू पडण्यास कारणीभूत जो त्यांतील अच् त्याचें द्विरुच्चारण होऊन जात असल्यामुळें व 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय असल्यामुळें, त्या अचाचें पुन्हा द्वित्व होण्याची प्राप्ति होत नाहीं व त्या एकाचांतील अवयवान्तर जो हल् तो एकाच् नसल्यामुळें, त्या हल्रूप अवयवान्तराचे ठिकाणीं द्वित्वाची प्रवृत्ति होऊं शकत नाही आणि त्यामुळें 'लिटि धातोरनभ्यासस्य' या सूत्रातील 'अनभ्यासस्य' या पदाचें ग्रहण व्यर्थ ठरतें. ('लिटि धातोरनभ्यासस्य' सू. ६·१·८ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारानीं 'अभ्यासप्रतिषेधानर्थक्यं च, छन्दसि वा वचनात्' हें वार्तिक पठित करून असें म्हटलें आहे कीं, 'अभ्यासप्रतिषेधश्चानर्थकः। किं कारणम्?। छन्दसि वा वचनात्। अवश्यं छन्दसि वा द्वे भवत इति वक्तव्यम्।' या वरील भाष्यांत भाष्यकारांनी 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' या न्यायाचा उल्लेखहि केला नाहीं व असेंहि म्हटलें नाहीं कीं, तो न्याय

असल्यामुळें 'लिटि धातोः' या सूत्रांत 'अनभ्यासस्य' हें पद असण्याची कांहीं गरज नाहीं. तथापि त्यांनीं त्या पदाचें प्रत्याख्यान केलें आहे व तें कां केलें आहे हें सांगतांना कैयटानें शब्दरत्नांत दिलेली पंक्ति लिहिली आहे. त्या पंक्तीचा तात्पर्यार्थ हा आहे कीं, 'नु' या एकाच् धातूचें यङलुकाचें रूप करतेवेळीं 'सन्यङोः' सू. २३९५ या सूत्रानें द्विर्वचन करून व 'गुणो यङलुकोः' सू. २६३० या सूत्रानें अभ्यासाचा गुण करून 'नोनु' असें जें यङलुकाचें रूप होतें त्याला 'सनाद्यन्ता धातवः' सू. २३०४ या सूत्रानें धातुसंज्ञा होते. त्याहून लिट् केल्यास 'लिटि धातोः' सू. २१७७ या सूत्रानें 'नोनु' यांतील 'नो' या प्रथम एकाचास द्विर्वचन पावतें. पण त्या 'नो = नु' धातूंतील 'उ' या अचाचें एकदां यङलुक्निमित्तक द्विर्वचन झालें असल्यामुळें व 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय असल्यामुळें, त्या 'उ' चें पुन्हा द्विर्वचन होऊं शकत नाहीं, व त्या 'नु' मधील अवयवान्तर जो नकार आहे तो हल् असून एकाच् नसल्यामुळें त्याला द्विर्वचनाची प्राप्तीच होत नाहीं. त्यामुळें 'नोनु' याचें लिटाचें प्रथमपुरुषाचें एकवचनाचें रूप करतेवेळीं द्विर्वचन न होतां 'नोनु + णल् = नोनौ + अ = नोनाव' असें इष्ट रूप सिद्ध होतें. हा जो कैयटानें वरील भाष्याचा आशय आपल्या वृत्तींत दिला आहे त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, भाष्यकारांनीं 'लिटि धातोः' या सूत्रांतील 'अनभ्यासस्य' या पदाचें जें प्रत्याख्यान केलें आहे तें 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' या न्यायान्वयें केलें आहे. म्हणून भाष्यकारांनीं तो न्याय मानला असल्यामुळें, 'सुध्युपास्यः' या स्थलीं धकाराचें 'अनचि च' या सूत्रानें एकदां द्विर्वचन केल्यावर पुन्हा त्याच सूत्रानें त्या धकाराचें द्विर्वचन करतां येत नाहीं आणि म्हणून प्रकाशकारांनीं जें त्या धकाराचें दोनदां त्या सूत्रानें द्विर्वचन केलें आहे तसें करणें भाष्यविरुद्ध व चूक ठरतें हें उघड आहे. यावर प्रकाशकारांतर्फे असें म्हणण्यांत येतें की, 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय

भाष्यात कोठेहि साक्षात् पठित केला नसल्यामुळे व 'लिटि धातोः' या सूत्रात पाणिनीने 'अनभ्यासस्य' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळें त्यावरून हे ज्ञापित होते की, तसा न्याय नाही व असल्यास तो अनित्य आहे, कारण तसा न्याय असता व तो नित्य असता तर त्या न्यायान्वयेंच पुन्हा द्विर्वचन होऊ शकले नसते व त्यामुळें वरील सूत्रात 'अनभ्यासस्य' हे पद घालण्याची काहीच गरज नव्हती. म्हणून 'लिटि धातोः' या सूत्रात 'अनभ्यासस्य' हा प्रतिषेध असल्यामुळें जरी पाष्ठ द्विर्वचन पुन्हा करता येत नाही तरी आष्टमिक द्विर्वचन पुन्हा करता येऊ शकते आणि म्हणून प्रकाशकारानी जें धकाराचे द्वित्व दोनदा केले आहे ते चूक ठरत नाही. या शंकेचे निरसन करण्याकरिताच वरील न्याय 'एकः पूर्वपरयोः' या सूत्रावरील भाष्यावरून कसा सिद्ध होतो हे शब्दरत्नकारानी वर विस्तारपूर्वक सांगितले आहे व तो न्याय भाष्यकाराना मान्य असून त्याच्या मते नित्य आहे हे सिद्ध करण्याच्या हेतूनेंच शब्दरत्नकारानी शब्दरत्नात वरील कैयटपक्ति उद्धृत केली आहे, कारण जर तो न्याय नसता किंवा अनित्य असता तर भाष्यकारानी कैयटाने सांगितल्याप्रमाणे त्या न्यायाचा आधार घेऊन 'लिटि धातो.' या सूत्रातील 'अनभ्यासस्य' या पदाचे प्रत्याख्यान केले नसते. म्हणून तो न्याय 'उत्तरोत्तर मुनीना प्रामाण्यम्' या वचनान्वये मानणे भाग आहे व त्या न्यायान्वये धकाराचे पुनर्द्वित्व होऊ शकत नाही आणि प्रकाशकारानी जें पुनर्द्वित्व केले आहे ते वरील न्यायाविरूद्ध ठरते.) 'सन्नन्ताद्यङन्ताद्वा णिचि चङि द्वित्वाभावार्थं तदिति तु कैयटादिभिरुक्तम्' या मनोरमेंतील पक्तीत 'कैयटादिभिरुक्तम्' ही अरुचिप्रदर्शक पदें घातली असल्यामुळे कैयटाचे हे मत दीक्षिताना मान्य नाही हे ते सुचवितात व त्याचे कारण हे की, वरील प्रमाणभूत भाष्यावरून हे ज्ञापित होते की, सन्नन्ताहून किंवा यङन्ताहून 'णिच्' करून व नंतर 'चङ' करून होणारी रूपें याचे अनभिधान आहे, म्हणजे तशी रूपें भाषेंत

आढळत नाहींत. (कारण तशीं रूपें भाषेंत प्रचलित असतीं तर तीं भाष्यांत उदाहरणरूपानें दिलीं असतीं.) 'स्तौतिण्योः सू. ८·३·६१ या सूत्रावरील भाष्यांत 'सोपुप्यतेः सन् सोपुपिपते' असा जो भाष्य-प्रयोग आढळतो तो देखील (लौकिक प्रयोग नसून) वैदिक प्रयोगाचें उदाहरण आहे असें वैयाकरणांचें म्हणणें आहे (कारण सन्नन्त किंवा यङन्त धातूंहून पुन्हा द्वित्वसंपादक 'सन्' इत्यादि प्रत्यय भाषेंत–लौकिक प्रयोगांत–होत नसतात असें भाष्यकारांचें मत असल्यामुळें,भाष्यकारांनीं वरील भाष्यांत छान्दस प्रयोगाचा निर्देश केला आहे असेंच मानलें पाहिजे. यावरून हें सिद्ध होतें कीं, जेथें धातूहून एकदां द्वित्वसंपादक प्रत्यय होऊन द्वित्व झालें आहे तशा प्रत्ययान्त धातूहून पुन्हा दुसरा द्वित्वसंपादक प्रत्यय भाषेंत होत नाहीं.) 'स्वीकुरु वा रूपानन्त्यम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यांतील 'रूपानन्त्यम्' या पदाचा 'रूपा-विस्मयम्' असा अर्थ आहे आणि म्हणूनच दीक्षितांनीं मनोरमेंत लगेंच पुढें 'नवत्वोक्तिरसङ्गतैव' असें म्हटलें आहे. (याचें विवरण वरील शब्दरत्नांत पूर्वी केलेंच आहे.) 'सकारद्वित्वेनाष्टौ' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, अचापुढें असणारा 'यर्' हा 'अनचि च' या सूत्राचें लक्ष्य आहे, म्हणजे जेथें अचापुढें 'यर्' येतो तेथें 'अनचि च' हें सूत्र प्रवृत्त होऊन त्या यर्‌चें द्वित्व होतें, आणि ('सुध्युपास्यः' या उदाहरणांत 'अनचि च' या सूत्रानें) धकाराचें द्वित्व झाल्यावर देखील ('उपास्यः' यांतील 'आ' या अचूपुढें जो सकार आहे तो) सकार भिन्न लक्ष्य असल्यामुळें, 'अनचि च' हें सूत्र पुन्हा प्रवृत्त होऊं शकतेंच (व या ठिकाणीं लक्ष्यभेद असल्यामुळें, 'लक्ष्ये लक्षणस्य' हा न्याय लागू पडत नाहीं.) याचप्रमाणें, संप्रसारण-विधायक सूत्रांत ('इग्यणः सम्प्रसारणम्' सू. ३२८ या सूत्रान्वयें) 'यण्' हें उद्देश्य असल्यामुळें, एखाद्या उदाहरणांत अनेक 'यण्' असल्यास, प्रत्येक 'यण्' भिन्न लक्ष्य होत असल्यामुळें, प्रत्येक यणाला सम्प्रसारणकार्य प्राप्त होतें. तसें न व्हावें म्हणूनच, 'न सम्प्रसारणे

सम्प्रसारणम्' सू. ३६३ हें सूत्र केलें असल्यामुळें, तें सूत्र व्यर्थ ठरत नाहीं. (हें सूत्र नसतें तर प्रत्येक यणाला संप्रसारण होऊन 'व्यध्, युवन्' इत्यादि स्थलीं विकृत रूपें होण्याची आपत्ति आली असती.)

शब्दरत्न--तदपि नेति। यथोद्देशपक्षे इत्यनुक्त्वा सामान्येन यदुक्तं तदपि नेत्यर्थः। तस्मादिहेति। "यणो मयः" इत्यत्रेत्यर्थः। विसर्जनीयसूत्रभाष्यात्तु कार्यकालपक्षेऽपि त्रिपाद्यां तदप्रवृत्तिरिति लभ्यते। मूलं तु कैयटानुसारेणेति परे। संप्रसारणस्थानिकस्येति। स्थाने जातस्येति शेषः। साक्षात्संप्रसारणस्थानिकपूर्वरूपादेः "हलः" इत्यारम्भसामर्थ्यादल्विधौ स्थानिवत्त्वाङ्गीकारेऽपि पूर्वरूपोत्तरं प्रवृत्तस्य "हलः" इति दीर्घस्य स्थानिवद्भावेन संप्रसारणत्वे मानाभाव इति भावः। द्वित्वं नेति। "यणो मयः" इति प्राप्तं नेत्यर्थः। द्वित्वप्रकरणे इति। तथा च भाष्यम्-"रेफास्यानुनासिकपरसवर्णद्विर्वचनप्रतिषेधो वक्तव्यः। 'स्वर्नयति'। 'कुण्डं रथेन'। 'मद्रह्रदः'। 'भद्रह्रदः'। न वक्तव्यः। रेफोष्मणां सवर्णा न सन्ति। नेमौ रहौ कार्यिणौ किं तर्हि निमित्तं द्विर्वचनस्येति"। अन्यथा वचनारम्भे द्विर्वचनमात्रस्य निषेधेन फलभेदे प्रत्याख्यानानापत्तेः। साक्षाच्छ्रुतेन = विशेषशब्दबोधितेन। यत्र यत्र द्वित्वनिमित्तत्वं तत्र सर्वत्र वाक्यान्तरेण "अनचि" इत्यनेन कार्यित्वप्रसक्तेरनवकाशेन तेन भाष्यप्रामाण्यात्सामान्यत एव द्वित्वकार्यित्वं बाध्यते इति भावः।

'त्रैपादिके अन्तरङ्गे बहिरङ्गपरिभाषा न प्रवर्तते' या वचनांत 'यथोद्देशपक्षे' असा शब्द न उच्चारतां जो (प्रकाशकारांनीं) सामान्यरूपानें सिद्धान्त सांगितला आहे तो बरोबर नाहीं असा दीक्षितांच्या 'तदपि न' या म्हणण्याचा आशय आहे. (कारण त्याना जरी ही गोष्ट मान्य आहे कीं, त्रैपादिक अन्तरङ्गकार्य करतेवेळी यथोद्देशपक्षात बहिरङ्ग परिभाषा त्रिपादींत प्रवृत्त होत नाहीं तरी, ती कार्यकालपक्षांत देखील प्रवृत्त होत नाही हे त्यांना कबूल नाहीं.)

'तस्मादिह यथोद्देशपक्षो ग्राह्यः' या मनोरमेंतील पंक्तींतील. 'इह' या शब्दाचा, 'यणो मयः इत्यत्र'– म्हणजे 'सुध्य्' यांतील यकाराचें 'यणो मयो द्वे वाच्ये' या वार्तिकानें द्वित्व करतेवेळीं–असा अर्थ आहे. ('सुधी + उपास्यः = सुध्य् + उपास्यः' या स्थलीं 'उ' या अच्रूप परनिमित्तामुळें 'सुधी' यांतील अन्त्य ईकाराचे जागीं 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें झालेला यकार, अपरनिमित्तक द्विर्वचनकार्याच्या मानानें, बहिरङ्ग ठरतो व दीक्षितांच्या मतें बहिरङ्गपरिभाषा–परि. ५०–कार्यकालपक्षांत त्रिपादींत उपस्थित होत असल्यामुळें तो पक्ष –कार्यकालपक्ष–मानल्यास, द्वित्वकार्य करतेवेळीं यकार असिद्ध ठरतो, म्हणजे तो झालाच नाहीं असें मानावें लागतें व त्यामुळें त्या पक्षांत यकाराचें द्वित्व होऊं शकत नाहीं. यथोद्देशपक्ष मानल्यास त्या पक्षांत बहिरङ्गपरिभाषा त्रिपादींत दीक्षितांच्या मतें उपस्थित होत नसल्यामुळें, त्रैपादिक द्वित्वकार्य करतेवेळीं सापादिक सूत्रानें झालेला यकार असिद्ध ठरत नाहीं व त्यामुळें त्या पक्षांत यकाराचें द्वित्व होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. 'सुध्य्' यांतील धकाराची गोष्ट वेगळी आहे; कारण तो बहिरङ्ग यणादेशानें झाला नसून मूळचा स्वतःसिद्ध धकार आहे व 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें, धकारापुढील 'य्' हा 'ई' च आहे असें मानतां येत नाहीं. म्हणून यथोद्देशपक्ष किंवा कार्यकालपक्ष या दोन पक्षांतून कोणताहि पक्ष मानला तरी धकाराचें द्वित्व होण्यांत कोणताहि प्रत्यवाय येत नाहीं. सारांश 'तस्मादिह…… बहिरङ्गपरिभाषाया अप्रवृत्तये' या मनोरमेंतील पंक्तीचा 'तस्मात्सुध्य् इत्यत्र यणो मयो द्वे वाच्ये इति वार्तिकेन यकारस्य द्वित्वे कर्तव्ये यथोद्देशपक्षः स्वीकर्तव्यः, तेन बहिरङ्गपरिभाषायाः प्रवृत्तिर्न भविष्यति' असा अर्थ समजावा असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) इतर वैयाकरणांचें असें म्हणणें आहे कीं, 'खरवसानयोर्विसर्जनीयः' सू. ८·३·१५ या सूत्रावरील भाष्यावरून हें सिद्ध होतें कीं, त्रैपादिक अन्तरङ्ग कार्य करतेवेळीं कार्यकालपक्षांत देखील बहिरङ्ग–

परिभाषा—परि. ५०—त्रिपादीत प्रवृत्त होत नाही व त्या पक्षांत ती परिभाषा त्रिपादीत प्रवृत्त होते असे जे दीक्षितानी मनोरमेत म्हटले आहे ते त्यानी कैयटमतानुसार म्हटले आहे. (दीक्षिताचे म्हणणे असे आहे की, *त्रैपादिक अन्तरङ्गकार्य करतेवेळी बहिरङ्गपरिभाषा कार्य*-कालपक्षात देखील त्रिपादीत प्रवृत्त होत नाही असे मानल्यास, 'नार्पत्यः, नाकुंटः' इत्यादि रूपाची सिद्धि होऊ शकणार नाही. पण 'विसर्जनीयोऽनुत्तरपदे' हे वार्तिक मानून भाष्यकारानी त्या रूपाची सिद्धि केली आहे व त्याचा सिद्धान्त हाच आहे की, त्रैपादिक अन्तरङ्ग कार्य करतेवेळी यथोद्देशपक्षात किंवा कार्यकालपक्षात बहिरङ्गपरिभाषा त्रिपादीत प्रवृत्त होत नाही. परंतु कार्यकालपक्षात त्रिपादीत ती प्रवृत्त होते असे कैयटानें ठिकठिकाणी आपल्या वृत्तीत म्हटले असल्यामुळे दीक्षितानी त्या मताला अनुसरून ती परिभाषा कार्यकालपक्षात त्रिपादीत प्रवृत्त होते असे म्हटले आहे असे शब्दरत्न-कार म्हणतात.) 'सम्प्रसारणस्थानिकस्यातथात्वाच्च' या मनोरमेच्या पक्तीतील 'सम्प्रसारणस्थानिकस्य' या पदापुढे 'स्थाने जातस्य' ही पदें अध्याहृत आहेत, म्हणजे 'सम्प्रसारणस्थानिकस्य स्थाने जातस्य अतथात्वाच्च' अशी ती पंक्ति पठित करावी. सम्प्रसारणाचे जागी होणाऱ्या पूर्वरूप एकादेशाला 'हलः' सू. २५५९ या सूत्राने दीर्घकार्य करतेवेळी तो एकादेश सम्प्रसारणच आहे असे, तो अल्विधि असून देखील, 'हलः' या सूत्राच्या आरंभसामर्थ्यामुळे स्थानिवद्भावाने जरी मानावे लागते तरी, तो एकादेश 'हलः' या सूत्रानें दीर्घ झाल्यावर तशा दीर्घ झालेल्या एकादेशाला तो संप्रसारणच आहे असे स्थानिवद्भावानें मानण्यास कोणतेहि प्रमाण नाही असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. (या विषयाचे विवरण मनोरमेत केलेच आहे. 'ध्यै + क्विप् = ध्या + क्विप्' या स्थली पूर्वी सांगितलेल्या प्रक्रियान्वयें 'ध्या' यातील यकाराचे सम्प्रसारण होऊन 'धि + आ' अशी स्थिति झाली असता, वास्तविक 'धि' यातील अन्त्य इकार

'इग्यणः सम्प्रसारणम्' सू. ३२८ या सूत्रानें संप्रसारणसंज्ञक ठरतो. नंतर 'सम्प्रसारणाच्च' सू. ३३० या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन 'घ्इ आ = घ्इ' अशी स्थिति झाल्यावर हा पूर्वरूप एकादेश स्थानिवद्भावानें संप्रसारणच आहे असें, 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें स्थानिवद्भावानें वास्तविक मानतां येत नाहीं; कारण संप्रसारणसंज्ञा वर सांगितल्याप्रमाणें 'इ' या अल्ला असून ती संज्ञा स्थानिवद्भावानें पूर्वरूप एकादेशाचे ठिकाणीं आणणें हा अल्विधि आहे. परंतु पूर्वरूप एकादेशाला संप्रसारणसंज्ञा न केल्यास, 'हलः' हें सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते व तें सूत्र प्रवृत्त होण्यास कोणतेंहि उदाहरण मिळणें शक्य नाहीं. म्हणून तें सूत्र चरितार्थ ठरण्याकरितां व त्या सूत्राला उदाहरण मिळण्याकरितां, 'अनल्विधौ' या प्रतिषेधाकडे दुर्लक्ष करून पूर्वरूप एकादेश संप्रसारणच आहे असें जरी स्थानिवद्भावानें मानावें लागतें तरी, तो एकादेश 'हलः' या सूत्रानें दीर्घ झाल्यावर तसा दीर्घ झालेला एकादेश देखील स्थानिवद्भावानें संप्रसारणसंज्ञक होतो असें मानण्यास कोणतेंहि प्रमाण नाहीं असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे व त्याचें कारण हें की, हा दीर्घ झालेला एकादेश संप्रसारणाचे जागीं झाला नसून संप्रसारण व त्यापुढील अच् या दोहोंचे जागीं झालेल्या एकादेशाचे ठिकाणीं झाला आहे व ज्याअर्थी संप्रसारणस्थानिक एकादेशास देखील, 'हलः' हें सूत्र नसतें तर, संप्रसारण मानतां येणें शक्य नव्हतें त्याअर्थी, त्या एकादेशाचे जागीं झालेल्या दीर्घ आदेशाला स्थानिवद्भावानें संप्रसारण मानणें हें 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें अशक्य आहे हें स्पष्ट होतें.) 'घात्रंश इति । अत्र रेफस्य द्वित्वं न' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा अर्थ हा आहे कीं, 'यणो मयो द्वे वाच्ये' या वार्तिकानें प्राप्त होणारें रेफाचें द्वित्व होत नाहीं. 'द्वित्वप्रकरणे ---कार्यित्वभावात्' असें जें मनोरमेंत रेफाचें द्विर्वचन होत नाहीं हें सिद्ध करण्याकरितां म्हटलें आहे त्याला पुढील भाष्य प्रमाण आहे–'रेफस्यानुनासिकपरसवर्णद्विर्वचनप्रतिषेधो वक्तव्यः ।

स्वर्नयति । कुण्ड रथेन । मद्रह्रदः । भद्रह्रदः । न वक्तव्यः । रेफोष्मणा सवर्णा न सन्ति । नेमौ रहौ कार्यिणौ, किं तर्हि । निमित्त द्विर्वचनस्येति ।' रेफाचे द्विर्वचन होते असे मानल्यास, ज्या वरील वार्तिकाचा आरंभ केला आहे त्या वार्तिकानें कोणत्याहि सूत्राने प्राप्त होणाऱ्या रेफाच्या द्विर्वचनाचा निषेध केला असल्यामुळे, फलभेद होऊन त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान न होण्याची आपत्ति येईल. मनोरमेतील 'साक्षाच्छ्रुतेन' या पदाचा 'विशेषशब्दबोधितेन', म्हणजे 'अचो रहाभ्या द्वे' या सूत्रात 'रहाभ्याम्' हे पद उच्चारून त्या पदाने बोधित झालेल्या निमित्तत्वाचा, असा अर्थ आहे. जेथे जेथे ('अचो रहाभ्या द्वे' या सूत्रान्वये) रेफ हा द्वित्वाचे निमित्त असतो तेथे तेथे 'अनचि च' या भिन्न सूत्राने त्या रेफाचे (तो यर् असून अचापुढे असल्यामुळे) द्वित्व होण्याची प्राप्ति आहेच (व जर त्याचे 'अनचि च' या सूत्राने द्वित्व केले तर तो सर्वत्र द्वित्वाचा कार्यी ठरेल व तो द्वित्वाचा कार्यी नसून द्वित्वाचे केवळ निमित्त आहे असे उदाहरण कोठेहि सापडणार नाही आणि अशा रीतीने त्याचे निमित्तत्व अनवकाश ठरत असल्यामुळे, त्या) अनवकाशत्वामुळेच तो रेफ वरील प्रमाणभूत भाष्यान्वये—भाष्यकाराच्या मताप्रमाणे—कोणत्याहि सूत्राने प्राप्त झालेल्या द्वित्वाचा कार्यी होऊ शकत नाही, म्हणजे त्याच्या निमित्तत्वामुळें त्याच्या कार्यित्वाचा बाध होतो असा वरील भाष्याचा भावार्थ आहे (वर जें शब्दरत्नात भाष्य दिले आहे ते 'हयवरट्' या शिवसूत्रावरील भाष्य आहे. त्या भाष्यात भाष्यकारानी 'रेफस्य परोपदेशेऽनुनासिकद्विर्वचनपरसवर्णप्रतिषेधः' हे वार्तिक पठित केले आहे व त्या वार्तिकाचा असा अर्थ आहे की, 'हरयवट्' असे शिवसूत्र पठित न करिता यकार व वकार याच्यानंतर रेफाचे उच्चारण करून 'हयवरट्' असे यथाश्रुत शिवसूत्र पठित केल्यास, रेफ हा 'यर्' होत असल्यामुळे त्याचे ठिकाणी अनुनासिक, द्विर्वचन व परसवर्ण या तीन कार्यांचा प्रतिषेध करणे आवश्यक आहे या वार्ति-

कांत निर्दिष्ट असलेलीं प्रयोजनें सिद्ध करण्याकरितां भाष्यकारांनीं त्या भाष्यांत प्रत्येक प्रयोजनाचीं उदाहरणें दिलीं आहेत. 'स्वर्नयति, प्रातर्नयति' या उदाहरणांत रेफ या यर्‌पुढें नकार हा अनुनासिक वर्ण आला असल्यामुळें 'यरोऽनुनासिकेऽनुनासिको वा' सू. ११६ या सूत्रानें त्या रेफाचे जागीं 'स्थानेऽन्तरतमः' सू. ३९ या सूत्रान्वयें मूर्धन्य णकारादेश पावला आहे. वरील वार्तिक मानल्यानें, तसा आदेश होण्याची आपत्ति टाळतां येते. 'कुण्डं रथेन, वनं रथेन' या उदाहरणांत अनुस्वारापुढें 'र्' हा 'यय्' आला असल्यामुळें. 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' सू. १२४ या सूत्रानें अनुस्वाराचे जागीं रेफाचा सवर्ण णकार होण्याची प्राप्ति आहे. वरील वार्तिक मानल्यानें, तसा आदेश होण्याची आपत्ति टाळतां येते. 'मद्रह्रदः, भद्रह्रदः' या उदाहरणांत 'मद्र, भद्र' यांतील अन्त्य अकार या अच्‌पुढें 'ह्रदः' यांतील हकार असून त्यापुढें 'र्' हा 'यर्' असल्यामुळें, 'अचो रहाभ्यां द्वे' सू. ५९ या सूत्रानें त्या रेफाचें द्विर्वचन पावलें आहे. वरील वार्तिक मानल्यानें, रेफाचें द्विर्वचन होण्याची आपत्ति टळते. अशा रीतीनें वरील वार्तिकाचीं प्रयोजनें सांगून भाष्यकार म्हणतात कीं, तें वार्तिक मानण्याची कांहीं गरज नाहीं; कारण 'रेफोष्मणां सवर्णा न सन्ति,' म्हणजे रेफ व 'श्, ष्, स् ह्' या उष्म वर्णांचे सवर्ण नसल्यामुळें, 'यरोऽनुनासिके' व 'अनुस्वारस्य ययि' हीं सूत्रें रेफाला लागूच पडत नाहींत. तसेंच रेफाचें द्वित्व देखील होऊं शकत नाहीं; कारण 'अचो रहाभ्यां द्वे' या सूत्रांत रकार हा द्वित्वाचें निमित्त या रूपानें साक्षात् पठित असल्यामुळें, तो द्वित्वाचा कार्यी होऊं शकत नाहीं. 'अचो रहाभ्यां द्वे' या सूत्रानें प्राप्त होणाऱ्या द्वित्वाचा जरी वर सांगितल्याप्रमाणें रेफ कार्यी होऊं शकत नाहीं तरी, 'अनचि च' या सूत्रानें व 'यणो मयो द्वे वाच्ये' या वार्तिकानें प्राप्त होणाऱ्या द्वित्वाचा रेफ कार्यी होऊं शकतो, कारण त्या सूत्रांत व वार्तिकांत रेफ हा निमित्तरूपानें पठित नसल्यामुळें त्याच्या

कार्यित्वाचा बाध होऊं शकत नाहीं असा वरील भाष्याचा आशय मानतां येत नाहीं; कारण तसा त्या भाष्याचा आशय मानल्यास, भाष्यान्वयें 'अनचि च' या सूत्रानें व 'यणो मयो' या वार्तिकानें रेफाचें द्वित्व होईल व ज्या वार्तिकाचें भाष्यकार प्रत्याख्यान करूं इच्छितात त्या वार्तिकान्वयें रेफाचें द्वित्व होणार नाहीं आणि अशा रीतीनें वार्तिकारंभपक्षांत व वार्तिकप्रत्याख्यानपक्षांत फलभेद होईल, म्हणजे भिन्न रूपें होतील, व भाष्यकारांनीं त्या वार्तिकाचें केलेलें प्रत्याख्यान अयोग्य ठरण्याची आपत्ति येईल; कारण कोणत्याहि पठित केलेल्या वचनाचें प्रत्याख्यान करणें तेव्हांच योग्य ठरतें कीं जेव्हां त्या वचनानें निष्पन्न होणारीं फलें, तें वचन न मानतां देखील इतर रीतीनें सिद्ध करतां येऊं शकतात. म्हणून भाष्यकारांनीं वरील वार्तिकाचें जें प्रत्याख्यान केलें आहे तें योग्य ठरण्याकरितां हें मानणें आवश्यक आहे कीं, भाष्यकारांच्या मतें देखील रकारास कोणत्याहि वचनानें—सूत्रानें किंवा वार्तिकानें—प्राप्त होणाऱ्या द्वित्वाचा निषेध होतो. तसें मानल्यानें, 'अनचि च' या सूत्रानें व 'यणो मयो द्वे' या वार्तिकानें प्राप्त होणारें रेफाचें द्वित्व होऊं शकत नाहीं आणि म्हणूनच 'हरि + अनुभवः = हर्य् + अनुभवः' या स्थलीं 'अनचि च' या सूत्रानें जरी रकाराचें द्वित्व होण्याची प्राप्ति आहे तरी, त्याचे ठिकाणीं कोणत्याहि शास्त्रानें प्राप्त होणाऱ्या द्वित्वाचा निषेध भाष्यकारांच्या मतें देखील होत असल्यामुळें, त्या रकाराचें द्वित्व करतां येत नाहीं. याचें कारण हें कीं, जेथें रेफ निमित्तरूपानें पठित आहे तेथें देखील 'अनचि च' या सूत्रानें तो द्वित्वाचा कार्यी ठरेल व जेथें तो द्वित्वाचें केवळ निमित्त आहे असें उदाहरण कोठेंहि मिळूं शकणार नाहीं आणि अशा रीतीनें त्याचें निमित्तत्व अनवकाश ठरण्याचा प्रसङ्ग येत असल्यामुळें, त्या अनवकाशत्वामुळें त्याचें निमित्तत्व त्याच्या कार्यित्वाचा बाध करतें व त्यामुळें त्याचें केव्हांहि द्वित्व होऊं शकत नाहीं. रेफाचें निमित्तत्व त्याच्या कार्यि-

त्वाचा बाध करतें हें सिद्ध करण्याकरितां भाष्यकारांनीं माठरपरिवेपणन्यायाचा उपयोग केला आहे व त्या न्यायाचें पूर्वीं विवेचन केलेंच आहे. सारांश रेफाचा सवर्ण नसल्यामुळें व कोणत्याहि शास्त्रानें पावलेलें रेफाचें द्वित्व होऊं शकत नसल्यामुळें 'हयवरट्' हें यथापठित शिवसूत्र असतांना देखील वरील वार्तिक मानण्याची कांहीं गरज नाहीं असा भाष्यकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. म्हणून 'धात्रंशः' या स्थलीं रेफाचें द्वित्व होऊं शकत नाहीं असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे तें योग्य ठरतें असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.)

शब्दरत्न--न बाध्यत इति । इदं च व्यक्तिपक्षेऽप्यावश्यकम् । अन्यथा 'अकः सवर्णे-" इत्येतत्पर्यालोचनया 'श्रीशः' इत्यादिविषयकयण्शास्त्राभावकल्पनवत्संग्राहकवाक्ये इकः स्थानित्वश्रवणात्तद्विषयकलक्षणाभावस्यैव कल्पनं स्यादिति स्पष्टम् "इको यणचि" इत्यत्र कैयटे । कैयट इति । अत्रारुचिबीजं तु अत्र स्थानित्वस्य नानवकाशत्वं, मध्वत्रेत्यत्र निमित्तत्वाप्राप्त्या तत्र स्थानित्वस्य चारितार्थ्यात् । तक्रकौण्डिन्यन्यायोऽप्यनवकाशविषय एव इति स्पष्टं "तद्धितेष्वचाम्-" इति सूत्रे भाष्ये । तदप्राप्तियोग्यविषयाभावरूपं चानवकाशत्वमेतद्विषये । न च तक्रकौण्डिन्यन्यायो विधेयविषय एव, विशेषविहितेन सामान्यविहितं बाध्यत इति अभियुक्तव्यवहारादिति वाच्यम्, अपूर्वबोध्यत्वेन निमित्तत्वादेरपि विधेयत्वात् न हि निमित्तत्वमपि मानान्तरसिद्धमिति दिक् एकनेवेति । यणतत्प्राग्वर्तियरोर्द्वित्त्वप्रयुक्तरूपभेदाभावादिति भावः । वकारस्तु नात्र, अन्यूनानतिरिक्तस्थानकादेशलाभेनाधिकस्थानकस्याप्रवृत्तेः । लण्सूत्रस्थभाष्यविरोधेनेदृशानामनभिधानमिति तत्त्वम् ।

'इको यणचि' या सूत्रांत 'इक्' जरी स्थानिरूपानें पठित आहे तरी त्याच्या स्थानित्वामुळें-कार्यित्वामुळें-त्याच्या निमित्तत्वाचा बाध होत नाहीं हें सिद्ध करण्याकरितां 'तस्मादित्युत्तरस्य' या सूत्रांतील जो निर्देश ज्ञापक मानला आहे तो निर्देश व्यक्तिपक्षामध्यें देखील ज्ञापक

मानणें आवश्यक आहे. तो निर्देश केवळ जातिपक्षांत ज्ञापक मानल्यास व व्यक्तिपक्षात ज्ञापक न मानल्यास, ज्याप्रमाणे 'श्रीशः' इत्यादि उदाहरणांत 'अकः सवर्णे दीर्घः' या अपवादक सूत्राचा अर्थ लक्षात आणून 'इको यणचि' हे सूत्र त्या उदाहरणाना लागू पडत नाही असे आपण ठरवितों त्याचप्रमाणे 'इको यणचि' या सूत्रात 'इक्' हा स्थानिरूपाने श्रुत–साक्षात् पठित–असल्यामुळे ('सुध्युपास्यः' या उदाहरणात 'उ' हा) 'इक्' जेथें यणाचे निमित्त देखील आहे, तशा उदाहरणाला 'इको यणचि' हे सूत्र लागू पडत नाही असे मानण्याची आपत्ति येईल असे 'इको यणचि' ६·१·७७ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत कैयटाने म्हटले आहे. (जातिपक्षात व व्यक्तिपक्षात हा फरक आहे की, जातिपक्षात एकच सूत्र त्या सूत्राच्या कक्षेत येणाऱ्या सर्व उदाहरणाना लागू पडते; पण व्यक्तिपक्षात ते सूत्र त्याच्या कक्षेत येणाऱ्या एकाच उदाहरणात प्रवृत्त होऊन चरितार्थ होत असल्यामुळे ते त्याच्या कक्षेत येणाऱ्या इतर उदाहरणाचे ठिकाणी प्रवृत्त होत नाही. इतर उदाहरणात ते सूत्र प्रवृत्त होण्याकरिता प्रत्येक उदाहरणाची सिद्धि करतेवेळी 'व्यक्तो पदार्थे प्रतिव्यक्ति लक्षणेन प्रवर्तितव्यम्' असे 'इको यणचि' ६·१·७७ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत कैयटाने म्हटल्याप्रमाणे त्या सूत्राचे उच्चारण करणे आवश्यक आहे, म्हणजे जितकी उदाहरणे सिद्ध करणे आहेत तितकी सूत्रे मानून व्यक्तिपक्षात प्रत्येक उदाहरणाची सिद्धि करावी लागते. व्यक्तिपक्षात 'श्री + ईशः' या स्थली संधि करतेवेळी 'इको यणचि' व 'अकः सवर्णे दीर्घः' या दोन्ही सूत्राची प्राप्ति होते. पण 'अकः सवर्णे दीर्घः' हे विशेषशास्त्र असून 'इको यणचि' हे सामान्यशास्त्र असल्यामुळे व 'पूर्वं ह्यपवादा अभिनिविशन्ते पश्चादुत्सर्गाः'–परि. ६३ व 'प्रकल्प्य चापवादविषयं तत उत्सर्गोऽभिनिविशते'–परि. ६४– या परिभाषा असल्यामुळे, 'अकः सवर्णे' हे विशेषशास्त्र 'इको यणचि' या सामान्यशास्त्राचा बाध करून प्रवृत्त होते. त्याचप्रमाणे 'सुधी + उपास्यः' या उदाहरणात

संधि करतेवेळीं जरी 'इको यणचि' या सूत्राची प्राप्ति होते तरी त्या सूत्रांत इक्‌चा स्थानिरूपानें साक्षात् निर्देश केला असल्यामुळें व 'कार्यी निमित्ततया नाश्रीयते' असा न्याय असल्यामुळें आणि वरील उदाहरणांत 'इक्' जसा यणादेशाचा कार्यी–स्थानी–आहे तसा तो यणादेशाचें निमित्त देखील असल्यामुळें, 'इको यणचि' हें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं व त्यामुळें 'सुध्युपास्यः'. असें इष्ट रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येते. पण 'तस्मादित्युत्तरस्य' इत्यादि पाणिनीय निर्देश असल्यामुळें व त्या निर्देशांत 'इक्' हा यणादेशाचा स्थानी व तसेंच यणादेशाचें निमित्त असून देखील यणादेश केला असल्यामुळें त्या निर्देशांवरून हें सिद्ध होतें कीं, 'इक्' जसा यणादेशाचा स्थानी–कार्यी–होतो तसाच तो यणादेशाचें निमित्त देखील होऊं शकतो व त्यामुळें 'सुध्युपास्यः' या इष्ट रूपाची त्या ज्ञापकांच्या आधारें सिद्धि करतां येते. पण हीं ज्ञापकें जातिपक्षांतच लागू पडतात असें मानल्यास, व्यक्तिपक्षांत त्या ज्ञापकांचा उपयोग करतां येणार नाहीं व त्यामुळें ज्या उदाहरणांत इक्‌पुढें असवर्ण इक् आहे त्या उदाहरणांची त्या पक्षांत इष्टसिद्धि होऊं शकणार नाहीं. म्हणून व्यक्तिपक्षांत देखील ते निर्देश ज्ञापक मानणें आवश्यक आहे व 'इको यणचि' या सूत्रानें तें सूत्र प्रत्येक वेळ उच्चारून प्रत्येक रूपाची सिद्धि करतेवेळीं त्या निर्देशांचा देखील प्रत्येकवेळीं उच्चार–उपयोग–करणें आवश्यक आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. 'इको यणचि' या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें 'द्रव्येऽपि पदार्थे उत्सर्गापवादभावः सन्दिग्धासन्दिग्धत्वाश्रयोऽस्त्येव' असें म्हटलें आहे व शब्दरत्नकारांनीं शब्दरत्नांत याच कैयटोक्तीचा दाखला दिला आहे.या कैयटोक्तीचें व्याख्यान करितांना उद्योतकार म्हणतात–'अपवादस्तु स्वविषयेऽसन्दिग्धत्वेन तात्पर्यवान्, उत्सर्गस्तु तदतिरिक्तविषयो वा तद्विषयोऽपि वेति सन्दिग्धोऽसन्दिग्धेनापवादेन स्वविषयातिरिक्तविषयः कल्प्यते । एवं चापवादविषयव्यक्त्यतिरिक्तव्यक्तिविषयलक्ष-

णानामेवोपप्लवः इति भावः ।') 'न बाध्यते इति कैयटः' या मनोरमेतील पंक्तीत 'इति कैयटः' असे जे म्हटले आहे त्यावरून हे ध्वनित होते की, कैयटाचे मत दीक्षितांना संमत नाही व त्याचे कारण हे की, 'इको यणचि' या सूत्रातील 'इक.' याचे स्थानित्व अनवकाश ठरत नाही. 'मध्वत्र' या स्थली इकाला निमित्तत्वाची प्राप्ति नसल्यामुळे त्याचे स्थानित्व चरितार्थ ठरते. 'तद्धितेष्वचामादेः' सू ७·२·११७ या सूत्रावरील भाष्यात असे सांगितले आहे की, ज्या ठिकाणी विशेषशास्त्र अनवकाश ठरते तशाच ठिकाणी तक्रकौण्डिन्यन्याय देखील लागू पडतो. जेथे जेथे विशेषशास्त्र प्रवृत्त होऊ पाहते तेथे तेथे सामान्य शास्त्राची अवश्यप्राप्ति असल्यामुळे, विशेषशास्त्र अनवकाश ठरणे हेच तक्रकौण्डिन्यन्यायाची प्रवृत्ति होण्यास कारणीभूत होते. ('तद्धितेष्वचामादेः' या सूत्रावरील भाष्यात 'तद्धितेष्वचामादिवृद्धावन्त्योपधलक्षणप्रतिषेधः' हे वार्तिक पठित करून व त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान करिताना तक्रकौण्डिन्यन्यायाचा उपन्यास करून भाष्यकार म्हणतात—'नाप्राप्ते दधिदाने तक्रदानमारभ्यते, तत्प्राप्ते आरभ्यमाणं बाधकं भविष्यति, इह पुनरप्राप्तायामन्त्योपधलक्षणायां वृद्धावचामादिवृद्धिरारभ्यते ।' व या भाष्याचे व्याख्यान करिताना कैयटाने 'सामान्यविशेषभावो बाधहेतुः स चेह नास्ति' असे म्हटले आहे. वरील भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'सर्वेभ्यो ब्राह्मणेभ्यो दधि दीयताम् तक्रं कौण्डिन्याय' या स्थली कौण्डिन्य ब्राम्हण असल्यामुळे, त्याला इतर ब्राम्हणाबरोबर दधिदानाची अवश्यप्राप्ति आहे व अशी अवश्यप्राप्ति असता त्याला तक्रदान द्यावे असे म्हटले असल्यामुळे, तक्रदान दधिदानाचे बाधक होते. सारांश तक्रकौण्डिन्यन्यायाची प्रवृत्ति होण्यास दोन शास्त्रामध्ये सामान्यविशेषभाव असला पाहिजे व सामान्यशास्त्राची अवश्यप्राप्ति असल्यामुळे विशेषशास्त्राची प्रवृत्ति न होणे आणि अशा रीतीने ते विशेषशास्त्र अनवकाश ठरण्याची आपत्ति येणे हेच त्या न्यायाचे बीज आहे. 'इको यणचि' या सूत्रात 'इक्' जरी स्थानित्वाने

साक्षात् पठित आहे तरी त्याचें स्थानित्व निरवकाश ठरत नसल्यामुळें, त्याच्या स्थानित्वानें त्याच्या निमित्तत्वाचा बाध होत नाहीं. 'दव्यत्र, मव्वत्र' इत्यादि स्थलीं 'इक्' हा यणादेशाचा केवळ स्थानी—कार्यी—असून इग्भिन्न अकार हा अच् यणादेशाचें निमित्त आहे. सारांश 'इको यणचि' या सूत्राच्या कक्षेंत येणारीं अशीं अनेक उदाहरणें मिळतात कीं, जेथें 'इक्' हा यणादेशाचा केवळ स्थानी असून निमित्त नाहीं व अशा रीतीनें त्याचें स्थानित्व चरितार्थ ठरत असून अनवकाश ठरत नसल्यामुळें, त्याचें स्थानित्व त्याच्या निमित्तत्वाचें बाधक होऊं शकत नाहीं आणि त्यामुळें येथें तक्रकौण्डिन्यन्यायाची प्रवृत्ति होऊं शकत नाहीं. म्हणून 'इक्' हा जसा यणादेशाचा स्थानी होतो तसा तो यणादेशाचें निमित्त देखील होऊं शकतो हें मानण्यास 'तस्मादित्युत्तरस्य' इत्यादि निर्देशांचा आधार घेण्याची कांहीं गरज नाहीं; कारण त्याचें स्थानित्व वर सांगितल्याप्रमाणें अनवकाश ठरत नसल्यामुळें, स्थानित्व व निमित्तत्व या दोहोंमध्यें बाध्यबाधकभाव होऊं शकत नाहीं असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) तक्रकौण्डिन्यन्याय (उद्देश्यांशास किंवा निमित्तांशास लागू पडणारा नसून) केवळ विधेयांशास लागू पडणारा आहे व त्यामुळें विशेष विधान सामान्य विधानाचें बाधक ठरतें असा विद्वान वैयाकरणांचा सिद्धान्त असल्यामुळें 'इको यणचि' या सूत्राला तो न्याय लागू पडत नाहीं हें म्हणणें मात्र बरोबर नाहीं; कारण निमित्तत्व व कार्यित्व (हीं पूर्वी ज्ञात नसून पाणिनीय सूत्रांनींच तीं ज्ञात होणारीं असल्यामुळें व अशा रीतीनें) यांचे ठिकाणीं अपूर्वबोध्यत्व—अज्ञातज्ञाप्यत्व—येत असल्यामुळें, त्यांना देखील अपूर्वबोध्यत्वरूपानें विधेय मानतां येतें. (जरी निमित्त किंवा कार्यी होणाऱ्या वर्णांचें आपणांस चतुर्दशसूत्रीनें किंवा लोकांत प्रसिद्ध असलेल्या वर्णानुक्रमपाठानें पूर्वीपासून ज्ञान आहे तरी ह्या वर्णांची) कार्यिता किंवा निमित्तता (चतुर्दशसूत्रीनें किंवा लोकप्रसिद्ध वर्णानुक्रमपाठानें) ज्ञात होणारी नसून 'इको

यणचि' इत्यादि शास्त्रांनीच ज्ञात होणारी आहे. (म्हणून कार्यित्व व निमित्तत्व याचेहि ठिकाणी अपूर्वबोध्यत्वरूप विधेयता आहे. शंकाकाराचे असे म्हणणे आहे की, 'सर्वेभ्यो ब्राह्मणेभ्यो दधि दीयताम् तक्र कौण्डिन्याय' या स्थली दधिदान करणे हे सामान्य विधेय असून तक्रदान करणे हे विशेप विधेय आहे व जेथे दोन विधेयाचे ठिकाणी सामान्यविशेपभाव होतो तशाच ठिकाणी तक्रकौण्डिन्यन्याय लागू पडतो. निमित्तत्व व कार्यित्व ही विधेयाहून भिन्न असल्यामुळे, कार्यित्वाने निमित्तत्वाचा बाध करण्याकरिता तक्रकौण्डिन्यन्याय लागू पडत नाही. या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, जें पूर्वी ज्ञात नमून शास्त्राने ज्ञात होणारे आहे त्याला विधेय अशी संज्ञा आहे. 'विधिरत्यन्तमप्राप्तौ, अप्राप्तप्रापको विधि., अज्ञातज्ञापको विधि' इत्यादि 'विधि' या शब्दाच्या मीमासाशास्त्रात व्याख्या दिल्या आहेत. 'ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत , उद्भिदा यजेत पशुकाम –' म्हणजे ज्याला स्वर्गाची इच्छा असेल त्याने ज्योतिष्टोम याग करावा, ज्याला पशूची इच्छा असेल त्याने उद्भिज्याग करावा–इत्यादि गोष्टीचे ज्ञान आपणास नसून ते वेदावरूनच होते. म्हणून अशा अज्ञात विपयाचे ज्ञान करून देणाऱ्या वचनाना विधि म्हणतात. साराश अज्ञातज्ञापकत्व किंवा अपूर्व बोधकत्व हे विधीचे–विधेयाचे–लक्षण आहे. पण हे लक्षण जसे पाणिनीय शास्त्रात केलेल्या यणादेशादिकादि विधानाना लागू पडते तसेच ते यणादेशादिकाच्या उद्देश्याला व निमित्ताला देखील सारखेच लागू पडते, कारण जरी आपणास माहेश्वरचतुर्दशसूत्रीवरून वर्णाचे, प्रत्याहाराचे व प्रत्याहारान्तर्गत वर्णाचे ज्ञान होते व तसेच लोकात प्रसिद्ध असलेल्या वर्णपाठावरून वर्णाचे व त्याच्या क्रमाचे ज्ञान होते तरी, यणादेश कोणत्या वर्णाचे जागी होऊ शकतो व तो यणादेश होण्यास कोणता वर्ण पुढें निमित्तरूपाने असला पाहिजे याचे ज्ञान आपणास चतुर्दशसूत्रीवरून किंवा लोकप्रसिद्ध वर्णपाठावरून होत नसून 'इको यणचि' या पाणिनीय शास्त्रानेंच होऊं शकते.

म्हणून विधेयाचे ठिकाणीं जसें पूर्वी ज्ञात नसून पाणिनीय शास्त्रानेंच ज्ञात होणारें अपूर्वबोध्यत्व आहे तसेंच तें स्थानी--कार्यी--व निमित्त यांचे ठिकाणीं देखील आहे हें उघड होतें. त्यामुळें तक्रकौण्डिन्यन्याय जसा विधेयाला लागू पडतो तसाच तो स्थानी व निमित्त यांना देखील लागू पडतो. तो न्याय केवळ विधेयाला लागू पडणारा असता तर, रेफाचें द्विर्वचन होऊं शकत नाहीं व त्याच्या निमित्तत्वामुळें त्याच्या कार्यित्वाचा बाध होतो हें सिद्ध करण्याकरितां त्या न्यायाचा भाष्य-कारांनीं 'हयवरट्' या शिवसूत्रावरील भाष्यांत उपयोग केला नसता. येथें हें लक्षांत ठेवावें कीं, तक्रकौण्डिन्यन्याय व माठरपरिवेषणन्याय हे दोन्ही सारखेच न्याय आहेत. त्या वरील भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, तो न्याय विधेय, कार्यी व निमित्त या सर्वांना सारखाच लागू पडणारा न्याय आहे. म्हणून, कार्यी व निमित्त यांचे ठिकाणीं तो न्याय लागू पडत नाहीं व त्यामुळें इक्च्या कार्यित्वानें त्याच्या निमित्तत्वाचा बाध होऊं शकत नाहीं असें दीक्षितांनीं म्हणावयास पाहिजे होतें व तसा बाध होत नाहीं हें सिद्ध करण्याकरितां 'तस्मा-दित्युत्तरस्य' इत्यादि ज्ञापकें देण्याची त्यांना कांहीं गरज नव्हती असें जें शंकाकाराचें म्हणणें आहे तें योग्य ठरत नाहीं. वास्तविक दीक्षि-तांच्या म्हणण्यावर योग्य उत्तर हें आहे कीं, जरी वरील न्याय कार्यी व निमित्त यांना देखील लागू पडतो तरी, वर सांगितल्याप्रमाणें, इक्चें स्थानित्व निरवकाश ठरत नसल्यामुळें त्याच्या स्थानित्वानें त्याच्या निमित्तत्वाचा बाध होऊं शकत नाहीं व तसा बाध होत नाहीं हें सिद्ध करण्याकरितां त्यांना वरील ज्ञापक मानण्याची कांहीं गरज नव्हती असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.)

'लाकृतिरिति त्वेकमेव'--म्हणजे 'लृ + आकृतिः' यांचा सन्धि करतेवेळीं 'लाकृतिः' असें एकच रूप सिद्ध होतें--असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, ('सुध्युपास्यः = सुध्य् + उपास्यः' या स्थलीं जसा यकार हा यण् पुढें असून त्याच्या पूर्वी

धकार हा यर् आहे व त्यामुळें धकाराचें 'अनचि च' या सूत्रानें व यकाराचें 'यणो मयो द्वे' या वार्तिकानें वैकल्पिक द्वित्व होऊन अनेक रूपें सिद्ध होतात, त्याप्रमाणें 'लाकृतिः' या उदाहरणांत) यणापूर्वी यर् नसल्यामुळें द्वित्वानें होणारीं अधिक रूपें सिद्ध होऊं शकत नाहीत. ('लाकृतिः' या स्थलीं एकच रूप कां होतें याचें विवरण मनोरमेंत केलेंच आहे. 'अनचि च' या सूत्रानें द्वित्व होण्या-करितां अचापुढें यर् असणें व त्या यर्पुढें अच् नसणें आवश्यक आहे. या दोन्ही निमित्तांचा 'लाकृतिः' या उदाहरणांत अभाव असल्यामुळें द्वित्व होऊं शकत नाहीं. तसेंच 'यणो मयो द्वे वाच्ये' हें वार्तिक देखील या उदाहरणास मयच्या अभावामुळें लागू पडत नाहीं व त्यामुळें एकच रूप सिद्ध होतें.) 'ऌ+आकृतिः' या स्थलीं सन्धि करितांना ऌकाराचे जागीं वकारादेश होत नाहीं; कारण ज्याचें अधिक किंवा उणें स्थान नाहीं असा आदेश उपलब्ध असल्यामुळें, ज्याचें अधिक स्थान आहे असा आदेश होऊं शकत नाहीं. (शंका-काराची अशी शंका आहे कीं, ऌकाराचें जसें दन्तस्थान आहे तसेंच, जरी वकाराचें दन्तस्थान व ओष्ठस्थान आहे तरी, त्या वकाराचें दन्तस्थान आहेच. म्हणून ऌकाराचे जागीं वकारादेश कां होऊं नये ? या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, जसें ऌकाराचें केवळ दन्तस्थान आहे त्याहून अधिक किंवा उणें ज्याचें स्थान नाहीं व ज्याचें केवळ दन्तस्थान आहे असा लकार हा यण् मिळत असतां, ज्याचें केवळ दन्तस्थान नसून ओष्ठ हें अधिक स्थान आहे असा वकार हा यण् ऌकाराचे जागीं होऊं शकत नाहीं व 'स्थानेऽन्तरतमः' या परिभाषान्वयें ऌकाराचे जागीं लकारादेशच होऊं शकतो. 'मध्वरिः' इत्यादि उदाहरणांत ज्याचें केवळ ओष्ठस्थान आहे असा यण् मिळत नसल्यामुळें तेथें दन्तोष्ठस्थानजन्य वकारादेश होतो ही गोष्ट वेगळी. पण जेथें इक्स्थानसदृश यणादेश पूर्ण स्थानसाम्य असणारा मिळूं शकतो तशा ठिकाणी इक्चे जागीं स्थानसाम्यानें

सर्व तऱ्हेनें सदृश असाच आदेश करणें हें, 'स्थानेऽन्तरतमः' ही परिभाषा असल्यामुळें, योग्य आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'लाकृतिः' इत्यादि प्रकारचे प्रयोग भाषेंत आढळत नसल्यामुळें तशा प्रकारचे प्रयोग करणें हें 'लण्' सूत्रावरील भाष्याच्या विरुद्ध आहे आणि म्हणून तसे प्रयोग वास्तविक करतां येत नाहींत. ('लण्' या शिवसूत्रावरील भाष्यांत 'न हि पदान्ताः परेऽणः सन्ति'—म्हणजे पदाच्या शेवटीं 'अ, इ, उ' यांच्या पुढील 'अण्' मिळत नाहींत—असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. 'लृ+आकृतिः =लाकृतिः' या उदाहरणांत 'लृ' या पूर्व पदाच्या अन्तीं पूर्व अण् नसून उकारापलीकडील 'लृ' हा पर अण् असल्यामुळें, तसा प्रयोग भाषेंत शुद्ध ठरत नाहीं. तो प्रयोग आर्ष मानून सिद्ध करणें ही गोष्ट वेगळी. सारांश शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, 'लाकृतिः' हें केवळ काल्पनिक उदाहरण आहे व असा प्रयोग भाषेंत आढळत नाहीं.)

**मनोरमा—हलो यमाम् लोपः स्याद्वेति। "झयो हः—" इत्यतोऽन्यतरस्यामित्यनुवृत्तेः। एतच्च लण्सूत्रे भाष्ये स्पष्टम्। माहात्म्यमिति। अत्र मलोपो नेत्यर्थः। "हलो यरां यरि सवर्णे लोपः" इति तु न सूत्रितम्, आध्नोति, मूर्ध्नः, शार्ङ्गम्, आर्त्नी, इत्यादौ रेफात्परस्य लोपापत्तेः॥**

'*हलो यमां यमि लोपः*' सू. ६० *या सूत्राचें व्याख्यान करितांना* 'लोपःस्याद्वा,' म्हणजे विकल्पेंकरून लोप होतो, असें जें कौमुदींत म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, 'झयो होऽन्यतरस्याम्' या पूर्व-सूत्रांतून 'अन्यतरस्याम्' हें पद प्रकृत सूत्रांत अनुवृत्त होतें व या सूत्रानें होणारा लोप वैकल्पिक आहे हें 'लण्' या शिवसूत्रावरील भाष्यावरून स्पष्ट होतें. (त्या भाष्यांत 'हलो यमां यमि लोपः···विभाषा स लोपः,' म्हणजे 'हलो यमां यमि लोपः' या सूत्रानें होणारा लोप वैकल्पिक आहे असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे.) 'माहात्म्यम्' या स्थलीं मकाराचा

करून लोप होण्याची व अनिष्ट रूपें सिद्ध होण्याची आपत्ति आली असती. ती आपत्ति टाळण्याकरितां पाणिनीनें शंकाकारानें सुचविलेलें एकच सूत्र न करितां प्रकृत सूत्र व 'झरो झरि सवर्णे' अशीं दोन भिन्न सूत्रें केलीं आहेत व त्यामुळें सर्व इष्ट रूपांची सिद्धि होते.)

शब्दरत्न---आर्त्नी इति । आङ्पूर्वादृतेर्बाहुलकान्निप्रत्ययः । धनुषः कोटी उच्येते । "आर्तिः पीडाधनुष्कोट्योः" इत्यमरे नकाररहितः पाठो दृश्यते । अर्तिरिति पाठान्तरम् ॥

'आङ' या उपसर्गपूर्वक (सौत्र) 'ऋत्' धातूहून बाहुलक–बहुलत्वानें होणारा–उणादि 'नि' प्रत्यय होऊन 'आर्त्नि' हें मनोरमेंत दिलेलें रूप झालें आहे व त्या शब्दाचा धनुष्याचीं दोन्हीं टोकें असा अर्थ आहे. 'आर्तिः पीडाधनुष्कोट्योः' या अमरांतील श्लोकाच्या चरणांत 'आर्तिः' असा नकाररहित पाठ दिसतो व 'आर्तिः' या शब्दाच्या ऐवजीं 'अर्तिः' असा देखील अमरपाठ आढळतो. (सारांश 'आर्त्नि, आर्ति, अर्ति' असे तीन एकाच अर्थाचे वाचक भाषेंत शब्द आहेत असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.)

---